

# श्री प्रमाणसहस्री.

( मराठी भाषांतर. )

लेखक,

बाळकृष्ण रघुनाथ शास्त्री पणशीकर,

पेडणें—गोवा.

---



प्रतिज्ञा—

… माणसाहस्रीं ये पठेयुरहर्निशम् ।
… देहं भवेयुस्ते धर्मनीतिविचक्षणाः ॥

अर्थः—हा "प्रमाणसहस्री" ग्रंथ जे नेहमीं वाचतील ते खरोखर धर्म व नीति जाणण्यांत चतुर होतील.

---



शके १८५०. सन १९२८.

किंमत २॥ रुपये.



# श्री प्रमाणसहस्त्री.

(मराठी भाषांतर.)

लेखक,

बाळकृष्ण रघुनाथ शास्त्री पणशीकर,

पेडणें—गोवा.

---

**प्रतिज्ञा—**

इमां प्रमाणसाहस्त्रीं ये पठेयुरहर्निशम् ।
निःसंदेहं भवेयुस्ते धर्मनीतिविचक्षणाः ॥

अर्थः—हा "प्रमाणसहस्त्री" ग्रंथ जे नेहमीं वाचतील ते खरोखर धर्म व नीति जाणण्यात चतुर होतील.

---



शके १८५०. सन १९२८.

किंमत २॥ रुपये.

# प्रकाशकाचे दोन शब्द.

कांहीं वर्षांपूर्वी मुंबईस राहत असतां आह्मांला एके दिवशीं जरीपुराण्याच्या दुकानांत कांहीं जुन्या पुस्तकांचा ढीग दिसला. तो पहात असतां त्यांत "प्रमाणसहस्री" या नांवाचें एक पुस्तक आढळलें. पुस्तक हातांत घेऊन उघडून पाहिलें तर संस्कृत मूळ ग्रंथांच्या वचनांचा संग्रह गुजराथी भाषेंत शब्दार्थ व विवरण असलेला आढळून आला. यावरून तें पुस्तक संग्राह्य वाटल्यामुळें विकत घेतलें. परंतु त्यावेळीं अनेक नियमित व्यवसायांमुळें तें पुस्तक स्वस्थपणें वाचण्यास सवड झाली नाहीं. नंतर कांहीं वर्षांनीं, श्रीकृपापात्र श्रीमंत रावराजे आत्माराम वासुदेव प्रभु देसाई, व्हायकाउंट पेडणें–गोवा, [illegible]नीं मला आश्रय दिल्यामुळें माझें घरींच राहणें झालें. 'कोणतीहि गोष्ट योग आल्या[illegible] होत नाहीं' असें ह्मणतात तें कांहीं खोटें नाहीं. तें पुस्तक स्वस्थपणानें १०–२० [illegible]ीं चाळून पाहिलें तेव्हां त्यांत वेद, वेदांत, धर्मसूत्रें, स्मृति, पुराणें, इतिहास, [illegible]त, ज्योतिष, वैद्यक आणि नीति वगैरे शास्त्रांतील मूल प्रमाणवाक्यांचा ठिक[illegible]ीं उल्लेख आढळूं लागला व ग्रंथाबद्दल अधिक आदर वाढला.

[illegible] ग्रंथाचीं सृष्टि, आचार व विचार अशीं तीन प्रकरणें आहेत. पहिल्या प्रकरणांत [illegible]लिक प्राणिवर्ग, वनस्पतिवर्ग वगैरे पदार्थांचें व खगोलिक ग्रह, तारे वगैरे [illegible]ांचें यथास्थित वर्णन आलें आहे, दुसऱ्या प्रकरणांत प्रत्येक मनुष्यानें व्यव[illegible] कसें वागावें हें सप्रमाण प्रतिपादन केलें आहे. आणि तिसऱ्या प्रकरणांत जगत्, [illegible]त्मा व परमात्मा यांच्या संबंधाचें विवेचन केलें आहे. अर्थात् हें पुस्तक बाल व [illegible], स्त्री व पुरुष, गुरु व शिष्य, श्रद्धाळू व सुधारक, नवमतवादी व पुराणमताभिमानी, [illegible]कारणी व धर्मकारणी वगैरे कोणत्याहि प्रकारच्या लोकांस या पुस्तकाचा अतिशय [illegible]योग होणारा आहे. अशा तऱ्हेचें ग्रंथरत्न आमच्या मातृभाषेंत असावें व त्याचा [illegible]राष्ट्रभाषाभिमान्यांस लाभ व्हावा हें योग्य आहे. ग्रंथ उत्तम आहे खरा पण तो [illegible]ाठीं भाषेंत झालेला नाहीं, तरी तशा तऱ्हेचा प्रयत्न आपणच स्वतः फावल्या वेळांत [illegible]रून पहावा अशी इच्छा झाली. परंतु त्या कामीं गुजराथी भाषा चांगली अवगत [illegible]जे होती. आणि आमची कांहीं तशी नाहीं. तथापि जो कांहीं थोडाबहुत प्रवेश [illegible]ला तो पेन्शनर श्री. चंपकलाल दिवाणजी रा. सुरत, यांच्या परिचयाचें फल होय.

मुंबईस असतेवेळीं, जवळजवळ ७–८ वर्षें या सद्गृहस्थांनीं स्वतःस संस्कृत [illegible]शिकविण्यासाठीं मासिक वेतन देऊन विद्यार्थीदशेंतच मला आश्रय दिला होता. तेव्हां त्यांच्या येथील सर्व मंडळीशीं गुजराथींतच दळणवळण झाल्यामुळें त्या भाषेचा साधारण परिचय झाला. पुढें हें काम करतेवेळीं ज्या शब्दांचा अर्थ बरोबर समजला नव्हता किंवा संदिग्ध होता, तेथें संकेत करून गेल्या वर्षी दिवाळीस सुरतेस गेलों होतों तेव्हां त्यांस विचारून तो सुधारून घेतला. आपला महत्त्वाचा वेळ खर्च करून त्यांनीं तो मला सांगितल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

आतां ह्या मूळ ग्रंथ कोणी रचला याबद्दल दोन शब्द लिहिणें अत्यावश्यक आ[illegible] शेट प्रयागजी ठाकरसी मूळजी या नांवाचे गृहस्थ भाटिया ज्ञातींतील नामांकित श्री[illegible] विद्वान्, परोपकारी, उदार, परमदयाळू आणि स्वदेशोन्नतीचे पूर्ण अभिमानी होऊन ग[illegible] यांचा जन्म द्वारकेनजीक वरवाळा गांवीं संवत् १९०६ सालीं चैत्र व. ३ रोजीं झा[illegible] याच सद्गृहस्थांनीं "प्रमाणसहस्री" हा ग्रंथ मोठ्या खटपटीनें रचला व त्या[illegible] शेवटीं स्वकृत भगवद्गीतेचें गुजराथी समश्लोकी भाषांतर जोडून छापला. तो हायस्कू[illegible] कॉलेजच्या विद्यार्थ्यांस, लायब्रऱ्यांतून व इतर लोकांस, ते भेटीदाखल देत असत. आ[illegible] हा लोकोपयोगी ग्रंथ नेहमीं लोकांच्या वाचनांत यावा या हेतूनें त्यांनीं एक फंड उभा-रून दर चवथ्या वर्षीं हा ग्रंथ छापवून प्रसिद्ध करावा आणि पूर्वीप्रमाणें सर्वांस भेटी-दाखल द्यावा अशी व्यवस्था केली आहे.

या ग्रंथाचें मराठी भाषांतर होऊन तें माझ्या हातून पुढें येण्याचें सर्वस्वी यश आमचे परमोदार श्रीमंत रावराजे आत्माराम वासुदेव प्रभु देसाई, व्हायकाउंट पेडणें-गोवा, यांसच आहे. या थोर सद्गृहस्थांनीं सदर ग्रंथाचें महत्त्व व उपयुक्तता ओळखून आरंभीं मदत करण्याचें आश्वासन दिलें आणि अखेरपर्यंत आर्थिक सहाय्यता केली याबद्दल आम्हींच नव्हे, तर वाचकांनींहि सदर महाशयांस अनेक धन्यवाद देणें योग्य आहे.

हा ग्रंथ माफक दरानें, वेळेवर व चांगला छापवून दिल्यामुळें मनोरंजन प्रेसचे म्यानेजर श्रीयुत दामोदर रघुनाथ मित्र, यांचे आभार आणि तपासण्याचें काम आपला अमूल्य वेळ खर्च करून ती. श्री. वासुदेवशास्त्री काका पणशीकर, प्रधान पंडित निर्णयसागर प्रेस, यांनीं केल्यामुळें त्यांचेंहि अंतःकरणपूर्वक उपकार मानतों.

आतां या पुस्तकांत जे कांहीं गुण असतील ते मूळ ग्रंथलेखकाचे व दोष मात्र आमच्याकडून घडण्याचा संभव आहे. पोस्टमननें बरोबर टपाल आणून पोंचविल्यास त्यास शाबासकी देखील नाहीं, पण एखादें पत्र मागेंपुढें झाल्यास ,तो तक्रारीस पात्र होतो, तद्वत् भाषांतरकर्त्याची स्थिति आहे. ह्मणून ज्या कोणास या ग्रंथाविषयीं कांहीं सूचना करणें असतील त्यांनीं त्या आमच्याकडे अवश्य पाठवाव्या. पुनर्मुद्रणाचा सुयोग आल्यास त्यावेळीं त्यांचा योग्य विचार करूं व आह्मीहि शक्य ती सुधारणा करूं.

**सूचना**—हें पुस्तक ४० वर्षांपूर्वीं प्रसिद्ध झालें असल्यामुळें इतक्या अवधींत त्या त्या देशांतील मनुष्यादिकांच्या संख्येंत जो कांहीं फरक झाला असेल तो अर्थातच या ग्रंथां-तहि तसाच राहणें शक्य आहे. मूळ वचनांतील पाठ अशुद्ध वाटले ते क्वचित् बदलले आहेत. पृ. ७३ वर १५१$\frac{3}{4}$ या अंकांच्या ठिकाणीं १५८१$\frac{3}{4}$ असे अंक पाहिजे[illegible]

हा ग्रंथ संग्रहीं ठेवून व याचा योग्य उपयोग करून घेऊन, अशा तऱ्हेचा प्रयत्न कर[illegible]-ऱ्यांस जनता प्रोत्साहन देईल अशी आशा व्यक्त करून हे लांबलेले दोन शब्द पुरे करीं.

दीपावली श. १८५०
पेडणें-गोवा.
} वा. र. पणशीकर.



॥ ॐ तत्सद्ब्रह्मणे नमः ॥

# ॥ प्रस्तावना ॥

यस्माज्जातं जगत्सर्वं यस्मिन्नेव विलीयते ।
येनेदं धार्यते चैव तस्मै विश्वात्मने नमः ॥

—शंकर.

ज्यापासुनी विश्व समस्त झालें ज्यामाजि हें होइ विलीन मालें ।
जो हें धरी सर्व समर्थ ऐसा विश्वात्मका त्या प्रणमूं न कैसा ॥

कोणत्याहि कार्याविषयीं प्रयोजनाशिवाय प्रवृत्ति होण्याचा संभव नाहीं; या नियमाप्रमाणें हाहि ग्रंथ रचण्यामध्यें कांहीं तरी प्रयोजन असलें पाहिजे. ह्मणून त्याविषयीं दोन शब्द आरंभीं लिहिले पाहिजेत. पुष्कळ वर्षांपासून माझ्या वाचनांत अनेक संस्कृत ग्रंथ आल्यामुळें प्राचीन आर्य पुरुषांचे सार्वजनिक उत्तम विचार समजूं लागले, त्यावरून मी विचार केला कीं, सांप्रतकालीं हे उत्तम विचार एक ग्रंथ रचून त्यांत प्रमाणासह दाखविण्यास योग्य आहेत. कारण मनुष्य जितका प्रमाणवाक्यें वाचून सुधरतो, तितका उपदेशानें सुधरत नाहीं, आणि हे विचार आधुनिक जनतेच्या वाचनामध्यें आले तर तिच्या ध्यानांत येईल कीं, प्राचीन आर्यांनीं आतांच्या प्रमाणें साधनें नसतांहि अनेक विषयांसंबंधीं केवढें ज्ञान मिळविलें होतें ? आणि कोणता तरी विषय घेतल्यावांचून ग्रंथाची रचना होण्याचा संभव नाहीं, ह्मणून कोणता विषय घ्यावा असा विचार करीत असतां मी असें ठरविलें कीं, एखादा कठिण विषय घेण्यापेक्षां जर सार्वजनिक अनेक विषय घेतले असतील, तर ग्रंथ सर्वांच्या उपयोगी होईल, कारण कठिण विषयांचे ग्रंथ तर निरनिराळे लिहिलेले आहेतच, त्यांपासून ज्यांनां ज्या विषयाचें ज्ञान मिळविण्याची इच्छा असेल, त्यांस तें ज्ञान त्या त्या विषयांसंबंधीं लिहिलेले ग्रंथ वाचल्यानें मिळूं शकतें, परंतु अनेक विषयांचा जर एका ग्रंथांत समावेश होईल, तर तो एकच ग्रंथ वाचल्यानें अनेक विषयांच्या मूलतत्त्वांचें वाचकांस ज्ञान होईल, आणि त्यासंबंधीं विशेष ज्ञान मिळविण्यामध्यें त्यांची स्वतःची प्रवृत्ति होईल, अशा विचारानें या ग्रंथामध्यें, सृष्टि, आचार व विचार या नांवाच्या तीन प्रकरणांच्या पोटांत ग्रंथ पुष्कळ वाढूं नये अशा प्रकारें संक्षेपानें सार्वजनिक विषयांसंबंधीं लेखन केलें आहे, जरी या तीनही प्रकरणांत पुष्कळ विषय आहेत तरी त्या सर्वांचा समावेश याप्रमाणें होऊं शकतो.

**ॐ तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः संभूतः । आकाशाद्वायुः । वायोरग्निः । अग्नेरापः । अद्भ्यः पृथिवी । पृथिव्या ओषधयः । ओषधीभ्योऽन्नम् । अन्नाद्रेतः । रेतसः पुरुषः । इति सृष्टिः ॥**

त्या श्रुतिप्रतिपाद्य सर्वव्यापी परमात्म्यापासून आकाश उत्पन्न झालें, आकाशापासून वायु, वायूपासून अग्नि, अग्नीपासून जल, जलापासून पृथ्वी, पृथ्वीपासून ओषधी ओषधींपासून अन्न, अन्नापासून वीर्य, आणि वीर्यापासून पुरुष उत्पन्न झाला आहे. याप्रमाणें सृष्टि.

**सत्यं वद । धर्मं चर । स्वाध्यायान्मा प्रमदः । आचार्याय प्रियं धनमाहृत्य प्रजातन्तुं मा व्यवच्छेत्सीः । सत्यान्न प्रमदितव्यम् । धर्मान्न प्रमदितव्यम् । कुशलान्न प्रमदितव्यम् । भूत्यै न प्रमदितव्यम् । यान्यनवद्यानि कर्माणि तानि सेवितव्यानि नो इतराणि । यान्यस्माकं सुचरितानि तानि त्वयोपास्यानि नो इतराणि । इत्याचारः ॥**

खरें बोल, धर्माचरण कर, विद्याभ्यासांत गैरसावध राहूं नकोस, विद्यागुरूस प्रिय धन दे आणि नंतर प्रजातंतूचा विच्छेद करूं नकोस, सत्यांत प्रमाद करूं नकोस, धर्मात प्रमाद करूं नकोस, कुशलांत प्रमाद करूं नकोस, ऐश्वर्य मिळविण्यांत प्रमाद करूं नकोस, जीं अनिंद्य कर्में असतील तीं करावीं, दुसरीं करूं नयेत, आणि आमचीं जीं चांगलीं आचरणें असतील तीं त्वां ग्रहण करावीं, दुसरीं करूं नयेत. याप्रमाणें आचार.

**किं कारणं ब्रह्म । कुतः स्म जाता जीवामः केन । क्व च संप्रतिष्ठिताः । केन सुखेतरेषु वर्तामहे । इति विचारः ॥**

जगताचें कारण काय ब्रह्म आहे ? आह्मीं कोठून उत्पन्न झालों ? कशानें जिवंत राहतों ? कोणच्या आधारावर राहिलों आहोंत ? आणि कशामुळें सुखदुःखांत राहतों ? याप्रमाणें विचार.

याप्रमाणें संपूर्ण ग्रंथाचा समावेश या तीन औपनिषद मंत्रांमध्यें होऊं शकल्यामुळें सर्व ग्रंथाचा उपक्रम व उपसंहार यावरून समजण्यासारखा आहे. आणि ज्यास अनेक विषयांसंबंधीं ज्ञान मिळविण्याची इच्छा असेल, तो या ग्रंथाचा अधिकारी समजावा. आणि त्याला या विषयांसंबंधीं ज्ञान होणें या स्वरूपाचा ग्रंथांत संबंध आहे. हाताशिवाय लिपि लिहितां येत नाहीं व वाणीशिवाय भाषा बोलतां येत नाहीं, यावरून असें सिद्ध होतें कीं, जे कांहीं ग्रंथ रचलेले आहेत ते सर्व मनुष्यांनीं रचलेले आहेत. मनुष्य सर्वज्ञ नसल्याकारणानें ज्या ज्या विषयासंबंधीं लिहितो त्यांत त्याची चूक होण्याचा संभव आहे. म्हणून श्रीमद्भागवताच्या एकादश स्कंधांत श्रीदत्तात्रेय महामुनींनीं सांगितलें आहे कीं,

अणुभ्यश्च महद्भ्यश्च शास्त्रेभ्यः कुशलो नरः ।
सर्वतः सारमादद्यात् पुष्पेभ्य इव षट्पदः ॥

शहाण्या मनुष्यानें सर्व लहान मोठ्या शास्त्रांतून–पुष्पांतून भ्रमर जसा मकरंद घेतो त्याप्रमाणें–सार ग्रहण करावें.

त्याचप्रमाणें योगवासिष्ठाच्या मुमुक्षुप्रकरणाच्या १८ व्या सर्गांत वसिष्ठमुनींनीं श्रीरामचंद्रास सांगितलें आहे कीं,

अपि पौरुषमादेयं शास्त्रं चेद्युक्तिबोधकम् ।
अन्यत्त्वार्षमपि त्याज्यं भाव्यं न्यायैकसेविना ॥

निःपक्षपाती मनुष्यानें युक्तिबोधक शास्त्र साधारण पुरुषानें रचलेलें असलें तरीहि ग्रहण करावें; परंतु युक्तिशून्य शास्त्र ऋषिप्रणीत जरी असलें तरी ग्रहण करूं नये.

युक्तियुक्तमुपादेयं वचनं बालकादपि।
अन्यत्तृणमिव त्याज्यमप्युक्तं परमेष्ठिना ॥

कारण युक्तियुक्त वचन बालकापासूनहि ग्रहण करण्यास योग्य आहे, आणि युक्ति-शून्य वचन ब्रह्मदेवानें सांगितलें असलें तरीहि तृणाप्रमाणें त्याग करण्यास योग्य आहे.

योऽस्मत्तातस्य कूपोऽयमिति कौपं पिबेत्पयः ।
त्यक्त्वा गाङ्गं पुरःस्थं तं कोऽनुशास्त्यतिरागिणम् ॥

असें असतांहि जो "ही आमच्या बावांनीं बांधलेली विहीर आहे" अशा दुराग्रहानें जवळ असलेलें गंगेचें गोड पाणी टाकून विहिरीचें खारें पाणी पितो, अशा अभिमानी पुरुषास कोण उपदेश करील ?

करितां ज्यांतून अल्प श्रमानें पुष्कळ ज्ञान मिळेल असा हा "प्रमाणसहस्री" ग्रंथ सुज्ञ लोक शुद्ध मनानें सुधारून वाचतील अशी आशा करितों.

ता. १० माहे फेब्रुआरी, सन १८८७.

ग्रंथकर्ता.



श्री

# अर्पणपत्रिका.

हा ग्रंथ श्रीमंत रावराजे आत्माराम वासुदेव
प्रभु देसाई पेडणें–गोवा यांस, त्यांचे
ठिकाणीं वसणाऱ्या विद्याप्रेम सुशी-
लता, मर्मज्ञता, उदारता इत्यादि
गुणांस लुब्ध होऊन प्रकाशकानें
आदरपूर्वक अर्पण
केला असे.

शुभं भवतु.



श्रीमंत रावराजे
आत्माराम वासुदेव प्रभु देसाई, पेडणें—गोवा.

# अनुक्रमणिका

## सृष्टिप्रकरण

## आचारप्रकरण

**समृद्धि मिळविण्यांत गैरसावध न राहण्याबद्दल उपदेश पृष्ठ ४०३ ते ४३८**



**अनिंद्य कर्म आचरण्याचा व निंद्य कर्म सोडण्याचा उपदेश पृष्ठ ४३९ ते ४४७**

**गुरु वगैरे वडिलांचें सदाचरण स्वीकारण्याचा व दुराचरण सोडण्याचा उपदेश पृष्ठ ४४७ ते ४५०**

इत्यनुक्रमणिका.

॥ ॐ तत्सद्ब्रह्मणे नमः ॥

श्री

# प्रमाणसहस्री



## ॥ सृष्टिप्रकरणप्रारंभः ॥

### उत्पत्तिवर्णन.



**ॐ यो देवोऽग्नौ योऽप्सु यो विश्वं भुवनमाविवेश ।**
**य ओषधीषु यो वनस्पतिषु तस्मै देवाय नमो नमः ॥ १ ॥**

—श्वेताश्वतरोपनिषद्.

जो देव अग्नींत जलांत राही व्यापोनि जो विश्व समग्र पाही ।
जो ओषधींमाजि वनस्पतींत देवा तया नम्र असों कृतींत ॥ १ ॥

या अनंत आकाशांत आधाराशिवाय असलेले सूर्य, चंद्र, पृथ्वी, ग्रह व नक्षत्रादि असंख्य तेजोगोलक, वायु, अग्नि व उदक आणि पृथ्वीवरचे पर्वत, वनें, नद्या, समुद्र व नाना प्रकारचे अनेक स्थावर जंगमात्मक प्राणिवर्गादि अपार चमत्कारिक सृष्ट पदार्थ पाहून कोणताहि विद्वान् पुरुष त्यांच्या उत्पत्तिसंबंधीं विचार करील, तर तो आश्चर्यचकित झाल्याशिवाय राहणार नाहीं. त्याच्या मनांत या सृष्ट पदार्थरूप कार्याचें कांहीं तरी कारण असलें पाहिजे, असा विचार येईल. कारण, वैशेषिक दर्शनांत पहिल्या अध्यायाच्या दुसऱ्या आह्निकाच्या आरंभीं कणादमुनीनें सांगितलें आहे कीं,

**कारणाभावात् कार्याभावः ॥ २ ॥**

कारणावांचून कार्याची उत्पत्ति होत नाहीं ॥ २ ॥

अनुभवहि सर्वांचा असाच आहे. तरी या आश्चर्यकारक सृष्टीची उत्पत्ति कारणाशिवाय झाली असेल असें संभवत नाहीं. करितां सूक्ष्म बीजरूप कारणापासून ज्याप्रमाणें मोठ्या वटवृक्षरूप कार्याची उत्पत्ति होते, तद्वत् मनानें ज्याचें स्वरूप समजणें शक्य नाहीं, अशा एखाद्या अद्भुत कारणापासून या मोठ्या सृष्टिरूप कार्याची उत्पत्ति झाली असावी असें संभवतें. याविषयीं आर्य जनतेच्या अति प्राचीन धर्माचें प्रतिपादन करणाऱ्या वेदांच्या उपनिषद् भागामध्यें उत्तम रीतीनें विचार केला आहे. ऋग्वेदाच्या ऐतरेयारण्यकाच्या उपनिषद्भागाच्या आरंभीं सांगितलें आहे कीं,

**आत्मा वा इदमेक एवाग्र आसीत् ॥ ३ ॥**

सृष्टीच्या पूर्वीं हें आत्मरूपच होतें ॥ ३ ॥

तसेंच शुक्लयजुर्वेदाच्या बृहदारण्यक उपनिषदाच्या पहिल्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**आत्मैवेदमग्र आसीत् ॥ ४ ॥**

हें जगत् पूर्वीं आत्माच होतें ॥ ४ ॥

सामवेदाच्या छांदोग्य उपनिषदाच्या सहाव्या प्रपाठकांत सांगितलें आहे कीं,

**सदेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयम् ॥ ५ ॥**

हे सोम्य, सृष्टीच्या पूर्वीं हें जगत् एकच अद्वितीय व सत्स्वरूप होतें ॥ ५ ॥

अथर्ववेदाच्या गोपथ ब्राह्मणाच्या आरंभींपण असेंच सांगितलें आहे कीं,

**ब्रह्म ह वा इदमग्र आसीत् ॥ ६ ॥**

पूर्वीं हें जगत् ब्रह्मच होतें. ॥ ६ ॥

याप्रमाणें वेदांमध्यें सृष्टीचें कारण एक अद्वितीय परमात्माच सांगितलें आहे, आणि तो सर्वज्ञ, सर्वशक्तिमान्, परमात्माच या कार्यरूप अखिल जगतांत कारणरूपानें सर्वत्र गुप्त राहिला आहे. कृष्णयजुर्वेदाच्या श्वेताश्वतर उपनिषदाच्या सहाव्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा ।**
**कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः साक्षी चेता केवलो निर्गुणश्च ॥७॥**

एकच देव सर्व प्राण्यांच्या ठिकाणीं गुप्त असलेला, सर्वव्यापक, सर्व प्राण्यांचा अंतरात्मा, कर्माचा अधिष्ठाता, सर्वांभूतीं वास करणारा, सर्वसाक्षी आणि सर्वांस चैतन्य देणारा, केवळ निर्गुण आहे ॥ ७ ॥

तसेंच शुक्लयजुर्वेदाच्या बृहदारण्यकाच्या पांचव्या प्रपाठकांत सांगितलें आहे कीं,

**यः सर्वेषु भूतेषु तिष्ठन् सर्वेभ्यो भूतेभ्योऽन्तरो, यं सर्वाणि भूतानि न विदुर्यस्य सर्वाणि भूतानि शरीरं, यः सर्वाणि भूतान्यन्तरो यमयत्येष त आत्माऽन्तर्याम्यमृतः ॥ ८ ॥**

जो सर्वांभूतीं राहून सर्व भूतांहून निराळा आहे, ज्यास सर्व भूतें जाणत नाहींत, ज्याचें सर्व भूतें शरीर आहे, जो वेगळा राहून सर्व भूतांस नियमांत ठेवितो, तो तुझा अंतर्यामी आत्मा अमर आहे ॥ ८ ॥

अथर्ववेदाच्या मुंडकोपनिषदाच्या दुसऱ्या भागांतहि सांगितलें आहे कीं,

**दिव्यो ह्यमूर्तः पुरुषः सबाह्याभ्यन्तरो ह्यजः ।**
**अप्राणो ह्यमनाः शुभ्रो ह्यक्षरात्परतः परः ॥ ९ ॥**

तो तेजस्वी व मूर्तिरहित पुरुष बाहेर व आंत राहणारा, अजन्मा, प्राण व मन यांच्या उपाधीनें रहित, शुद्ध आणि मायेहून पर आहे ॥ ९ ॥

त्याच परमात्म्यापासून आकाशादि पंचमहाभूतांच्या सृष्टिक्रमेंकरून सर्व जगत् उत्पन्न झालें आहे. कृष्णयजुर्वेदाच्या तैत्तिरीय उपनिषदाच्या ब्रह्मवल्लींत सांगितलें आहे कीं,

**तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः संभूतः । आकाशाद्वायुः । वायोरग्निः । अग्नेरापः । अद्भ्यः पृथिवी । पृथिव्या ओषधयः । ओषधीभ्योऽन्नम् । अन्नाद्रेतः । रेतसः पुरुषः ॥ १० ॥**

त्या परमात्म्यापासून आकाश उत्पन्न झालें आहे, आकाशापासून वायु, वायूपासून अग्नि, अग्निपासून उदक, उदकापासून पृथ्वी, पृथ्वीपासून ओषधि, ओषधींपासून अन्न, अन्नापासून वीर्य, आणि वीर्यापासून पुरुष उत्पन्न झाला आहे ॥ १० ॥

तसेंच शुक्लयजुर्वेदाच्या बृहदारण्यकाच्या चवथ्या अध्यायांतहि सांगितलें आहे कीं,—

**यथाग्नेर्विस्फुलिङ्गा व्युच्चरन्त्येवमेवास्मादात्मनः सर्वे प्राणाः सर्वे लोकाः सर्वे देवाः सर्वाणि भूतानि व्युच्चरन्ति ॥ ११ ॥**

जशा अग्नीपासून ठिणग्या उडतात, तसे या आत्म्यापासून सर्व प्राण, सर्व लोक, सर्व देव व सर्व भूतें निघतात. ॥ ११ ॥

अथर्ववेदाच्या मुंडकोपनिषदाच्या दुसऱ्या भागांतहि असेंच सांगितलें आहे कीं,

**एतस्माज्जायते प्राणो मनः सर्वेन्द्रियाणि च ।**
**खं वायुर्भूमिरापः पृथिवी विश्वस्य धारिणी ॥ १२ ॥**

या परमात्म्यापासून प्राण, मन, सर्व इंद्रियें, आकाश, वायु, तेज, उदक आणि जगतास धारण करणारी पृथ्वी उत्पन्न झाली आहे ॥ १२ ॥

परंतु परमात्मा निराकार आहे, सृष्टि साकार आहे, आणि निराकार वस्तूपासून साकार वस्तूची उत्पत्ति संभवत नाहीं. गौतम मुनीच्या न्यायदर्शनाच्या चवथ्या अध्यायाच्या पहिल्या आह्निकांत सांगितलें आहे कीं,

**व्यक्ताद्व्यक्तानां प्रत्यक्षप्रामाण्यात् ॥ १३ ॥**

दृश्य वस्तूपासून दृश्य वस्तूची उत्पत्ति प्रत्यक्ष प्रमाणानें प्रसिद्ध आहे ॥ १३ ॥

याच दर्शनांत याच अध्यायांत दुसऱ्या आह्निकांत सांगितलें आहे कीं,

**मूर्तिमतां च संस्थानोपपत्तेरवयवसद्भावः ॥ १४ ॥**

मूर्त पदार्थांची स्थिति असल्यामुळें परमाणुरूप अवयवांचा सद्भाव आहे ॥ १४ ॥

तसेंच कणादमुनिप्रणीत वैशेषिक दर्शनाच्या दुसऱ्या अध्यायाच्या पहिल्या आह्निकांत सांगितलें आहे कीं,

**कारणगुणपूर्वकः कार्यगुणो दृष्टः ॥ १५ ॥**

कारणगुणपूर्वक कार्यगुण पाहिला आहे ॥ १५ ॥

या नियमाप्रमाणें हें परिदृश्यमान जगद्रूप कार्य अवयवी आहे. म्हणून त्याचें कारणहि अवयवी असलें पाहिजे. करितां सच्चिदानंदरूप निरवयव परमात्म्याच्या एकदेशांत जडरूप मायेची स्थिति सांगितली आहे. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलाच्या नवव्या सूक्तांत सांगितलें आहे कीं,

**पादोऽस्य विश्वा भूतानि त्रिपादस्यामृतं दिवि ॥ १६ ॥**

या परमात्म्याच्या स्वप्रकाशरूपामध्यें एक अंश सर्व विश्व आहे आणि तीन अंश अमृत आहे ॥ १६ ॥

शुक्लयजुर्वेदाच्या बृहदारण्यकाच्या चवथ्या प्रपाठकाच्या तिसऱ्या ब्राह्मणांत सांगितलें आहे कीं,

**द्वे वाव ब्रह्मणो रूपे मूर्तं चैवामूर्तं च ॥ १७ ॥**

जगद्रूपानें मूर्त आणि आत्मरूपानें अमूर्त अशीं ब्रह्माचीं दोन रूपें आहेत ॥ १७ ॥

अथर्ववेदाच्या नृसिंहोत्तरतापिनींत सांगितलें आहे कीं,

**अनुभूतेर्माया च तमोरूपा अनुभूतेस्तदेतज्जडं मोहात्मकम् ॥ १८ ॥**

अनुभवानें माया तमोरूप आहे, आणि तिचें स्वरूप जड व मोहात्मक आहे ॥ १८ ॥

वैशेषिक दर्शनाच्या चवथ्या अध्यायाच्या पहिल्या आह्निकांत सांगितलें आहे कीं,

**सदकारणवन्नित्यम् ॥ १९ ॥**

कारणाशिवायचें परमाणुरूपी सत् नित्य आहे ॥ १९ ॥

**तस्य कार्यं लिङ्गम् ॥ २० ॥**

तें परमाणूंचें कार्य दृश्य वस्तु आहे ॥ २० ॥

**कारणभावात् कार्यभावः ॥ २१ ॥**

कारण असल्यानें कार्य होतें ॥ २१ ॥

ही जडरूप माया निरंतर, निर्विकार परमात्म्याच्या सान्निध्यानें कालांतरानें बीजांतून वृक्ष व वृक्षांतून बीज याप्रमाणें विस्तार पावत आहे. विस्ताराच्या

वेळीं हें दृश्य जगद्रूप होतें, आणि संकोचाचे वेळीं अदृश्य परमाणुरूपानें राहतें. मुंडकोपनिषदाच्या प्रथम भागांत सांगितलें आहे कीं,

**यथोर्णनाभिः सृजते गृह्णते च यथा पृथिव्यामोषधयः संभवन्ति ।**
**यथा सतः पुरुषात् केशलोमानि तथाक्षरात्संभवतीह विश्वम् ॥ २२ ॥**

जसा कोळी तंतु उत्पन्न करतो व ग्रहण करतो, जशा पृथ्वीमध्यें औषधी उत्पन्न होतात, जसे जिवंत पुरुषापासून केश व लोम उत्पन्न होतात, तद्वत् अक्षर मायेपासून हें जगत् उत्पन्न होतें ॥ २२ ॥

श्रीमद्भगवद्गीतेच्या नवव्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**मयाऽध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् ।**
**हेतुनाऽनेन कौन्तेय जगद्विपरिवर्तते ॥ २३ ॥**

माझ्या आत्मस्वरूपाच्या सान्निध्यानें माया चराचर विश्वाची सृष्टि करितें. हे अर्जुना, याच कारणास्तव वारंवार जगत् उत्पन्न होतें ॥ २३ ॥

तसेंच कृष्णयजुर्वेदाच्या श्वेताश्वतर उपनिषदाच्या चवथ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम् ।**
**तस्यावयवभूतैस्तु व्याप्तं सर्वमिदं जगत् ॥ २४ ॥**

मायेस प्रकृति असें समजावें व मायीस महेश्वर असें समजावें. त्या महेश्वराच्या अवयवांनीं हें सर्व जगत् व्याप्त आहे. ॥ २४ ॥

परंतु ही माया स्वभावतः जड असल्यानें स्वतंत्र राहून कांहीं करूं शकत नाहीं, तथापि नित्य सच्चिदानंदरूप परमात्म्यानें व्याप्त आहे, त्यामुळें विस्तार व संकोच पावूं शकते; म्हणूनच हें दृश्य जगत् पूर्वीं ब्रह्मरूप होतें आणि ब्रह्मापासून झालें आहे, असें वेदांच्या उपनिषदांमध्यें सांगितलें आहे. करितां तैत्तिरीय उपनिषदाच्या ब्रह्मवल्लींत सांगितल्याप्रमाणें सृष्टिक्रम संभवतो. याच उपनिषदाच्या याच वल्लींत सांगितलें आहे कीं,

**सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म ॥ २५ ॥**

सत्यरूप, ज्ञानरूप व अनंतरूप ब्रह्म आहे. ॥ २५ ॥

आणि कारणावांचून कार्याची स्थिति होऊं शकत नाहीं, या नियमाप्रमाणें ज्याच्या स्वरूपाचा अंत नाहीं, अशा परमात्म्याशिवाय आकाशाची स्थिति संभवत नाहीं. कारण आकाश अनंत आहे, तें अनंत आत्म्यावांचून राहूं शकत नाहीं, ह्मणून आत्म्यापासून आकाशाची उत्पत्ति सिद्ध होते. जरी आकाश आत्म्याशिवाय पृथक् वस्तु नाहीं, तरीहि दोन किंवा त्यांहून अधिक वस्तूंच्या मधील अवकाश, प्रकाश व अंधकार उपाधिवशात् दृश्य होतो. ह्मणून आकाशाची उत्पत्ति सांगितली आहे. आकाशांत सूक्ष्म बीजरूपानें असलेली माया ब्रह्माच्या सान्निध्यानें वृद्धि पावून प्रथम वायुरूप झाली. तो वायु आकाशावांचून राहूं शकत नाहीं, ह्मणून आकाशापासून त्याची उत्पत्ति सांगितली आहे. तसाच अग्नि वायु नसेल तर विझून जातो, उदाहरणार्थ दिव्यावर मातीचें किंवा धातूचें भांडें झांकलें तर तो दिवा लगेच, भांड्याच्या फटींतून वायु बंद होतांच दुसरा बाहेरचा वायु न मिळाल्यामुळें विझून जातो. परंतु भांड्यास छिद्र असेल, तर त्या द्वारानें बाहेरचा वायु मिळाल्यामुळें विझत नाहीं, ह्मणून अग्नि वायूपासून उत्पन्न झालेला दिसतो, अर्थात् वायूंतच सूक्ष्म रूपानें असलेला अग्नि विशेषरूप झालेला आहे. तसेंच अग्नीशिवाय उदक प्रवाहीरूपानें राहूं शकत नाहीं, आणि घट्ट बनून रूपांतरास प्राप्त होतें, ह्मणून तें अग्नीचें कार्य आहे असें समजलें जातें; अर्थात् अग्नींतच बाष्परूपानें उदक शैत्यास प्राप्त होऊन विशेषतेस प्राप्त झालें आहे. याचप्रमाणें उदकाशिवाय पृथ्वीचीहि स्थिति होऊं शकत नाहीं; कारण त्याच्याशिवाय आर्द्रतेचा नाश होऊन सूर्याच्या आणि पृथ्वीच्या पोटांतील उष्णतेनें पृथ्वीच्या गोलाचा संपूर्ण नाश होईल, ह्मणून पृथ्वी ही जलाचें कार्य जुळतें; अर्थात् ती जलांतच सूक्ष्मरूपानें राहून पृथ्वी या विशेषपणास प्राप्त झालेली आहे. ज्याप्रमाणें दह्यांतील फेंसरूप कठिण भाग मंथन केल्यानें लोणी होतें, तशी जलापासून पृथ्वी झालेली आहे. शुक्लयजुर्वेदाच्या बृहदारण्यकाच्या पहिल्या अध्यायाच्या दुसऱ्या ब्राह्मणांत सांगितलें आहे कीं,

**तद्यदपां शर आसीत्तत्समहन्यत सा पृथिव्यभवत् ॥ २६ ॥**

पाण्यांत जो कठिण भाग होता तो आघातानें घट्ट बनून पृथ्वी झाली आहे. ॥ २६ ॥

अनुभवांतहि असेंच येतें कीं, पक्ष्याच्या अंड्यांत पाण्यासारखा रस असतो, तो घट्ट बनून पक्ष्याचें शरीर होतें; तसेच पाण्यांत असलेले सूक्ष्म परमाणु पुष्कळ कालानें घट्ट बनून पृथ्वीरूप झाले असावेत असें संभवतें. आतां पृथ्वीपासून वनस्पतींची उत्पत्ति प्रसिद्ध आहे. एखाद्या क्षाराशिवायच्या स्थानांतून सुकी माती घेऊन तीच्यावर पाणी शिंपलें असेल, आणि ती माती हवा व प्रकाश असलेल्या जागीं ठेविली असेल तर कांहीं कालानें तींत वनस्पति होते, तर पूर्वी पृथ्वीच्या वेगवेगळ्या भागांवर वायु, तेज व पाणी यांच्या संयोगानें वायुभेदें-करून अनेक प्रकारच्या वनस्पतींची उत्पत्ति झाली असल्यास त्यांत आश्चर्य नाहीं. वनस्पतींची स्थिति पृथ्वीवांचून होऊं शकत नाहीं, ह्मणून ती पृथ्वीचें कार्य आहे; अर्थात् पृथ्वीमध्येंच सूक्ष्मरूपानें असलेली वनस्पति विशेषतेस प्राप्त होत असते. तशीच अन्नाची स्थिति वनस्पतीशिवाय होऊं शकत नाहीं; आणि अन्न वनस्पतीपासून होतें हें प्रसिद्ध आहे; अर्थात् वनस्पतीमध्येंच सूक्ष्मरूपानें असलेलें अन्न विशेषरूप होतें. त्याचप्रमाणें वीर्याची स्थिति अन्ना-शिवाय बनूं शकत नाहीं, हें सर्वांस माहित आहे. ह्मणून अन्नापासून वीर्य होतें; अर्थात् अन्नामध्येंच सूक्ष्मरूपानें असलेलें वीर्य विशेषतेस प्राप्त होतें. आणि वीर्याशिवाय पुरुषाची स्थिति होऊं शकत नाहीं व वीर्यापासून पुरुषाची उत्पत्ति प्रसिद्ध आहे, ह्मणून पुरुष हा वीर्याचें कार्य आहे; अर्थात् वीर्यामध्यें सूक्ष्मरूपानें असलेला पुरुष विशेषतेस प्राप्त झालेला आहे. आतां जसे सर्प, विंचू, घाघोण, सरडा, बेडूक आणि मत्स्य वगैरे लहान मोठे अनेक प्रकारचे जीव जंतू प्रथम पदार्थांचा संयोग होऊन ते सडल्यानें उत्पन्न होतात, व त्यानंतर त्यांच्यांत मैथुन धर्म पहाण्यांत येतो, तशींच पूर्वी पृथ्वीच्या वेगवेगळ्या स्थानांवर हवाभेदेंकरून नानाप्रकारच्या मनुष्यादि जंगम प्राण्यांचीं जोडपींहि पदार्थांचा संयोग होऊन ते सडल्यानें उत्पन्न झालीं असावीं. तसें होण्यास त्या वेळची हवापाणी आणि प्रकाश अनुकूल असावा.

नंतर त्या उत्पन्न झालेल्या जंगम प्राण्यांमध्यें मैथुन धर्म झाल्यानें त्यांच्या वस्तीची वाढ झालेली आहे. आतां प्रथम प्रत्येक जातीच्या मनुष्यादि जंगम प्राण्यांचें एकएक जोडपें उत्पन्न झालें, कीं पृथ्वीच्या वेगवेगळ्या भागांवर हवाभेदेंकरून अनेक जोडपीं झालीं, याविषयीं कांहीं निश्चित सांगतां येत नाहीं. कारण शांत समुद्रांत असलेल्या अतिशय दूरच्या टापूमध्येंहि तेथील हवेप्रमाणें नानाप्रकारचे जंगम प्राणी उत्पन्न झालेले दिसतात, तसे येथें होत नाहींत. जर एकएक जोडप्यापासून पृथ्वीवर प्राण्यांची वस्ति झाली असेल तर त्या टापूमध्यें पूर्वीं त्यांस सोडण्यास कोण गेला असेल; व पृथ्वीवर सर्वत्र एकसारखे प्राणी कां दिसत नाहींत ? याप्रमाणें तैत्तिरीय उपनिषदांत सांगितलेल्या क्रमानें सृष्टि उत्पन्न झालेली आहे. याविषयीं अर्वाचीन विद्वान्हि याप्रमाणें सांगतात कीं, सृष्टीच्या पूर्वीं ही पृथ्वी वायुरूप होती. तो वायु अग्निरूप होऊन अति उष्ण प्रवाही पिंडरूपानें पृथ्वी झाली. त्यावेळीं कोणी एक प्राणी किंवा वनस्पतिहि पृथ्वीवर नव्हती. नंतर कांहीं कालानें तिच्यामध्यें असलेली उष्णता किरणांनीं अनंत आकाशामध्यें पसरली गेल्यामुळें आणि ती वारंवार पाण्याच्या वृष्टीनें मारा केल्यामुळें कांहींशी थंड झाल्यावर प्रथम एक आवरणरूप पुटानें युक्त झाली. त्यानंतर वायु, तेज व पाणी यांच्या संयोगानें तिच्यावर अनेक प्रकारचे वृक्ष उत्पन्न झाले व नाश पावले; असें वारंवार झाल्यामुळें पुष्कळ कालानें त्यांच्या रूपांतरानें पृथ्वी अनेक आवरणयुक्त झाली व प्राण्यांस राहण्यास योग्य झाली; त्यामुळेंच आतां कोणत्याहि ठिकाणीं पृथ्वी खोदून पाहिली असतां, अनेक जातीचे पाषाण व मृत्तिकादिकांचे थर पाहण्यांत येतात. पृथ्वीवर मनुष्याची उत्पत्ति सर्व प्राण्यांच्या अखेरीस झालेली आहे. ज्या क्रमानें ही पृथ्वी वायूपासून झालेली आहे त्याच क्रमानें किंवा त्यापेक्षां कांहीं फेरफार होऊन या अनंत आकाशामध्यें असलेले सूर्य, चंद्र, ग्रह आणि नक्षत्रादि असंख्य गोल वायूपासून झालेले आहेत. बृहदारण्यक उपनिषदाच्या पांचव्या प्रपाठकाच्या तिसऱ्या ब्राह्मणांत सांगितलें आहे कीं,

**वायुरेव व्यष्टिर्वायुरेव समष्टिः ॥ २७ ॥**

वायूच पृथक्‌रूप व वायूच अखिलरूप आहे ॥ २७ ॥

तसेंच श्रीमहाभारतान्तर्गत वनपर्वांत ११३ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**वायुः सर्वमिदं जगत् ॥ २८ ॥**

हें सर्व जग वायु आहे ॥ २८ ॥

आतां जसी या पृथ्वीवर वायुभेदेंकरून अनेक प्रकारच्या स्थावरजंगमात्मक प्राण्यांची वस्ति झालेली आहे, तसीच आकाशामध्यें पाहिलें असतां असंख्य तेजस्वी गोलांवरहि तेथील हवामानानें प्राण्यांची वस्ति झालेली आहे. जर या पृथ्वीवरील थोड्यांत थोडीहि जागा कोणत्याहि जातीच्या सूक्ष्म जीवांशिवाय नाहीं, तर या पृथ्वीहून कित्येक अतिशय मोठे, कित्येक लहान व कितीएक तिच्या एवढे गोल प्राण्यांच्या वस्तीशिवाय असतील असें मानतां येत नाहीं.

याप्रमाणें प्रमाणसहस्रीच्या सृष्टिप्रकरणापैकीं पहिलें उत्पत्तिवर्णन समाप्त.

---

## पृथ्वीवर्णन.

आतां जिच्यावर आपण रहात आहों अशा या पृथ्वीविषयीं प्रथम विचार करण्यांत येत आहे. ही पृथ्वी गोलाकार आहे. ऋग्वेदाच्या पहिल्या मंडलाच्या ३३ व्या सूक्ताच्या ८ व्या ऋचेंत सांगितलें आहे कीं,

**चक्राणासः परीणहं पृथिव्याः ॥ २९ ॥**

पृथ्वीच्या परिधिभोंवतीं फिरतां फिरतां ॥ २९ ॥

पुनः सूर्यसिद्धान्ताच्या भूगोलाध्यायांत सांगितलें आहें कीं,

**मध्ये समन्ताद‍ण्डस्य भूगोलो व्योम्नि तिष्ठति ।**
**बिभ्राणः परमां शक्तिं ब्रह्मणो धारणात्मिकाम् ॥ ३० ॥**

चारी बाजूंनीं ब्रह्मांडाच्या मध्यभागीं असलेला भूगोल ब्रह्माच्या श्रेष्ठ अशा धारणात्मक शक्तीस धारण करून आकाशामध्यें राहतो ॥ ३० ॥

तसेंच आर्यसिद्धान्ताच्या गोलपादांत सांगितलें आहे कीं,

**वृत्तभपंजरमध्ये कक्ष्यापरिवेष्टितः खमध्यगतः ।**
**मृज्जलशिखिवायुमयो भूगोलः सर्वतो वृत्तः ॥ ३१ ॥**

गोल अशा नक्षत्रपंजराच्या मध्यभागीं चंद्रादिकांच्या मार्गांनीं वेष्टिलेला आणि आकाशाच्या मध्यभागीं असलेला पृथ्वीमय, जलमय, तेजोमय व वायुमय भूगोल चारहि बाजूंनीं गोल आहे. ॥ ३१ ॥

तसेंच भास्कराचार्यकृत सिद्धांतशिरोमणीच्या गोलाध्यायांतहि सांगितलें आहे कीं,

**भूमेः पिण्डः शशाङ्कज्ञकविरविकुजेज्यार्किनक्षत्रकक्षा–**
**वृत्तैर्वृत्तो वृतः सन् मृदनिलसलिलव्योमतेजोमयोऽयम् ।**
**नान्याधारः स्वशक्त्यैव वियति नियतं तिष्ठतीहास्य पृष्ठे**
**निष्ठं विश्वं च शश्वत्सदनुजमनुजादित्यदैत्यं समन्तात् ॥ ३२ ॥**

चंद्र, बुध, शुक्र, सूर्य, मंगळ, गुरु, शनि व नक्षत्रें यांच्या वर्तुळ मार्गांनीं वेष्टित आणि कोणत्याहि दुसऱ्या आधाराशिवाय, पृथ्वीमय, जलमय, तेजोमय, वायुमय आणि आकाशमय हा भूमीचा पिंड, गोलाकार असून स्वतःच्या शक्तीनेंच आकाशामध्यें निरंतर राहतो. याच्या या पृष्ठावर दानव, मानव, देव आणि दैत्य यांसह विश्व चारी बाजूंनीं राहिलें आहे. ॥ ३२ ॥

याचप्रमाणें ज्योतिषशास्त्राच्या दुसऱ्या ब्रह्मसिद्धांतादि ग्रंथांत पृथ्वी गोल सांगितली आहे. विचार केला तर प्रत्येक दिवशीं सूर्य, चंद्र, ग्रह व नक्षत्रादि सर्व गोल पूर्वेस उदय पावून पश्चिम दिशेस जाऊन पुनः पूर्वदिशेस उदय पावतात म्हणून पृथ्वी अनंत नाहीं, तर परिच्छिन्न म्हणजे मर्यादित पदार्थ आहे व तो आकाशांत निराधार असलेला दिसतो. सिद्धांतशिरोमणीच्या गोलाध्यायांत भास्कराचार्यांनीं सांगितलें आहे,

**भपंजरस्य भ्रमणावलोकादाधारशून्या कुरिति प्रतीतिः ॥ ३३ ॥**

नक्षत्रपंजराचें भ्रमण दिसल्यामुळें पृथ्वी निराधार आहे असें वाटतें ॥ ३३ ॥

जर आधार असेल तर याप्रमाणें भास्कराचार्यांनीं त्या ठिकाणीं शंका केलेली आहे—

**मूर्तो धर्ता चेद्धरित्र्यास्ततोऽन्यस्तस्याप्यन्योऽस्यैवमत्रानवस्था ।**
**अन्त्ये कल्प्या चेत्स्वशक्तिः किमाद्ये किं नो भूमेः साष्टमूर्तेश्च मूर्तिः ॥**

पृथ्वीस धारण करणारा एखादा मूर्तिमान् पदार्थ असेल, तर त्या पदार्थास धरणारा कोणी दुसरा असला पाहिजे; आणि त्यास धरणारा तिसरा पाहिजे व याप्रमाणें पुनः त्यास धरणारा चवथा असला पाहिजे. असें झालें असतां अनवस्था ह्मणजे ज्याचा अंत सांपडत नाहीं असा दोष प्राप्त होतो. ह्मणून काय शेवटच्यांत स्वशक्ति कल्पावी? असें असेल तर पहिल्यांतच कां कल्पूं नये! अर्थात् पृथ्वीचीच स्वशक्ति आहे, कारण ती ईश्वराच्या अष्टमूर्तींपैकीं एक मूर्ति आहे ॥ ३४ ॥

यावरून पृथ्वीची परिच्छिन्नता सिद्ध होऊन पृथ्वीचा गोलाकारपणाहि सिद्ध होतो. एखादा प्रवासी मनुष्य पृथ्वीच्या कोणत्याहि स्थानापासून पूर्व दिशेच्या समोर निघून प्रवास करील, तर तो पुनः त्याच ठिकाणीं येतो, असें सांप्रतकालीं अनुभवास येतें. त्यावरून पृथ्वी पूर्व—पश्चिम गोलाकार असावी. दक्षिण—उत्तर दिशांकडूनहि पृथ्वी गोल आहे. सूर्यसिद्धांताच्या भूगोलाध्यायांत सांगितलें आहे कीं,

**ध्रुवोन्नतिर्भचक्रस्य नतिर्मेरुं प्रयास्यतः ।**
**निरक्षाभिमुखं यातुर्विपरीते नतोन्नते ॥ ३५ ॥**

पृथ्वीच्या उत्तर किंवा दक्षिण टोंकाच्या समोर जाणाऱ्या पुरुषास त्या त्या दिशेच्या ध्रुवाचा तारा उंच आणि नक्षत्रमंडल खालीं असलेलें दिसतें. तसेंच तेथून पृथ्वीच्या वर्तुल मध्य रेषेच्या प्रदेशासमोर येणाऱ्यास त्याहून विपरीत दिसतें. अर्थात् ध्रुव खालीं आणि नक्षत्रमंडल उंच असलेलें दिसतें ॥३५॥

तसेंच भास्कराचार्यांनीं सिद्धांतशिरोमणीच्या गोलाध्यायांत सांगितलें आहे कीं,

**उदग्दिशं याति यथा यथा नरस्तथा तथा खान्नतमृक्षमण्डलम् ।**
**उदग्ध्रुवं पश्यति चोन्नतं क्षितेः ॥ ३६ ॥**

जसजसा पुरुष उत्तर दिशेस जातो, तसतसें त्यास नक्षत्रमंडल आकाशापेक्षां खालीं दिसतें, आणि उत्तरध्रुवाचा तारा पृथ्वीपेक्षां उंचावर दिसतो ॥ ३६ ॥

पृथ्वी दक्षिण—उत्तर दिशेनें गोल असली तरच असें दिसेल, दुसऱ्या प्रकारची असली तर दिसणार नाहीं. पुनः सपाट प्रदेशांत उभा असलेला पुरुष कोणत्याहि दिशेनें दूरच्या गृहवृक्षादिकांना पाहील, तर त्यास प्रथम त्यांचा वरचा भाग दिसतो. नंतर जसजसा तो पुरुष गृहवृक्षादिकांच्या जवळ जात जाईल, तसतसा त्यास त्यांचा खालचा भाग दिसतो. तसेंच पृथ्वीच्या कोणत्याहि दिशेस समुद्राच्या किनाऱ्याजवळ आलेल्या होडींतील शिडाच्या दांड्यावर बसणाऱ्या मनुष्यांस होडीवर बसणाऱ्या मनुष्यास दिसण्याचे पूर्वी किनाऱ्यावरचे पर्वत वृक्षादि दिसतात. पृथ्वी सपाट असेल तर असें होऊं नये. तर सर्वांस एकसारख्या रीतीनें दूरचे पदार्थ दिसले पाहिजेत. लल्लसिद्धांतांत सांगितलें आहे कीं,

**समता यदि विद्यते भुवस्तरवस्तालनिभा बहूच्छ्रयाः ।**
**कथमेव न दृष्टिगोचरं नुरहो यान्ति सुदूरसंस्थिताः ॥ ३७ ॥**

पृथ्वी जर सपाट असेल, तर अतिशय दूर असलेले तालवृक्षासारखे पुष्कळ उंच वृक्ष मनुष्याच्या दृष्टीस कां पडत नाहींत ? ॥ ३७ ॥

तसेंच सिद्धांतशिरोमणीच्या गोलाध्यायांत सांगितलें आहे कीं,

**यदि समा मुकुरोदरसन्निभा भगवती धरणी तरणिः क्षितेः ।**
**उपरि दूरगतोऽपि परिभ्रमन् किमु नरैरमरैरिव नेक्ष्यते ॥३८॥**

जर भगवती पृथ्वी आरशाच्या ळतासारखी सपाट असेल, तर तिच्यावर फिरणारा सूर्य दूर गेला असला तरीहि उत्तरेच्या टोंकास राहणाऱ्या लोकांप्रमाणें मध्यप्रदेशामध्यें राहणाऱ्या लोकांस कां दिसत नाहीं ? ॥ ३८ ॥

**यदि निशाजनकः कनकाचलः किमु तदन्तरगः स न दृश्यते ।**
**उदगयं न तु मेरुरथांशुमान् कथमुदेति च दक्षिणभागके ॥ ३९ ॥**

जर रात्री उत्पन्न करणारा मेरुपर्वत असेल व सूर्य त्यानें आच्छादित होत असेल, तर तो मेरु कां दिसत नाहीं ? जर हा मेरु उत्तर दिशेस असेल, तर सूर्य दक्षिण दिशेस कां उदय पावत नाहीं ? ॥ ३९ ॥

यावरून असें सिद्ध होतें कीं, पृथ्वी सर्व बाजूंनीं गोल आहे, तथापि समान आणि चक्राकार दिसते, याचें कारण सूर्यसिद्धांताच्या भूगोलाध्यायांत सांगितलें आहे कीं,

**अल्पकायतया लोकाः स्वस्थानात्सर्वतोमुखम् ।**
**पश्यन्ति वृत्तामप्येतां चक्राकारां वसुन्धराम् ॥ ४० ॥**

पृथ्वी गोल आहे, तथापि ही शरीराच्या अल्पपणामुळें लोकांस स्वतःच्या स्थानापासून चारहि बाजूंनीं चक्राकार दिसते. ॥ ४० ॥

तसेंच शिरोमणीच्या गोलाध्यायांतहि याप्रमाणें सांगितलें आहेः—

**समो यतः स्वात्परिधेः शतांशः पृथ्वी च पृथ्वी नितरां तनीयान् ।**
**नरश्च तत्पृष्ठगतस्य कृत्स्ना समेव तस्य प्रतिभात्यतः सा ॥ ४१ ॥**

पृथ्वी मोठी आहे व मनुष्य अतिशय लहान आहे, आणि पृथ्वीच्या घेराचा शेंकडावा अंश समान आहे, ह्मणून पृथ्वीच्या पाठीवर राहणाऱ्या मनुष्यांस संपूर्ण पृथ्वी सारखी असल्याप्रमाणें दिसते. ॥ ४१ ॥

याप्रमाणें पृथ्वी चारहि बाजूंनीं गोल आहे खरी; परंतु तिच्यावर पर्वत, टेकड्या, खड्डे आणि खोरें, दरी असल्यामुळें उंच सखल आहे. उत्तर व दक्षिण टोंकास पुढून चपटी आहे, आणि मध्यभागीं वर आलेली आहे. पर्वत, टेकड्या, खड्डे आणि खोरेंदरी होण्याचे कारणाविषयीं विद्वान् लोक असें अनुमान करतात कीं, पृथ्वीच्या पोटांत गंधक व सुराखार (दारूचे कारखान्यांत उपयोगी औषध) वगैरे ज्वालाग्राही पदार्थ आहेत, त्यांच्याशीं कांहीं उष्णतेचा संबंध होऊन ते वाफरूप होऊन किंवा पाण्याचे परमाणूहि पृथ्वीचे थरांस भेदून तिच्या पोटांतील उष्ण रसाशीं संयोग पावल्यानें वाफरूप होऊन स्वतःच्या प्रसरण शक्तीनें पृथ्वीच्या पृष्ठास कांपवून ह्मणजे भूकंप करून जेथें तेथें उंच सखल करून टाकितात, त्यामुळें पर्वतादि होतात. कांहीं ठिकाणीं

ती वाफ संकुचित झाल्यामुळें पृथ्वीच्या पृष्ठास भेदून टाकिते; त्यामुळें तोफ उडाल्याप्रमाणें मोठा आवाज होऊन त्या वाफेबरोबर पृथ्वींतील उष्ण रस बाहेर येतो, तो थारला असतां गोल खडकरूप टेकडी बनते, आणि भेद पावून छिद्ररूप झालेल्या भूपृष्ठास ज्वालामुखी ह्मणतात. याप्रमाणें कांहीं कालानें भूकंपामुळें पूर्वींचे पर्वत, टेकड्या, ज्वालामुखी खड्डे आणि खोरेंदरी झालेले आहेत, असें कार्य होण्याचा हल्लींहि कांहीं कांहीं वेळीं अनुभव येतो. ज्यावेळीं भूकंप जोरांत होतो त्यावेळीं जलाचे ठिकाणीं स्थल व स्थलाचे ठिकाणीं जल करून टाकितो. पुनः पर्वतादि उंच भागांवर प्रतिवर्षीं वृष्टि झाल्यानें पाण्याचा स्वभाव खालीं वाहण्याचा असल्याकारणानें पाण्याच्या नानाप्रकारच्या प्रवाहरूप नद्या बनून पुढें एकत्र मिळून मोठी नदी होऊन समुद्रामध्यें मिळून जाते. तिच्या प्रवाहाच्या प्रत्येक वर्षीं नानाप्रकारच्या आघातांनीं व तशाच कांहीं कारणास्तव मनुष्यांकडूनहि पृथ्वीवर खड्डे झालेले आहेत, असें हल्लींहि होत असलेलें आढळून येतें. पृथ्वी दक्षिण आणि उत्तर टोंकास चपटी, मध्यें वर आलेली असण्याचें कारण विद्वान् लोक असें सांगतात कीं, जसा एखादा किंचित् मृदु पदार्थ फिरविला असेल, तर त्या बाजूनें चपटा होऊन मध्यभागीं वर येतो, तशी पृथ्वीहि पूर्वीं ज्यावेळीं मृदु होती त्यावेळीं सूर्याच्या आकर्षणानें स्वतःच्या अंगाभोंवतीं फिरण्याची गति प्राप्त झाल्यानें मध्यभागीं वर आलेली आणि बाजूंस चपटी झालेली आहे. अशा प्रकारच्या भूगोलाची दर वर्षीं वाढ होत असते, कारण हिच्यावर स्थावर आणि जंगम प्राण्यांची वारंवार उत्पत्ति व लय झाल्यानें अशा परमाणूंची वृद्धि होते. नंतर आकाशांतील अनेक प्रकारचे सूक्ष्म परमाणु प्रत्येक वर्षीं आकर्षण होऊन यांस येऊन मिळतात त्यामुळें समजण्यांत येत नाहीं. अशा रीतीनें चारी बाजूंनीं हिचें परिमाण वाढत चाललें आहे. भूगर्भशास्त्रवेत्ते सांगतात कीं, पृथ्वीच्या पृष्ठभागापासून सुमारें १० ते १५ कोसांखालीं इतकी उष्णता आहे कीं, पृथ्वीच्या सपाटीवरची कोणतीहि वस्तु त्या ठिकाणीं वितळूं शकेल. ह्मणून पृथ्वीच्या गर्भांत उष्ण रस आहे, तो कांहीं कारणानें गंधकादि ज्वालाग्राही पदार्थांच्या संयोगानें

भूकंप, पाण्याचा उष्ण झरा होण्याचें कारण आहे. त्यानंतर कालांतरानें थर होऊन पृथ्वीची वाढ होऊन ती हल्लींच्या स्थितीस पोंचली आहे.

आर्य सिद्धांताच्या गोलपादांत सांगितलें आहे कीं,

ब्रह्मदिवसेन भूमेरुपरिष्टाद्योजनं भवति वृद्धिः ।
दिनतुल्ययैव रात्र्या मृदुपचितायास्तदिह हानिः ॥ ४२ ॥

ब्रह्मदेवाच्या दिवसानें ह्मणजे ४ अब्ज ३२ कोटि वर्षांनीं पृथ्वीची एक योजन वृद्धि होते; आणि नंतर त्या दिवसाएवढ्याच रात्रीनें या मातीनें वाढलेल्या पृथ्वीचा तितकाच ऱ्हास होतो ॥ ४२ ॥

सिद्धांतशिरोमणीच्या गोलाध्यायांतहि सांगितलें आहे कीं,

वृद्धिर्विधेरह्नि भुवः समन्तात्स्याद्योजनं भूभवभूतपूर्वैः ।
ब्राह्मे लये योजनमात्रवृद्धेर्नाशो भुवः प्राकृतिकेऽखिलायाः ॥४३॥

ब्रह्मदेवाच्या दिवशीं पूर्वीं पूर्वीं उत्पन्न झालेल्या स्थावर जंगमात्मक शरीरांनीं चारी बाजूंनीं पृथ्वीची एक योजन वृद्धि होते; व ब्रह्मदेवाच्या रात्रीच्या लयांत त्या योजनमात्र वृद्धीचा नाश होतो; परंतु सर्व पृथ्वीचा नाश महाप्रलयांत होतो ॥ ४३ ॥

अशा भूगोलाच्या पाठीवर नानाप्रकारच्या वनस्पतींची व प्राणिवर्गाची वस्ति झालेली आहे. आर्यभट्टानें स्वतःच्या सिद्धांताच्या गोलपादांत सांगितलें आहे कीं,

यद्वत्कदम्बपुष्पग्रन्थिप्रचितः समन्ततः कुसुमैः ।
तद्वद्धि सर्वसत्वैर्जलजैः स्थलजैश्च भूगोलः ॥ ४४ ॥

जशी कदंबपुष्पाची ग्रंथि चारहि बाजूंनीं पुष्पानें व्याप्त असते, तसाच भूगोल जलजन्य आणि स्थलजन्य सर्व प्राण्यांनीं व्याप्त आहे ॥ ४४ ॥

सिद्धांतशिरोमणीच्या गोलाध्यायांतहि सांगितलें आहे कीं,

सर्वतः पर्वतारामग्रामचैत्यचयैश्चितः ।
कदम्बकुसुमग्रन्थिः केसरप्रसरैरिव ॥ ४५ ॥

जशी कदंबवृक्षाच्या फुलाची गांठ केसरांच्या विस्तारानें व्याप्त असते, तसा भूगोल चारहि बाजूंनीं पर्वत, बगीचे, गांव व यज्ञशाळा यांच्या समूहानें व्याप्त आहे ॥ ४५ ॥

याप्रमाणें पृथ्वीच्या पाठीवर सर्व प्राणी राहिले आहेत व पृथ्वीच सर्वांचा आधार आहे. ह्मणून ऋग्वेदाच्या पहिल्या मंडलाच्या १६४ व्या सूक्तांत सांगितलें आहे कीं,

बन्धुर्मे माता पृथिवी महीयम् ॥ ४६ ॥

ही मोठी पृथ्वी माझा बंधु व माझी माता आहे ॥ ४६ ॥

पृथ्वीनें सर्वांस धारण करून ठेवण्याचें कारण असें आहे कीं, तिच्यांत आकर्षण करण्याची शक्ति आहे, त्यामुळें ती पदार्थांस आपल्याकडे आकर्षण करून धरून ठेविते. सिद्धांतशिरोमणीच्या गोलाध्यायांत भास्कराचार्यांनीं सांगितलें आहे कीं,

आकृष्टशक्तिश्च मही तया यत् खस्थं गुरु स्वाभिमुखं स्वशक्त्या ।
आकृष्यते तत्पततीव भाति समे समन्तात् क्व पतत्वियं खे ॥ ४७ ॥

पृथ्वीमध्यें आकर्षणशक्ति आहे, ती आकाशांत असलेल्या जड वस्तूस आपल्याकडे स्वशक्तीनें आकर्षण करिते. ती पडत आहे असें भासतें. चारहि बाजूंनीं समान असलेल्या आकाशांत ही पृथ्वी कोठें पडणार? ॥ ४७ ॥

युक्तीनेंहि असेंच सिद्ध होतें कीं, एक मातीचा गोळा अदमासें १० किंवा १२ हातांच्या घेराचा बनविला असेल आणि त्यास एक घरी केली असेल; नंतर त्या गोळ्यावर त्याच्या शक्तीप्रमाणें लहान वनस्पति लाविली असेल, त्यांत अतिशयच लहान खड्डे करून त्यांत पाणी भरलें असेल, व त्याच्या पाठीवर बारीक किडे, पतंग, मुंग्या, माशा वगैरे प्राण्यांची वसती केली असेल, आणि नंतर तो फिरविला असेल, तर कोणतीहि वस्तु त्याच्यावर जवळच्या पृथ्वीचें महदाकर्षण असूनहि त्या मातीच्या गोळ्याचें आकर्षण असल्याकारणानें त्याच्यावरून खालीं पडणार नाहीं, तर त्यास चिकटून राहील; तर मग जिच्याजवळ दुसऱ्या कोणाचेंहि महदाकर्षण नाहीं अशा

पृथ्वीवर आकर्षणानें वस्तुमात्र चिकटून राहील यांत आश्चर्य नाहीं. वैशेषिक-दर्शनासंबंधीं तर्कसंग्रहांत सांगितलें आहे कीं,

**गंधवती पृथिवी । सा द्विविधा । नित्याऽनित्या च ।**
**नित्या परमाणुरूपा । अनित्या कार्यरूपा ॥ ४८ ॥**

पृथिवी गंधवती आहे. ती नित्य व अनित्य अशी दोन प्रकारचीं आहे. परमाणुरूपानें नित्य आणि कार्यरूपानें अनित्य आहे. ॥ ४८ ॥

जो सूक्ष्म वस्तूहूनहि सूक्ष्म असतो, तो परमाणु ह्मटला जातो. न्याय-दर्शनाच्या चवथ्या अध्यायाच्या दुसऱ्या आन्हिकांत भाष्यकार वात्स्यायनानें सांगितलें आहे कीं,

**यतो हि नाल्पतरमस्ति स परमाणुः ॥ ४९ ॥**

ज्याहून अतिशय सूक्ष्म नाहीं, तो परमाणु ह्मटला जातो ॥ ४९ ॥

या परमाणुमात्रामध्यें आकर्षण करण्याची शक्ति आहे, त्यांच्याशीं पाण्या-सारख्या द्रवीभूत पदार्थांचा संयोग झाल्यानें ते परस्परांस आकर्षण करून एकत्र मिळून पदार्थरूप होतात. तर्कसंग्रहांत सांगितलें आहे कीं,

**चूर्णादिपिण्डीभावहेतुर्गुणः स्नेहः ॥ ५० ॥**

चूर्णादिकांचें पिंडीभवन—गोळा होण्यास त्यांतील स्नेहगुण कारण आहे ॥ ५० ॥

गौतम मुनीनें न्यायदर्शनाच्या तिसऱ्या आह्निकांत सांगितलें आहे कीं,

**अनेकद्रव्यसमवायाद्रूपविशेषाच्च रूपोपलब्धिः ॥ ५१ ॥**

अनेक द्रव्यांच्या दृढ संबंधानें व रूपविशेषेंकरून रूपाची प्राप्ति होते ॥ ५१ ॥

कणादमुनीनेंहि वैशेषिकदर्शनाच्या चवथ्या अध्यायाच्या पहिल्या आह्नि-कांत सांगितलें आहे कीं,

**महत्यनेकद्रव्यवत्त्वाद्रूपाच्चोपलब्धिः ॥ ५२ ॥**

मोठ्या पदार्थांच्या ठिकाणीं अनेक द्रव्यवत्त्व असल्याकारणानें रूपाची प्राप्ति आहे ॥ ५२ ॥

याप्रमाणें पदार्थमात्र परमाणूंच्या संयोगानें बनलेला आहे, आणि परमाणूं-मध्यें आकर्षणशक्ति आहे ह्मणून “कारणगुणपूर्वक कार्यगुण होतो” या

नियमाप्रमाणें पदार्थांमध्येंहि आकर्षणशक्ति आहे. परंतु ती शक्ति पृथ्वीवर पडलेल्या पदार्थांमध्यें पाहण्यांत येत नाहीं. कारण, पृथ्वीचें आकर्षण असल्या-कारणानें पदार्थ पृथ्वीबरोबर चिकटून राहिलेले असतात, त्यामुळें परस्पर आकर्षिले जातात. तरीहि ते पृथ्वीचें आकर्षण तोडण्यास असमर्थ असल्या-मुळें तेथेंच पडून राहतात. परंतु पाण्यासारख्या पातळ पदार्थांमध्यें पदार्थांमधील आकर्षणशक्ति समजण्यांत येऊं शकते. पाण्यानें भरलेलें एक भांडें घ्यावें आणि जेथें वायु वाहत नसेल अशा ठिंकाणीं ठेवावें; ज्या वेळीं पाणी स्थिर होईल, त्या वेळीं त्यामध्यें तरूं शकेल अशा पदार्थाचे तुकडे वेगवेगळे सोडावे, थोड्या वेळांत ते तुकडे एकमेकांजवळ गेलेले दिसतांच चिकटून जातील, किंवा त्या भांड्याच्या कांठाजवळ येतील, तर ते बरोबर जाऊन अडकतील. जवळ येतेवेळीं ते जोरानें धांवतात, कारण आकर्षणशक्तीचें बल दिव्याच्या तेजाप्रमाणें जवळून पुष्कळ व दुरून कमी असतें, हें अनुभवसिद्ध आहे. समुद्राच्या मध्यभागीं फुटलेल्या गलबतांतील तरूं शकेल असला माल आणि बुडालेले प्राणी जवळच्या किनाऱ्यावर आकर्षण होऊन येतात, त्याचें कारणहि किनाऱ्याची आकर्षण-शक्ति होय. पुनः लोहचुंबक सुईस आपल्याकडे आकर्षण करितो हें प्रसिद्ध आहे. आणि समुद्रामध्यें फिरणारे नावाडी दिशा समजण्यासाठीं जहाजावर होकायंत्र ठेवितात, त्याच्या सुईचीं टोकें नेहमीं उत्तरध्रुवाच्या आणि दक्षिण-ध्रुवाच्या बाजूस राहतात; व जसजसें त्या ध्रुवाजवळ जावें, तसतशीं त्या सुईचीं टोंकें पृथ्वीच्या सपाटीबरोबर नमत जातात. आणि एकदम उत्तर-ध्रुवाजवळ सुईचें उत्तर टोंक व दक्षिणध्रुवाजवळ सुईचें दक्षिण टोंक पृथ्वीच्या सपाटीसारखें होऊन सुई उभी राहते. यावरून अनुमान होतें कीं, पृथ्वीचीं उत्तरदक्षिण टोंकें लोहचुंबक धातूचा गुण धारण करितात. याप्रमाणें विशेष आकर्षणशक्ति स्पष्ट पाहण्यांत येते, आणि सामान्य शक्तीहि पाण्यांत सोडलेल्या पदार्थांमध्यें दिसते. यावरून स्पष्ट समजतें कीं, पदार्थमात्रामध्यें आकर्षणशक्ति आहे, आणि तीच शक्ति या भूगोलसंबंधीं पदार्थांपासून झालेली आहे. ह्मणून यांमध्येंहि राहिलेली आहे. ह्मणूनच हिच्या पाठीवर

स्थावरजंगमात्मक सर्व पदार्थ राहिले आहेत. परंतु जंगम प्राण्यांचे ठिकाणीं हिचें आकर्षण तोडून गति करण्याचें सामर्थ्य असतें. या भूगोलाचे दोन भाग जलानें व एक भाग स्थलानें व्यापिला आहे. याच्या उत्तर भागामध्यें पृथ्वी विशेष आहे; आणि दक्षिण भागामध्यें पाणी विशेष आहे. याची उत्तर-ध्रुवाच्या व दक्षिणध्रुवाच्या जवळची पृथ्वी, नेहमीं थंडी असल्याकारणानें थिजून गेलेल्या खाऱ्या समुद्रानें वेढिलेली आहे. उत्तर बाजूच्या समुद्रास उत्तरसमुद्र आणि दक्षिण बाजूच्या समुद्रास दक्षिणसमुद्र ह्मणतात. त्यानंतर पूर्वार्धगोलामध्यें परस्पर जोडलेलीं एशिया, आफ्रिका, यूरोप हीं खंडें आणि आस्ट्रे-लिया वगैरे मोठीं व अतिशय लहान द्वीपें आहेत. त्यांपैकीं आफ्रिकाखंड व आस्ट्रेलिया महाद्वीपाचीं दक्षिण टोंकें हीं दक्षिणध्रुवानजीक लांब गेलेलीं आहेत. पश्चिमार्धगोलामध्यें ध्रुवाजवळून आरंभ करून दक्षिणध्रुवाच्या जवळपर्यंत अमेरिकाखंड व पुष्कळ लहानमोठीं द्वीपें आहेत. दोन्ही गोलार्धांच्या पृथ्वीस पूर्वपश्चिमेकडील मोठ्या क्षारसमुद्रानें अंतर पाडिलें आहे. त्यामुळें एका द्वीपा-मधून दुसऱ्या द्वीपामध्यें जावयाचें असल्यास जलमार्गानेंच गेलें पाहिजे. परंतु पूर्वार्धगोलाच्या जमिनीचा ईशान्यकोण व पश्चिमार्धगोलाच्या जमिनीचा वायव्य-कोण इतके जवळ जवळ आलेले आहेत कीं, त्यांच्यामध्यें केवळ १८ कोस रुंद समुद्राची खाडी आहे; तर त्या रस्त्यानें एका गोलार्धाच्या जमिनीमधून दुसऱ्या गोलार्धाच्या जमिनीमध्यें स्थलमार्गानें गेलें पाहिजे. पूर्वार्धगोलाच्या जमिनीच्या पूर्वेस व पश्चिमार्धगोलाच्या जमिनीच्या पश्चिमेस आलेल्या समुद्रास शांतसमुद्र ह्मणतात. आणि पश्चिमार्धगोलाच्या जमिनीच्या पूर्वेस व पूर्वार्ध-गोलाच्या जमिनीच्या पश्चिमेस आलेल्या समुद्रास आटलान्टिकसमुद्र ह्मणतात. सर्व समुद्र उत्तर व दक्षिण समुद्रास मिळाले आहेत. शांतसमुद्र जास्तींत जास्त ४००० कोस रुंद आणि आटलान्टिकसमुद्र जास्तींत जास्त २००० कोस रुंद आहे. पूर्वार्धगोलाचें एशियाखंड भूमंडलांतील सर्व खंडांहून मोठें आहे आणि त्याची लांबी यांतच आलेल्या आरबस्थान देशाच्या नैर्ऋत्य कोणाच्या टोंकापासून तों याच्या उत्तरेस आलेल्या साईबीरिया देशाच्या

ईशान कोणाच्या टोंकापर्यंत ३४०० कोस, व रुंदी याच्या वायव्य कोणाच्या सीमेंत आलेल्या युरल पर्वतापासून तों चीन देशाच्या आग्नेय कोणाच्या टोंकापर्यंत १८०० कोस आहे. आग्नेय कोणांत ८०० कोसपर्यंत एकास एक लागून असणाऱ्या अनेक द्वीपांच्या योगानें हें खंड आस्ट्रेलिया नामक महाद्वीपाशीं संबंध जोडित आहे. या खंडामध्यें सर्व पृथ्वीवरच्या पर्वतांहून अतिशय उंच हिमालय पर्वत भरतखंडाच्या उत्तरेस आहे. त्याचीं गौरीशंकर, कांचनगंगा आणि धवलगिरी नांवाचीं तीन शिखरें अदमासें तीन तीन कोस सरळ रेषेंत उंच गेलेलीं आहेत. या खंडांना अतिशय मोठी १८०० कोस लांब यांगट्सीकियांग नामक नदी चीन देशामध्यें आहे. हें भरतखंड या खंडाच्या दक्षिणटोंकास आहे; आणि त्याच्या दक्षिणेस लंका नामक महाद्वीप आहे. पुनः या खंडाच्या पश्चिम सीमेमध्यें मोठ्यांत मोठें खाऱ्या पाण्याचें कास्पियन नामक सरोवर आहे. हें ३५० कोस लांब व १०० ते २०० कोस पर्यंत रुंद आहे. याच्या उत्तरेस सैबीरिया देशामध्यें गोड्या पाण्याचें बेकल नामक सरोवर १०९ कोस लांब व २० ते ३० कोस रुंद आहे. या खंडाचे भरतखंड, सियाम व ब्रह्मदेशादि दक्षिण देश उष्ण आहेत, तरीहि ते भूमंडलाच्या वर्तुलमध्यरेषेजवळ असल्यामुळें तेथें पाऊस पुष्कळ पडतो, त्यामुळें ते देश अतिशय सुपीक होतात. उत्तरेचे देश ध्रुवानजीक असल्यानें पुष्कळ थंड आहेत, आणि दक्षिणेच्या देशांसारखे सुपीक नाहींत. या खंडामध्यें स्तन्यपानानें वाढणाऱ्या प्राण्यांच्या ह्मणजे पशुवर्गाच्या ३३८ जाति आहेत, त्यांमध्यें २२४ जाति अपूर्व आहेत. त्या इतर खंडांमध्यें दिसत नाहींत. या अपूर्व जातींमध्यें ३३ जाति फक्त वानरांच्या आहेत. पक्ष्यांच्या ९३७ जाति आहेत, त्यांमध्यें ६२१ अपूर्व आहेत. पोटानें चालणाऱ्या—सरपटणाऱ्या प्राण्यांच्या ७६ जाति आहेत, त्यांमध्यें ४९ अपूर्व आहेत. या खंडामध्यें सुमारें ७५ कोटि मनुष्य राहतात, त्यांच्या शरीराचा बांधा व वर्ण हवाभेदेंकरून नानाप्रकारचा झालेला आहे. एशियाखंडाहून लहान आफ्रिकाखंड आहे. तो दक्षिणोत्तर लांबींत १५०० कोस व पूर्व—पश्चिम रुंदींत १००० ते २००० कोस आहे. या खंडाच्या

वायव्य कोणामध्यें रेतीचीं मोठीं ओसाड मैदानें आहेत, आणि मध्यभागांत मोठीं जंगलें आहेत. याच्या दक्षिणेस माडागास्कर नामक महाद्वीप आहे. या खंडांत जंगबार देशाच्या पश्चिमेस केनिया नामक अतिशय उंच पर्वत आहे, तो दोन कोस सरळ रेषेंत उंच गेला आहे. या खंडांत मिसर देशामध्यें नाईल नांवाची मोठी नदी २००० कोस लांब आहे. या खंडामध्यें गोड्या पाण्याचीं नियान्झा, नियासा, टांगानिका नांवाचीं मोठीं सरोवरें आहेत. त्यांतील शेवटचें सरोवर २२५ कोस लांब आहे. या खंडामध्यें स्तन्यपान करणाऱ्या प्राण्यांच्या ४४६ जाति आहेत, त्यांपैकीं ३३९ जाति इतर खंडामध्यें दिसत नाहींत. यामध्यें अनेक जातींचे पक्षी आहेत आणि पोटानें चालणाऱ्या सर्पजाति पुष्कळ आहेत. यांत सुमारें ४ कोटि मनुष्य राहतात, ते त्या ठिकाणची हवा नेहमीं उष्ण असल्याकारणानें श्यामवर्ण असतात. या दोन्ही खंडांहून लहान तिसरें यूरोपखंड, त्याच्या नैर्ऋत्य कोणामध्यें आलेल्या पोर्तुगाल देशाच्या दक्षिण टोंकापासून तों त्याच्या ईशान्य कोणामध्यें आलेल्या युरल पर्वतापर्यंत १७०० कोस लांब व त्याच्या आग्नेय कोणामध्यें आलेल्या खाऱ्या पाण्याच्या कास्पियन सरोवरापासून तों त्याच्या वायव्य कोणामध्यें आलेल्या नार्वे देशाच्या टोंकापर्यंत ११०० कोस रुंद आहे. या खंडांतील फ्रान्स देशांत अतिशय उंच ब्लांक नांवाचा पर्वत आहे, तो सरळ रेषेंत अदमासें दीड कोस उंच गेला आहे. यांतील रशिया देशामध्यें वाल्गा नांवाची मोठी नदी १२०० कोस लांब आहे. हें खंड उत्तरध्रुवाजवळून आल्यामुळें अतिशय थंड आहे, आणि तेथें थंड देशामध्यें होणाऱ्या वनस्पति होतात. पशुवर्गाच्या त्या ठिकाणीं पुष्कळ जाति नाहींत, परंतु पक्षी व सरपटणाऱ्या प्राण्यांच्या अनेक जाति आहेत. या खंडामध्यें ३० कोटि मनुष्य राहतात. या ठिकाणीं उष्णता कमी असल्याकारणानें त्यांचें शरीर बांध्यानें उंच, मजबूत व श्वेतवर्णाचें असतें. या तीन्ही खंडांहून लहान महाद्वीप आस्ट्रेलिया पूर्व—पश्चिम १२५० कोस लांब व उत्तर—दक्षिण १००० कोस रुंद आहे. यामध्यें सर्वांहून उंच कुक नामक पर्वत याच्या ईशान्य कोणांत आहे. तो सुमारें

एक कोस सरळ रेषेंत उंच गेला आहे. यामध्यें मरे नांवाची मोठी नदी १२०० कोस लांब आहे, आणि आमेडीअस, गेईर, गेर्डनर, व टोरेन्स या नांवांचीं मोठीं सरोवरें सुमारें शंभर शंभर कोस लांबीचीं आहेत. या महाद्वीपाच्या मध्यभागाचा अद्यापि पूर्ण शोध लागला नाहीं. यामध्यें अतिशय मोठीं जंगलें आहेत. यामधील जुनी वस्ती जंगली व श्यामवर्णाची आहे. यांत वनस्पति व प्राणिवर्ग अतिशय अपूर्व आहेत. कितीएक दोन पायांच्या पक्ष्यांस लंव असते, व कितीएक चार पायांच्या जनावरांस चोंच असते. पक्ष्यांच्या अदमासें ६०० जाति आहेत. या महाद्वीपावाहेर पूर्वार्ध गोलांत याहून उतरतीं माडागास्कर, लंका, सुमात्रा, बोर्निवो, सेलीविस, जावा, न्युगीनी आणि टास्मानिया नांवांचीं मोठीं आणि दुसरीं अतिशय लहान द्वीपें आहेत. त्या सर्वांत हवाभेदेंकरून नाना प्रकारच्या वनस्पति, पशु, पक्षी, किडे आणि मनुष्य यांची वसाहत झालेली आहे. आतां पश्चिमार्धगोलामध्यें अमेरिकाखंड आहे, याचे उत्तर आणि दक्षिण असे दोन भाग कल्पिले आहेत. उत्तर भागाचें दक्षिण टोंक दक्षिण भागाच्या उत्तर टोंकाशीं बरोवर कमींत कमी २५ कोसांच्या रुंद जमिनीनें मिळालें आहे; असें नसेल तर दोन्ही भाग निराळे द्वीप किंवा खंड ह्मटले गेले असते. उत्तर अमेरिकेची लांबी उत्तर—दक्षिण १७३० कोस आणि रुंदी पूर्व—पश्चिम १६६५ कोस आहे. यामध्यें अतिशय उंच पोपोकेटिपेट नांवाचा पर्वत पाउण कोस सरळ रेषेंत उंच गेलेला आहे. या खंडांत सर्व पृथ्वींतील नद्यांमध्यें सर्वांत मोठी मिसीसिपी नांवाची नदी २२०० कोस लांव आहे. यामध्यें सुपीरियर, ह्युरन, मीचिगन, ईरी आणि आंटेरियो नांवांचीं मोठीं सरोवरें आहेत. त्यांपैकीं सुपीरियर व मीचिगन दोन्ही मिळून सुमारें ४५० कोस लांब आहेत. या खंडाचा उत्तर भाग ध्रुवानजीक आल्यामुळें अतिशय थंड व दक्षिण भाग मध्य रेषेजवळ आल्यामुळें अतिशय उष्ण आहे, तेथें पुष्कळ जातींच्या वनस्पती, नाना तऱ्हेचे पशु—पक्षी व सर्पादि प्राण्यांची वस्ती आहे. तेथील अस्सल रहिवासी जंगली आहेत, ते उत्तर बाजूचे श्वेतवर्णाचे आणि दक्षिण बाजूचे गोधूमवर्णाचे आहेत. यांमध्यें

पावणेपांच कोटी मनुष्यांची वस्ती आहे. दक्षिण अमेरिका त्रिकोणाकृति द्वीपकल्पासारखी आहे. ही दक्षिण–उत्तर २३०० कोस लांब आहे आणि पूर्व–पश्चिम जास्तींत जास्त १६०० कोस आणि कमींत कमी १५० कोस रुंद आहे, यामध्यें अतिशय मोठी एमेझान नांवाची नदी २००० कोस लांब आहे. या खंडामध्यें वनस्पतीहि पुष्कळ जातींच्या चांगल्या होतात. त्यांपैकीं कितीएक जाति अपूर्व आहेत. त्यांमध्यें स्तन्यपान करणाऱ्या प्राण्यांच्या ५३७ जाति आहेत. त्यांपैकीं ४८० जाति तर इतर खंडामध्यें दिसतहि नाहींत. पक्ष्यांच्या जातीहि अनेक आहेत, त्यांमध्यें १००० जाति तर अत्यंत अपूर्व आहेत. या खंडाची अस्सल राहणी जंगली आहे. यांमध्यें सव्वा कोटि मनुष्यांची वस्ती आहे. उत्तर व दक्षिण अमेरिकेची अस्सल वस्ती पूर्वेस एशिया खंडाच्या ईशान्य कोणांतून गेलेली दिसते, आणि ती सुधारलेली असली पाहिजे. कारण या खंडाच्या कित्येक भागांमध्यें खोदून पाहिलें असतां सुधारलेल्या बांधावळीच्या इमारती सांपडतात. परंतु कांहीं कालानें हे लोक जसे चतुर पुरुषाचे मुलगे मूर्ख निपजतात तसे जंगली झाले असावे. पश्चिम गोलार्धामध्यें याशिवाय पुष्कळ लहान व मोठीं द्वीपें आहेत, त्या सर्वांमध्यें हवाभेदेंकरून नाना प्रकारचे स्थावरजंगमात्मक प्राणी उत्पन्न होऊन राहिले आहेत. या सर्व खंडांमध्यें व द्वीपांमध्यें एकंदर मनुष्यांची वस्ती अदमासें १ अब्ज ३० कोटींची धरण्यांत येते. याप्रमाणें भूगोलाच्या स्थलभागावर जशी नाना प्रकारच्या प्राण्यांची वस्ती झाली आहे, तशीच जलभागामध्येंहि हवाभेदेंकरून नानाप्रकारचे मत्स्यादि अनेक जातींचे प्राणी उत्पन्न होऊन राहतात. त्यांपैकीं समुद्रांतील मनुष्य, घोडे, हत्ती, वाघ, सर्प, कांसव व पोपट वगैरे प्राणी कित्येक अंशानें स्थलभागावरील त्याच जातीच्या प्राण्यांसारखे असतात. असा हा भूगोल स्वतःच्या अंगाभोंवतीं चक्रासारखा पश्चिमेपासून पूर्वेस मध्यभागावर दर तासास ५०० कोसांच्या वेगानें २४ तास फिरत राहतो. त्यामुळें यामध्यें दिवस व रात्री होतात. आणि आकाशांत असलेले सूर्य चंद्रादि ग्रह व नक्षत्रादि सर्व गोल नित्य उदय पावून अस्त झालेले दिसतात. आर्यसिद्धांताच्या गोलपादांत सांगितलें आहे कीं,

**अनुलोमगतिर्नौस्थः पश्यत्यचलं विलोमगं यद्वत् ।**
**अचलानि भानि तद्वत् समपश्चिमगानि लङ्कायाम् ॥ ५३ ॥**

जसें समोरच्या गतीनें जाणाऱ्या नौकेमध्यें बसलेल्या पुरुषास अचल अशा किनाऱ्यावरील वृक्ष—पर्वतादिक वस्तु उलट्या गतीनें जातात असें दिसतें, तसें पृथ्वीच्या पूर्व दिशेच्या परिभ्रमणामुळें अचल अशीं नक्षत्रें लंकेमध्यें असणाऱ्या मनुष्यास पश्चिम दिशेस सरळ जात आहेत असें दिसतें ॥ ५३ ॥

तसेंच बृहदार्यसिद्धांतांत सांगितलें आहे कीं,

**भपंजरः स्थिरो भूरेवावृत्यावृत्य प्रातिदैवसिकौ ।**
**उदयास्तमयौ संपादयति ग्रहनक्षत्राणाम् ॥ ५४ ॥**

नक्षत्रमंडल स्थिर आहे, आणि पृथ्वीच आपल्या अंगाभोंवतीं वारंवार भ्रमण करून प्रत्येक दिवशीं ग्रह व नक्षत्रें यांचे उदयास्त करिते ॥ ५४ ॥

आर्यभट्टानंतरच्या ज्योतिष्यांनीं पृथ्वी आपल्या अंगाभोंवतीं फिरते याविषयीं याप्रमाणें शंका केली आहे. ब्रह्मगुप्त सांगतो कीं,

**आवर्तनमुर्व्याश्चेन्न पतन्ति समुच्छ्रयाः कस्मात् ॥ ५५ ॥**

पृथ्वी फिरत असेल तर उंच असलेले पदार्थ कसे पडत नाहींत ? ॥५५॥

लल्लानेंहि सांगितलें आहे कीं,

**यदि च भ्रमति क्ष्मा तदा स्वकुलायं कथमाप्नुयुः खगाः ।**
**इषवोऽभिनभः समुज्झिता निपतन्तः स्युरपांपतेर्दिशि ॥ ५६ ॥**

जर पृथ्वी फिरत असेल तर पक्षी आपल्या घरट्यांजवळ कसे येऊं शकतात ? पुनः आकाशामध्यें उंच फेंकलेले बाण पश्चिमदिशेस येऊन पडले पाहिजेत ? ॥ ५६ ॥

**पूर्वाभिमुखे भ्रमे भुवो वरुणाशाभिमुखो व्रजेद्घनः ।**
**अथ मन्दगमात्तथा भवेत् कथमेकेन दिवा परिक्रमः ॥ ५७ ॥**

पृथ्वीचें पूर्व दिशेस भ्रमण असेल तर, मेघ पश्चिम दिशेस गेले पाहिजेत ? परंतु कदाचित् पृथ्वीचें भ्रमण मंद असेल आणि त्यामुळें मेघ पश्चिमेस गेलेले दिसत नाहींत, असें असेल तर एका दिवसामध्यें पृथ्वीचें भ्रमण कसें होईल ? ॥५७॥

श्रीपतीनेंहि असेंच सांगितलें आहे कीं,

यद्येवमम्बरचरा विहगाः स्वनीड-
मासादयन्ति न खलु भ्रमणे धरित्र्याः ।
किञ्चाम्बुदा अपि न भूरिपयोमुचः स्यु-
र्देशस्य पूर्वगमनेन चिराय हन्त ॥ ५८ ॥

जर याप्रमाणें पृथ्वी भ्रमण करीत असेल, तर आकाशामध्यें उडणारे पक्षी अवश्य आपल्या घरट्यांजवळ येऊं शकणार नाहींत ? पुनः भूभ्रमणाबरोबर देशांचेंहि भ्रमण झाल्याकारणानें मेघ बहुतकालपर्यंत पुष्कळ वृष्टि कसे करीत नाहींत ? ॥ ५८ ॥

भूगोलवेगजनितेन समीरणेन
केत्वादयोऽप्यपरदिग्गतयः सदा स्युः ।
प्रासादभूधरशिरांस्यपि संपतन्ति
कस्माद् भ्रमत्युडुगणस्त्वचलाऽचलैव ॥ ५९ ॥

पुनः भूगोलाच्या भ्रमणाच्या वेगानें उत्पन्न झालेल्या वायूनें पताका वगैरे नेहमीं पश्चिम दिशेकडे उडल्या पाहिजेत आणि मंदिरांचीं व पर्वतांचीं शिखरेंहि पडून गेलीं पाहिजेत, करितां नक्षत्रमंडल फिरतें, आणि पृथ्वी ही अचलच आहे ॥ ५९ ॥

परंतु पृथ्वीमध्यें आकर्षणशक्ति आहे, त्यामुळें उंच असलेलीं शिखरें वगैरे पडत नाहींत, आणि पृथ्वी आपल्या वातावरणासह फिरते, त्यामुळें पक्षी, बाण, मेघ आणि ध्वजादिकांविषयीं शंका केल्याप्रमाणें होत नाहीं. जर कोणी चालत्या बैलगाडीमध्यें, घोड्याच्या गाडीमध्यें, आगगाडीमध्यें, चालत्या होडीमध्यें किंवा आगबोटीमध्यें बसलेला पुरुष कोणतीहि वस्तु सरळ रेषेंत उंच फेंकील तर ती वस्तु पुनः त्याच्या हातांमध्येंच येईल, परंतु मागें पडणार नाहीं. पुनः उडणारे माशी वगैरे बारीक जंतु चालत्या गाडीमध्यें किंवा होडीमध्यें आल्यानंतर त्यांच्या आसपास उडतात, तथापि मागें राहत नाहींत. कारण चालत्या गाडीचा किंवा नौकेचा वेग त्या वस्तूमध्यें आणि जंतूमध्यें येतो, आणि ती वस्तु व जंतु

त्या गाडीहून किंवा नौकेहून अल्प असल्यामुळें त्यांच्या वेगामधून सुटूं शकत नाहींत, ह्मणून त्यांच्या बरोबरच राहतात, हें अनुभवसिद्ध आहे. याचप्रमाणें या भूगोलाच्या भ्रमणाचा वेग त्याच्या आसपास फिरणाऱ्या वातावरणामध्यें आणि वातावरणांत असलेल्या पक्ष्यादि पदार्थांमध्यें येतो; त्यामुळें ते पृथ्वीबरोबरच नेहमीं फिरत राहतात, ह्मणून पृथ्वीच्या भ्रमणानें वातावरणामध्यें कांहीं उलटा वेग उत्पन्न होत नाहीं, व त्यामुळें शिखरें पडत नाहींत, पक्षीहि गाडींतील किंवा नौकेंतील माशीप्रमाणें आपल्या नेहमींच्या ठिकाणीं येऊं शकतात. उंच फेंकलेला बाण पश्चिम दिशेस जात नाहीं, तर चालत्या गाडीमध्यें किंवा होडीमध्यें उसळलेल्या पदार्थाप्रमाणें पुनः तेथेंच पडतो आणि मेघ व पताका वगैरे नेहमीं पश्चिमेच्या बाजूस जात नाहींत. ह्मणून आर्यभट्टानें सांगितल्याप्रमाणें भूगोल फिरतो, आणि नक्षत्रें स्थिर आहेत; परंतु पृथ्वीच्या भ्रमणानेंच त्यांचे नेहमीं उदयास्त दिसतात आणि त्यामुळेंच दिवस व रात्री होतात. उलट, पृथ्वी फिरत नसेल तर उंचावरून सोडलेला कोणताहि जड पदार्थ पृथ्वीचें आकर्षण असल्याकारणानें स्वतःच्या पडण्याच्या स्थानाच्या खालच्या बिंदूवरच पडला पाहिजे; परंतु तसें न होतां तो नेहमीं खालच्या बिंदूपासून पूर्वेस किंचित् दूर पडतो; करितां पृथ्वी पश्चिमेकडून पूर्वेस फिरते, असा विद्वानांनीं निश्चय केला आहे. जसा एकाद्या चालत्या गाडीच्या चक्राच्या घेरावरचा बिंदू त्या चक्राच्या धरीजवळच्या बिंदूहून अधिक वेगानें फिरतो, कारण जवळच्या बिंदूहून दूरच्या बिंदूस अधिक प्रदेश फिरावा लागतो, त्यामुळें असें सिद्ध होतें कीं, फिरत्या वस्तूच्या जवळच्या बिंदूहून दूरच्या बिंदूमध्यें अधिक वेग येतो; त्याचप्रमाणें या फिरणाऱ्या पृथ्वीच्या जवळच्या बिंदूहून पर्वत, देवालयें आणि बंगले वगैरेंच्या शिखरादि उंच भागाच्या बिंदूचा वेग अधिक असतो, तो त्या ठिकाणाहून सोडून दिलेल्या पदार्थामध्यें त्याच्या पृथ्वीवर येईपर्यंत चालू असतो, त्यामुळें ते पदार्थ स्वतःच्या खालच्या बिंदूपासून पूर्वेकडे किंचित् दूर नेहमीं पडतात, हें अनुभवसिद्ध आहे, ह्मणून पृथ्वी फिरते. पुनः आकर्षणशक्तीच्या नियमाप्रमाणें मोठे पदार्थ लहान पदार्थाभोंवतीं फिरत नाहींत, तर सूर्य आणि

नक्षत्रें पृथ्वीच्यां गोलाहून अतिशय मोठे असल्याकारणानें त्याच्या भोंवतीं फिरत नसले पाहिजेत, तर पृथ्वीच्या फिरण्यानेंच ते फिरतात असें भासलें पाहिजे. पृथ्वीचा अर्धगोल सूर्यकिरणांनीं एकाच वेळीं प्रकाशित होतो, त्यावेळीं दिवस असें ह्मणतात. आणि जसजशी पृथ्वी फिरत जाते, तसतसा तिचा पश्चिमभाग सूर्याच्या समोर येऊन प्रकाशित होत जातो, आणि पूर्वभाग पृथ्वीचेंच अंग सूर्याच्या आड आल्यामुळें अप्रकाशित होतो, त्यावेळीं रात्रि असें ह्मणतात. पृथ्वीच्या मध्यभागावर ज्या ज्या ठिकाणीं सूर्याचा उदय आणि मध्याह्न होतो, त्या त्या ठिकाणाहून पूर्व–पश्चिम ६००० कोसांवर सूर्याचा अस्त आणि मध्यरात्र होते. एशिया खंडाच्या या हिंदुस्थान देशाहून अमेरिका खंडाचा मेक्सिको देश ६००० कोस पूर्वपश्चिम दूर आहे, त्यामुळें सांगितल्याप्रमाणें त्या एका देशामध्यें जर सूर्योदय व मध्यान्ह होतो, तर दुसऱ्या देशामध्यें सूर्याचा अस्त आणि मध्यरात्र होते, असें हल्लीं विजेच्या तारायंत्राच्या बातमीनें सिद्ध झालें आहे. आर्यसिद्धांताच्या गोलपादांत सांगितलें आहे कीं,

**उदयो यो लंकायां सोऽस्तमयः सवितुरेव सिद्धपुरे ।**
**मध्याह्नो यमकोट्यां रोमकविषयेऽर्धरात्रिः स्यात् ॥ ६० ॥**

लंकेमध्यें जो सूर्याचा उदय, तोच सिद्धपुरामध्यें अस्त, यमकोटीमध्यें मध्याह्न आणि रोमक देशामध्यें अर्धरात्रि होते ॥ ६० ॥

सिद्धांतशिरोमणीच्या गोलाध्यायांतहि सांगितलें आहे कीं,

**लंकापुरेऽर्कस्य यदोदयः स्यात्तदा दिनार्धं यमकोटिपुर्याम् ।**
**अधस्तदा सिद्धपुरेऽस्तकालः स्याद्रोमके रात्रिदलं तदैव ॥ ६१ ॥**

लंकापुरीमध्यें ज्या वेळीं सूर्याचा उदय होतो, त्या वेळीं यमकोटिपुरामध्यें मध्याह्न, खालच्या सिद्धपुरामध्यें अस्तसमय आणि रोमकपुरामध्यें अर्धरात्रि होते ॥ ६१ ॥

पृथ्वीवर हीं चार पुरींचीं स्थानें आणि सर्व ध्रुवाची वस्ती याविषयीं भास्कराचार्यांनीं गोलाध्यायांत याप्रमाणें सांगितलें आहे कीं,

**लंकाकुमध्ये यमकोटिरस्याः प्राक्पश्चिमे रोमकपत्तनं च ।**
**अधस्ततः सिद्धपुरं सुमेरुः सौम्येऽथ याम्ये वडवानलश्च ॥ ६२ ॥**

लंका पृथ्वीच्या मध्यभागीं आहे, हिच्या पूर्वेस यमकोटि, पश्चिमेस रोमक शहर, आणि खालीं सिद्धपुर आहे. आणि उत्तरेस सुमेरु ह्मणजे पृथ्वीचें उत्तर टोंक व दक्षिणेस वडवानळ ह्मणजे पृथ्वीचें दक्षिण टोंक आहे ॥ ६२ ॥

**कुवृत्तपादान्तरितानि तानि स्थानानि षड् गोलविदो वदन्ति ।**
**वसन्ति मेरौ सुरसिद्धसङ्घा और्वे च सर्वे नरकाः सदैत्याः ॥ ६३ ॥**

हीं सहा स्थानें भूगोलाच्या चवथ्या चवथ्या भागाच्या अंतरावर आहेत, असें भूगोलवेत्ते सांगतात. उत्तर टोंकास देवता आणि सिद्ध यांचा समुदाय राहतो आणि दक्षिस टोंकास दैत्यांसह सर्व नरक राहतात ॥ ६३ ॥

या भूगोलावर राहणाऱ्या मनुष्यांस परस्पर याप्रमाणें वाटतें. सूर्यसिद्धांताच्या भूगोलाध्यायांत सांगितलें आहे कीं,

**उपर्यात्मानमन्योन्यं कल्पयन्ति सुरासुराः ।**
**अन्येऽपि समसूत्रस्था मन्यन्तेऽधः परस्परम् ॥ ६४ ॥**

उत्तर टोंकास राहणारे देव आणि दक्षिण टोंकास राहणारे दैत्य आपआपणांस एक दुसऱ्यांस वर कल्पितात. दुसरेहि भूगोलाच्या समसूत्रामध्यें राहणारे परस्परांस खालीं समजतात ॥ ६४ ॥

तसेंच आर्यभट्टानेंहि गोलपादांत सांगितलें आहे कीं,

**स्वर्मेरुस्थलमध्ये नरको वडवामुखश्च जलमध्ये ।**
**अमरमरा मन्यन्ते परस्परमधः स्थितान्नित्यम् ॥ ६५ ॥**

स्वर्गरूप उत्तर टोंक स्थलाच्या मध्यभागीं व नरकरूप दक्षिण टोंक जलाच्या मध्यभागीं आहे. देव आणि दैत्य नेहमीं परस्परांस खालीं आहेत असें मानितात ॥ ६५ ॥

सिद्धांतशिरोमणीच्या गोलाध्यायांतहि सांगितलें आहे कीं,

**यो यत्र तिष्ठत्यवनीं तलस्थामात्मानमस्या उपरिस्थितं च ।**
**स मन्यतेऽतः कुचतुर्थसंस्था मिथश्च ते तिर्यगिवामनन्ति ॥६६॥**

जो जेथें राहतो, तो तेथील पृथ्वी आपल्या पायांच्या खालीं आहे आणि आपण तिच्यावर राहिलों आहें असें समजतो. म्हणजे भूगोलाच्या चवथ्या चवथ्या भागाच्या अंतरावर राहणारे मनुष्य परस्परांस जणूं वांकडे राहिल्या-सारखे समजतात ॥ ६६ ॥

**अधःशिरस्काः कुदलान्तरस्थाश्छायामनुष्या इव नीरतीरे ।**
**अनाकुलास्तिर्यगधः स्थिताश्च तिष्ठन्ति ते तत्र वयं यथाऽत्र ॥६७॥**

पृथ्वीच्या दुसऱ्या गोलार्धामध्यें राहणारे मनुष्य, पाण्याच्या किनाऱ्यावर उभा असलेल्या मनुष्याच्या पाण्यामध्यें दिसणाऱ्या छायेप्रमाणें जणूं उलटें मस्तक करून राहिले आहेत, आणि याप्रमाणें खालीं व वांकडे असलेले ते कोणत्याहि व्याकुलतेवांचून-आपण जसे येथें राहतों तसे-तेथें राहतात ॥६७॥

परंतु भूगोल चारहि बाजूंनीं गोल आहे, आणि त्याच्या सर्व बाजूंस आकाश आहे, त्यामुळें त्याच्या कोणत्याहि स्थानावर उभा असलेल्या मनुष्याच्या डोक्यावर नेहमीं आकाश असतेंच, म्हणून खालीं वर ही कल्पना व्यर्थ आहे. सूर्यसिद्धांताच्या भूगोलाध्यायांत सांगितलें आहे कीं,

**सर्वत्रैव महीगोले स्वस्थानमुपरि स्थितम् ।**
**मन्यन्ते खे यतो गोलस्तस्य क्वोर्ध्वं क्व वाप्यधः ॥ ६८ ॥**

पृथ्वी सर्व बाजूंनीं गोल आहे, ह्मणून मनुष्य आपापलें स्थान वर आहे असें मानितात. परंतु आकाशामध्यें गोल आहे, त्याची उच्चता किंवा नीचता कोठें आहे ? अर्थात् नाहीं ॥ ६८ ॥

या भूगोलाची वर्तुल मध्यरेषा आणि तिच्या दोन्ही बाजूंचा जो प्रदेश उत्तर आणि दक्षिण अयनांच्या मध्यें आलेला आहे, तेथें सूर्यकिरण सरळ पडल्यामुळें उष्णता अधिक होते, ह्मणून तितक्या प्रदेशास उष्णकटिबंध ह्मणतात, आणि तेथील वस्ती बांध्यानें लहान आणि रंगानें श्यामवर्ण व गोधूमवर्ण असते. उत्तरायण व उत्तरध्रुव यांच्यामध्यें आणि दक्षिणायन व दक्षिणध्रुव यांच्यामध्यें आलेल्या देशांवर सूर्यकिरण वक्र पडल्यानें तेथें उष्णता कमी असते; करितां तितक्या प्रदेशास समशीतोष्ण कटिबंध ह्मणतात,

व तेथील लोक शरीरानें सुदृढ, उंच आणि सफेत रंगाचे असतात. आणि थेट उत्तर व दक्षिण ध्रुवाजवळील देशामध्यें सूर्यकिरण एकदम आडवे पडतात, त्यामुळें तेथें उष्णता नसल्यासारखीच असल्यानें त्यास शीतकटिबंध ह्मणतात; आणि तेथील मनुष्य शरीरानें ठेंगणे, भक्कम आणि सफेत असतात. या सर्व ठिकाणीं राहणाऱ्या मनुष्यांस पृथ्वी गोल असल्यामुळें व तिच्या भ्रमणामुळें सूर्य व नक्षत्रें याप्रमाणें फिरत असलेलीं दिसतात. सूर्यसिद्धांताच्या भूगोलाध्यायांत सांगितलें आहे कीं,

सव्यं भ्रमति देवानामपसव्यं सुरद्विषाम् ।
उपरिष्टाद् भगोलोऽयं व्यक्षे पश्चान्मुखः सदा ॥ ६९ ॥

हें नक्षत्रमंडल उत्तरटोंकवासी देवांस सुलट्या रीतीनें ह्मणजे पूर्व, दक्षिण, पश्चिम व उत्तर दिशांच्या क्रमानें आणि दक्षिण टोंकवासी दैत्यांस याहून उलट्या रीतीनें ह्मणजे पूर्व, उत्तर, पश्चिम व दक्षिण दिशांच्या क्रमानें फिरतें, परंतु मध्यप्रदेशवासी मनुष्यांस नेहमीं डोक्यावर राहून पूर्वेकडून पश्चिम दिशेच्या बाजूस फिरतें ॥ ६९ ॥

देवासुरा विषुवति क्षितिजस्थं दिवाकरम् ।
पश्यन्त्यन्योन्यमेतेषां वामसव्ये दिनक्षपे ॥ ७० ॥

दिवस व रात्री सारख्या होण्याच्या वेळीं देवांस व दैत्यांस सूर्य, क्षितिज —ह्मणजे जेथें पृथ्वी आणि आकाश मिळालेलीं दिसतात, त्या—वृत्तांत असलेला दिसतो. यांस दिवस व रात्री एक दुसऱ्याहून उलटीं होतात ॥ ७० ॥

ब्रह्मगुप्तानेंहि याप्रमाणें सांगितलें आहे:—

सौम्यमपमण्डलार्धं मेषाद्यं सव्यगं सदा देवाः ।
पश्यन्ति तुलाद्यर्धं दक्षिणमपसव्यगं दैत्याः ॥ ७१ ॥

राशिचक्राच्या मेषापासून कन्याराशीपर्यंत उत्तर बाजूचा अर्धा भाग नेहमीं देवांस सुलट्या रीतीनें दिसतो आणि तुळेपासून मीन राशीपर्यंत दक्षिण बाजूचा अर्धा भाग दैत्यांस उलट्या रीतीनें फिरत असलेला दिसतो ॥ ७१ ॥

आर्यसिद्धांताच्या गोलपादांतहि सांगितलें आहे कीं,

देवाः पश्यन्ति भगोलार्धमुदङ् मेरुसंस्थिताः सव्यम् ।
अपसव्यगं तथार्धं दक्षिणवडवामुखे प्रेताः ॥ ७२ ॥

उत्तर टोंकांत राहणाऱ्या देवांस नक्षत्रमंडलाचा अर्धा भाग सुलट्या रीतीनें दिसतो आणि बाकीचा अर्धा भाग दक्षिण टोंकांत राहणाऱ्या दैत्यांस उलट्या रीतीनें फिरत असलेला दिसतो ॥ ७२ ॥

सिद्धांतशिरोमणींत सांगितलें आहे कीं,

निरक्षदेशे क्षितिमण्डलोपगौ ध्रुवौ नरः पश्यति दक्षिणोत्तरौ ।
तदाश्रितं खे जलयंत्रवत्तथा भ्रमद्भचक्रं निजमस्तकोपरि ॥ ७३ ॥

पृथ्वीच्या वर्तुलमध्यरेषेवर राहणाऱ्या मनुष्यांस दक्षिणध्रुवाचा व उत्तरध्रुवाचा तारा भूगोलाच्या बरोबर लागलेला दिसतो आणि आकाशामध्यें जणूं त्यांस दोन्ही ध्रुवांच्या आधारावर राहून नक्षत्रमंडल स्वतःच्या डोक्यावर पाण्याच्या रहाटाप्रमाणें फिरत असलेलें दिसतें ॥ ७३ ॥

सौम्यं ध्रुवं मेरुगताः खमध्ये याम्यं च दैत्या निजमस्तकोर्ध्वे ।
सव्यापसव्यं भ्रमदक्षचक्रं विलोकयन्ति क्षितिजप्रसक्तम् ॥ ७४ ॥

पृथ्वीच्या उत्तर टोकांत राहिलेल्या देवांस उत्तरध्रुवाचा तारा आकाशाच्या मध्यभागीं अर्थात् स्वतःच्या डोक्यावर दिसतो, आणि दक्षिण टोंकांत राहिलेल्या दैत्यांस दक्षिणध्रुवाचा तारा स्वतःच्या डोक्यावर दिसतो, आणि त्या दोन्ही लोकांस एक दुसऱ्याहून उलट्या रीतीनें नक्षत्रमंडल पृथ्वीबरोबर लागलेलें व फिरत असलेलें दिसतें ॥ ७४ ॥

उत्तरगोले क्षितिजादूर्ध्वे परितो भ्रमन्तमादित्यम् ।
सव्यं त्रिदशाः सततं पश्यन्त्यसुरा असव्यगं याम्ये ॥ ७५ ॥

उत्तरगोलामध्यें देवांस व दक्षिणगोलामध्यें दैत्यांस परस्पर उलट्या रीतीनें सूर्य क्षितिजापासून वर चारहि दिशांमध्यें नेहमीं फिरत असलेला दिसतो ॥ ७५ ॥

विषुवद्वृत्तं द्युसदां क्षितिजत्वमितं तथा च दैत्यानाम् ।
उत्तरयाम्यौ क्रमशो मूर्धोर्ध्वगतौ ध्रुवौ यतस्तेषाम् ॥ ७६ ॥

देवांस व दैत्यांस खगोलाची वर्तुलमध्यरेषा पृथ्वीबरोबर लागलेली दिसते, कारण क्रमानें उत्तर व दक्षिण ध्रुवाचा तारा त्यांच्या डोक्यावर असतो ॥७६॥

**यो हि प्रदेशोऽपममण्डलस्य तिर्यक्स्थितो यात्युदयं तथाऽस्तम् ।**
**सोऽल्पेन कालेन य ऊर्ध्वसंस्थोऽनल्पेन सोऽस्मादुदया न तुल्याः ७७.**

राशिचक्राचा जो भाग अर्थात् तारा वक्र असलेला भासतो, तो थोड्या वेळानें आणि जो भाग म्हणजे तारा उंच असलेला भासतो तो पुष्कळ वेळानें उदय व अस्त पावतो म्हणून ताऱ्यांचा उदय एकसारखा असत नाहीं ॥७७॥

**त्र्यंशयुङ्नवरसाः पलांशका यत्र तत्र विषये कदाचन ।**
**दृश्यते न मकरो न कार्मुकं किञ्च कर्किमिथुनौ सदोदितौ ॥ ७८ ॥**

पृथ्वीच्या वर्तुलमध्यरेषेपासून उत्तरेस, जेथें पृथ्वीच्या उत्तर–दक्षिण परिधीच्या कल्पिलेल्या ३६० अंशांतून ६९⅓ अंश येतात, त्या देशामध्यें कांहीं कालानें मकर आणि धनु राशीचे तारे दिसत नाहींत, परंतु कर्क आणि मिथुन राशीचे तारे नेहमीं उदय पावलेले असतात ॥ ७८ ॥

**यत्र साङ्घ्रिगजवाजिसम्मिता तत्र वृश्चिकचतुष्टयं न च ।**
**दृश्यतेऽथ वृषभाच्चतुष्टयं सर्वदा समुदितं च लक्ष्यते ॥ ७९ ॥**

आणि जेथें ७८¼ अंश येतात, त्या देशामध्यें वृश्चिकापासून कुंभापर्यंत चार राशींचे तारे दिसत नाहींत, परंतु वृषभापासून सिंहापर्यंत चार राशींचे तारे नेहमीं उदय पावलेले दिसतात ॥ ७९ ॥

**यत्र तेऽथ नवतिः पलांशकास्तत्र काञ्चनगिरौ कदाचन ।**
**दृश्यते न भदलं तुलादिकं सर्वदा समुदितं क्रियादिकम् ॥८०॥**

तसेच जेथें ९० अंश येतात, त्या उत्तर टोंकासंबंधीं देशांमध्यें कांहीं कालानें तुलेपासून मीनापर्यंत नक्षत्रमंडलाचें अर्ध दिसत नाहीं, परंतु नेहमीं कर्कापासून धनुपर्यंत अर्धें नक्षत्रमंडल उदय पावलेलें दिसतें ॥ ८० ॥

हा भूगोलहि अनंत आकाशामध्यें दिसणाऱ्या बुध, शुक्र, वगैरे ग्रहांसारखा एक ग्रह आहे. हे सर्व ग्रह चक्राप्रमाणें स्वतःच्या अंगाभोंवतीं फिरतात, त्यामुळें त्यांच्यावर दिवस व रात्री होतात आणि स्वतःच्या अंगाभोंवतीं फिरत

फिरत सूर्यास फेरा घालितात; तसा एक फेरा झाला कीं त्यांचें वर्ष होतें, आणि तितक्या कालामध्यें त्यांच्यावर ऋतु होतात. कित्येक ग्रहांभोंवतीं फिरणारे उपग्रह आहेत, त्यांस चंद्र म्हणतात; त्यांसहि स्वतःच्या अंगाभोंवतीं फिरल्यामुळें दिवस व रात्री असतात, आणि आपल्या ग्रहाबरोबर राहून सूर्याभोंवतीं फिरल्यानें वर्ष व ऋतु होतात. सर्व ग्रह आपल्यापैकीं एका गोलास मध्यें ठेवून फिरतात, आणि मध्यगोलापासून जे ग्रह जवळ असतात, त्यांस आकाशामध्यें थोडा प्रदेश फिरावा लागतो, म्हणजे ते थोड्या वेळांत राशिचक्र फिरत असतात; परंतु जे ग्रह दूर असतात, त्यांस अधिक प्रदेश फिरावा लागतो, त्यामुळें बाराहि राशी फिरतां फिरतां बहुत काल लागतो. सूर्यसिद्धांताच्या भूगोलाध्यायांत सांगितलें आहे कीं,

उपरिस्थस्य महती कक्षाऽल्पाऽधःस्थितस्य च ।
महत्या कक्षया भागा महान्तोऽल्पास्तथाऽल्पया ॥ ८१ ॥

उंच असलेल्या ग्रहाच्या भ्रमणाचा मार्ग मोठा असतो व खालीं असलेल्या ग्रहाच्या भ्रमणाचा मार्ग लहान असतो. आणि मोठ्या मार्गानें राशिचक्राचे भाग मोठे होतात व लहान मार्गानें राशिचक्राचे भाग लहान होतात ॥ ८१ ॥

कालेनाल्पेन भगणं भुङ्क्तेऽल्पभ्रमणाश्रितः ।
ग्रहः कालेन महता मण्डले महति भ्रमन् ॥ ८२ ॥

लहान मार्गानें फिरणारे ग्रह थोडा वेळ राशिचक्रास भोगितात, व मोठ्या मार्गानें फिरणारे ग्रह राशिचक्रास बहुत काल भोगितात ॥ ८२ ॥

सर्व ग्रह पश्चिमेकडून पूर्वेस जाऊन लंबगोल मार्गानें सूर्याभोंवतीं फिरतात, पृथ्वीभोंवतीं फिरत नाहींत. कारण, जर पृथ्वीभोंवतीं फिरत असतील तर पृथ्वीच्या चंद्राप्रमाणें एकसारखे फिरले पाहिजेत; परंतु तसें न होतां ते एखादे वेळीं जलद व एखादे वेळीं मंद जातांना दिसतात. एखादे वेळीं मागें हटतात व एखादे वेळीं स्थिर भासतात. पुनः एखादे वेळीं पृथ्वीपासून अतिशय दूर जातात व एखादे वेळीं अतिशय जवळ येतात. म्हणून ते पृथ्वीभोंवतीं फिरत नाहींत, तर पृथ्वीसहवर्तमान ते सर्व सूर्यास

फेरे घालतात, त्यामुळेंच असें दिसतें. बुध व शुक्र ग्रह नेहमीं सूर्याच्या मागें पुढें दिसतात, कधींहि सूर्याच्या समोर दिसत नाहींत; ह्मणजे त्यांच्या आणि सूर्याच्यामध्यें पृथ्वी येत नाहीं. कारण, ते सूर्याच्या जवळचे ग्रह आहेत, आणि पृथ्वी त्यानंतरचा ग्रह आहे, त्यामुळें त्यांचा सूर्यासभोंवतीं फिरण्याचा मार्ग पृथ्वीच्या मार्गाच्या आंत आलेला आहे. ज्या वेळीं ते फिरतां फिरतां सूर्य आणि पृथ्वी यांमधून जातात, त्यावेळीं मागें हटलेले दिसतात, व पृथ्वीच्या जवळ येतात. परंतु ज्या वेळीं सूर्याच्या दुसऱ्या बाजूनें जातात, त्या वेळीं पुढें गेलेले दिसतात व पृथ्वीपासून दूर होतात. ज्या वेळीं आपल्या मार्गामध्यें वळून पृथ्वीच्या मार्गाच्या मागाहून समोर येत असतील किंवा पुढून समोर जात असतील, त्या वेळीं प्रथम स्थिर भासून नंतर हळू जातात असें दिसून बाजूनें आल्यामुळें जलद जातांना दिसतात. तसेंच ज्यांचा सूर्याभोंवतीं फिरण्याचा मार्ग पृथ्वीच्या मार्गापासून बाहेर आहे, अशा पृथ्वीमागच्या मंगळादि ग्रहांपैकीं एखाद्या ग्रहाच्या मार्गाच्या मागाहून पृथ्वी समोर जात असेल, तर तो ग्रह प्रथम स्थिर भासतो. नंतर जसजशी पृथ्वी आपल्या मार्गामध्यें वळत जाते, तसतसा तो ग्रह मागें हटलेला दिसतो; नंतर स्थिर दिसून पृथ्वी ज्या वेळीं अधिक वळते त्या वेळीं तो फिरून पूर्वेस प्रथम हळू जातांना दिसून बाजूस आल्यामुळें जलद जातांना दिसतो. पुनः पृथ्वी आपल्याहून बाहेरच्या ग्रहापेक्षां सूर्याभोंवतीं जलद फिरत राहते, त्यामुळें फिरत फिरत ज्या वेळीं तो ग्रह आणि सूर्य यांच्यामध्यें येते, त्या वेळीं तो ग्रह पृथ्वीच्या जवळ आणि सूर्याच्या समोर असतो, त्यामुळें अधिक प्रकाशित दिसतो. परंतु ज्या वेळीं पृथ्वी सूर्याच्या दुसऱ्या बाजूस जाते, त्या वेळीं तो ग्रह पृथ्वीपासून अतिशय दूर आणि सूर्याच्या बाजूस असतो; त्यामुळें कमी प्रकाशित दिसतो. भास्कराचार्यांनीं सिद्धांतशिरोमणीच्या गोलाध्यायांत सांगितलें आहे कीं,

**उच्चस्थितो व्योमचरः सुदूरे नीचस्थितः स्यान्निकटे धरित्र्याः।**
**अतोऽणुबिम्बः पृथुलश्च भाति भानोस्तथासन्नसुदूरवर्ती॥ ८३॥**

ज्या वेळीं ग्रह उंच असतो, त्या वेळीं पृथ्वीपासून दूर असतो; आणि ज्या वेळीं तो खालीं असतो त्या वेळीं पृथ्वीच्या जवळ असतो; त्यामुळें तो लहान व मोठा आणि सूर्याच्या जवळ व दूर भासतो ॥ ८३ ॥

यावरून असें दिसून येतें कीं, पृथ्वीसह सर्व ग्रह सूर्याभोंवतीं फिरतात; आणि त्यांच्या भोंवतीं फिरणाऱ्या अनेक ग्रहांवरून त्या ग्रहांच्या फिरण्याच्या मार्गाच्या आंत ज्यांचा मार्ग आहे असे ग्रह पृथ्वीवरून बुध—शुक्राप्रमाणें दिसतात. परंतु सूर्यावरून ते सर्व ग्रह एकाच रीतीनें आपापल्या मार्गामध्यें फिरत असलेले दिसतात. कारण, तो सर्वांच्यामध्यें आहे. सर्व ग्रह परमाणूंचें कार्य आहेत. आणि परमाणू त्यांचें कारण आहेत. परमाणुमात्रांमध्यें परस्परांस आकर्षण करण्याची शक्ति आहे, ती "कारणगुणपूर्वक कार्यगुण असतो" या नियमाप्रमाणें त्या सर्व ग्रहांतहि वर्तमान आहे. परंतु सूर्य सर्वांहून मोठा असल्यामुळें त्याच्यामध्यें सर्वांहून ती अधिक आहे. त्यामुळें तो स्वतः मध्यें राहून सर्व ग्रहांस धारण करून आपल्या आसपास फिरवितो. ऋग्वेदाच्या तिसऱ्या मंडलाच्या ५९ सूक्ताच्या पहिल्या ऋचेंत सांगितलें आहे कीं,

**मित्रो दाधार पृथिवीमुत द्याम् ॥ ८४ ॥**

सूर्य पृथ्वीस व ग्रहांस धारण करिता झाला ॥ ८४ ॥

याच वेदाच्या चवथ्या मंडलाच्या ५३ सूक्ताच्या दुसऱ्या ऋचेंत सांगितलें आहे कीं,

**दिवो धर्ता भुवनस्य प्रजापतिः ॥ ८५ ॥**

प्रकाश, वृष्टि इत्यादिकेंकरून पालन करणारा सूर्य ग्रहांस व भूलोकास धारण करणारा आहे. ॥ ८५ ॥

पुनः याच वेदाच्या दहाव्या मंडलाच्या १४९ व्या सूक्ताच्या पहिल्या ऋचेंत सांगितलें आहे कीं,

**सविता यन्त्रैः पृथिवीमरम्णादस्कम्भने सविता द्यामदृंहत् ॥ ८६ ॥**

निराधार प्रदेशामध्यें सर्वांच्या मध्यभागीं असलेल्या सूर्यानें यंत्रेंकरून पृथ्वीस स्तंभित केली आहे, आणि ग्रहांस दृढ केले आहेत ॥ ८६ ॥

याच आकर्षणशक्तीनें चंद्र आणि सूर्य समुद्राच्या पाण्यास आकर्षितात, त्यामुळें त्यामध्यें भरती व ओहोटी होतें. अमावास्येच्या दिवशीं ते दोघे बरोबरच असल्यामुळें समुद्रावर त्यांचें द्विगुणित आकर्षण होतें, त्यामुळें भरती मोठी होते. नंतर जसजसा चंद्र सूर्यापासून दूर होऊन पृथ्वीच्या दुसऱ्या बाजूस येत जातो, तसतशी भरती कमी होत जाते. हा क्रम शुक्लपक्षाच्या सप्तमी—अष्टमीपर्यंत रहातो; या दोन्ही दिवशीं भरती कमी होत जाते, कारण चंद्र समोर असतो, आणि सूर्य बाजूस असतो. त्यामुळें एकाचें समोरून व दुसऱ्याचें बाजूनें आकर्षण झाल्याकारणानें भरती विभागिली जाते. नंतर जसजसा चंद्र सूर्याच्या समोर येत जातो, तसतशी भरती मोठी होत जाते. हा क्रम पौर्णिमेपर्यंत राहून त्या दिवशीं भरती मोठी होते. कारण समुद्रावर एका बाजूनें चंद्राचें व दुसऱ्या बाजूनें सूर्याचें पूर्ण आकर्षण होतें. त्यानंतर चंद्र मागाहून सूर्याच्या बाजूनें जातो. त्यामुळें शुक्लपक्षाप्रमाणें कृष्णपक्षामध्येंहि सप्तमी—अष्टमीपर्यंत भरती कमी होण्याचा क्रम व त्यानंतर अमावास्येपर्यंत वाढण्याचा क्रम चालू राहतो. आकर्षण समसूत्रामध्यें होतें, त्यामुळें पृथ्वीच्या ज्या भागावर भरती होते, त्या भागापासून पूर्व—पश्चिम ६००० कोस भरती होते. जरी सूर्य आणि चंद्र या दोहोंच्या आकर्षणानें भरती होते, तथापि चंद्र पृथ्वीपासून अतिशय जवळ आहे, आणि सूर्य अतिशय दूर आहे, त्यामुळें भरतीचा सर्व आधार चंद्रावर आहे. माघानें शिशुपालवध काव्याच्या दुसऱ्या सर्गांत सांगितलें आहे कीं,

**पूर्णश्चन्द्रोदयाकांक्षी दृष्टान्तोऽत्र महार्णवः ॥ ८७ ॥**

पूर्ण समुद्र चंद्रोदयाची इच्छा ठेवतो, हा दृष्टांत आहे ॥ ८७ ॥

पुनः पंचतंत्राच्या दुसऱ्या तंत्रांत सांगितलें आहे कीं,

**नदीशः परिपूर्णोऽपि चन्द्रोदयमपेक्षते ॥ ८८ ॥**

समुद्र परिपूर्ण असूनहि चंद्रोदयाची इच्छा करितो ॥ ८८ ॥

भूगोलाच्या चंद्राच्या समोरच्या भागावर ज्या वेळीं पाणी वाढतें त्याचवेळीं बाजूच्या भागावर पाणी कमी होतें. जेथें पाणी वाढतें तेथें भरती

आणि जेथें कमी होतें, तेथें ओहोटी म्हटली जाते, परंतु मूळच्या पाण्यामध्यें कांहीं वाढ किंवा कमतरता होत नाहीं.

याप्रमाणें प्रमाणसहस्त्रीच्या सृष्टिप्रकरणापैकीं पृथिवीवर्णन समाप्त.

---

## तेजोवर्णन.

आतां ग्रह व उपग्रह यांमध्यें जो प्रकाश दिसतो, तो त्यांचा स्वतःचा नव्हे तर सूर्याचा आहे, कारण त्यांच्यावर सूर्याचा जो प्रकाश पडतो, तोच प्रतिफलित होऊन दिसतो. ह्मणून ते परप्रकाश ह्मटले जातात आणि सूर्य स्वप्रकाश गोल ह्मटला जातो. ऋग्वेदाचें मंडल ४ सूक्त ५३ ऋचा ४ यांत सांगितलें आहे कीं,

**अदाभ्यो भुवनानि प्रचाकशत् ॥ ८९ ॥**

अविनाशी सूर्य, ग्रह व उपग्रहादि लोकांस प्रकाश करणारा आहे ॥८९॥

पुनः याच वेदांत मंडल १०, सूक्त ८४, ऋचा १५ यांतहि सांगितलें आहे कीं,

**अत्राह गोरमन्वत नाम त्वष्टुरपीच्यम् । इत्था चन्द्रमसो गृहे ॥ ९० ॥**

पृथ्वीच्या भोंवतीं फिरणाऱ्या या चंद्रमंडलामध्यें रात्रीच्या वेळीं जें तेज दिसत आहे, तें सूर्याचें आहे असें प्राचीन पुरुषांनीं मानिलें आहे ॥ ९० ॥

आर्यभट्टानें आपल्या सिद्धांताच्या गोलपादांत सांगितलें आहे कीं,

**भूग्रहभानां गोलार्धानि स्वच्छायया विवर्णानि ।**
**अर्धानि यथाकारं सूर्याभिमुखानि दीप्यन्ते ॥ ९१ ॥**

पृथ्वी, ग्रह, व नक्षत्रें यांचे अर्धगोल आपल्या छायेनें प्रकाशहीन होतात, आणि यांचे जे अर्धगोल सूर्याच्या समोर असतात ते आपापल्या आकाराप्रमाणें प्रकाशित होतात ॥ ९१ ॥

तसेंच भास्कराचार्यांनींहि सिद्धांतशिरोमणीच्या गोलाध्यायांत सांगितलें आहे कीं,

तरणिकिरणसङ्गादेष पीयूषपिण्डो
दिनकरदिशि चन्द्रश्चन्द्रिकाभिश्चकास्ति ।
तदितरदिशि बालाकुन्तलश्यामलश्री-
र्घट इव निजमूर्तिच्छाययैवातपस्थः ॥ ९२ ॥

उन्हामध्यें ठेवलेल्या घड्याप्रमाणें सूर्यकिरणाच्या संसर्गानें हा अमृतपिंडरूप चंद्रमा आपल्या सूर्याच्या बाजूच्या भागांत चंद्रिकेनें प्रकाशतो, आणि दुसऱ्या भागांत स्वतःच्या अंगाच्याच छायेनें कुमारी स्त्रीच्या गुंडाळिलेल्या केशांसारखा श्यामवर्ण होतो ॥ ९२ ॥

श्रीपतीनेंहि असेंच सांगितलें आहेः—

धाम्ना धामनिधेरयं जलमयो धत्ते सुधादीधितिः
सद्यःकृत्तमृणालकन्दविशदच्छायां विवस्वद्दिशि ।
हर्म्ये घर्मघृणेः करैर्घट इवान्यस्मिन् विभागे पुनर्
बालाकुन्तलकालतां कलयति स्वच्छां तनोश्छायया ॥ ९३ ॥

ज्याप्रमाणें घरामध्यें ठेवलेला घडा सूर्यकिरणांनीं अर्धा प्रकाशित व अर्धा अप्रकाशित होतो, त्याप्रमाणें हा जलमय अमृतकिरणयुक्त चंद्रमा सूर्याच्या प्रकाशानें आपल्या सूर्याच्या बाजूच्या अर्धभागांत तत्काळ छेदिलेल्या कमलकंदाप्रमाणें श्वेतकांतीस धारण करितो, आणि फिरून दुसऱ्या अर्धभागांत आपल्या छायेनें कुमारी स्त्रीच्या केशांप्रमाणें स्वच्छ श्यामतेस धारण करितो ॥ ९३ ॥

सूर्याचा प्रकाश ग्रहांचा किंवा उपग्रहांचा जो अर्धगोल सूर्याच्या समोर होतो, त्याच्यावर नेहमीं पडतो, त्यामुळें ज्या वेळीं चंद्र आणि सूर्य यांच्या मध्यें पृथ्वी असते, त्या वेळीं चंद्राचा पृथ्वीवरून दिसणारा अर्धगोल सूर्याच्या समोर होतो, त्यामुळें तो पूर्ण प्रकाशित दिसतो, आणि त्या दिवसास पौर्णिमा ह्मणतात. नंतर कृष्णपक्षामध्यें जसजसा चंद्र पृथ्वीच्या दुसऱ्या बाजूस अर्थात् पृथ्वी आणि सूर्य यांच्यामध्यें येत जातो तसतसा त्याच्या पृथ्वीच्या बाजूच्या अर्धगोलावर सूर्याचा प्रकाश कमी होत जाऊन, दुसऱ्या बाजूच्या अर्धगोल-

वर वाढत जातो. तो अमावास्येपर्यंत हा क्रम चालू राहून, त्या दिवशीं चंद्र, सूर्य आणि पृथ्वी यांच्यामध्यें आलेला असतो, ह्मणजे त्याचा सूर्याच्या बाजूचा अर्धभाग प्रकाशित आणि पृथ्वीच्या बाजूचा अर्धभाग अप्रकाशित होतो. फिरून शुक्लपक्षामध्यें पौर्णिमेपर्यंत चंद्र फिरतां फिरतां पृथ्वीस आपल्या आणि सूर्याच्यामध्यें आणित जातो, त्यामुळें प्रतिदिवशीं त्याच्या पृथ्वीच्या बाजूच्या अर्धगोलावर प्रकाश वाढत जाऊन दुसऱ्या बाजूच्या अर्धगोलावर प्रकाश कमी होत जातो. चंद्राच्या एका बाजूच्या अर्धगोलाचा जितका भाग प्रकाशित होतो, तितकाच त्याच्या दुसऱ्या बाजूच्या अर्धगोलाचा भाग प्रकाशरहित होतो. वराह-मिहिरानें आपल्या संहितेच्या चवथ्या अध्यायाच्या आरंभीं सांगितलें आहे कीं,

नित्यमधस्थस्येन्दोर्भाभिर्भानोः सितं भवत्यर्धम् ।
स्वच्छाययाऽन्यदसितं कुम्भस्येवातपस्थस्य ।। ९४ ।।

उन्हामध्यें ठेवलेल्या घड्याप्रमाणें सूर्याच्या तेजानें खालीं असलेला चंद्राचा अर्धा भाग नेहमीं श्वेत असतो, आणि दुसरा अर्धा भाग त्याच्या स्वतःच्याच छायेनें श्याम होतो ।। ९४ ।।

सलिलमये शशिनि रवेर्दीधितयो मूर्च्छितास्तमो नैशम् ।
क्षपयन्ति दर्पणोदरविहता इव मन्दिरस्यान्तः ।। ९५ ।।

जसें आकाशामध्यें पडलेले सूर्यकिरण प्रतिफलित होऊन घरांतील अंध-काराचा नाश करितात, तसे जलमय चंद्राच्या ठिकाणीं पडलेले सूर्यकिरण प्रतिफलित होऊन रात्रिसंबंधीं अंधकाराचा नाश करितात ।। ९५ ।।

त्यजतोऽर्कतलं शशिनः पश्चादवलम्बते यथा शौक्ल्यम् ।
दिनकरवशात्तथेन्दोः प्रकाशतेऽधःप्रभृत्युदयः ।। ९६ ।।

जसा सूर्याचा खालचा भाग सोडीत असतां चंद्राचा पांढरेपणा त्याच्या मागच्या बाजूस होतो, तसा सूर्याच्याच प्रकाशानें चंद्राच्या पृथ्वीच्या बाजूच्या अर्धभागाचा उदय खालून आरंभ करून होतो ।। ९६ ।।

प्रतिदिवसमेवमर्कात्स्थानविशेषेण शौक्ल्यपरिवृद्धिः ।
भवति शशिनोऽपराह्णे पश्चाद्भागे घटस्येव ।। ९७ ।।

जसा मध्यान्हानंतर घटाच्या मागच्या भागांत प्रकाश वाढत जातो, तशी प्रत्येक दिवशीं सूर्यामुळें स्थानविशेषेंकरून चंद्राची श्वेतता वाढत जाते॥ ९७॥

पुनः सिद्धांतशिरोमणीच्या गोलाध्यायांत सांगितलें आहे कीं,

**सूर्यादधःस्थस्य विधोरधःस्थमर्धं न दृश्यं सकलासितं स्यात्।**
**दर्शेऽथ भार्धान्तरितस्य शुक्लं तत्पौर्णमास्यां परिवर्तनेन॥९८॥**

अमावास्येस सूर्यापासून खालीं असलेल्या चंद्राचें मनुष्यांच्या बाजूचें अर्ध संपूर्ण श्यामवर्ण होतें, आणि भ्रमणेंकरून पौर्णिमेस सूर्यापासून सहा राशींच्या अंतरावर आलेलें त्याचें तेज अर्धश्वेत होतें॥ ९८॥

**उपचितमुपयाति शौक्ल्यमिन्दोस्त्यजत इनं व्रजतश्च मेचकत्वम्।**
**जलमयजलजस्य गोलकत्वात् प्रभवति तीक्ष्णविषाणरूपतास्य॥९९॥**

सूर्यापासून दूर जात असतां चंद्राची श्वेतता वाढत जाते, आणि सूर्याच्या जवळ जात असतां श्यामता वाढत जाते, आणि पाण्यापासून उत्पन्न झालेल्या जलमय चंद्राचा गोलपणा असल्यामुळें त्याचा द्वितीयेदिवशीं बारीक शिंगा-सारखा आकार होतो॥ ९९॥

पृथ्वीचे अंतर्ग्रह बुध व शुक्र हे नलिकेनें पाहिले असतां चंद्राप्रमाणें ते कमजास्त प्रकाशित दिसतात, त्याचें कारण असें आहे, कीं ज्या वेळीं ते पृथ्वी आणि सूर्य यांच्यामध्यें येत जातात, त्या वेळीं पृथ्वीच्या बाजूच्या अर्ध गोलावर प्रकाश कमी होत जाऊन दुसऱ्या बाजूच्या अर्ध गोलावर वाढत जातो. ते ज्या वेळीं पृथ्वी आणि सूर्य यांच्यामध्यें आलेले असतात, त्या वेळीं पृथ्वीच्या बाजूचा त्यांचा सर्व अर्धगोल प्रकाशरहित होतो, आणि दुसऱ्या बाजूचा अर्धगोल प्रकाशित होतो. नंतर जसजसे ते सूर्याच्या पलीकडच्या बाजूनें जाऊं लागतात ह्मणजे सूर्यास आपल्या आणि पृथ्वीच्यामध्यें आणीत जातात, तसतसा त्यांच्या पृथ्वीकडील बाजूच्या अर्धगोलावर सूर्याचा प्रकाश सुरू होऊन वाढत जातो, आणि दुसऱ्या अर्धगोलावर प्रकाश कमी होत जातो. नंतर फिरतां फिरतां ज्या वेळीं ते आपल्या आणि पृथ्वीच्यामध्यें सूर्यास आणितात, त्या वेळीं त्यांचा पृथ्वीच्या बाजूचा अर्धगोल सगळा प्रकाशित होतो

याचप्रमाणें सूर्याच्याभोंवतीं फिरणाऱ्या अनेक ग्रहांवरून त्यांचे अंतर्ग्रह कमी जास्ती प्रकाशित दिसतात. सर्व प्रकाशाचें मूळ अग्नि आहे. कृष्ण यजुर्वेदाच्या तैत्तिरीयारण्यकांत चवथ्या प्रपाठकाच्या दहाव्या अनुवाकांत सांगितलें आहे कीं,

**अग्निर्ज्योतिर्ज्योतिरग्निः ॥ १०० ॥**

अग्निच प्रकाश आहे आणि प्रकाश अग्नि आहे ॥ १०० ॥

अग्नि पदार्थमात्रांत राहिलेला आहे, ह्मणूनच ऋग्वेदाच्या पहिल्या मंडलाच्या ७० व्या सूक्ताच्या दुसऱ्या ऋचेंत सांगितलें आहे कीं,

**गर्भो यो अपां गर्भो वनानां गर्भश्च स्थातां गर्भश्चरथाम् ॥ १०१ ॥**

जो अग्नि पाणी, वन, जंगम प्राणी व स्थावर वस्तू यांमध्यें गर्भरूपानें राहिलेला आहे ॥ १०१ ॥

जो स्वतःच्या सामान्यरूपानें असल्यामुळें भासत नाहीं, परंतु जेथें पदार्थामध्यें परस्पर घर्षण होतें, तेथें विशेषरूप होऊन भासतो. मेघरूप पाण्यामध्यें असलेला सामान्य अग्नि, वर्षाऋतूमध्यें मेघ परस्पर घर्षण पावतात, त्या वेळीं विशेषतेस प्राप्त होऊन विद्युद्रूप होतो. हाच सामान्य अग्नि अरण्यामध्यें वायूच्या जोरानें वृक्षांमध्यें घर्षण होतें त्या वेळीं विशेषतेस प्राप्त होऊन अरण्य जाळून टाकितो. तोच अग्नि पर्वतांस आघात केल्यानें प्रत्याघातामध्यें स्फुलिंगरूपानें विशेषरूप दिसतो; आणि जंगम प्राण्यांमध्यें जठराग्निरूपानें प्रसिद्ध आहे, आणि त्यांचीं शरीरेंहि एकमेकांस घांसलीं असतील तर तो विशेषपणास प्राप्त होतो. अग्नि सर्वत्र आहे, त्यामुळेंच पदार्थांच्या संयोगानें वीज उत्पन्न होते, जीच्या सहायतेनें आधुनिक विद्वानांनीं दूरश्रवण, दूरसंकेत वगैरे अनेक चमत्कारिक यंत्रें तयार केलीं आहेत, आणि आतां पुढेंहि ते अनेक यंत्रें होण्याची आशा बाळगितात. हाच सामान्य अग्नि सूर्यबिंबामध्यें किंवा त्याच्या वातावरणामध्यें निरंतर रसायनक्रिया झाल्यानें विशेषतेस प्राप्त होऊन प्रज्वलित होतो. त्याचाच प्रकाश सूर्याभोंवतीं फिरणाऱ्या सर्व ग्रहांवर व उपग्रहांवर एका सेकंडांत म्हणजे अडीच विपलांमध्यें सुमारें ९३००० कोसांच्या वेगानें पडतो. प्रकाशाचा वेग याप्रमाणें शोधून काढ-

ण्यांत आला आहे:—बृहस्पतीच्या चंद्रांस ग्रहण लागण्याचा वेळ अर्वाचीन ज्योतिषी गणितानें सिद्ध करीत आहेत. ज्या वेळीं पृथ्वी बृहस्पतीच्या अगद जवळ येते, त्या वेळीं त्यास चंद्रग्रहण पृथ्वीवरून दूरदर्शक यंत्रानें बरोबर गणितानें काढिलेल्या वेळीं दिसतें. परंतु ज्या वेळीं पृथ्वी बृहस्पतीपासून अतिशय दूर होते, त्या वेळीं गणितानें काढिलेल्या वेळाहून तें ग्रहण १६$\frac{१}{२}$ मिनिटांनीं मागाहून दिसतें; बृहस्पतीपासून जवळच्या अंतरापेक्षां पृथ्वीचें दूरचें अंतर सुमारें ९ कोटि ५० लक्ष कोस अधिक होतें, कारण पृथ्वीच्या सूर्याभोंवतीं फिरण्याच्या मार्गाचा व्यास तितक्या कोशांचा आहे. तितक्या अंतरावरून ग्रहण दिसण्यास जितका वेळ लागतो, तितका वेळ प्रकाश येण्यास लागतो असें समजावें. प्रकाशामध्यें सामान्य रीतीनें तेजस्वी शुक्लरूप आणि उष्ण स्पर्श असे दोन गुण आहेत. कणाद मुनीनें वैशेषिक दर्शनाच्या दुसऱ्या अध्यायाच्या पहिल्या आह्निकांत सांगितलें आहे कीं,

**तेजो रूपस्पर्शवत् ॥ १०२ ॥**

तेज रूपयुक्त आणि स्पर्शयुक्त आहे ॥ १०२ ॥

परंतु हें तेजकार्य असल्यामुळें तिरोभावास प्राप्त होतें, ह्मणून अनित्य ह्मटलें जातें, आणि सामान्य अग्नि त्याचें कारण असल्यामुळें तें नित्य ह्मटलें जातें. तर्कसंग्रहांत सांगितलें आहे कीं,

**तच्च द्विविधम् । नित्यमनित्यं च ।**
**नित्यं परमाणुरूपम् । अनित्यं कार्यरूपम् ॥ १०३ ॥**

तें नित्य व अनित्य असें दोन प्रकारचें आहे; परमाणुरूपानें नित्य आहे व कार्यरूपानें अनित्य आहे ॥ १०३ ॥

अग्नि नेहमीं आपल्या सामान्यरूपामध्यें असतो. परंतु उपाधीनें विशेषरूप होतो; तो विझला असतां फिरून आपल्या मूळ रूपामध्यें राहतो; परंतु कधींहि त्याचा नाश होत नाहीं. प्रकाशाचें स्वरूप साधारण दृष्टीनें श्वेत दिसतें, परंतु तसें नाहीं. त्यांत सात प्रकारचे रंग आहेत, ते मिश्रित झाल्यानें एकरूपानें भासतात. परंतु जर त्रिकोणाकार कांचेमधून प्रकाशाचे किरण

आरपार जाण्यास देऊन पाहिलें असेल, तर ते पृथक्पणास प्राप्त होऊन सात रंगांचे दिसतात. तसेंच पाण्यानें भरलेलें कांचेचें गोल भांडें आपल्या मस्तकाहून उंच जागेवर ठेवून तें भांडें आणि सूर्य यांच्यामध्यें उभें राहून त्या भांड्याकडे पाहिलें असेल, तर त्यांत सूर्यकिरण पृथक्पणास प्राप्त होऊन अनेक रंगांचे दिसतात. याचप्रमाणें पावसाळ्यांत पडणाऱ्या जलबिंदूंच्या समूहांत सूर्यकिरण पृथक् पृथक् होऊन निरनिराळ्या रंगांचे भासतात, त्यांस इंद्रधनुष्य असें म्हणतात. वराहमिहिरानें बृहत्संहितेच्या ३५ व्या अध्यायाच्या आरंभीं सांगितलें आहे कीं,

**सूर्यस्य विविधवर्णाः पवनेन विघट्टिताः कराः साभ्रे ।**
**वियति धनुःसंस्थाना ये दृश्यन्ते तदिन्द्रधनुः ॥ १०४ ॥**

सूर्याचे नानाप्रकारचे किरण अभ्रयुक्त आकाशामध्यें वायूनें विस्तीर्ण होऊन जे धनुष्याच्या आकारानें दिसतात, त्यांस इंद्रधनुष्य ह्मणतात ॥१०४॥

तसेंच वर्षाऋतूमध्यें सूर्याभोंवतीं आणि चंद्राभोंवतीं जें मंडलाकार कोंडाळ्यासारखें होऊन रहातें, त्याचें कारणहि बृहत्संहितेच्या ३४ व्या अध्यायाच्या आरंभीं वराहमिहिरानें सांगितलें आहे कीं,

**सम्मूर्च्छिता रवीन्द्वोः किरणाः पवनेन मण्डलीभूताः ।**
**नानावर्णाकृतयस्तन्वभ्रे व्योम्नि परिवेषः ॥ १०५ ॥**

सूर्याचे व चंद्राचे जे किरण अल्प अभ्रयुक्त आकाशामध्यें चारी बाजूंस पसरल्याकारणानें वायूच्या योगेंकरून मंडलाकार व अनेक वर्णांनीं व आकृतींनीं युक्त होतात ते कोंडाळ्यासारखे भासतात ॥ १०५ ॥

पुनः प्रकाशकिरणांच्या सात रंगांविषयीं ऋग्वेदाच्या पहिल्या मंडलाच्या १०५ व्या सूक्तांत ९ व्या ऋचेंत सांगितलें आहे कीं,

**अमी ये सप्त रश्मयस्तत्रा मे नाभिरातता ॥ १०६ ॥**

हे जे सूर्याचे सात किरण आहेत, त्यांमध्यें माझी नाभि बांधिली आहे ॥ १०६ ॥

याच वेदांत ८ व्या मंडलाच्या ७२ व्या सूक्ताच्या १६ व्या ऋचेंत सांगितलें आहे कीं,

**सूर्यस्य सप्त रश्मिभिः ॥ १०७ ॥**

सूर्याच्या सात किरणांनीं ॥ १०७ ॥

हे सात रंग याप्रमाणें आहेतः—जांभळा, निळा, अस्मानी, गुलाबी, पिंवळा, नरिंगी व लाल. प्रकाशकिरणांमध्यें परावर्तन पावण्याचा धर्म आहे. त्यामुळेंच आरशामध्यें प्रतिबिंब दिसतें व रत्नें वगैरे स्वच्छ वस्तु चकचकतात, परंतु अंधारामध्यें तसें होत नाहीं; कारण तेथें प्रकाश नाहीं. असें असूनहि ज्या ज्या पदार्थांमध्यें अग्नि विशेष अंशानें आहे, ते अंधारामध्येंहि सहज प्रकाशतात. प्रकाशकिरण पदार्थावर पडून नंतर मागें वळतात, ह्मणूनच त्यांच्या सहायतेनें आधुनिक विद्वानांनीं फोटो काढण्याचीं वगैरे यंत्रें तयार केलीं आहेत, आणि आतां मागाहूनहि याच सहायतेनें पुष्कळ तयार होऊं लागलीं आहेत. सरळ पडणारे प्रकाशकिरण त्याच दिशेंत मागें वळतात, परंतु डाव्या बाजूंतून पडणारे किरण तशाच रेषेंत उजव्या बाजूनें मागें वळतात, त्यामुळेंच आरशामध्यें बाजूच्या वस्तू दिसतात; आपलें उजवें अंग डाव्या अंगाप्रमाणें आणि डावें अंग उजव्या अंगाप्रमाणें भासतें. आणि आरसा कदाचित् लहान असला तरीहि त्यांत आपल्या बांध्याचा मोठा भाग दिसतो. कितीएक पदार्थांवरून किरण मागे वळण्याच्या ऐवजीं त्यांतच शिरून राहतात, आणि कितीएकांवरून थोडे किरण विखरून जाऊन किंवा शिरून बाकीचे मागें वळतात. पारदर्शक वस्तूमधून किरण आरपार जातात. ज्या पदार्थांवरून किरण मुळींच मागें फिरत नाहींत ते काळे असतात, आणि ज्यांच्यावरून बहुतकरून सर्व किरण मागें फिरतात, ते सफेत असतात. परंतु ज्यांच्यावरून पक्क्या रंगाचे किरण मागें फिरतात, ते पदार्थ त्याच रंगाचे असतात. आणि बाकीच्या रंगांचे किरण त्यांत सामावून जातात असें समजावें. पारदर्शक वस्तूंतून जे प्रकाशकिरण सरळ रेषेंत प्रसरण पावतात, ते वांकडे वळत नाहींत, परंतु जे वक्र रेषेंत पसरतात ते वांकडे वळतात; ह्मणूनच पेल्यामध्यें टाकलेला शिक्का

( पैसा वगैरे नाणें ) ज्या पेल्याची कोर आड आल्यानें दिसत नाहीं, त्या पेल्यामध्यें पाणी घातल्यानें तो दिसतो. पाण्यामध्यें वांकडी धरलेली काठी आखूड व मोडल्यासारखी दिसते, त्याचें कारणहि किरणांची मार्गे फिरण्यांत वक्रता हें आहे. याच कारणास्तव नदी, तलाव वगैरे जलाशयांचे तळ उंच दिसतात, त्यामुळें पाणी पुष्कळ असलें तरीहि थोडें आहेसें वाटतें, सूर्य-चंद्रादि गोलहि उदय व अस्त होण्याच्या वेळीं क्षितिजापासून खालीं असले तरीहि उंच आणि मोठे दिसतात, त्याचें कारणहि वातावरणांतील किरणांची वक्रता होय. आणि प्रथम ते लाल दिसतात, त्यांच्या प्रकाशाचे लाल किरण सर्वांहून पूर्वी वक्र होऊन दृष्टीस पडतात. सांजसकाळ आकाशांत लालिमा दिसतो त्याचें कारणहि हें कीं, वातावरणामध्यें सूर्याचे किरण वक्र होऊन प्रथम लाल किरण आपल्या दृष्टीस पडतात. एखादे वेळीं सकाळ संध्याकाळ आकाशामध्यें निरनिराळीं झालेलीं पातळ अभ्रें असतील, तर त्यांमध्यें पृथक्पणास प्राप्त झालेल्या सूर्यकिरणाचे विचित्र रंग दिसतात. परंतु जर जाड झालेलीं असतील तर सूर्यकिरणांनीं केवळ प्रकाशित दिसतात. सूर्यास्त झाल्यानंतरहि प्रकाश असतो त्याचें कारण हें आहे कीं, सूर्याचे किरण वातावरणामध्यें परावर्तन पावतात. सकाळ संध्याकाळ आकाशामध्यें लालिमा दिसण्याचें कारण सिद्धांत-शिरोमणीच्या २६८ पृष्ठावरील टिप्पणीमध्यें याप्रमाणें सांगितलें आहे कीं,

भूम्युत्थितै रजोधूमैर्दिगन्तव्योम्नि संस्थितैः ।
सूर्याल्पकिरणैर्मिश्रैरारुण्यमवभासते ॥ १०८ ॥

पृथ्वीपासून उडालेल्या, दिगंत आकाशामध्यें असलेल्या आणि सूर्याच्या अल्प किरणांनीं मिश्रित झालेल्या रजोरूप धूमांनीं आकाशामध्येंहि अरुण वर्ण भासतो ॥ १०८ ॥

विरलावयवं वस्तु यद्दृष्टेर्व्यवधायकम् ।
तेनाभ्रमरुणीभूतं दृश्यते शक्रचापवत् ॥ १०९ ॥

वेगवेगळे झाले आहेत अवयव ज्याचे अशी दृष्टीच्या आड येणारी जी रजोरूप वस्तु तिच्या योगेंकरून इंद्रधनुष्याप्रमाणें आभाळ लाल झालेलें भासतें ॥ १०९ ॥

संध्यारागः स विज्ञेयो दिनादौ च दिनात्यये ।
राकायां तु निशावक्रे तथैवेन्दुकरोद्यमे ॥ ११० ॥

दिवसाच्या आरंभीं आणि शेवटीं, पौर्णिमेस व प्रदोषकालीं, तसेंच चंद्रकिरणांच्या उदयाच्या वेळीं जो आरक्त वर्ण दिसतो तो तोच समजावा ॥ ११० ॥

प्रकाशाचे किरण जसजसे दूर जातात, तसतसे अधिक अधिक पसरत जातात. एका हाताच्या अंतरावर जितका प्रकाश पडतो त्याच्या १/४ दोन हातांच्या अंतरावर १/९ तीन हातांच्या अंतरावर आणि १/१६ चार हातांच्या अंतरावर पडतो. यावरून जो ग्रह पृथ्वीपेक्षां सूर्यापासून जितकेपट जवळ असतो, तितक्यांच्या वर्गाइतका त्या ग्रहावर किरणांचा प्रसार कमी झाल्यानें, तेथें सूर्य तितका मोठा दिसतो, आणि प्रकाश व उष्णता तितकीं अधिक पडतात. तसेंच जो ग्रह पृथ्वीपेक्षां सूर्यापासून जितके पट दूर असतो, तितक्याच्या वर्गाइतका त्या ग्रहावर किरणांचा प्रसार अधिक झाल्यानें तेथें सूर्य तितका लहान दिसतो, आणि प्रकाश व उष्णता तितकीं कमी पडतात. प्रकाशकिरणांचा वक्र होण्याचा धर्म असल्याकारणानें मध्यें जाड केलेल्या कांचेमध्यें ते अधिक एकत्र होतात; त्यामुळें साध्या नेत्रांहून तशा कांचेमध्यें पदार्थ दाखविण्याची शक्ति अधिक असते. त्या कांचेनें पाहिल्यास सूक्ष्म पदार्थ जवळ आणि मोठे दिसतात. त्यामुळें त्या कांचेस सूक्ष्मदर्शक ह्मणतात. अशा कांचेमध्यें सूर्यकिरण इतके एकत्र होतात कीं, त्यांच्या उष्णतेनें जवळ ठेवलेला वस्त्रादि पदार्थ देखील जळून जातो. जसे प्रकाशकिरण मध्यें जाड केलेल्या कांचेच्या सर्व बाजूंनीं वक्र होऊन तिच्या मध्यबिंदूमध्यें एकत्र होतात, तसेच मनुष्याच्या दृष्टीच्या अग्रभागामध्येंहि स्वच्छ जलनिर्मित नेत्रांशांत प्रकाश-किरण वक्र होऊन एकत्र होतात; त्यामुळें पदार्थ स्पष्ट दिसतात. बहुतकरून वृद्ध मनुष्यांच्या नेत्रांतील जलांश कमी होत गेल्यानें तेथें प्रकाशकिरणांची वक्रता थोड्या अंशानें होते, त्यामुळें त्यांची दृष्टि मंद होते. परंतु चष्म्याच्या मदतीनें त्या मनुष्यांस बरोबर दिसतें, कारण त्यांच्या नेत्रांतील

किरणवक्रतेची न्यूनता चष्म्यामध्यें होणाऱ्या किरणवक्रतेनें पूर्ण होते. जर पातळ तांब्याच्या पत्र्यास गोल छिंद्र करून त्यामध्यें पाणी घातलें असेल, तर तो मध्योन्नत कांचेप्रमाणें बनून सूक्ष्मदर्शक होतो. पुनः दिवसास एखाद्या अंधार असलेल्या घरामध्यें बसून त्या घराच्या दरवाज्यास छिद्र करून त्याच्या समोर पांढरें वस्त्र धरलें असेल, तर त्यावर त्या घराच्या बाहेर असलेल्या मनुष्याचें, गृहाचें व वृक्षादिकांचें प्रतिबिंब पडतें. जर त्या छिद्रामध्यें मध्योन्नत कांच अडकविली असेल, तर बाहेरच्या वस्तूचें प्रतिबिंब स्पष्टतेनें पडतें. याच प्रकारानें नेत्रामध्यें प्रतिबिंब पडल्यामुळें पदार्थ दिसतात. मध्यें पातळ केलेल्या कांचेमध्यें मध्यें जाड केलेल्या कांचेहून उलट्या रीतीनें किरण वक्रता पावतात, त्यामुळें ते मध्योन्नत कांचेच्या मध्यबिंदूमध्यें जसे किरण एकत्र होऊन पदार्थ मोठा दाखवितात, तसे ते मध्यनिम्न कांचेच्या मध्यबिंदूंतील किरण कमी होऊन पदार्थ लहान दाखवितात. ज्यांचे नेत्र या मध्यनिम्न कांचेसारखे असतात, त्यांस पदार्थ अतिशय जवळ असेल तोच स्पष्ट रीतीनें दिसतो. म्हणूनच वाचतेवेळीं ते पुस्तक वगैरे आपल्या डोळ्यांच्या अतिशय जवळ म्हणजे नाकाच्या अग्रभागाच्या पुढें धरितात. याकरितां दूरदर्शक यंत्रांमध्यें स्पष्ट दिसण्यासाठीं या दोन्ही जातीच्या कांचा तयार करण्यांत येतात. आधुनिक विद्वानांनीं साध्या डोळ्यापेक्षां ४०० पट पासून १००० पट पर्यंत अधिक दिसेल अशा शक्तीचीं दूरदर्शक यंत्रें ( दुर्बिणी ) बनविलीं आहेत. प्रकाशाच्या उष्णतेनें मैदानांमध्यें पाण्याच्या वाफेप्रमाणें वाफ निघते, त्यामुळें मृगजल भासतें. पुनः उष्णतेनें पदार्थ विस्तार पावतात, त्यामुळेंच कांचेच्या नळींतील पारा उंच चढतो, त्यामुळें उष्णता मापणें शक्य होतें. परंतु उष्णतेमध्यें कांहीं गुरुत्व दिसत नाहीं, कारण तापविलेल्या वस्तूचें वजन केलें असतां ती वाढत नाहीं. उष्णतेमध्यें आकर्षण तोडण्याचा धर्म आहे, त्यामुळें जर पदार्थ ऊन केला असेल तर त्याचे परमाणु सुटे होऊं लागतात, त्यामुळें ते विस्तार पावलेले दिसतात. अधिक उष्णता दिल्यानें घट्ट पदार्थहि प्रवाहिरूप बनतो, आणि जर अत्यंत उष्णता दिली असेल,

तर तोच प्रवाहिरूप पदार्थ वायुरूप होऊन उडून जातो. कितीएक पदार्थ उष्णतेनें प्रवाहिरूप बनल्याशिवायहि वायुरूप होऊन जातात.

याप्रमाणें प्रमाणसहस्रीच्या सृष्टिप्रकरणापैकीं तेजोवर्णन समाप्त.

---

## ॥ जलवर्णन ॥

पाण्याची वृष्टिहि प्रकाशाच्या उष्णतेनें होते. जसें वाटेल त्या भांड्यामध्यें पाणी भरून ऊन करण्यासाठीं चुलीवर ठेविलें असून, त्या भांड्यावर जर कांहीं झांकण ठेवण्यांत आलें असेल, तर त्या गरम पाण्यामधून उत्पन्न झालेली वाफ झांकण आड आल्यामुळें त्यास चिकटून राहते; ती झांकण काढतेवेळीं बाहेरच्या वायूच्या शीततेचा स्पर्श होतांच पुनः जलरूप होते, हें पुष्कळांच्या अनुभवास आलेलें असतें. तसेंच सूर्यकिरणांच्या उष्णतेनें पृथ्वीवरच्या सर्व जलाशयांमधून नेहमीं पाणी बाष्परूप होऊन, या रूपांत वायूहून हलकें झाल्यामुळें आकाशामध्यें उडून जाऊन, ज्या ठिकाणीं वायूशीं समतोलपणास प्राप्त होतें, तेथें शीततेस प्राप्त होऊन घट्ट बनून मेघरूपानें राहतें; तें पुष्कळ एकत्र झाल्यामुळें गुरुत्वास प्राप्त होऊन फिरून उष्णतेनें प्रवाहिरूप बनून पृथ्वीवर पडतें; त्यास वृष्टि ह्मणतात. कृष्णयजुर्वेदाच्या दुसऱ्या कांडांत चवथ्या प्रपाठकांत दहाव्या अनुवाकांत सांगितलें आहे कीं,

**अग्निर्वा इतो वृष्टिमुदीरयति मरुतः सृष्टां नयन्ति यदा खलु वा असावादित्योन्यङ्रश्मिभिः पर्यावर्ततेऽथ वर्षति ॥ १११ ॥**

अग्निच वृष्टीस प्रेरितो, अर्थात् या पृथ्वीवरून बाष्परूप जलद्वारा आकाशामध्यें वृष्टि उत्पन्न करितो, तीस वायु वेगवेगळ्या ठिकाणीं घेऊन जातो आणि ज्या वेळीं हा सूर्य तीव्र किरणांनीं अतिशय ताप करितो त्या वेळीं वृष्टि करितो ॥ १११ ॥

फिरून याच वेदाच्या दहाव्या प्रपाठकाच्या ६२ व्या अनुवाकांत याप्रमाणें सांगितलें आहे कीं,

**याभिरादित्यस्तपति रश्मिभिस्ताभिः पर्जन्यो वर्षति ॥ ११२ ॥**

ज्या किरणांनीं आदित्य तापतो, त्या किरणांनीं वृष्टि पडते ॥ ११२ ॥

तसेंच मनुस्मृतीमध्यें तिसऱ्या अध्यायाच्या ७६ व्या श्लोकांत सांगितलें आहे कीं,

**आदित्याज्जायते वृष्टिर्वृष्टेरन्नं ततः प्रजाः ॥ ११३ ॥**

सूर्यापासून वृष्टि होते, वृष्टिपासून अन्न आणि अन्नापासून प्रजा उत्पन्न होते ॥ ११३ ॥

कणादमुनीनेंहि आपल्या दर्शनामध्यें पांचव्या अध्यायाच्या दुसऱ्या आह्निकांत सांगितलें आहे कीं,

**अपां नाड्यो वायुसंयोगादारोहणम् ॥ ११४ ॥**

वायूच्या संयोगानें सूर्यकिरण पाण्यास चढवितात ॥ ११४ ॥

याप्रमाणें पाणीच बाष्परूप होऊन आकाशामध्यें जाऊन मेघरूप बनतें. या मेघामध्येंहि अग्नि आहे. कृष्णयजुर्वेदाच्या पांचव्या कांडाच्या पांचव्या अध्यायाच्या पहिल्या अनुवाकांत सांगितलें आहे कीं,

**या अग्निं गर्भं दधिरे सुवर्णाः ॥ ११५ ॥**

स्वच्छ पाण्यानें अग्नीस गर्भामध्यें धारण केला आहे ॥ ११५ ॥

परंतु ज्या वेळीं हे मेघ परस्पर घर्षण पावतात त्या वेळीं गर्जना होते, आणि त्यांत असलेला सामान्य अग्नि विद्युद्रूपानें विशेषतेस प्राप्त होऊन भासतो. वैशेषिकदर्शनामध्यें कणादमुनीनें पांचव्या अध्यायाच्या दुसऱ्या आह्निकांत सांगितलें आहे कीं,

**तत्र विस्फूर्जथुर्लिङ्गम् ॥ ११६ ॥**

मेघामध्यें अग्नि आहे, याविषयीं विद्युत्सहित गर्जना चिन्ह आहे ॥ ११६ ॥

**अपां संयोगाद्विभागाच्च स्तनयित्नोः ॥ ११७ ॥**

ही गर्जना मेघांतील पाण्याचा वायूनें संयोग आणि विभाग झाल्यानें होते ॥ ११७ ॥

अभ्रें पावसाळ्यामध्यें जड झाल्यामुळें पुष्कळ खालीं येतात; त्या वेळीं तीं पृथ्वीपासून बहुतकरून अर्ध्या कोसापासून एक कोसपर्यंत दूर असतात.

इतर वेळीं सुमारें तीनपासून चार कोसपर्यंत दूर असतात. पाण्याची वाफ वायूनें हलकी झाल्याकारणानें तीमध्यें उंच उडून जाण्याचा धर्म आहे, त्यामुळें जर एखाद्या पदार्थामध्यें ती संकोच पावली असेल, तर इतका जोर करते कीं, त्या पदार्थास फोडून टाकून बाहेर निघून उडून जाते. हें समजण्यांत आल्यामुळें आधुनिक विद्वानांनीं तिची मोठ्या यंत्रामध्यें योजना करून अग्निरथादि ( आगगाड्या वगैरे ) अनेक कार्यें तयार केलीं आहेत. पाण्यास बाष्परूपानें राहण्यांत अत्यंत उष्णतेची जरूर आहे; कारण, उष्णतेवांचून वाफ थंड होऊन जलरूप होऊन जाते. यामुळें दिवसाच्या उष्णतेनें झालेल्या वाफेपैकीं जी वाफ आकाशामध्यें आपल्या राहण्याच्या स्थानापर्यंत पोहोंचत नाहीं, तीस रात्रीची थंडी लागल्यामुळें ती जलरूप होऊन परत पृथ्वीवर पडते, तिला दहिंवर ह्मणतात. हिंवाळ्यामध्यें सकाळ—संध्याकाळ पुष्कळ धुकें पडतें त्याविषयीं सिद्धांतशिरोमणीच्या २६७ व २६८ व्या पृष्ठांवरील टिप्पणीमध्यें सांगितलें आहे कीं,

वर्षान्ते निर्जला मेघा वायुना विरलीकृताः ।
ईषद्बाष्पावशेषास्तु पतन्ति वसुधातले ॥ ११८ ॥

वर्षाकालाच्या अखेरीस ज्यामध्यें थोडी वाफ शिल्लक राहिली आहे, असे पाण्याशिवायचे मेघ, वायूनें वेगवेगळे होऊन पृथ्वीच्या पाठीवर पडतात ॥ ११८॥

धूमावयवरूपैस्तैश्छाद्यन्ते गिरयो द्रुमाः ।
रामारामादयस्ते तु पुनरर्कांशुशोभिताः ॥ ११९ ॥

त्यांच्या धुरासारख्या अवयवांनीं पर्वत, वृक्ष व सुंदर बगीचे वगैरे आच्छादून जातात ॥ ११९ ॥

पुनः सूर्यकिरणांनीं सुशोभित ते—

भूवायुना विशीर्णास्तु विलीयन्ते नभस्तले ।
तद्रजः संहतिर्धेनुमहिषीक्षीरनाशकृत् ॥ १२० ॥

पृथ्वीवरच्या वायूनें सुकून आकाश प्रदेशामध्यें लीन होऊन जातात, त्यांस गाईंच्या व महिषींच्या दुधाचा नाश करणारें धुकें ह्मणतात ॥ १२० ॥

पाणीच अतिशय थंडीस प्राप्त होऊन हिमरूप बनतें, तें पावसाळ्यामध्यें आकाशांतून गारांच्या रूपानें पडतें, आणि हिंवाळ्यामध्यें पृथ्वीवरील पर्वतांवर व थंड देशांवर घट्ट होऊन बर्फरूपानें भासतें. पर्वतांवर घट्ट असलेलें हिम उन्हाळ्यांत विरघळतें त्यामुळें त्या बाजूच्या नद्यांत त्या काळींहि पूर येतो. हिम जितक्या उष्णतेनें विरघळतें, तितकीच उष्णता जर पाण्यास दिली असेल, तर तें थिजतें; यावरून असें समजून येतें कीं, पदार्थ विरघळणें व थिजणें या दोन्ही क्रिया एकाच उष्णमानानें होतात. कणादमुनीनेंहि वैशेषिक दर्शनांतील पांचव्या अध्यायाच्या दुसऱ्या आह्निकांत सांगितलें आहे कीं,

अपां सङ्घातो विलयनं च तेजःसंयोगात् ॥ १२१ ॥

पाणी थिजणें व वितळणें या दोन्ही क्रिया तेजाच्या संयोगानें होतात ॥ १२१॥

पाण्यामध्यें गुरुत्व असल्यामुळें त्याच्याहून हलके पदार्थ त्यांत तरूं शकतात, कारण ते पदार्थ पाण्यांतील जितकी जागा व्यापितात, तितक्या जागेंतील पाणी त्या पदार्थांहून जड असतें. परंतु जो पदार्थ पाण्यांत बुडून जातो त्या पदार्थाच्या आकाराइतकें पाणी त्या पदार्थाहून हलकें असतें, ह्मणजे ते पदार्थ पाण्याहून जड असतात. पाणी हें प्राणिमात्राचें जीवन आहे, ह्मणून ऋग्वेदाच्या पहिल्या मंडलाच्या २३ व्या सूक्तांत सांगितलें आहे कीं,

अप्स्वन्तरमृतमप्सु भेषजम् ॥ १२२ ॥

पाण्यामध्येंच अमृत व औषध आहे ॥ १२२ ॥

सामान्य रीतीनें पाण्यांत शुक्लरूप, मधुर रस आणि शीत स्पर्श असे तीन गुण आहेत. वैशेषिक दर्शनाच्या दुसऱ्या अध्यायाच्या पहिल्या आह्निकांत कणादमुनीनें सांगितलें आहे कीं,

रूप–रस–स्पर्श–वत्य आपः ॥ १२३ ॥

पाणी हें रूप, रस आणि स्पर्श या गुणांनीं युक्त आहे ॥ १२३ ॥

परंतु तें पाणी विशेषरूपानें कार्य असल्यामुळें अनित्य ह्मटलें जातें आणि सामान्यरूपानें परमाणु असल्यामुळें नित्य ह्मटलें जातें. तर्कसंग्रहांत सांगितलें आहे कीं,

**ताश्च द्विविधाः । नित्या अनित्याश्च । नित्याः**
**परमाणुरूपाः । अनित्याः कार्यरूपाः ॥ १२४ ॥**

तें जल नित्य आणि अनित्य असें दोन प्रकारचें आहे. परमाणुरूपानें नित्य आणि कार्यरूपानें अनित्य आहे ॥ १२४ ॥

सामान्यरूपामध्यें पाणी बाष्परूपानें असतें, आणि विशेषरूपांत तें प्रवाहिरूपानें असतें. बाष्परूप झालेलें पाणी हें मेघरूप होऊन या भूगोलाभोंवतीं फिरणाऱ्या वातावरणांत राहतें, आणि ज्याप्रमाणें दुधांत मलई किंवा पाण्यांत फेंस त्याप्रमाणें त्यांत तें तरतें.

याप्रमाणें प्रमाणसहस्रीच्या सृष्टिप्रकरणापैकीं जलवर्णन समाप्त.

---

## वायुवर्णन.

वायूचें आवरण पृथ्वीपासून सुमारें ५० कोसपर्यंत आहे. भास्कराचार्यांनीं आपल्या सिद्धांतशिरोमणीच्या गोलाध्यायांत सांगितलें आहे कीं,

**भूमेर्बहिर्द्वादश योजनानि भूवायुरत्राम्बुदविद्युदाद्यम् ॥१२५॥**

पृथ्वीभोंवतीं फिरणारा भूवायु बारा योजनेंपर्यंत आहे, यामध्यें अभ्र व विद्युत् वगैरे राहिलीं आहेत ॥ १२५ ॥

श्रीपतीनेंहि सांगितलें आहे कीं,

**निर्घातोल्काघनसुरधनुर्विद्युदन्तः कुवायोः**
**संदृश्यन्ते खनगरपरीवेषपूर्वं तथान्यत् ॥ १२६ ॥**

गर्जना, उल्का, मेघ, इंद्रधनुष्य, विद्युत्, गंधर्वनगर आणि कोंडाळें वगैरे अन्य जीं दिसतात तीं सर्व भूवायूच्या आंत आहेत ॥ १२६ ॥

वायूचे परमाणु पारदर्शक असल्यामुळें ते डोळ्यांना दिसत नाहींत, परंतु त्याचा त्वगिंद्रियानें स्पर्श होतो व त्याच्या धक्क्यानें वृक्ष वगैरे कांपतात, त्यामुळें त्याचें अस्तित्व समजण्यांत येतें. जर त्याचे परमाणु पारदर्शक नसतील, तर आकाशांतील व पृथ्वीवरील कोणताहि पदार्थ दृष्टीस पडणार नाहीं. पृथ्वीवरच्या सर्व आकाशयुक्त जागेंत वायु भरलेला असतो, तो सहज समजण्यांत

येत नाहीं, परंतु जर पंखा वगैरे एखादी वस्तू त्या ठिकाणीं हालविली असेल, तर तिचा धक्का लागल्यानें वायु चलायमान होतो; तो स्पर्श झाल्यानें समजण्यांत येतो. वायूमध्यें गुरुत्व आहे, त्यामुळें पृथ्वीवरच्या सर्व स्थावर–जंगमात्मक वस्तूंवर त्याचा दाब आहे. जंगम प्राण्यांस तो दाब समजण्यांत येत नाहीं, कारण त्यांच्या शरीरामध्येंहि वायु असतो, त्याचा दाब आंतून झाल्याकारणानें बाहेरचा वायु समतोलपणास प्राप्त होतो. वायूचा दाब चारही बाजूंनीं असतो त्यामुळें पदार्थ सारख्या स्थितींत राहूं शकतात. कोणत्याहि वस्तूवर एका बाजूनें वायूचा दाब असेल आणि दुसऱ्या बाजूनें नसेल तर तिच्या स्थितींत फरक पडतो. वायूमध्यें गुरुत्व असल्यामुळें त्याचे परमाणु पृथ्वीचें आकर्षण झाल्याकारणानें पृथ्वीच्या जवळ पुष्कळ एकत्र होतात; त्यामुळें पृथ्वीजवळचा वायु जाड असतो. दिव्याच्या प्रकाशाप्रमाणें आकर्षणाचा जोरहि अंतराच्या प्रमाणांत कमी होत जातो, त्यामुळें अतिशय उंच ठिकाणच्या वायूवर पृथ्वीचें आकर्षण कमी होत जातें, त्यामुळें त्या त्या ठिकाणीं वायूचे परमाणु एकत्र पुष्कळ न जमल्याकारणानें वायु पातळ होतो. यामुळें पृथ्वीजवळच्या वायूचा जितका दाब असतो, त्याहून उंचावरच्या वायूचा दाब कमी असतो. अतिशय उंच पर्वतावर प्राण्यांकडून बरोबर श्वास घेववत नाहीं, त्यांची चामडी फुटते व त्यांच्या नाकांतून रक्त वाहूं लागतें, त्याचें कारण हें आहे कीं, तेथें बाहेरच्या वायूचा दाब कमी असतो व त्यांच्या शरीराच्या आंतील वायूचा दाब अधिक असतो. याप्रमाणें वायूच्या समतोलपणांत फरक पडल्याकारणानें असें होतें. जर बाहेरच्या वायूचा दाब मुळींच नसेल, तर आंतील वायूच्या दाबानें प्राण्यांचें शरीर एकदम फुटून जाऊन नाश पावेल! जर कोणी एक सच्छिद्र व एक अच्छिद्र असे दोन सारख्या धारेचे वाडगे घेऊन, एकमेकाशीं आंत हवा जाऊं शकणार नाहीं अशा रीतीनें बरोबर बसविले असतील, आणि त्या सच्छिद्र वाडग्यांतून बंबानें हवा बाहेर आकर्षण करून काढून तें छिद्र बुच लावून बंद केलें असेल, तर ते दोन्ही वाडगे एकमेकांस असे चिकटून जातील कीं, अतिशय जोर केल्यानेंहि वेगळे करण्यास

कठिण पडतील, असें होण्याचें कारण हें कीं, त्या वाडग्यांच्या आंतील वायु काढून घेतांच त्यांच्यावर एकट्या बाहेरच्याच वायूचा दाब असतो. दोन्ही बाजूंनीं सच्छिद्र अखंडित पोकळ नळी घेऊन ती पाण्यानें भरून तिचीं दोन्ही छिद्रें बोटांनीं झांकून ती नळी उभी धरावी. नंतर वरच्या छिद्रावर ठेवलेलें बोट तसेंच कायम ठेवून, खालच्या छिद्रावर झांकलेलें बोट काढून घेतलें असेल, तर त्या नळींतील पाणी पृथ्वीवर न पडतां तींतच चिकटून राहतें. त्याचें कारण हें कीं, वायूचा दाब त्या नळीच्या पाण्यावर खालच्या छिद्रानें होतो, वरचें छिद्र झांकलें असल्यामुळें तेथें वायूचा दाब होत नाहीं. परंतु जर त्याच्यावरचें झांकलेलें बोट ओढून घेतलें तर पाणी एकदम पृथ्वीवर पडतें; कारण वरून वायूचा दाब चालू होतो. एका बाजूनें छिद्र असलेली अदमासें दोन हात लांबीची व ३/४ अंगुल व्यासाची कांचेची नळी घेऊन तींत पारा भरून तिचें छिद्र बोटानें झांकून पाऱ्यांच्या भांड्यामध्यें ती नळी उलटी ठेवून बोट ओढून घ्यावें. त्या नळींतील पारा भांड्यांतील पाऱ्यावर व वायूच्या दाबानें, नळींत भांड्यांतील पाऱ्याच्या सपाटीहून उंच चिकटून राहतो. या यंत्रानें वायूच्या दाबाचें माप निघूं शकतें, आणि पर्वतांची उंचीहि यानें जाणतां येते. कारण पृथ्वीच्या सपाटीवरचा वायु जड असल्यामुळें त्याचा दाब अधिक झाल्याकारणानें तेथें नळींतील पारा जितक्या उंचीवर राहतो, त्याच्या-पेक्षां उंच उंच ठिकाणीं कमी उंचीवर राहतो. कारण त्या त्या ठिकाणीं वायु पातळ असल्याकारणानें त्याचा दाब कमी होत जातो. दोहोंबाजूंनीं छिद्रयुक्त अखंडित अंकुशाकार पोकळ नळी घेऊन पाण्यानें भरून तिचीं दोन्ही टोंकें बोटांनीं झांकून एक टोंक पाण्यानें भरलेल्या उंच भांड्यामध्यें आणि एक टोंक खालच्या भांड्यामध्यें एकाच वेळीं सोडून दिलें असेल, तर त्या उंच भांड्यांतील पाणी त्या नळीच्या द्वारा सगळें खालच्या भांड्यांत वाहून येतें, कारण उंच भांड्यांतील पाण्यावर वायूचा दाब असतो. ज्या वेळीं दोन्ही भांड्यातील पाण्याची सपाटी सारखी होईल, त्यावेळीं पाणी वाहण्याचें बंद होऊन जाईल. कारण वायूचा दाब दोन्ही भांड्यांतील पाण्यावर सारखा असतो. भास्कराचार्यांनीं सिद्धांतशिरोमणीच्या यंत्राध्यायांत सांगितलें आहे कीं,

ताम्रादिमयस्याङ्कुशरूपनलस्याम्बुपूर्णस्य ।
एकं कुण्डंजलान्तर्द्वितीयमग्रं त्वधोमुखं च बहिः ॥
युगपन्मुक्तं चेत्कं नलेन कुण्डाद्बहिः पतति ॥ १२७ ॥

पाण्यानें भरलेल्या ताम्रादि धातूच्या अंकुशाकार नळाचें एक टोंक कुंडांतील पाण्याच्या आंत आणि अधोमुख असें दुसरें टोंक बाहेर ठेवून एकदम सोडून दिलें असेल, तर कुंडांतील पाणी नळानें बाहेर पडतें ॥ १२७॥

वायूहि इतर पदार्थांप्रमाणें उष्णतेनें पातळ होतो, कारण त्याचे परमाणूहि उष्णता लागल्यानें पृथक्पणास प्राप्त होऊन उंच चढतात. याप्रमाणें ज्या ठिकाणीं वायु पातळ होतो, त्या ठिकाणीं जाड वायूस राहण्यास जागा मिळाल्यानें तो दुसऱ्या ठिकाणाहून एकदम येतो, ह्मणजे वायु जोरांत वाहतो असें दिसतें. आणि ज्या वेळीं ती रिकामी जागा जाड वायूनें भरून जाते त्या वेळीं जोरानें वायु वाहण्याचा बंद होतो. उष्णतामिश्रित वायु उष्ण असतो आणि बाष्पमिश्रित वायु थंड लागतो. पातळ वायूमध्यें वजन कमी असतें, त्यामुळें तो उंच जातो. ज्यामध्यें दिवा ठेवलेला असेल असा कागदाचा कंदील उंच उडतो त्याचें कारण असें आहे कीं, दिव्याच्या उष्णतेनें कंदिलांतील वायु पातळ होतो, त्यामुळें तो बाहेरच्या वायूहून हलका झाल्यानें कंदिलास उंच घेऊन जातो. विमान आकाशांत उंच उडतें, त्याचें कारणहि हेंच कीं, त्यांत पातळ वायु भरण्यांत येतो. शब्द ऐकूं येण्याचें कारणहि वायु आहे. पदार्थांवर आघात झाल्यानें उत्पन्न झालेल्या शब्दाचा धक्का वायूच्या परमाणूंस लागल्यानें पाण्याप्रमाणें वायुरूप सागरांत तरंग उत्पन्न होतात; ते कानापर्यंत येऊन पोंचल्यामुळें शब्द ऐकावयास येतो. हेच तरंग पर्वत, घरें वगैरेंस अडकून मागें फिरतात; त्यामुळें शब्दांचा प्रतिध्वनि होतो. सामान्य रीतीनें वायूमध्यें स्पर्श हा गुण आहे. कणादमुनीनें वैशेषिकदर्शनाच्या प्रथमाह्निकांत सांगितलें आहे कीं,

स्पर्शवान् वायुः ॥ १२८ ॥

वायु (अरूप असून) स्पर्शगुणानें युक्त आहे ॥ १२८ ॥

परंतु तो दोन प्रकारचा सांगितला आहे. तर्कसंग्रहामध्यें सांगितलें आहे कीं,

**स द्विविधः। नित्योऽनित्यश्च। नित्यः परमाणुरूपः। अनित्यः कार्यरूपः॥ १२९॥**

तो वायु दोन प्रकारचा आहे, नित्य आणि अनित्य. परमाणुरूपानें नित्य आणि कार्यरूपानें अनित्य ॥ १२९॥

वायूच्या एकत्र जमलेल्या परमाणूंस कार्यवायु ह्मटला जातो, आणि त्याचा स्पर्श होतो, परंतु तो बंद होतो, ह्मणून तो अनित्य ह्मटला जातो. सामान्य वायु हें जरी एक तत्त्व भासतें, तरी रसायनी क्रियेनें ऑक्सिजन ह्मणजे प्राणप्रद, नाईट्रोजन ह्मणजे जीवांतक, हायड्रोजन ह्मणजे जलकर आणि क्यारबान म्हणजे हिरवा असा चार प्रकारचा वायु समजण्यांत आला आहे. प्राणप्रद ह्मणजे जीवनशक्ति देणारा, या वायूवांचून प्राणी जीवंत राहूं शकत नाहींत. या वायूमध्यें कांहीं स्वाद व गंध असत नाहीं. तसेंच हा कांचेच्या पात्रांत भरला असेल तर याचा रंगहि समजत नाहीं. या वायूंत दहनशक्ति अतिशय असल्यामुळें याचा सामान्य वायूहून भेद समजण्यांत येतो. लोखंड देखील सुक्या लांकडाप्रमाणें या वायूमध्यें जळतें. प्राण्यांच्या अस्थींतून मिळून येणारा प्रकाशद ह्मणजे प्रकाश देणारा फॉस्फरस नांवाचा पदार्थ या वायूमध्यें जाळला असेल, तर सूर्याप्रमाणें प्रकाशतो, परंतु सामान्य वायूमध्यें इतका प्रकाशत नाहीं. सामान्य वायूंत प्राणप्रद वायूचा सद्भाव आहे, म्हणून त्यानें प्राणी जीवंत राहूं शकतात, परंतु प्राणप्रद वायूइतकी ज्वलनशक्ति सामान्य वायूंत नाहीं. कारण तो जीवांतक वायूनें मिश्रित आहे. जीवांतक वायूमध्येंहि कांहीं स्वाद व गंध असत नाहीं, आणि तो कांचेच्या पात्रांत भरला असल्यास त्याचा रंगहि दिसत नाहीं. जळणारा पदार्थ जर शुद्ध जीवांतक वायूमध्यें टाकला असेल, तर तो लगेच विझून जातो. जर सामान्य वायु एकच जीवांतक वायुरूप असता, तर कोणतीहि वस्तु जळूं शकली नसती व कोणताहि प्राणी जीवंत राहूं शकला नसता. तसेंच तो कदाचित् एकच प्राणप्रद वायुरूप असता तर एकाच अग्निकणाच्या स्पर्शानें वस्तुमात्र जळून भस्म होऊन जातें. तर दोन्ही

वायूंच्या मिश्रणानें सामान्य वायु झालेला आहे, ह्मणून तसें होत नाहीं. पाण्यां भरलेल्या पात्रांत जळती वात अशा रीतीनें ठेवावी कीं, ती पाण्यांत त राहील. नंतर तिच्यावर घंटाकार कांचेचें पात्र अशा रीतीनें झांकावें कीं, पात्राचा कांठ थोडा पाण्यांत बुडेल. असें झाल्यानें थोडया वेळांत ती वा पात्रांतील प्राणप्रद वायु जळून गेला असतां विझून जाते, व पाणी पात्राच्या पांचव्या भागापर्यंत उंच चढतें. यामुळें असें समजून येतें कीं सामान्य वायूमध्यें चार भाग जीवांतक वायूचे व एक भाग प्राणप्रद वायूच आहे. कारण त्या पात्रांतील सामान्य वायूमध्यें जो प्राणप्रद वायु होता, ते जळून गेल्यानें पात्रांतील तितकी जागा रिकामी झाल्याकारणानें त्यांत पाणी भरून जातें व तें पात्राच्या पांचव्या भागापर्यंत भरतें. ह्मणून सामान्य वायू मध्यें तितका भाग प्राणप्रद वायूचा समजावा. तिसऱ्या जलकर वायूमध्यें सांगितलेल्या दोन्ही वायूंप्रमाणें रूप, रस व गंध असत नाहींत. प्राणप्र वायूशीं याचा संयोग झाल्यानें जल उत्पन्न होतें, ह्मणून यास जलकर वायु ह्मणतात. रसायनी प्रयोगानें पाण्यांतील हे दोन्ही वायू पृथक् करून कांचेच्या पात्रांत भरतां येतात. आणि नंतर त्याच पात्राच्या तोंडाबरोबर ठेवून एक पात्रामध्यें ठेविले असतील, तर ते दोन्ही वायु मिळून जाऊन नंतर जलरू होतांना दिसतात. दहन करण्यामध्यें हा प्राणप्रद वायुहून विपरीत धर्मयुक्त आहे. यांत जळती वत्ती टांकली तर विझून जाते, परंतु हा स्वतः जळू जातो. आजपर्यंत जितके लघु पदार्थ जळण्यांत आले आहेत, त्या सर्वांहून हा वायु अतिशयच हलका आहे. त्यामुळें हा जर अंडाकार वस्तूमध्यें भरला असेल, तर ती वस्तु पक्षिगम्य मार्गानेंहि उंच जाते. विमानहि हा वायु भरल्यानें उडतें. चवथ्या हरित वायूमध्यें बहुतकरून हरितरूप आणि असह्य रस व गंध असतो. हा वायु जंगम प्राण्यांच्या जीवनास हानिकारक व वृक्षादिक स्थावरांस सफेत करणारा आहे. वस्त्रें वगैरे सफेत करण्यांत व दुर्गंधाचा नाश करण्यांत हा अतिशय उपयोगी आहे. या चार वायूंपैकीं प्राणप्रद वायु बहुतकरून पृथ्वीवरच्या सर्व पदार्थांमध्यें असतो.

सृष्टीचा ३/४ भाग या वायूनें बनलेला आहे. पदार्थ जळतो तोहि त्यांमध्यें असलेला हा वायुच जळतो. त्यामुळें हा सामान्य अग्नि आहे असें अनुमान करण्यांत येतें. प्राणप्रद वायु व जलकर वायु मिळून पाणी झालेलें आहे. दोन्ही वायु जळून जातात म्हणून सामान्य अग्निरूप आहेत, व अग्नि-पासून पाणी झालेलें आहे.

याप्रमाणें प्रमाणसहस्रीच्या सृष्टिप्रकरणापैकीं वायुवर्णन समाप्त.

---

## प्राणिवर्गवर्णन.

हे चार वायु व गंधकादि दुसरे ११ अधातुरूप आणि सुवर्णादि ४६ धातुरूप मिळून ६१ मूलतत्त्वें आहेत; त्यांचें अनेक रीतीनें मिश्रण झाल्यानें ही अपार चमत्कारयुक्त सृष्टि झालेली आहे. या सर्व मूलतत्त्वांमध्यें गंधक व हीरकादिक रत्नें आणि सोनें, रुपें, तांबें, लोखंड, शिसें व पारा वगैरे १२ धातु पृथ्वींतून स्वतंत्र मिळून येतात. बाकीचीं तत्त्वें मिश्रित पदार्थांपासून प्राप्त होतात. पृथ्वी, जल, तेज आणि वायु या चार महाभूतांमध्यें सर्व मूल-तत्त्वांचा समावेश झालेला आहे, आणि हीं चारहि भूतें आकाशानें व्याप्त आहेत, म्हणून पंचमहाभूतांपासून सृष्टि सांगितली आहे. मनूनें आपल्या स्मृतीच्या पहिल्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**अण्व्यो मात्रा विनाशिन्यो दशार्धानां तु याः स्मृताः ।**
**ताभिः सार्धमिदं सर्वं संभवत्यनुपूर्वशः ॥ १३० ॥**

पंचमहाभूतांच्या परिणामास प्राप्त होणाऱ्या ज्या सूक्ष्म तन्मात्रा सांगितल्या आहेत, त्यांसहवर्तमान हें सर्व जगत् क्रमानें उत्पन्न झालें आहे ॥ १३० ॥

या पंचमहाभूतांच्या संयोगानें प्राण्यांचीं शरीरें चार प्रकारांनीं उत्पन्न होतात. कणादविवृतीमध्यें सांगितलें आहे कीं,

**शरीरं जरायुजाण्डजस्वेदजोद्भिज्जभेदाच्चतुर्विधम् ॥ १३१ ॥**

जरायुज, अंडज, स्वेदज व उद्भिज्ज असें चार प्रकारचें शरीर आहे॥१३१॥

याविषयीं मनुस्मृतीच्या प्रथमाध्यायांत सांगितलें आहे कीं,

पशवश्च मृगाश्चैव व्यालाश्चोभयतोदतः ।
रक्षांसि च पिशाचाश्च मनुष्याश्च जरायुजाः ॥ १३२ ॥

पशु, वनचर पशु, दोन्ही बाजूंस दांत असणारे शिकारी पशु, राक्षस पिशाच आणि मनुष्य, हे जरायुज म्हणजे ज्यांच्या गर्भास सूक्ष्म चर्म वेष्टिलें असतें असे प्राणी म्हटले जातात ॥ १३२ ॥

अण्डजाः पक्षिणः सर्पा नक्रा मत्स्याश्च कच्छपाः ।
यानि चैवं प्रकाराणि स्थलजान्यौदकानि च ॥ १३३ ॥

पक्षी, सर्प, सुसरी, मासे कांसव आणि याचप्रकारचे स्थलज व जलज प्राणी आहेत ते अंडज म्हणजे अंड्यांतून उत्पन्न होणारे म्हटले जातात ॥ १३३

स्वेदजं दंशमशकं यूकामक्षिकमत्कुणम् ।
ऊष्मणश्चोपजायन्ते यच्चान्यत्किञ्चिदीदृशम् ॥ १३४ ॥

डांस, मच्छर, उवा, माशा, ढेकूण यांच्यासारखे जे कोणी दुसरे प्राणी उष्णतेनें उत्पन्न होतात, ते सर्व स्वेदज म्हणजे घामापासून उत्पन्न होणारे म्हटले जातात ॥ १३४ ॥

उद्भिज्जाः स्थावराः सर्वे बीजकाण्डप्ररोहिणः ।
ओषध्यः फलपाकान्ता बहुपुष्पफलोपगाः ॥ १३५ ॥

पृथ्वीमध्यें बीज आणि शाखा लावल्यानें उत्पन्न होणाऱ्या सर्व स्थावर म्हणजे वृक्षजाति, उद्भिज्ज म्हणजे उंच भेदून उत्पन्न होणाऱ्या म्हटल्या जातात त्यामध्यें फलांचा पाक झाल्यानेंच ज्यांचा नाश होतो अशा अनेक पुष्पयुक्त व फलयुक्त ज्या असतील त्या ओषधी म्हटल्या जातात ॥ १३५ ॥

अपुष्पाः फलवन्तो ये ते वनस्पतयः स्मृताः ।
पुष्पिणः फलिनश्चैव वृक्षास्तूभयतः स्मृताः ॥ १३६ ॥

ज्यांस फुलें नाहींत पण फळें असतात त्यांस वनस्पति म्हणतात; आणि फुलें व फळें हीं दोन्ही असलेल्यांस वृक्ष म्हणतात ॥ १३६ ॥

गुच्छगुल्मं तु विविधं तथैव तृणजातयः ।
बीजकाण्डरुहाण्येव प्रताना वल्ल्य एव च ॥ १३७ ॥

विविध प्रकारचे गुच्छ, गुल्म, तृणजाति व वेली कांहीं बीजापासून व कांहीं शाखांपासून उगवणाऱ्या आहेत ॥ १३७ ॥

पृथ्वीमध्यें रोंपलेलें बीज मनुष्यशक्तीनें असाध्य गुणांस वृक्षांमध्यें उत्पन्न करतें. तें स्वत:च्या योग्य वेळीं पृथ्वीच्या आंत व बाहेर अंकुर काढतें. बाहेरचा अंकुरशाखा आणि आंतील अंकुर मूळ होतें. तो पृथ्वींतून निघणारा अंकुर जणों प्रकाशाचीच इच्छा करीत असावा, अशा रीतीनें प्रकाशाच्या समोर वाढतो, आणि तो न मिळेल तर कोमेजून जातो; नंतर वाढतां वाढतां तो वृक्ष होतो. वृक्ष आपल्या शरीराच्या पोषणासाठीं अनुकूल पदार्थांस पृथ्वींतून मूळानें आणि वायूंतून पानांनीं आकर्षण करून घेतात. वहुतकरून प्राणप्रद, जलकर व हरित हे वायु व प्रकाश यांहींकरून वृक्षजाति वाढतात. कारण त्यांचें पोषण होण्याकरितां त्यांच्या मूळांमध्यें पाणी शिंपण्याची व बाहेरून वायु आणि प्रकाश मिळण्याची अत्यंत जरूर असते. मूळांत शिंपलेल्या पाण्यांतून त्यांस प्राणप्रद व जलकर वायु मिळतो आणि बाहेरून सामान्य वायूमध्यें येणारा हरित वायु व सूर्यापासून येणारा प्रकाश पर्णद्वारा मिळतो. जंगम प्राण्यांच्या शरीरांमध्यें जशीं फुप्फुसें, धमन्या, रक्तवाहिन्या व स्नायु वगैरे असतात, त्यामुळें त्यांनीं केलेल्या खाण्या–पिण्याच्या क्रिया होऊन त्यांचें रक्षण होतें, तसेंच वृक्षांचींहि पानें, धमन्या, आणि मोठ्या व लहान रसवाहिन्या रेषा वगैरे असतात, त्यामुळें त्यांनीं पृथ्वीमधून व वायूंतून आकर्षून घेतलेले पदार्थ क्रियांस प्राप्त होऊन त्यांच्या शरीराच्या सर्व भागांत पसरतात; त्यामुळें त्यांचें रक्षण होतें. जंगम प्राण्यांच्या शरीरामध्यें फुप्फुसांकडून जें कार्य होतें, तें वृक्षांमध्यें पानांकडून होतें, जसे जंगम प्राणी फुप्फुसांकडून प्राणप्रद वायूस ग्रहण करून हरित वायूस बाहेर काढतात, तसेच वृक्ष पानांकडून हरित वायूस ग्रहण करून वाढलेल्या प्राणप्रद वायूस बाहेर काढतात. जंगम प्राण्यांच्या शरीरामध्यें जीविताचें रक्षण व्हावें एतदर्थ जशी मेंदु व मज्जा असते, तद्वत् वृक्षांमध्यें त्यांच्या रक्षणासाठीं गाभा व पाळेंमुळें असतात, गाभा सर्व वृक्षांत असतो, तो त्यांच्या पूर्वावस्थेंत

वाढत असतो, आणि उत्तरावस्थेंत कमी होत जातो. तो ज्यावेळीं वृक्ष मरत येतो त्यावेळीं एकदम जात राहतो. वृक्षांमध्यें कित्येक नरजातीचे व कित्येक स्त्रीजातीचे वृक्ष असतात. नरजातीच्या वृक्षांच्या फुलांमध्यें जें सूक्ष्म रज असतें, तें वायूंत उडून स्त्रीजातीच्या वृक्षाच्या फुलांत पडतें, त्यामुळें फळ उत्पन्न होतें, तसें झाल्याशिवाय फळ होत नाहीं. या नरजातीच्या पुष्पाचें सूक्ष्म रज दूरूनहि वायूबरोबर येतें. किती एक ठिकाणीं असेंहि पाहण्यांत येतें कीं, स्त्रीजातीच्या वृक्षाची दृष्टि पुरुषजातीच्या वृक्षासमोर होतांच त्यांस फळें लागण्यास सुरुवात होते. जरी वृक्षजातींत जंगम प्राण्याप्रमाणें बाह्यज्ञान पाहण्यांत येत नाहीं, तरीहि त्यांच्यामध्यें अंतर्ज्ञान आहे असें अनुमान केलें जातें. कारण त्यांच्या वाढींत कांहीं आड येत असल्यास ते बाजूस होऊन वाढतात. पुनः त्यांस ताडन केल्यानें दुःख होतें तें लाजरीच्या झाडामध्यें स्पष्ट ध्यानांत येतें. मनुस्मृतीच्या पहिल्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**तमसा बहुरूपेण वेष्टिताः कर्महेतुना ।**
**अन्तःसंज्ञा भवन्त्येते सुखदुःखसमन्विताः ।। १३८ ।।**

प्रारब्धकर्म ज्यांचा हेतु आहे अशा विचित्र प्रकारच्या तमोगुणेंकरून वेष्टिलेले वृक्षादिक स्थावर प्राणी, अंतर्ज्ञानयुक्त असल्यानें सुखदुःखांनीं युक्त असतात ।। १३८ ।।

जशी पृथ्वी चारहि बाजूंनीं असंख्य उद्भिज्ज म्हणजे वृक्षजातींनीं वेष्टित आहे, तशीच असंख्य जरायुज, अंडज व स्वेदज प्राण्यांनींहि सर्वत्र व्याप्त आहे. वनस्पतीच्या प्रत्येक फुलामध्यें व पानामध्यें बारीक जंतु असतात, तशीच आपल्या पायांच्या खालची जमीनहि सूक्ष्म जीवांनीं व्यापलेली आहे. आपल्या आसपासचें वातावरणहि जीवांनीं व्याप्त आहे. प्रत्येक पर्वत, अरण्य, सागर, सरोवर, नद्या व नाले हे सर्व प्राण्यांनीं भरलेले असतात. कोठें कोठें उष्णोदकाच्या झऱ्यांतहि कित्येक जातींचे मासे व किडे आढळतात. अधिक काय सांगावें? पाण्याच्या प्रत्येक बिंदूमध्यें व तिळाइतक्या जागेंतहि सूक्ष्मदर्शक

यंत्रानें पाहिल्यास जीव दृग्गोचर होतात. छांदोग्य उपनिषदाच्या तिसऱ्या प्रपाठकांत सांगितलें आहे कीं,

सर्वमिदमभ्यात्तः ॥ १३९ ॥

आत्मा या सर्वांस व्यापून राहिला आहे. ॥ १३९ ॥

जरायुज प्राण्यांस स्तन असतात, त्यांच्यामध्यें दोन हातांचे मनुष्य चार हातांचे वानर, हातांनीं उडणारीं वाघळें, किडे खाणारे चिचुंदरी वगैरे, मांस-भक्षक सिंह, व्याघ्र, लांडगे, कोल्हे, आस्वलें, कुत्रे व मांजरें वगैरे, पाण्यांत राहणारे सुसरी वगैरे, जाडया चामडीचे गेंडे हत्ती व वराहादिक, रंवथ करणारे उंट, गाय, म्हैस व हरिणादि, दांताशिवायचे अथवा छोट्या दांतांचे स्थाल म्हणजे वज्रकीट, आरमाडिलो वगैरे, चावून खाणारे उंदीर व ससे वगैरे आणि आस्ट्रेलिया—महाद्वीपांत राहणारे पेशीवाले कांगारु व मलमूत्र करण्याचा ज्यांस एकच मार्ग आहे असे, चार पाय व चोंचयुक्त प्राणी वगैरे प्राण्यांचे असे १२ भेद आहेत. अंडज प्राण्यांमध्यें पक्षिवर्ग, सर्पवर्ग व मत्स्यवर्ग हे तीन भेद आहेत. त्यांत पक्ष्यांमध्यें दुसऱ्या पक्ष्यांस मारून खाणारे गिधाड, गरुड, घार व घुबड वगैरे, वृक्षांवर राहणारे कावळे, कोकिळ व लांकुडफोडे वगैरे, घूत्कार करणारे कबूतरें, होला, कुकडा व शहामृगादि, पाण्यामध्यें चालणारे बगळे वगैरे आणि पाण्यांत तरणारे बदकें, हंस, राजहंसादि असे ५ भेद आहेत. सर्पवर्गांत कांसव कांकिडा, सर्पमाशी, बेडूक व एकंदर सर्पजाति आणि जलावर व स्थलावर पोटानें चालणाऱ्या एकंदर प्राण्यांचा समावेश केला आहे. मत्स्यवर्गामध्यें सर्व प्रकारच्या माशांची गणना केलेली आहे. स्वेदज वर्गामध्येंहि असंख्य जातींच्या प्राण्यांचा समावेश झालेला आहे. जरी त्यांचीहि अंडयांपासून उत्पत्ति होते तरी तीं अंडीं अत्यंत सूक्ष्म असल्यानें दृष्टीस पडत नाहींत, आणि तीं उष्णतेनें होतात, ह्मणून त्यांस स्वेदज ह्मणतात. ढेकणांचीं अंडीं पुष्कळ वेळा पाहण्यांत येतात, पण ढेकणांस स्वेदज म्हणतात. या सर्व प्राण्यांमध्यें ज्यांच्या पाठींत कणा असतो, त्यांची गणना पृष्ठवंशविशिष्ट प्राणिवर्गांत झालेली आहे. आणि ज्यांच्या पाठींत कणा असत नाहीं, अशा

प्राण्यांची पृष्ठवंशहीन अर्थात् कोमलशरीरविशिष्ट अशा प्राणिवर्गामध्यें गणना केलेली आहे. पुनः एक असा नियम आहे कीं, ज्यांस कानाच्या ठिकाणीं छिद्र असतें, ते प्राणी अंडीं टाकितात, आणि ज्यांस कान असतात ते प्राणी मुलांस जन्म देतात, आणि त्यांस दूध पाजण्याकरितां स्तन असतात. अर्थात् ज्यांस छिद्र त्यांस अंडीं आणि ज्यांस कान त्यांस स्तन असतात. या चार प्रकारच्या प्राण्यांमध्यें वेगवेगळ्या रीतीनें आहार, निद्रा, भय व मैथुन हे धर्म पाहण्यांत येतात. जरायुज व अंडज वर्गामध्यें जे स्थलचर प्राणी आहेत, त्यांच्यामध्यें तर हे चारहि धर्म प्रसिद्ध रीतीनें सर्वांच्या पाहण्यांत आहेत. आणि या दोन्ही वर्गांचे जे जलचर प्राणी आहेत, त्यांच्यांतसुद्धां पण हे चारहि धर्म असतात. ते शोध करणाऱ्यास समजून येतात. स्वेदजवर्गाच्या प्राण्यामध्यें आहार, निद्रा व भय हे तीन धर्म तर चांगल्या प्रकारें दिसतात, परंतु मैथुनधर्म मत्कुण मक्षिकादिकामध्यें कांहीं कांहीं वेळीं पाहण्यांत येतो. त्यावरून असें अनुमान होतें कीं, उत्पन्न झाल्यानंतर सर्व स्वेदजांमध्यें कोणत्याहि प्रकारानें हा धर्म असला पाहिजे. उद्भिज्जांमध्यें ह्मणजे वृक्ष जातींतहि हे चार धर्म आहेत, कारण हे वाढतात आणि टवटवीत राहतात, त्यामुळें यांस आहार आहे असें दिसतें. रात्रीस ग्लानि पावतात, ह्मणून हे निद्रावश होतात, असें अनुमान होतें. यांच्या वाढण्याच्या मार्गामध्यें पत्थर वगैरे कांहीं आड आल्यास हे बाजूस होऊन वाढतात, ह्मणून यांस भय आहे, असें वाटतें; यांत स्त्रीजाति व पुरुषजाति आहेत आणि यांच्या पुष्परजाचा संयोग होतो, यावरून या जातींतहि अशा प्रकारें मैथुनधर्म राहिलेला आहे. यावरून हें सर्व जगत् प्रकृति व पुरुष यांच्या संयोगानेंच झालेलें आहे, असें जें आर्यप्रजेच्या प्राचीन ग्रंथांत सांगितलें आहे, तें सिद्ध होतें. ज्ञानहि या चार प्रकारच्या प्राण्यांमध्यें कमजास्त प्रमाणानें दिसतें. मनुष्यांमध्यें सर्वांहून विशेष ज्ञान आहे, त्यांच्यामध्यें सारासार जाणण्याचा विवेक आहे. ते जरी शरीरबलानें सिंह, वाघ व हत्ती वगैरे बलवान् प्राण्यांहून अतिशय कमी आहेत, तरीहि ते यांस वश करूं शकतात.

सृष्टींतील अनेक पदार्थांस, त्यांची वेगवेगळ्या रीतीनें योजना करून, ते आपल्या खाणें, पिणें, वस्त्रें, घरें व वाहनादि वैभवाच्या साधनासाठीं, तसेंच रोगशमनार्थ औषधादिकांकरितां उपयोगांत आणून स्वतःच्या गरजा पुऱ्या करूं शकतात. विमानानें आकाशामध्यें गमन करूं शकतात. अग्निरथ व अग्निनौकेसारख्या वाहनांनीं अखिल भूगोलावर सहज चैनींत फिरून येऊं शकतात. विद्युत्यंत्रानें एका पळामध्यें दूर देशांतील बातमी जाणूं शकतात. दूरश्रवणयंत्रानें अतिशय लांबून ऐकूं शकतात, आणि दूरदर्शक यंत्रानें आकाशामध्यें असलेल्या असंख्य प्रकाशित गोलांचें निरीक्षण करून त्यांचें स्वरूप जाणूं शकतात. सूक्ष्मदर्शक यंत्रानें साध्या दृष्टीस न दिसणाऱ्या सूक्ष्म पदार्थांस पाहूं शकतात. आणि थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे या अपार चमत्कारयुक्त सृष्टीच्या रचनेसंबंधी रसायनशास्त्रानें विचार करून हिचीं मूलतत्त्वें जाणून, हिचें अद्भुत कारणस्वरूप निराकार, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान्, नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त, अखंडाकार सच्चिदानंदरूप परमात्म्यास ओळखून मोक्ष मिळवूं शकतात. इतर प्राण्यांमध्यें याचा सहस्रांशहि पाहण्यांत येत नाहीं. जरी त्यांच्यांतहि ज्ञान आहे, तरी तें अतिशय खालच्या प्रतीचें दिसतें. मनुष्याहून उतरतें ज्ञान जरायुज जातीच्या दुसऱ्या प्राण्यांमध्यें दिसतें. त्यांमध्यें कितीएक वानरांसारख्या जातींत विशेष, आणि कितीएकांत कमी असतें. मनुष्याप्रमाणें त्यांसहि दहा इंद्रियें व मन असावेंसें वाटतें. त्यांचें बोलणें एकाच प्रकारचें दिसतें, परंतु तसें नाहीं; त्यांत स्वतःचे शुभाशुभाचे व प्रियाप्रियाचे सूचक अनेक प्रकारचे भेद असतात, ते त्याच्या जातवाल्यासच समजतात. त्यांसहि स्वतःस अनुकूल व प्रतिकूल शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध या पांच विषयांचें ज्ञान होतें. पुनः शिकविल्यानें ते सुधारून आपल्या पालकाची आज्ञा पाळणारे होतात. त्यावरून असें अनुमान केलें जातें कीं, त्यांच्यामध्येंहि थोड्या अंशानें विचार करण्याची शक्ति आहे. जरायुज प्राण्यां-हून उतरतें ज्ञान अंडज प्राण्यांमध्यें असतें. त्यांतहि कितीएक जातींमध्यें कमी आणि कित्येक जातींमध्यें अधिक असतें. पक्ष्यांमध्यें सर्व अंडजांहून विशेष

ज्ञान असावेंसें वाटतें. कारण तेहि शिकविल्यानें सुधरून आज्ञापालक होतात. त्यांचें भाषणहि स्वतःच्या प्रियाप्रियादिकाचें सूचक असतें, तें त्यांच्याच जातीचा जाणतो. अंडजांहून उतरतें ज्ञान स्वेदज वर्गाच्या प्राण्यांमध्यें असतें. आणि उद्भिज्ज वर्गाच्या प्राण्यांमध्यें तर त्याहूनहि अतिशयच उतरतें दिसतें. या रीतीनें विविध व विचित्र प्रकारचे स्थावर व जंगम प्राणी या पृथ्वीच्या पृष्ठावर राहतात, तसेच पृथ्वीच्या पोटांतहि अनेक प्रकारचे मिश्रित व अमिश्रित पदार्थ भरलेले असतात, ते खनन केल्यानें उपलब्ध होतात, म्हणून त्यांस खनिज पदार्थ म्हणतात. अशी ही पृथ्वी सामान्य रीतीनें चतुर्गुणयुक्त सांगितली आहे. कणाद मुनीनें सांगितलें आहे कीं,

**रूपरसगन्धस्पर्शवती पृथिवी ॥ १४० ॥**

रूप, रस, गंध आणि स्पर्शयुक्त पृथ्वी आहे ॥ १४० ॥

त्यापैकीं रूपाचे नील, शुक्ल, पीत, हरित, कपिश व चित्रात्मक असे सात भेद आहेत. रसाचे मधुर, अम्ल, लवण, कटु, कषाय व तिक्त असे सहा भेद आहेत. गंधाचे सुगंध व दुर्गंध असे दोन भेद आहेत. आणि स्पर्शाचे शीत, उष्ण, कठिण व कोमल असे चार भेद आहेत. पृथ्वीच्या आंत बाहेर पाणी राहिलें आहे. तेजहि हिच्या पोटामध्यें व बाहेर राहिलें आहे. वायूहि हिच्या परमाणूंमधील व बाहेरील आकाशामध्यें राहून हीस व्यापून राहिला आहे. आणि आकाशहि हिच्या परमाणूंमध्यें व बाहेर असतें, यासाठीं हा पृथ्वीचा पंचमहाभूतात्मक गोल सांगितला आहे. हिच्यासारखे असंख्य वस्तियुक्त गोल आकाशामध्यें उत्पन्न होऊन राहिले आहेत. ह्मणून ऋग्वेदाच्या पहिल्या मंडलाच्या १६४ व्या सूक्तामध्यें सांगितलें आहे कीं,

**द्यौर्मे पिता जनिता नाभिरत्र ॥ १४१ ॥**

आकाश माझा पिता उत्पन्न करणारा व आदि कारण आहे ॥ १४१ ॥

आकाशाचा अंत नाहीं ह्मणून यास अनंत ह्मणतात. आकाशामध्यें शब्द गुण सांगितला आहे, परंतु वस्तुस्थितीनें पहातां हा गुण वायूमध्यें आहे, आकाशांत तर याचा आरोप केलेला दिसतो. कोणत्याहि एका

बाजूनें छिद्र असलेल्या घड्यांतील किंवा हांडीसारख्या पदार्थांतील वायु बंबानें काढून घेतला असेल आणि नंतर त्यामध्यें घंटा वाजविली असेल, तर तिचा शब्द जणूं अतिशयच दूर होत असल्यासारखा सूक्ष्म ऐकण्यांत येतो. यावरून शब्द गुण वायूमध्यें आहे असें वाटतें. परंतु वायु निःशेष काढून घेतां येणें शक्य नाहीं, थोड्या अंशानें तरी तो पदार्थांतील आकाशामध्यें राहतो, त्यामुळें सूक्ष्म शब्द ऐकूं येतो, म्हणून शब्द गुण आकाशामध्यें आरोपित केला आहे. तर्कसंग्रहांत सांगितलें आहे कीं,

**शब्दगुणकमाकाशम् ॥ १४२ ॥**

आकाश शब्दगुणयुक्त आहे ॥ १४२ ॥

आकाशास कांहीं स्वरूप नाहीं, परंतु त्यामध्यें किंचित् प्रकाश व किंचित् अंधकार मिश्रित झाल्यानें नीलता भासते; आणि पृथ्वी गोल आहे व तिच्या सर्व बाजूंनीं आकाश आहे. म्हणून तिच्या अर्ध गोलाच्या बरोबर लागलेलें आकाश घुमटासारखें भासतें.

याप्रमाणें प्रमाणसहस्त्रीच्या सृष्टिप्रकरणापैकीं प्राणिवर्गवर्णन समाप्त.

---

## ॥ खगोलवर्णन ॥

### वल्कन्.

सर्व ग्रह सूर्यास फेरे घालतात, त्यामध्यें पहिला वल्कन् नांवाचा ग्रह आहे. पुष्कळ वर्षांच्या मागें सूर्याच्या जवळचा ग्रह बुधच समजला जात असे, परंतु त्याच्या गतीमध्यें कांहीं अनियमितपणा समजला गेल्यानें त्याच्या आणि सूर्याच्या मध्यें कोणी दुसरा ग्रह असला पाहिजे, असें थोड्या वर्षांपूर्वी अर्वाचीन ज्योतिष्यांच्या ध्यानांत आलें. नंतर त्याच्या शोधास प्रारंभ केला होता; परंतु तो सूर्याच्या जवळ असल्यानें त्याच्या प्रकाशांत दिसूं शकत नाहीं. शेवटीं इसवी सन १८७८ त खग्रास सूर्यग्रहण होतेवेळीं, अमेरिकेच्या एका ज्योतिष्यानें दूरदर्शक यंत्रानें अवलोकन करून शोधून काढिला. हा सूर्याच्या अगदींच समीप असल्यानें त्यानें याचें नांव वल्कन् म्हणजे अग्नि असें ठेविलें.

याचा आकार अद्यापि यंत्रानें मापणें शक्य झालें नाहीं, परंतु हा सूर्यापासून ६५ लक्ष कोश दूर आहे व सूर्याच्या भोंवतीं पृथ्वीच्या २० दिवसांमध्यें एक वेळ फिरत राहतो, असा अंदाज काढणें शक्य झालें आहे. याच्यावरून आपणापेक्षां सूर्य अदमासें ५० पट मोठा दिसतो, त्यामुळें प्रकाश आणि उष्णता आपणापेक्षां याच्यावर तितकीं अधिक पडतात, त्यांस पोंचण्यास १$\frac{१}{२}$ मिनिटें लागतात. याचे सर्व ऋतूहि आपल्या २० दिवसांत होतात. ह्मणून याच्यावर प्राण्यांची वसतीहि यास योग्य अशी झाली असावी.

## बुध.

वल्कनानंतर सूर्याच्या भोंवतीं फिरणारा ग्रह बुध आहे. त्याचा व्यास ह्मणजे सरळ मध्यरेषा अर्थात् जाडी सुमारें १५०० कोशांची आहे. म्हणजे तो आपल्या पृथ्वीहून घनफळांत अर्थात् आपल्या सर्व अंगानें १९ पट लहान आहे. तो सूर्यापासून अदमासें १ कोटि ८० लक्ष कोश दूर आहे, व कधींहि सूर्याच्या पुढें—मागें दीड तासाहून अधिक वेळपर्यंत उदय व अस्त पावत नाहीं. त्यामुळें तो जर दृष्टीस पडला तर क्षितिजाच्या पुढेंच दृष्टीस पडतो. तो सूर्यप्रकाशाच्या जोरानें बहुतकरून दिसत नाहीं; परंतु वर्षांतून एक वेळ सूर्योदयाच्या पूर्वीं पूर्वेस आणि एक वेळ सूर्यास्तानंतर पश्चिमेस याप्रमाणें दोन वेळ आपल्या देशामध्यें १५ किंवा २० दिवसपर्यंत क्षितिजापुढें दिसतो. तो एका तासांत ५४५०० कोशांच्या वेगानें सूर्यास आपल्या ८८ दिवसांमध्यें एक प्रदक्षिणा करतो. भास्कराचार्यांनीं ग्रहगणिताध्यायांत सांगितलें आहे कीं,

**सिन्धुसिन्धुरनवाष्टगोङ्कषट्त्र्यङ्कसप्तशशिनो ज्ञशीघ्रजाः ॥ १४३ ॥**

४ अब्ज ३२ कोटि सौर वर्षांमध्यें बुधाचे १७९३६९९८९८४ शीघ्रपर्यय होतात. या हिशोबानें त्याची एक शीघ्रपरिक्रमा होण्यास आपले ८८ दिवस लागतात ॥ १४३ ॥

यावरून त्याच्यावर राहणारांचें आपल्या तीन महिन्याएवढें वर्ष होतें. तो आपल्या अंगाभोंवतीं २५ तासांत एक वेळ फिरतो, असें अनुमान झालें

आहे. म्हणून त्याच्यावर होणाऱ्या प्रकाशाच्या न्यूनाधिक कला दूरदर्शक यंत्रानें दिसतात. प्रकाशाविषयीं सांगितलेल्या प्रकाशकिरणांच्या प्रसरण-धर्माप्रमाणें त्या ग्रहावरून आपल्यापेक्षां सूर्य ६ पासून ७ पट पर्यंत मोठा दिसतो, आणि तेथें प्रकाश व उष्णताहि तितकीं अधिक पडतात, तीं पोंचण्यास तीन मिनिटें लागतात. यावरून प्राण्यांची वसतीहि त्याच्यावर योग्य अशी झाली असावी. कांहीं कांहीं वेळीं तो सूर्यबिंबावरील काळ्या डागाप्रमाणें दिसत असतो. ज्या वेळीं तो पृथ्वी आणि सूर्य यांच्यामधून जातो, त्या वेळीं पृथ्वीच्या जवळ होतो व ज्या वेळीं सूर्याच्या पलीकडे जातो त्या वेळीं पृथ्वीपासून दूर होतो.

## शुक्र.

बुधानंतर सूर्याभोंवतीं फिरणारा ग्रह शुक्र आहे. त्याचा व्यास सुमारें ३८०० कोशांचा आहे, त्यामुळें बहुतकरून त्याचें महत्त्व पृथ्वीच्या महत्त्वाएवढें आहे. सूर्य—चंद्राशिवाय आकाशांतील सर्व गोलांहून तो अधिक तेजस्वी दिसतो. ज्या वेळीं तो सूर्य आणि पृथ्वी यांच्यामध्यें येतो त्या वेळीं चंद्राशिवाय सर्व ग्रहांहून तो पृथ्वीच्या अतिशय जवळ असतो; कारण त्याच्या फिरण्याच्या मार्गाच्या मागाहून पृथ्वीचा फिरण्याचा मार्ग आहे, आणि ज्या वेळीं तो सूर्याच्या दुसऱ्या बाजूनें जातो, त्या वेळीं पृथ्वीपासून दूर असतो. तो सूर्यापासून ३ कोटि ३५ लक्ष कोश दूर आहे, आणि एका तासांत ३८८०० कोशांच्या वेगानें आपल्या २२४ दिवसांत सूर्यास १ प्रदक्षिणा करीत रहातो. भास्कराचार्यांनीं ग्रहगणिताध्यायांत सांगितलें आहे कीं,

द्विनन्दवेदाङ्कगजाग्निलोचनद्विशून्यशैलासितशीघ्रपर्ययाः ॥ १४४ ॥

४ अब्ज ३६ कोटि सौर वर्षांमध्यें शुक्राचे ७०२२३८९४९२ शीघ्रपर्यय होतात, या हिशोबानें त्याची एक शीघ्रपरिक्रमा होण्यास आपले २२४ दिवस लागतात ॥ १४४ ॥

ह्मणजे त्यावर राहणाऱ्यांचें सुमारें आपल्या सवासात महिन्यांचें वर्ष होतें, तितक्या वेळांत तेथें सर्व ऋतु झाले पाहिजेत. तो आपल्या अंगाभोंवतीं २३

तासामध्यें प्रदक्षिणा करतो, असा अदमास काढणें शक्य झालें आहे. त्यामुळें त्याच्यावरच्या दिवसरात्रीहि बहुतकरून आपल्या दिवसरात्रीएवढ्या असतात. तोहि पृथ्वीपासून अंतर्ग्रह आहे, ह्मणून त्याच्यावर होणाऱ्या प्रकाशाच्या न्यूनाधिक कला दूरदर्शक यंत्रानें दिसतात. तो ज्या वेळीं सूर्याच्या पूर्वेस असतो, त्या वेळीं सूर्यास्त झाल्यानंतर २९२ दिवसपर्यंत दिसतो, म्हणून तो सायंकाळचा तारा ह्मटला जातो, आणि ज्या वेळीं सूर्याच्या पश्चिमेस असतो, त्या वेळीं सूर्योदय होण्यापूर्वीं तितके दिवसपर्यंत दिसतो, त्यामुळें तो सकाळचा तारा ह्मटला जातो. तो सकाळीं किंवा सायंकाळीं ३ तासांपेक्षां अधिक वेळपर्यंत दिसत नाहीं. तो सूर्यास आपल्या २२४ दिवसांमध्यें फेरा घालतो, आणि त्याच्यापुढें—मागें २९२ दिवसपर्यंत दिसतो, त्याचें कारण हें कीं आपली पृथ्वीहि मंदगतीनें त्याच्या मागूनमागून जाऊन सूर्यास फेरे घालते, त्यामुळें तो पुष्कळ वेळपर्यंत दिसतो. पृथ्वी स्थिर असती तर असें झालें नसतें. प्रकाशधर्माप्रमाणें शुक्रावर प्रकाश आणि उष्णता पृथ्वीपेक्षां अदमासें डावीं पडतात, त्यांस तेथें पोंचण्यास ६ मिनिटें लागतात. तेथून सूर्यहि आपल्यापेक्षां डावा दिसतो, त्यामुळें त्याच्यावर प्राण्यांची वसतीहि त्याच्या योग्य अशी झाली असावी. शुक्रहि ज्या वेळीं सूर्य आणि पृथ्वी यांच्यामधून जातो, त्या वेळीं कांहींकांहीं वेळीं तो सूर्याच्या आड येतो; तो दूरदर्शक यंत्रानें अवलोकन केला असतां सूर्यबिंबावरील काळ्या डागासारखा दिसतो.

## पृथिवी.

शुक्रानंतर सूर्यासभोंवार फिरणारा ग्रह आपली पृथ्वी आहे. ही सूर्यापासून सुमारें ४ कोटि ६२ लक्ष कोश दूर आहे. हिचा पूर्व—पश्चिम व्यास अदमासें ३९६० कोश आणि परिधि अर्थात् घेर १२३७५ कोश आहे. कारण पृथ्वीच्या मध्यभागावर ज्या ठिकाणीं सूर्य उदय पावतो, त्या स्थानापासून पश्चिमेस ५०० कोशांवर त्याचा उदय होण्यास एक होरा म्हणजे एक तासाचा वेळ लागतो, असें आतां विजेची तार सर्व पृथ्वीच्या परिधीव

गांठविलेली असल्यामुळें तिच्या द्वारा वातमीनें सिद्ध झालें आहे. आतां ज्याठिकाणीं सूर्य उदय पावतो, त्याच ठिकाणीं पुनः उदय पावण्यास त्यास जवळ जवळ २४ तास लागतात. म्हणून एक तासाच्या वेळेंत जर ५०० कोश होतात, तर २४ तासांच्या वेळेंत १२००० कोस झाले पाहिजेत, असें ठरतें. म्हणजे पृथ्वीच्या पूर्व–पश्चिम घेराविषयीं कांहीं शंका राहिलेली नाहीं. वाटेल त्या गोलाचा घेर सिद्ध झाला असतां त्याची जाडी भूमितीच्या गणितानें लगेच शोधून काढतां येते. म्हणून पृथ्वीच्या गोलाच्या जाडी-विषयीं अर्थात् व्यासाविषयीं कांहीं शंका राहत नाहीं. काशीविद्यासुधा-निधीमध्यें काशी येथील श्री. बापुदेव शास्त्र्यांनीं ज्योतिषासंबंधीं लिहून ठेवलेल्या विषयांत सांगितलें आहे कीं,

**व्यासे भनन्दाग्निहते विभक्ते खबाणसूर्यैः परिधिस्तु सूक्ष्मः ॥१४५॥**

कोणत्याहि गोलाच्या व्यासास ३९२७ नीं गुणून १२५० नीं भागिलें असतां त्या गोलाचा सूक्ष्म परिधि निघतो ॥ १४५ ॥

भास्कराचार्यांनी शिरोमणींतील ग्रहगणिताध्यायाच्या चंद्रग्रहणाधिकाराच्या भाष्यामध्यें सांगितलें आहे कीं,

**भनन्दाग्निमितपरिधेः खबाणसूर्यैर्मितो व्यासः ॥ १४६ ॥**

३९२७ योजनें परिधीचा ह्मणजे घेराचा १२५० योजनें व्यास ह्मणजे जाडी होते ॥ १४६ ॥

पुनः आर्यभट्टानेंहि आर्यसिद्धांताच्या गणितपादांत सांगितलें आहे कीं,

**चतुरधिकं शतमष्टगुणं द्वाषष्टिस्तथा सहस्राणाम् ।**
**अयुतद्वयविष्कम्भस्यासन्नो वृत्तपरिणाहः ॥ १४७ ॥**

गोलाचा व्यास २०००० योजनें असेल तर त्याच्या जवळजवळचा परिधि ह्मणजे घेर ६२८३२ योजनें होतो ॥ १४७ ॥

उत्तर–दक्षिण टोंकाच्या बाजूस पृथ्वी चपटी असल्यानें पूर्व–पश्चिमेहून जाडीमध्यें अदमासें १३ कोश आणि परिधीमध्यें अदमासें ४१ कोश कमी आहे. या रीतीचें पृथ्वीगोलाचें महत्त्व भूमितीच्या गणितानें अर्वाचीन ज्योति-

ष्यांनीं सूक्ष्म यंत्रांच्या साहाय्यानें शोधून काढिलें आहे. ज्यांस या गणिताचें ज्ञान असेल, त्यांस हें शोधून काढिलेलें महत्त्व जणूं प्रत्यक्ष मापून काढिलें असावेंसें वाटेल. भास्कराचार्यादि पूर्वींच्या आर्यज्योतिष्यांनींहि याच गणितानें पृथ्वीचें महत्त्व शोधून काढिलें होतें, परंतु त्यावेळीं आतांच्या सारखीं सूक्ष्म यंत्रें नव्हतीं, त्यामुळें त्यांनीं काढिलेल्या महत्त्वामध्यें किंचित् फरक आलेला आहे. सिद्धांतशिरोमणीच्या गोलाध्यायांत भास्कराचार्यांनीं सांगितलें आहे कीं,

**पुरान्तरं चेदिदमुत्तरं स्यात्तदक्षविश्लेषलवैस्तदा किम् ।**
**चक्रांशकैरित्यनुपातयुक्त्या युक्तं निरुक्तं परिधेः प्रमाणम् ॥१४८॥**

कोणत्याहि उत्तर–दक्षिणेच्या दोन शहरांच्या मधल्या अक्षांशांची वजाबाकी करून जितके अंश बाकी राहतील तितके अंश बरोबर जर त्या पुरांच्या उत्तर बाजूचें योजनात्मक अंतर इतकें आहे, तर सर्व भूगोलचक्राचें ३६० अंशांनीं किती? या त्रैराशिकाच्या हिशोबानें भूगोलाच्या घेराचें जें प्रमाण सांगितलें तें योग्यच आहे ॥ १४८ ॥

**निरक्षदेशात् क्षितिषोडशांशे भवेदवन्ती गणितेन यस्मात् ।**
**तदन्तरं षोडशसंगुणं स्याद् भूमानमस्माद्बहु किं तदुक्तम् ॥१४९॥**

उज्जयिनी नगरी विषुव–वृत्तापासून पृथ्वीच्या सोळाव्या अक्षांशावर गणितानें येते. ह्मणून विषुव–वृत्तापासून त्याचें योजनात्मक अंतर १ अक्षांशाच्या योजनात्मक अंतराहून १६ पट होतें. यावरून पृथ्वीच्या घेराचें हें प्रमाण सांगितलें आहे. पुष्कळ सांगण्यानें काय? ॥ १४९ ॥

पृथ्वीची पूर्वपश्चिम वर्तुलमध्यरेषा लंकेवरून जाते, असें प्राचीन आर्य ज्योतिषी समजत असत, त्यामुळेंच उज्जयिनी शहर विषुव–वृत्तापासून अर्थात् वर्तुलमध्यरेषेपासून १६ अक्षांशांच्या अंतरावर सांगितलें आहे. वस्तुतः पृथ्वीची पूर्वपश्चिम वर्तुलमध्यरेषा लंकेहून ७ अंश दक्षिणेस आहे, त्यामुळें सांप्रत उज्जयिनी शहर २३ अक्षांशांच्या अंतरावर आलेलें आहे; परंतु लंकेपासून तें १६ अंशांच्या अंतरावरच आहे. या रीतीनें गणित करून भास्क

राचार्यांनीं शिरोमणीच्या याच अध्यायांत पृथ्वीचें उत्तर—दक्षिण महत्त्व याप्रमाणें सांगितलें आहे:—

**प्रोक्तो योजनसंख्यया कुपरिधिः सप्ताङ्गनन्दाब्धय—**
**स्तद्व्यासः कुभुजङ्गसायकभुवः सिद्धांशकेनाधिकाः ॥ १५० ॥**

पृथ्वीचा घेर ४९६७ योजनें आणि व्यास १५८१$\frac{1}{4}$ योजनें सांगितला आहे ॥ १५० ॥

पृथ्वी स्वतःच्या अंगाभोंवतीं सुमारें २४ तासांमध्यें एकदा फिरते, तितक्या वेळेंत हिच्यावर दिवस व रात्र होते; त्यास ज्योतिषी सावन दिवस ह्मणतात. भास्कराचार्यांनीं शिरोमणींतील ग्रहगणिताध्यायाच्या मध्यमाधिकारांत सांगितलें आहे कीं,

**इनोदयद्वयान्तरं तदर्कसावनं दिनम् ।**
**तदेव मेदिनीदिनं भवासरस्तु भभ्रमः ॥ १५१ ॥**

सूर्याच्या दोन उदयांमधील जें अंतर तो सूर्याचा सावन दिवस, तोच पृथ्वीचा दिवस आणि नक्षत्रमंडलाचा जो भ्रम तो नक्षत्र सावन दिवस म्हणण्यांत येतो ॥ १५१ ॥

जसा एकाद्या गोल कंदुकामध्यें सळी रोंवून तो कंदुक त्या सळीवर वेगानें फिरविला असेल तर त्याच्या वर आलेल्या मध्यभागावर अतिशय वेग असतो. आणि सळीबरोबर लागलेल्या त्याच्या टोंकावर वेग असत नाहीं. तसाच पृथ्वीच्या वर्तुलमध्यरेषेजवळ हिच्या फिरण्याचा वेग तासास ५ कोश आहे, तो उत्तर व दक्षिण ध्रुवाच्या बाजूस जातांना कमी होत जातो, तो एकदम ध्रुवाजवळ तर भासतहि नाहीं. या रीतीनें आपल्या अंगाभोंवतीं फिरतांफिरतां पृथ्वी एका तासांत ३२५०० कोसांच्या वेगानें सूर्यास फेरा घालते. ती आपल्या मार्गामध्यें राहून सूर्यास प्रदक्षिणा करीत असतां प्रत्येक महिन्यास आकाशांतील स्पष्ट तारागणाच्या किंवा राशीच्या खालून सरकून दुसऱ्या तारागणाच्या किंवा राशीच्या खालीं जाते. ज्या राशीच्या ताऱ्याखालीं पृथ्वी असेल त्या राशीपासून सातव्या राशीच्या ताऱ्याखालीं सूर्य दिसतो. जरी तो

सरकत नाहीं तरीहि त्याच्या आसपास पृथ्वीच्या फिरण्यानें ज्या ज्या राशीस पृथ्वी बदलत जाते, त्या त्या राशीपासून सातव्या राशीस सूर्य बदललेला दिसतो, आणि पृथ्वीवरच्या राशींचा उदय व सूर्यावरच्या राशींचा अस्त ह्मटला जातो. भास्कराचार्यांनीं शिरोमणीच्या गोलाध्यायांत सांगितलें आहे कीं,

**योऽभ्युदेति समयेन येन तत्सप्तमोऽस्तमुपयाति तेन च ।**
**राशिरूर्ध्वमपमण्डलं कुजादर्द्धमेव सततं यतः स्थितम् ॥ १५२ ॥**

ज्या कालीं जो राशी उदय पावतो, त्याच कालीं त्या राशीपासून सातवा राशि अस्तास जातो, त्यामुळें राशिचक्राचें अर्धमंडल अर्थात् ६ राशी नेहमीं क्षितिजापासून वर राहतात ॥ १५२ ॥

याप्रमाणें फिरतां फिरतां आकाशांतील ज्या राशीच्या ताऱ्यांखालून पृथ्वी निघाली असेल, त्याच राशीच्या ताऱ्यांखालीं पुनः येण्यास तीस १२ महिने लागतात. म्हणून आकाशाच्या मध्यभागीं दिसणाऱ्या ताऱ्यांचे प्राचीन ज्योतिष्यांनीं १२ भाग कल्पिले आहेत, त्यांस राशी म्हणतात. पृथ्वीच्या गमनानें ज्या राशींतून सूर्य गेलेला दिसतो, त्या राशीची संक्रांति ह्मटली जाते. आणि एक महिन्यापर्यंत त्या राशीबरोबर सूर्य दिसतो. म्हणून तितका वेळ-पर्यंत त्या राशीचा सूर्य म्हटला जातो, त्यास सौर मास ह्मणतात. अशा १२ सौर मासांमध्यें पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरत राहते. असें होण्यास ३६५¼ दिवस लागतात, त्यास सौर वर्ष ह्मणतात. भास्कराचार्यांनीं शिरोमणीच्या गोलाध्यायांत सांगितलें आहे कीं,

**पञ्चाङ्गरामास्तिथयः खरामाः सार्द्धद्विदस्राः कुदिनाद्यमध्ये ।**
**अस्यार्कमासोऽर्कलवः प्रदिष्टस्त्रिंशद्दिनः सावनमास एव ॥ १५३ ॥**

एका सौर वर्षामध्यें पृथ्वीचे ३६५ दिवस १५ घटी ३० पळें २२½ विपळें होतात. याचा बारावा भाग सौरमास सांगितला आहे, आणि सावन मास तर ३० दिवसांचाच सांगितला आहे ॥ १५३ ॥

## ऋतु.

पृथ्वीवर सर्व ऋतु व दिवसरात्रींचा कमजास्तपणाहि तिच्या सूर्याभोंवतीं फिरून येण्यानें एका सौर वर्षामध्यें होतात. ऋग्वेदाच्या चवथ्या मंडलाच्या ५३ व्या सूक्ताच्या ७ व्या ऋचेंत सांगितलें आहे कीं,

**आगन् देव ऋतुभिः—॥ १५४ ॥**

सूर्य ऋतूंसहवर्तमान आला ॥ १५४ ॥

पृथ्वीचा गोल सूर्यासमोर आकाशामध्यें किंचित् तिरकस राहिला आहे; म्हणजे तिच्या सूर्याभोंवतीं फिरण्याच्या मार्गाचें उत्तर टोंक तिच्या दक्षिण टोंकाहून नेहमीं किंचित् उंच राहतें. तें ज्यावेळीं आकाशांतील मेषराशीच्या ताऱ्यांच्या खालीं असतें, त्यावेळीं ह्मणजे तारीख २२ सप्टेंबरमध्यें सूर्य तुला राशीच्या ताऱ्याबरोबर दिसतो; त्यावेळीं पृथ्वी बरोबर सूर्याच्या पश्चिम बाजूस असते, त्यामुळें तिच्या दोन्ही टोंकांवर सूर्याचा प्रकाश सारखा पडल्यानें तिच्या दोन्ही गोलार्धांत दिवस—रात्री सारख्या होतात. त्या दिवसापासून पृथ्वी मेषराशीच्या ताऱ्यांखालून म्हणजे सूर्याच्या पश्चिम बाजूंतून सरकत सरकत क्रमानें वृषभ, मिथुन व कर्क राशींच्या ताऱ्यांच्या खालीं सूर्याच्या वरच्या बाजूस येत जाते; आणि सूर्य क्रमानें वृश्चिक, धन व मकर राशींच्या ताऱ्यांच्या खालीं दिसत जातो. आणि पृथ्वीचें दक्षिण टोंक सूर्याच्या बाजूस होत गेल्यानें त्याच्यावर सूर्याचा प्रकाश निरंतर पडतो, त्यामुळें तेथील रहिवाशांच्या सहा महिन्यांच्या दिवसास प्रारंभ होतो. तसेंच उत्तर टोंकाच्या रहिवाशांस पृथ्वीचा वर आलेला मध्यभाग आड आल्या-कारणानें त्या ठिकाणीं सूर्याचा प्रकाश पडण्याचा बंद झाल्यानें ६ महिन्यांच्या रात्रीस आरंभ होतो. दिवसेंदिवस दक्षिण गोलार्धामध्यें राहणाऱ्यांस सूर्य अधिक वेळपर्यंत दिसत जातो, त्यामुळें तेथें दिवस मोठे आणि रात्री लहान होत जातात. उत्तरगोलार्धामध्यें राहणाऱ्यांस याहून उलट म्हणजे सूर्य थोडा वेळ दिसल्यामुळें रात्री मोठ्या व दिवस लहान होत जातात. पुनः त्या दिवसापासून उत्तरगोलार्धामध्यें शरद्, हेमंत व शिशिर

या हिंवाळ्याच्या ऋतूंस आरंभ होतो कारण दिवसेंदिवस सूर्य दक्षिणेस उगवल्यानें उत्तरगोलार्धांत त्याचे किरण वक्र पडतात, त्यामुळें उष्णता कमी व थंडी अधिक होत जाते. दक्षिणगोलार्धांत याहून उलट होतें, म्हणजे सूर्यकिरण तेथें सरळ पडूं लागल्यानें उष्णता अधिक झाल्याकारणानें वसंत, ग्रीष्म आणि वर्षा या उन्हाळ्याच्या ऋतूंस आरंभ होतो. मकरराशीच्या ताऱ्यांखालीं सूर्य दिसतो त्यावेळीं म्हणजे तारीख २१ डिसेंबरमध्यें पृथ्वी सूर्याच्या वरच्या बाजूस बरोबर येऊन राहते. त्यामुळें तिचें दक्षिण टोंक सूर्याच्या बाजूनें जितकें होण्याचें असेल तितकें होऊन राहतें. त्यामुळें त्या दिवसांत दक्षिण गोलार्धांत मोठ्यांत मोठा दिवस आणि लहानांत लहान रात्र होते. याहून उलट उत्तर गोलार्धांत मोठ्यांत मोठी रात्र आणि लहानांत लहान दिवस होतो, तेथपर्यंत सूर्य दक्षिणायनाचा असतो, तो संपून तेव्हांपासून उत्तरायणाचा होतो. कारण त्या दिवसापासून पृथ्वी कर्कराशीच्या ताऱ्यांखालून म्हणजे सूर्याच्या वरच्या बाजूंतून सरकत सरकत क्रमानें सिंह, कन्या व तुला राशींच्या ताऱ्यांखालीं सूर्याच्या पूर्व बाजूस जाऊं लागते, आणि सूर्य क्रमानें कुंभ, मीन आणि मेष या राशींच्या ताऱ्यांबरोबर दिसत जातो. त्यामुळें पृथ्वीचीं दक्षिण व उत्तर दोन्ही टोंकें सूर्याच्या समोर येत गेल्यानें दक्षिणगोलार्धांत मोठा झालेला दिवस लहान आणि लहान झालेली रात्र मोठी होत जाते व उत्तर गोलार्धांत मोठी झालेली रात्र लहान आणि लहान झालेला दिवस मोठा होत जातो, आणि नित्य सूर्य उत्तरेच्या बाजूस सरकत उगवलेला दिसतो, ह्मणून उत्तरायणाचा सूर्य म्हणतात. त्यावेळेपासून म्हणजे तारीख २१ डिसेंबरपासून दक्षिण गोलार्धामध्यें वर्षाऋतु सुरू होतो, अर्थात् तारीख २२ सप्टेंबरपासून त्या गोलार्धामध्यें सरळ पडणाऱ्या सूर्यकिरणांनीं आकर्षून घेतलेलें पाणी पुनः पडण्यास सुरुवात होते. सूर्य मेषराशीचा होतो त्यावेळीं म्हणजे तारीख २२ मार्चास पृथ्वी बरोबर सूर्याच्या पूर्वबाजूस येऊन राहते, त्यामुळें सूर्य पृथ्वीच्या वर्तुलमध्यरेषेवर उगवतो, आणि पृथ्वीचीं दोन्ही टोंकें सूर्याच्या समोर बरोबर आल्यानें तिच्या दोन्ही गोलार्धांत सूर्यप्रकाश सारखा पडल्या-

कारणानें दोन्ही ठिकाणीं पुनः दिवस व रात्र सारखीं होतात. त्या दिवसापासून पृथ्वी तुला राशीच्या ताऱ्यांखालून म्हणजे सूर्याच्या पूर्व बाजूंतून सरकत सरकत क्रमानें वृषभ, मिथुन व कर्क यांच्या ताऱ्यांबरोबर दिसत जाते. आणि पृथ्वीचें उत्तर टोंक सूर्याच्या बाजूस होत गेल्यानें त्याच्यावर सूर्याचा प्रकाश निरंतर पडतो, त्यामुळें तेथें राहणाऱ्यांस ६ महिन्यांची रात्र पुरी होऊन ६ महिन्यांच्या दिवसास प्रारंभ होतो. तसेंच दक्षिण टोंकास राहणाऱ्यांस पृथ्वीचा वर आलेला मध्यभाग आड आल्याकारणानें तेथें सूर्याचा प्रकाश पडण्याचा बंद झाल्यामुळें ६ महिन्यांचा दिवस पुरा होऊन ६ महिन्यांच्या रात्रीस प्रारंभ होतो. दिवसेंदिवस उत्तरगोलार्धांत राहणाऱ्यांस सूर्य अधिक वेळपर्यंत दिसत जातो. त्यामुळें तेथें दिवस मोठे व रात्री लहान होत जातात, याहून उलट दक्षिण गोलार्धांत राहणाऱ्यांस सूर्य थोडा वेळ दिसल्यानें तेथें रात्री मोठ्या व दिवस लहान होत जातात. पुनः त्या दिवसापासून दक्षिण गोलार्धामध्यें वसंत, ग्रीष्म व वर्षा या हिंवाळ्याच्या ऋतूंस आरंभ होतो. कारण दिवसेंदिवस सूर्य उत्तरेस उगवल्यानें दक्षिण गोलार्धांत त्याचे किरण वक्र पडतात, त्यामुळें उष्णता कमी आणि थंडी जास्त होत जाते. उत्तरगोलार्धांत याहून उलट होतें, म्हणजे सूर्यकिरण तेथें सरळ पडूं लागल्यामुळें उष्णता अधिक झाल्याकारणानें शरद्, हेमंत व शिशिर हे हिंवाळ्याचे ऋतु पुरे होऊन वसंत, ग्रीष्म व वर्षा या उन्हाळ्याच्या ऋतूंस आरंभ होतो. कर्कराशीचा सूर्य होतो त्यावेळीं म्हणजे तारीख १ जूनमध्यें पृथ्वी सूर्याच्या खालीं येऊन राहते, त्यामुळें तिचें उत्तर टोंक सूर्याच्या बाजूस जितकें होण्याचें असेल तितकें होऊन राहिल्यानें त्या दिवशीं उत्तर गोलार्धांत मोठ्यांत मोठा दिवस आणि लहानांत लहान रात्र होते. याहून उलट दक्षिण गोलार्धांत मोठ्यांत मोठी रात्र व लहानांत लहान दिवस होतो. तेथपर्यंत सूर्य उत्तरायणाचा असतो तो संपून तेव्हांपासून दक्षिणायनाचा होतो. कारण त्या दिवसापासून पृथ्वी मकरराशीच्या ताऱ्यांखालून ह्मणजे सूर्याच्या खालच्या बाजूंतून सरकत सरकत क्रमानें कुंभ, मीन व मेष राशींच्या

ताऱ्यांखालीं सूर्याच्या पश्चिम बाजूस येण्यास सुरवात होते, आणि सूर्य क्रमानें सिंह, कन्या व तुला राशींच्या ताऱ्यांबरोबर दिसत जातो. त्यामुळें पृथ्वीचीं उत्तर व दक्षिण दोन्ही टोंकें सूर्याच्या समोर येत गेल्यानें उत्तर गोलार्धांत मोठा झालेला दिवस लहान आणि लहान झालेली रात्र मोठी होत जाते; व दक्षिण गोलार्धांत मोठी झालेली रात्र लहान व लहान झालेला दिवस मोठा होत जातो. आणि नित्य सूर्य दक्षिणेच्या बाजूस सरकत उगव-लेला दिसतो. म्हणून दक्षिणायनाचा सूर्य ह्मणतात. तेव्हांपासून ह्मणजे तारीख २१ जूनपासून उत्तरगोलार्धांत वर्षाऋतूस प्रारंभ होतो, अर्थात् तारीख २२ मार्चपासून त्या गोलार्धांत सरळ पडणाऱ्या सूर्यकिरणांनीं आक-र्षण केलेलें पाणी पुनः पडण्यास सुरवात होते. तुला राशीचा सूर्य होतो त्यावेळीं ह्मणजे तारीख २२ सप्टेंबर रोजीं पृथ्वी बरोबर सूर्याच्या पश्चिमेस येऊन राहते. त्यामुळें सूर्य पृथ्वीपासून वर्तुल मध्यरेषेवर उगवतो. आणि पृथ्वीचीं दोन्ही टोंकें सूर्याच्या समोर बरोबर आल्यानें तिच्या दोन्ही गोलार्धांत सूर्यप्रकाश सारखा पडल्याकारणानें दोन्ही ठिकाणीं दिवस व रात्र समान होतात. त्या दिवसापासून उत्तरटोंकाच्या रहिवाशांचा ६ महिन्यांचा दिवस पुरा होतो, आणि ६ महिन्यांच्या रात्रीस प्रारंभ होतो; आणि दक्षिण टोंकाच्या रहिवाश्यांस त्याहून उलट होतें. उत्तर गोलार्धांत वसंत, ग्रीष्म आणि वर्षा हे उन्हाळ्याचे ऋतु पुरे होतात, आणि दक्षिणगोलार्धांत याहून उलट होतें. भास्कराचार्यांनीं शिरोमणीच्या ग्रहगणिताध्यायांत सांगितलें आहे कीं,

**रवेश्चक्रभोगोऽर्कवर्षं प्रदिष्टं द्युरात्रं च देवासुराणां तदेव ॥ १५५ ॥**

सूर्याच्या राशिचक्र भोगण्याच्या कालास सौर वर्ष ह्मटलें आहे, आणि तेंच देव व असुर यांचें अहोरात्र ह्मटलें आहे ॥ १५५ ॥

सूर्यसिद्धांताच्या भूगोलाध्यायांत सांगितलें आहे कीं,

**मेषादावुदितः सूर्यस्त्रीन् राशीनुदगुत्तरम् ।**
**संचरन् प्रागहर्मध्यं पूरयेन्मेरुवासिनाम् ॥ १५६ ॥**

मेषादि राशीमध्यें उदय पावलेला सूर्य क्रमेंकरून उत्तरेच्या तीन राशींत जात असतां पृथ्वीच्या उत्तर टोंकवासी लोकांचें दिवसाचें पूर्वार्ध पुरें करतो १५६

**कर्कादीन् संचरंस्तद्वदह्नः पश्चार्धमेव सः ।**
**तुलादींस्त्रीन्मृगादींश्च तद्वदेव सुरद्विषाम् ॥ १५७ ॥**

त्याचप्रमाणें कर्कादि तीन राशींस जात असतां तो देवांच्या दिवसाचें पश्चिमार्ध पुरें करतो; आणि तसेंच तुलादि व मृगादि तीन तीन राशींमध्यें जात असतां असुरांच्या दिवसाचें पूर्वार्ध व परार्ध पुरें करतो ॥ १५७ ॥

**अतो दिनक्षपे तेषामन्योन्यं हि विपर्ययात् ।**
**अहोरात्रप्रमाणं च भानोर्भगणपूरणात् ॥ १५८ ॥**

याहून देवदैत्यांच्या दिवसरात्री परस्पर उलट होतात; आणि या दिवस-रात्रींचें प्रमाण सूर्याच्या एक वेळच्या राशिचक्रभोगानें होतें ॥ १५८ ॥

वाग्भट्टानेंहि स्वतःच्या अष्टांगहृदय नांवाच्या वैद्यकग्रंथाच्या ऋतुचर्याध्यायांत सांगितलें आहे कीं,

**मासैर्द्विसंख्यैर्माघाद्यैः क्रमात् षड् ऋतवः स्मृताः ।**
**शिशिरोऽथ वसन्तश्च ग्रीष्मवर्षाशरद्धिमाः ॥ १५९ ॥**

क्रमानें माघादि दोन दोन महिन्यांनीं शिशिर, वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद् व हेमंत हे ६ ऋतु सांगितले आहेत ॥ १५९ ॥

याप्रमाणें मेषाच्या सूर्यापासून ते कन्येच्या सूर्यापर्यंत उत्तरगोलार्धांत वसंत, ग्रीष्म आणि वर्षा या ऋतूंचा उन्हाळा आणि दक्षिणगोलार्धांत शरद्, हेमंत आणि शिशिर या ऋतूंचा हिंवाळा होतो. तसेंच तुलेच्या सूर्यापासून ते मीनाच्या सूर्या-पर्यंत दक्षिणगोलार्धांत वसंत, ग्रीष्म आणि वर्षा या ऋतूंचा उन्हाळा व उत्तर-गोलार्धांत शरद्, हेमंत आणि शिशिर या ऋतूंचा हिंवाळा होतो. असें असतांहि मकरराशीपासून आरंभ करून अर्थात् पौष मासापासून मिथुन राशीपर्यंत अर्थात् ज्येष्ठमासापर्यंत सूर्य उत्तरायणाचा होतो, तितक्या वेळांत उत्तरगोलार्धांत कित्ती-एक ठिकाणीं दर दोनदोन महिन्यांस शिशिर, वसंत व ग्रीष्म ऋतु आणि कर्क-राशीपासून आरंभ करून अर्थात् आषाढ महिन्यापासून धनराशीपर्यंत, अर्थात्

मार्गशीर्ष महिन्यापर्यंत सूर्य दक्षिणायनाचा होतो, तितक्यावेळेंत प्रत्येक दोनदोन महिन्यांस वर्षा, शरद्, व हेमंत ऋतु होतात. दक्षिणगोलार्धामध्यें या दोन्ही वेळीं याहून उलट समजावें. सूर्यसिद्धांताच्या मानाध्यायांत सांगितलें आहे कीं,

**भानोर्मकरसंक्रान्तेः षण्मासा उत्तरायणम् ।**
**कर्कादेस्तु तथैव स्यात् षण्मासा दक्षिणायनम् ॥ १६० ॥**

सूर्याच्या मकरसंक्रांतीपासून ६ महिने उत्तरायण, तसेंच कर्कसंक्रांतीपासून ६ महिने दक्षिणायन ह्मटलें जातें ॥ १६० ॥

**द्विराशिनाथा ऋतवस्ततोऽपि शिशिरादयः ।**
**मेषादयो द्वादशैते मासास्तैरेव वत्सरः ॥ १६१ ॥**

ते मकरसंक्रांतीपासून शिशिरादि ६ ऋतु दोन दोन महिन्यांचे होतात. आणि मेषादि १२ राशि हे १२ सौर मास होत आणि त्या १२ सौर मासांनीं एक सौर वर्ष होतें ॥ १६१ ॥

श्रीपतीनेंहि सांगितलें आहे कीं,

**मृगादिराशिद्वयभानुयोगात् षडर्तवः स्युः शिशिरो वसन्तः ।**
**ग्रीष्मश्च वर्षाश्च शरच्च तद्वद्धेमन्तनामा कथितोऽत्र षष्ठः ॥ १६२ ॥**

सूर्याच्या मकरादि दोनदोन राशींच्या भोगानें ६ ऋतु होतात. त्यांत शिशिर, वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद् आणि तसाच हेमंतनामक सहावा ऋतु सांगितला आहे ॥ १६२ ॥

पुनः मेषापासून आरंभ करून कन्येच्या सूर्यापर्यंत आपल्या भूगोलाच्या उत्तर ध्रुवावर किंवा टोंकावर राहणाऱ्या लोकांचा दिवस आणि दक्षिणध्रुवावर किंवा टोंकावर राहणाऱ्या लोकांची रात्र होते. कारण तितका वेळपर्यंत उत्तर टोंकाच्या रहिवाशांस पृथ्वीचा मध्यभाग सूर्याच्या आड येत नाहीं आणि दक्षिण टोंकाच्या रहिवाशांस तो सूर्याच्या आड येतो. तसेंच तुळेच्या सूर्यापासून ते मीनेच्या सूर्यापर्यंत आपल्या भूगोलाच्या दक्षिण ध्रुवावर किंवा टोंकावर राहणाऱ्यांचा दिवस आणि उत्तर टोंकावर राहणाऱ्यांची रात्र होते. कारण तितक्या वेळांत दक्षिण टोंकाच्या रहिवाशांस पृथ्वीचा मध्यभाग

सूर्याच्या आड येत नाहीं, आणि उत्तर टोंकाच्या रहिवाशांस तो सूर्याच्या आड येतो; असें असूनहि किती एक असें मानितात कीं, मकरेच्या सूर्यापासून आरंभ करून मिथुनेच्या सूर्यापर्यंत उत्तरायणसमयीं उत्तरटोंकवासी लोकांचा दिवस आणि दक्षिणटोंकवासी लोकांची रात्र होते. आणि कर्काच्या सूर्यापासून आरंभ करून धनाच्या सूर्यापर्यंत दक्षिणायनसमयीं दक्षिणटोंकवास्यांचा दिवस आणि उत्तरटोंकवासीयांची रात्र होते. पण तसें होत नाहीं. भास्कराचार्यांनीं शिरोमणीच्या गोलाध्यायांत सांगितलें आहे कीं,

**दिनं सुराणामयनं यदुत्तरं निशेतरत्संहितिकैः प्रकीर्तितम् ।**
**दिनोन्मुखेऽर्के दिनमेव तन्मतं निशा तथा तत्फलकीर्तनाय तत् १६३**

उत्तरायण देवांचा दिवस आणि दक्षिणायन त्यांची रात्र असें जें संहितावाद्यांनीं सांगितलें आहे, तें मात्र अयनाचें फल सांगण्याकरितां आहे. पण त्यांचें मत तर ज्या वेळीं दिनमान वाढविणारा मेष राशीचा सूर्य होतो, तेव्हांपासूनच देवांचा दिवस, आणि दिवसाचा ऱ्हास करणारा तुला राशीचा सूर्य होतो, तेव्हांपासूनच देवांची रात्र होते, असें असलें पाहिजे ॥ १६३ ॥

**द्वन्द्वान्तमारोहति यैः क्रमेण तैरेव वृत्तैरवरोहतीनः ।**
**यत्रैव दृष्टः प्रथमं स देवैस्तत्रैव तिष्ठन्न विलोक्यते किम् ॥ १६४ ॥**

कारण क्रमेंकरून ज्याप्रमाणें सूर्य दोनदोन राशींच्या अंतापर्यंत चढतो, त्याचप्रमाणें मागें उतरतो, तो ज्या ठिकाणीं प्रथम देवांनीं पाहिला त्याच ठिकाणीं असलेला तो नंतर कां दिसूं नये? ॥ १६४ ॥

## चंद्र.

जसा सूर्याभोंवतीं फिरणाऱ्या गोलास ग्रह ह्मणतात, तसाच ग्रहाभोंवतीं फिरणाऱ्या गोलास उपग्रह अथवा चंद्र ह्मणतात. आपली पृथ्वीहि एक ग्रह आहे, आणि तिच्या भोंवतीं फिरणारा चंद्र हिचा उपग्रह आहे. त्याचा व्यास सुमारें १०८ कोशांचा आहे. ह्मणून तो आपल्या पृथ्वीहून घनफळांत अर्थात् सर्व अंगानें ५० पट लहान आहे. तो पृथ्वीपासून मध्यम अंतरावर अदमासें १२०००० कोश दूर आहे. आणि दर तासास ११५० कोशांच्या वेगानें

सुमारें २७¼ दिवसांमध्यें पृथ्वीभोंवतीं एक प्रदक्षिणा करतो. परंतु तितक्या वेळांत पृथ्वी स्वतःच्या मार्गामध्यें पुढें सरकत जाते. तीस गांठून वळण्यास त्यास दोन दिवस अधिक लागतात. करितां त्याचा सूर्याशीं योग होण्यास २९½ दिवस लागतात. त्यास चांद्रमास ह्मणतात. तो १५ दिवस उत्तरेच्या बाजूस व १५ दिवस दक्षिणेच्या बाजूस सरकत असलेला दिसतो. कारण त्याची पृथ्वीभोंवतीं फिरण्याची गति सर्पगतीसारखी आहे. चंद्र स्वतःची एकच बाजू पृथ्वीकडे ठेवून फिरतो. केव्हांहि त्याची दुसरी बाजू पृथ्वीवरून दिसत नाहीं; त्यावरून असें सिद्ध झालें आहे कीं, तो स्वतःच्या अंगाभोंवतीं एका चांद्रमासामध्यें एकच वेळ फिरतो. त्यामुळें त्याची एक बाजू सूर्याकडे सुमारें आपले १५ दिवसपर्यंत राहिल्यानें त्या ठिकाणीं राहणाऱ्यांस आपल्या १५ दिवसांचा दिवस आणि तितक्याच वेळाची रात्र होते. भास्कराचार्यांनीं शिरोमणीच्या कालमानाध्यायांत सांगितलें आहे कीं,

**रवीन्द्वोर्युतेः संयुतिर्यावदन्या विधोर्मास एतच्च पैत्र्यं द्युरात्रम् ॥१६५॥**

सूर्य आणि चंद्र यांच्या अमावास्येच्या योगापासून दुसऱ्या अमावास्येच्या योगापर्यंत चांद्रमास ह्मटला जातो, आणि हेंच पितरांचें अहोरात्र आहे ॥ १६५॥

याच ग्रंथाच्या गोलाध्यायांत सांगितलें आहे कीं,

**कालेन येनैति पुनः शशीनं क्रामन् भचक्रं विवरेण गत्योः ।**
**मासः स चान्द्रोऽङ्कयमाः कुरामाः पूर्णेषवस्तत्कुदिनप्रमाणम् ॥ १६६॥**

गतीच्या वेगळेपणानें अर्थात् शीघ्रगतीनें चंद्र, नक्षत्रमंडलाखालीं जात असतां जितक्या कालानें सूर्यास पुनः प्राप्त होतो, तितक्या कालास चांद्रमास ह्मणतात. आणि त्यांत पृथ्वीचे २९ दिवस ३१ घटी आणि ५० पळें होतात ॥१६६॥

**दिनं दिनेशस्य यतोऽत्र दर्शने तमी तमोहन्तुरदर्शने सति ।**
**कुपृष्ठगानां द्युनिशं यथा नृणां तथा पितॄणां शशिपृष्ठवासिनाम् ॥१६७॥**

ज्याप्रमाणें पृथ्वीच्या पृष्ठावर राहणाऱ्या मनुष्यांस सूर्याच्या दर्शनाच्या वेळीं दिवस व सूर्याच्या अदर्शनाच्या वेळीं रात्र होते, त्याचप्रमाणें चंद्रगोलाच्या पृष्ठावर राहणाऱ्या पितरांसहि दिवस व रात्र होते ॥ १६७ ॥

**विधूर्ध्वभागे पितरो वसन्तः स्वाधः सुधादीधितिमामनन्ति ।**
**पश्यन्ति तेऽर्कं निजमस्तकोर्ध्वे दर्शे यतोऽस्माद्द्युदलं तदैषाम् ॥१६८॥**

चंद्रगोलाच्या एकदम वरच्या भागामध्यें राहणारे पितर स्वतःच्या खालच्या भागास पृथ्वीचा चंद्र मानितात; ते अमावास्येच्या दिवशीं सूर्यास स्वतःच्या मस्तकावर पाहतात, त्यामुळें तो त्यांचा मध्यान्ह होतो ॥ १६८ ॥

**भार्धान्तरत्वान्न विधोरधःस्थं तस्मान्निशीथः खलु पौर्णमास्याम् ।**
**कृष्णे रविः पक्षदलेऽभ्युदेति शुक्लेऽस्तमेत्यर्थत एव सिद्धम् ॥ १६९ ॥**

आणि पौर्णिमेस चंद्रगोल सूर्यापासून ६ राशींच्या अंतरावर असल्यानें त्याच्या एकदम खालच्या भागावर राहणारांस मध्यान्ह होतो. जे एकदम वरच्या भागांत राहणारे आहेत त्यांस मध्यान्ह होत नाहीं, परंतु मध्यरात्र होते. यावरून असें सिद्ध होतें कीं, चंद्रगोलाच्या एकदम वरच्या भागामध्यें कृष्ण-पक्षाच्या अर्धांत सूर्य उदय पावतो आणि शुक्लपक्षाच्या अर्धांत तो अस्तास जातो ॥ १६९ ॥

आर्यभट्टानें गोलपादांत सांगितलें आहे कीं,

**रविवर्षार्धं देवाः पश्यन्त्युदितं रविं तथा दैत्याः ।**
**शशिमासार्धं पितरः शशिगाः कुदिनार्धमिह मनुजाः ॥ १७० ॥**

६ सौरमासांपर्यंत देव आणि दैत्य, अर्ध्या चांद्रमासापर्यंत चंद्रावर असलेले पितर आणि येथें ह्मणजे भूमीवर राहणारे मनुष्य १२ तासपर्यंत सूर्यास निरंतर उदय पावलेला पाहतात ॥ १७० ॥

सूर्यसिद्धांतांत सांगितलें आहे कीं,

**सकृदुद्गतमब्दार्धं पश्यन्त्यर्कं सुरासुराः ।**
**पितरः शशिगाः पक्षं स्वदिनं च नरा भुवि ॥ १७१ ॥**

देव आणि दैत्य अर्ध वर्षपर्यंत, चंद्रावर राहिलेले पितर पक्षपर्यंत आणि भूमीवर असलेले मनुष्य स्वतःच्या दिवसापर्यंत सूर्यास एक वेळ उदय पावलेला पाहतात ॥ १७१ ॥

पुन: २९½ दिवसांचा चांद्रमास होतो; आणि तशा १२ मासांचें ह्मणजे ३५४ दिवसांचें एक चांद्रवर्ष म्हटलें जातें. परंतु सर्व ऋतु एका सौरवर्षांत येतात. आणि तें वर्ष ३६५ दिवसांचें असल्यानें त्यांत चांद्रवर्षाहून जे ११ दिवस आणि कांहीं घटी पळें अधिक वाढतात त्यांचा प्राचीन ज्योतिष्यांनीं तितक्या वेळामध्यें दोन वेळ चांद्रमास गणून त्यास अधिकमास अशी संज्ञा देऊन चांद्रमान सौरमानाबरोबर मिळवून दिलें आहे; असें केलें नसतें तर सौरमानाप्रमाणें झालेले ऋतु आतां जे चांद्रमानाप्रमाणें पाहण्यांत येतात, ते आले नसते; पण चांद्रमासांत जे ऋतु आले असतील तेच ऋतु दुसऱ्या वर्षीं त्याच चांद्रमासापासून ११¼ दिवस आणि तिसऱ्या वर्षीं २२½ दिवस याप्रमाणें मोडून आले असते, त्यामुळें अतिशय घोंटाळा झाला असता. ५¼ सौर वर्षामध्यें दोन वेळ अधिकमास आला असतां ज्या वर्षीं क्षयमास येईल त्या वर्षीं दोन अधिकमास येतात. क्षयमासांत दोन महिन्यांची गणती कमी होते. भास्कराचार्यांनीं शिरोमणीच्या ग्रहगणिताध्यायांत सांगितलें आहे कीं,

असंक्रान्तिमासोऽधिमासः स्फुटं स्याद्<br>
द्विसंक्रान्तिमासः क्षयाख्यः कदाचित् ।<br>
क्षयः कार्तिकादित्रये नान्यतः स्यात्<br>
तदा वर्षमध्येऽधिमासद्वयं च ॥ १७२ ॥

ज्यामध्यें सूर्यसंक्रांति नाहीं असा चांद्रमास स्पष्ट अधिकमास होतो आणि कधींकाळीं ज्यामध्यें दोन सूर्यसंक्रांति येतात, असा चांद्रमास क्षयमास होतो. क्षयमास कार्तिकादि तीन महिन्यांमध्यें येतो, इतर कोणत्याहि महिन्यांत येत नाहीं आणि ज्या वर्षीं क्षयमास येतो त्या वर्षीं दोन अधिकमास होतात १७२

गतोऽब्ध्यद्रिनन्दैर्मिते शाककाले तिथीशैर्भविष्यत्यथाङ्गाक्षसूर्यैः ।<br>
गजाद्र्यग्निभूमिस्तथा प्रायशोऽयं कुवेदेन्दुवर्षैः क्वचिद्गोकुभिश्च॥१७३॥

क्षयमास शके ९७४ या वर्षीं आला होता, तसाच शके १११५ ११५६ व १२७८ या वर्षांत येईल. बहुतकरून हा १४१ वर्षांनीं येतो, परंतु कांहींकांहीं वेळीं १२२ वर्षांनीं व १६० वर्षांनींहि येतो ॥ १७३ ॥

शिरोमणीच्या गोलाध्यायांत सांगितलें आहे कीं,

**सौरान्मासादैन्दवः स्याल्लघीयान्यस्मात्तस्मात्संख्यया तेऽधिकाः स्युः।**
**चान्द्राः कल्पे सौरचान्द्रान्तरे ये मासास्तज्ज्ञैस्तेऽधिमासाः प्रदिष्टाः॥**

सौरमासाहून चांद्रमास लहान असतो, करितां तो एका कल्पामध्यें संख्येनें अधिक होतो. तो सौरमासाहून जितका अधिक होतो तितका ज्योतिर्वेत्त्यांनीं अधिकमास सांगितला आहे ॥ १७४ ॥

चंद्रहि पृथ्वीच्या बरोबर राहून एका सौर वर्षांत सूर्यास एक प्रदक्षिणा करतो. त्यामुळें त्याच्यावरहि सर्व ऋतु तितक्याच वेळांत झाले पाहिजेत. प्राचीन विद्वानांनीं असा तर्क केला आहे कीं, चंद्रामध्यें जितका पाण्याचा भाग आहे तितक्या भागांत सूर्याचे किरण प्रतिफलित झाल्यानें तो प्रकाशित भासतो आणि जितका स्थलाचा भाग आहे तितक्या भागांत सूर्यकिरण प्रतिफलित न झाल्यानें तो काळा दिसतो. कृष्णयजुर्वेदांतील पहिल्या कांडाच्या पहिल्या प्रपाठकाच्या नवमाध्यायांत सांगितलें आहे कीं,

**यामैरियं चन्द्रमसि स्वधाभिः ॥ १७५ ॥**

या भूमीस चंद्रगोलांत अमृत कणांबरोबर स्थापन केली आहे ॥ १७५ ॥

परंतु अर्वाचीन विद्वानांनीं चंद्रास दूरदर्शक यंत्रानें वारंवार पाहून तपास करून असा तर्क केला आहे कीं, चंद्रामध्यें पाणी, वातावरण व अभ्रहि नाहीं; पण उंच सखल पर्वत मात्र आहेत, त्यांच्यावर सूर्यकिरण पडल्यानें चंद्राचा तितका भाग प्रकाशित दिसतो. आणि त्या पर्वतांची छाया ज्या मैदानांत कोतरांत व दरीखोऱ्यांतून पडते तेवढा भाग काळा दिसतो. चंद्रामध्यें पाणी असतें तर दूरदर्शक यंत्रानें तितका भाग सपाट व प्रकाशित दिसला पाहिजे होता, परंतु तसा न भासतां उंच सखल भाग प्रकाशित भासतो, त्यामुळें तेथें पाणी नाहीं परंतु पर्वत आहेत, असें अनुमान करण्यांत आलें आहे. पुनः चंद्राच्या आसपास वातावरण व अभ्रें असतीं तर दूरदर्शक यंत्रानें तो जसा साफ दिसतो तसा दिसला नसता, तर त्याच्या आसपास धुरकटसारखें दिसलें असतें, आणि त्यांत अभ्रांची हालचाल झालेली

दिसली असती. याप्रमाणें चंद्रामध्यें जर पाणी, वातावरण व अभ्रें नसतीलच, तर तेथें कांहीं वनस्पति किंवा आपल्या पृथ्वीवरच्या प्राण्यांसारखे कांहीं प्राणीहि नसले पाहिजेत ! तर काय तेथें केवळ ओसाड असलेले भयंकर पर्वत, टेकड्या, कोतर व मैदानेंच असतील? असें असेल तर असेंच समजलें पाहिजे कीं, अद्यापि चंद्रगोल प्राण्यांच्या वसतीस योग्य झाला नाहीं. परंतु चंद्रावर सूर्यकिरण पडतात, ते प्रतिबिंबित झाल्यानें चंद्र आपणास प्रकाशित भासतो, असें प्रचीन व अर्वाचीन विद्वानांनीं उत्तम रीतीनें जाणलें आहे. कारण चंद्राच्या कलांची क्षय—वृद्धि होण्याचें कारण, त्याची पृथ्वीकडची बाजू क्रमानें सूर्याकडे संमुख व विमुख होणें हें आहे, करितां जर चंद्रामध्यें वातावरण व पाणी दोन्ही नसतील आणि केवळ ओसाड पर्वतच असतील, तर त्यांच्यावरून मागें वळणारे सूर्यकिरण उष्णच असल्यानें चंद्राचा प्रकाश आपणास उष्ण लागला पाहिजे. कारण आपल्या भूगोलामध्येंहि जेथें दगडांची जमीन आहे तिच्यावरून मागें वळलेले सूर्यकिरण उष्णच लागतात. कदाचित् असें असूं शकेल कीं, पृथ्वीवर सूर्यकिरणांच्या उष्णतेनें दिवसास झालेली पाण्याची वाफ, जी पृथ्वीजवळच्या जाड वायूहून हलकी झाल्यानें अंतरिक्षामध्यें स्वतःच्या समतोल वायूबरोबर राहण्यास उंच जाते, तीपैकीं सूर्यास्त होईपर्यंत जितकी तेथें पोंचत असतां मार्गामध्यें राहते, तितकी रात्रीस सूर्यकिरणांची उष्णता बंद झाल्यानें थंड होऊन झाकळरूप होऊन पुनः पृथ्वीवर पडते, त्या कारणास्तव आपलें वातावरण थंड होऊन जातें. आणि त्यांतून येणारे चंद्रकिरणहि थंड होऊन गेल्यानें चंद्राचा प्रकाश आपणास शीतळ लागतो. परंतु असें घडत नाहीं. कारण पौर्णिमेचा चंद्र पूर्ण प्रकाशित असतो, आणि सूर्यास्त झाल्यानंतर लगेच उदय पावतो; त्यामुळें आपलें वातावरण व त्यांत असलेल्या पाण्याच्या वाफेनें सूर्याची उष्णता बंद होतांच चंद्राची उष्णता लागल्यानें रात्रीसहि उष्णता असली पाहिजे, पण तसें होत नाहीं, करितां चंद्रामध्येंच कांहीं विलक्षण रीतीनें पाणी व वातावरण दोन्ही असलीं पाहिजेत, त्यामुळें चंद्रावर

पडणारे सूर्यकिरण तेथें थंड होऊन मागें वळतात. ते पृथ्वीवर येत असतां पृथ्वीच्या वातावरणाच्या आर्द्रतेनें विशेष थंड झाल्यामुळें चंद्राचा प्रकाश आपणास अत्यंत थंड भासतो. क्रमेंकरून चंद्राची एक बाजू सूर्याकडे आणि एक बाजू त्याहून उलट्या दिशेस आपले १५ दिवसपर्यंत राहिल्यानें त्याच्या दिवसास तेथें अतिशयच उष्णता व त्याच्या रात्रीस तेथें अतिशयच शीतता असली पाहिजे. तशी उष्णता असल्याकारणानें तेथील वातावरणहि अतिशयच पातळ असलें पाहिजे. आणि तेथें पर्वतांची छाया ज्यांत पडते, अशा काळ्या दिसणाऱ्या मैदानांत पाणी असेल तर त्यांतील झालेली वाफहि रात्रीस, अतिशय थंडी असल्याकारणानें जलरूप होऊन गुरुत्वास प्राप्त होऊन अशा पातळ वातावरणांत राहूं न शकल्यामुळें पुनः वृष्टिरूपानें पडून गेली पाहिजे. त्यामुळें तेथें अभ्रें असलीं तरीहि तीं नसल्यासारखींच असलीं पाहिजेत. वायूचे परमाणु पारदर्शक असल्यामुळें वातावरण न दिसलें पाहिजे; परंतु वाफ व अभ्रें यांच्या उपाधीनें तें धुरकट दिसतें खरें. तसें चंद्रावर न दिसण्याचें कारण तेथें अतिशय उष्णता असल्याकारणानें तेथील वातावरणांत वाफेची व अभ्रांची उपाधि अति सूक्ष्म असली पाहिजे. करितां कदाचित् चंद्रावर दूरदर्शक यंत्रानेंहि न दिसण्यासारखें सूक्ष्म वाफेच्या व अभ्रांच्या उपाधीनें युक्त पातळ वातावरण व जसें पृथ्वीवर अंधारांत असलेलें पाणी दिसतें, तसें पर्वतांच्या छायारूप अंधारांत असलेल्या मैदानांत दिसणार नाहीं असें पाणी असेल, तर त्याच्या योग्य अशा प्राण्यांची वसतीहि तेथें असली पाहिजे. जर या भूमंडलामध्यें लहानांत लहानहि स्थान सूक्ष्म प्राण्यांनीं भरलें आहे, तर चंद्राएवढा गोल प्राण्यांवांचून असेल असें मानितां येत नाहीं. आपल्या पृथ्वीमध्यें प्राण्यांचीं शरीरें मिश्रित पंचमहाभूतांचीं बनलेलीं दिसतात; त्यावरून असें दिसून येतें कीं, प्राणी होण्याकरितां पांचहि महाभूतांची जरूर आहे, तसें असतांहि कांहीं जातींच्या प्राण्यांच्या शरीरांत पृथ्वीचा, कांहींच्या शरीरांत पाण्याचा, कांहींच्या शरीरांत अग्नीचा व कांहीं जातींच्या प्राण्यांच्या शरीरांत वायूचा भाग अधिक पाहण्यांत येतो, तसेंच कांहीं जातींच्या प्राण्यां-

मध्यें दोन भूतांचा तर कांहींत तीन भूतांचा भाग अधिक भासतो. करितां चंद्रमंडळामध्यें कदाचित् वायु व जल हीं दोन्ही महाभूतें थोड्या अंशानें असल्यास काय झालें? तेथें तशा प्रकारचे प्राणी झाले असतील. कारण विषामध्येंहि कृमी असतात, आणि ते विषामध्यें राहूनच जगतात, असें पाहण्यांत येतें, तर अशा कांहीं विलक्षणतेनें चंद्रमंडळांतहि त्याच्या योग्य असे प्राणी उत्पन्न होऊन जीवंत राहूं शकत असतील, यांत कांहीं आश्चर्य दिसत नाहीं. जसा चंद्रगोल सूर्यप्रकाशानें रात्रीस आपणास प्रकाशित झालेला भासतो, तसाच चंद्रगोलावर जर मनुष्यांची वस्ती असेल, तर त्यांस तेथील रात्रीस आपला भूगोलहि सूर्यप्रकाशानें प्रकाशित झालेला भासत असेल. करितां चंद्रगोल जसा पृथ्वीचा चंद्र आहे, तसाच भूगोल चंद्रगोलाचा चंद्र समजावा. चंद्रगोलाहून भूगोलाचें क्षेत्रफळ १४ पट मोठें आहे. करितां तेवढ्या मोठ्या आकारानें व तितक्या अधिक प्रकाशानें हा चंद्रावरून दिसत असेल. चंद्राची जी एकच बाजू नेहमीं पृथ्वीकडे राहते, तिच्यावरून तेथील रात्रीस आपला भूगोल प्रकाशित दिसतो, पण त्याची जी दुसरी बाजू पृथ्वीवरून कधींहि दिसत नाहीं, तेथील वसतीस त्याच्या रात्रीस आपला प्रकाशित झालेला भूगोल कधींहि दिसत नाहीं. चंद्राच्या पृथ्वीकडील बाजूमध्यें कधींहि अंधार पडत नाहीं, कारण तेथें दिवसास सूर्याचा आणि रात्रीस पृथ्वीचा प्रकाश असतो. परंतु त्याच्या दुसऱ्या बाजूमध्यें रात्रीस मुळींच प्रकाश असत नाहीं; कारण तेथून पृथ्वी दिसत नाहीं. जशा चंद्राच्या कमी जास्ती झालेल्या कला आपण पहातों, तशा चंद्रावरून आपल्या भूगोलाच्या कला कमी जास्ती झालेल्या दिसत असतील. पुनः जसे आपण चंद्रावर पर्वत वगैरे पहातों, तशी चंद्राची वसतीहि आपल्या पृथ्वीवरील स्थलांचे व जलांचे विभाग कदाचित् पाहत असेल. आपण चंद्राची एकच बाजू पाहत असतों, कारण तो स्वतःच्या अंगाभोंवतीं एका चांद्रमासांत एक फेरी करतो; परंतु चंद्रावरून आपल्या भूगोलाच्या सर्व बाजू दिसत असतील. कारण ही २४ तासांमध्यें आपल्या अंगाभोंवतीं एक फेरी घालते.

## ग्रहण.

चंद्र, सूर्य आणि पृथ्वी हे तीन गोल ज्या वेळीं एका समसूत्रांत येतात, त्या वेळीं ग्रहण होतें. पौर्णिमेच्या दिवशीं पृथ्वी मध्यें येते, आणि तिच्या एका बाजूस चंद्र आणि दुसऱ्या बाजूस सूर्य असतो. करितां ज्या पौर्णिमेस हे तीन्ही गोल सरळ रेषेंत येतात, त्या पौर्णिमेस चंद्रग्रहण होतें; कारण जशी दिवा व भिंत यांच्यामध्यें ठेवलेल्या पदार्थावर दिव्याचा प्रकाश पडल्यानें त्या पदार्थाची छाया भिंतीवर पडते, तशीच चंद्र आणि सूर्य यांच्यामध्यें पृथ्वी असल्यानें पृथ्वीवर सूर्यप्रकाश पडल्याकारणानें पृथ्वीची छाया चंद्रावर पडते; त्यास चंद्रग्रहण ह्मणतात. ज्या वेळीं पृथ्वीवर चंद्रग्रहण दिसतें, त्याच वेळीं चंद्रलोकवासी लोकांस सूर्यग्रहण भासतें, कारण पृथ्वी मध्यें असल्यानें त्यांस सूर्याचें दर्शन होत नाहीं. याचप्रमाणें अमावास्येस चंद्र मध्यें येतो, आणि त्याच्या एका बाजूस सूर्य आणि दुसऱ्या बाजूस पृथ्वी येते. करितां ज्या अमावास्येस हे तीन्ही गोल सरळ रेषेंत येतात, त्या अमावास्येस सूर्यग्रहण होतें; कारण जसा दिव्याच्या मध्यें पदार्थ आल्यानें दिवा दिसत नाहीं तसेंच पृथ्वी आणि सूर्य यांच्यामध्यें चंद्र आल्यानें सूर्य दिसत नाहीं, यासाठीं सूर्यग्रहण ह्मणतात. ज्यावेळीं पृथ्वीवर सूर्यग्रहण दिसतें, त्याच वेळीं चंद्रलोक-वासी लोकांस पृथ्वीचें ग्रहण भासतें; कारण चंद्रगोलाची छाया पृथ्वीवर पडते. भास्कराचार्यांनीं शिरोमणीच्या गोलाध्यायांत सांगितलें आहे कीं,

**पूर्वाभिमुखो गच्छन् कुच्छायान्तर्यतः शशी विशति ।**
**तेन प्राक् प्रग्रहणं पश्चान्मोक्षोऽस्य निःसरतः ॥ १७६ ॥**

चंद्र पूर्वेस जात असतां पृथ्वीच्या छायेमध्यें प्रवेश करतो, त्यामुळें तींतून निघत असतां त्याचें पुढून ग्रहण आणि मागाहून मोक्ष होतो ॥ १७६ ॥

**पश्चाद्भागाज्जलदवदधः संस्थितोऽभ्येत्य चंद्रो**
**भानोर्बिम्बं स्फुरदसितया छादयत्यात्ममूर्त्या ।**
**पश्चात्स्पर्शो हरिदिशि ततो मुक्तिरस्यात एव**
**क्वापि च्छन्नः क्वचिदपिहितो नैष कक्षान्तरत्वात् ॥ १७७ ॥**

अभ्राप्रमाणें खालीं असलेला चंद्र, मागाहून येऊन सूर्यबिंबास स्वतःच्या स्फुरण पावलेल्या काळ्या मूर्तीनें आच्छादितो, त्यामुळें सूर्यास मागून ग्रहण आणि पुढून मोक्ष होतो, करितांच गतिमार्गाच्या भेदानें कधीं चंद्रानें आच्छादिलेला सूर्य दिसत नाहीं, आणि कधीं आच्छादिलेला नसल्यानें दिसतो ॥१७७॥

याच ग्रंथाच्या ग्रहगणिताध्यायांत सागितलें आहे कीं,

**भूभा विधुं विधुरिनं ग्रहणे पिधत्ते ॥ १७८ ॥**

ग्रहणाचे वेळीं पृथ्वीची छाया चंद्रास आच्छादित करिते, आणि चंद्र सूर्यास आच्छादित करितो ॥ १७८ ॥

आर्यभट्टानेंहि गोलपादांत सांगितलें आहे कीं.

**चन्द्रो जलमर्कोऽग्निर्मृद्भूश्छायापि या तमस्तद्धि ।**
**छादयति शशी सूर्यं शशिनं महती च भूच्छाया ॥ १७९ ॥**

चंद्र जलमय, सूर्य अग्निमय व पृथ्वी मृण्मय आहे, आणि जी छाया तो अंधकार आहे. करितां सूर्यास चंद्र आच्छादित करितो, आणि चंद्रास पृथ्वीची छाया आच्छादित करिते ॥ १७९ ॥

सूर्यसिद्धांताच्या चंद्रग्रहणाधिकारांतहि याप्रमाणें सांगितलें आहें कीं,

**छादको भास्करस्येन्दुरधःस्थो घनवद्भवेत् ।**
**भूच्छायां प्राङ्मुखश्चन्द्रो विशत्यस्य भवेदसौ ॥ १८० ॥**

मेघाप्रमाणें खालीं असलेला चंद्र सूर्यास आच्छादितो, आणि पूर्वेस जात असलेला चंद्र भूच्छायेमध्यें प्रवेश करतो, त्यामुळें त्यास भूच्छाया आच्छादन करणारी होते ॥ १८० ॥

तसेंच ग्रहलाघवांतहि सांगितलें आहे कीं,

**छादयत्यर्कमिन्दुर्विधुं भूमिभा ॥ १८१ ॥**

सूर्यास चंद्र आच्छादित करितो आणि चंद्रास पृथ्वीची छाया आच्छादित करिते ॥ १८१ ॥

पुनः बृहत्संहितेच्या पांचव्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**भूच्छायां स्वग्रहणे भास्करमर्कग्रहे प्रविशतीन्दुः ।**
**प्रग्रहणमतः पश्चान्नेन्दोर्भानोश्च पूर्वार्धात् ॥ १८२ ॥**

चंद्र स्वतःच्या ग्रहणाचे वेळीं पृथ्वीच्या छायेमध्यें प्रवेश करतो आणि सूर्यग्रहणाचे वेळीं सूर्याच्या आड प्रवेश करतो, त्यामुळें एखाद्या वेळीं चंद्राच्या मागच्या अर्धानें आणि सूर्याच्या पुढच्या अर्धानें ग्रहण होत नाहीं ॥१८२॥

**सूर्यात्सप्तमराशौ यदि चोदग् दक्षिणेन नातिगतः ।**
**चन्द्रः पूर्वाभिमुखश्छाया मौर्वीं तदा विशति ॥ १८३ ॥**

पूर्वेस जाणारा चंद्र, ज्यावेळीं सूर्यापासून सातव्या राशीमध्यें उत्तर व दक्षिण गतीनें अधिक सरकला नसेल त्या वेळीं पृथ्वीच्या छायेमध्यें प्रवेश करतो ॥ १८३ ॥

**चन्द्रोऽधःस्थः स्थगयति रविमम्बुदवत्समागताः पश्चात् ।**
**प्रतिदेशमतश्चित्रं दृष्टिवशाद्भास्करग्रहणम् ॥ १८४ ॥**

मेघाप्रमाणें खालीं असलेला चंद्र, सूर्यास मागाहून येऊन झांकतो, त्यामुळें प्रत्येक देशामध्यें दृष्टिवशात् विचित्र प्रकारचें सूर्यग्रहण दिसतें ॥ १८४ ॥

**आवरणं महदिन्दोः कुण्ठविषाणस्ततोऽर्धसंछन्नः ।**
**स्वल्पं रवेर्यतोऽतस्तीक्ष्णविषाणो रविर्भवति ॥ १८५ ॥**

चंद्रास आच्छादणारी पृथ्वीची छाया मोठी असल्यामुळें ग्रहणाचे वेळीं चंद्र पोखरलेल्या शिंगासारखा व अर्धा आच्छादित, आणि सूर्यास आच्छादणारा चंद्र लहान असल्यामुळें सूर्य तीक्ष्ण शिंगासारखा होतो ॥ १८५ ॥

**एवमुपरागकारणमुक्तमिदं दिव्यदृग्भिराचार्यैः ।**
**राहुरकारणमस्मिन्नित्युक्तः शास्त्रसद्भावः ॥ १८६ ॥**

याप्रमाणें खगोलज्ञ आचार्यांनीं ग्रहणाचें कारण सांगितलें आहे, करितां ग्रहण होण्यास राहु कारण नाहीं, असा शास्त्राचा खरा खरा अभिप्राय सांगितला आहे ॥ १८६ ॥

बहुतकरून प्रत्येक १८ वर्षें आणि १० किंवा ११ दिवसांनीं तेंच सूर्यग्रहण व चंद्रग्रहण फिरून होतें. आकाशामध्यें फिरतां फिरतां पृथ्वी व

चंद्र जर बरोबर स्थानापासून सरकले असतील, तर बरोबर त्याच ठिकाणीं पुनः येण्यास त्यांस तितका वेळ लागतो. आणि तेव्हांपासून पुनः पूर्वीप्रमाणेंच ग्रहणें होऊं लागतात. चंद्रग्रहण व सूर्यग्रहण होतेवेळीं त्यांचा वर्ण याप्रमाणें दिसतो. शिरोमणीच्या ग्रहगणिताध्यायांत सांगितलें आहे कीं,

**स्वल्पे छन्ने धूम्रवर्णः सुधांशो-**
**रर्धे कृष्णः कृष्णरक्तोऽधिकेऽर्धात् ।**
**सर्वच्छन्ने वर्ण उक्तः पिशङ्गो**
**भानोश्छन्ने सर्वदा कृष्ण एव ॥ १८७ ॥**

चंद्राचा वर्ण, स्वल्पग्रहणामध्यें धुरासारखा, अर्धग्रहणामध्यें काळा, अर्धाधिक ग्रहणामध्यें लालमिश्रित काळा आणि सर्वग्रहणामध्यें भुरकट सांगितला आहे. आणि सूर्याचा वर्ण ग्रहणाचे वेळीं नेहमीं काळाच सांगितला आहे ॥ १८७॥

## मंगळ.

पृथ्वीनंतर सूर्याभोंवती परिभ्रमण करणारा ग्रह मंगळ आहे. त्याचा व्यास सुमारें २१०० कोशांचा आहे. करितां तो आपल्या पृथ्वीहून घनफळांत अर्थात् सर्व अंगानें ७ पट लहान आहे. तो सूर्यापासून सुमारें ७ कोटि ५ लक्ष कोश दूर आहे. तो ज्यावेळीं सूर्यास्तसमयीं उदय पावतो, त्यावेळीं पृथ्वीच्या अतिशय जवळ असतो, आणि त्याचें अंतर पृथ्वीच्या केवळ १ कोटि ७५ लक्ष कोशांचें होतें, परंतु ज्यावेळीं तो सूर्याच्या पलीकडून सूर्याच्या बरोबरच अस्त पावतो, त्यावेळीं पृथ्वीपासून अतिशय दूर होतो, आणि त्याचें अंतर सुमारें ११ कोटि ७० लक्ष कोशांचें होतें. तो दर तासास २७००० कोशांच्या वेगानें सूर्याभोंवतीं आपल्या ६८७ दिवसांत १ प्रदक्षिणा करतो. भास्कराचार्यांनीं ग्रहगणिताध्यायांत सांगितलें आहे कीं,

**युग्मयुग्मशरनागलोचनव्यालषण्णवयमाश्विनोऽसृजः ॥१८८॥**

४ अब्ज ३२ कोटि सौरवर्षांत मंगळाच्या २२९६८२८५२२ परिक्रमा होतात, या हिशोबानें त्याची एक परिक्रमा होण्यास आपले ६८७ दिवस लागतात ॥ १८८ ॥

त्यामुळें त्याच्यावर राहणाऱ्यांस सुमारें आपल्या दोन वर्षांएवढें वर्ष होतें, आणि त्याचा एक एक ऋतूहि आपल्या ऋतूहून दुप्पट कालाचा होतो. तो सुमारें २४॥ तासांत आपणाभोंवतीं फिरतो, त्यामुळें आपल्यापेक्षां तेथील दिवस रात्री सहज मोठ्या होतात. त्याच्यावर सूर्यप्रकाश पोंचण्यास १२ मिनिटें लागतात. आणि आपल्यापेक्षां अर्धी थंडी व उष्णता पडते; त्यामुळें तेथील प्राणीहि त्यास योग्य झाले असतील. तेथें सूर्यहि आपल्याहून अर्धा दिसतो. या ग्रहाभोंवतीं फिरणारे दोन उपग्रह अथवा चंद्र आहेत, त्यांतील एक सुमारें ६१५० कोश त्याच्यापासून दूर आहे, आणि तो ३० तासांत त्यास एक प्रदक्षिणा करतो. दुसरा उपग्रह केवळ त्याच्यापासून सुमारें १८०० कोश दूर आहे, आणि तो ७¾ तासांत त्यास एक प्रदक्षिणा करतो. या उपग्रहांचें महत्त्व अद्यापि शोधणें शक्य झालें नाहीं. चांगल्या दूरदर्शक यंत्रानें मंगळाकडे पाहिला असेल, तर त्याच्यावरील जलाचे व स्थलांचे आकार ओळखूं येतात, आणि त्याचें वातावरणहि अभ्रांनीं भरलेलें दिसतें. हा ग्रह लाल अग्नीसारखा प्रकाशित भासतो, तो एक तर याची जमीन लाल असावी, किंवा दुसरें याच्या वातावरणांतून सूर्याचे लाल रंगाचे किरण परावर्तन पावलेले असावेत. या ग्रहावर राहणाऱ्यांस आपली पृथ्वी, आम्हांस शुक्र जेवढा मोठा दिसतो तेवढी मोठी दिसत असेल, आणि जसे कांहीं वेळीं आपणांस बुध व शुक्र सूर्यावरून गेलेले दिसतात तसे त्याच्यावरून बुध, शुक्र व आपली पृथ्वी हे तीन्ही ग्रह एखाद्या वेळीं सूर्यावरून जातांना दिसत असतील. कारण तो या तिघांहून बाहेर राहून सूर्याभोंवतीं फिरतो.

## अल्पग्रह.

मंगळानंतर सूर्याभोंवतीं फिरणारे सीरिस, पालास, जूनो आणि वेस्टा आदिकरून सुमारें २०० अल्पग्रह दिसलेले आहेत; ते साध्या दृष्टीनें कधींच दिसत नाहींत. परंतु दूरदर्शक यंत्रानें पाहिलें असतां दिसून येतात. ते सर्व सूर्यापासून सुमारें १० ते १२ कोटी कोशपर्यंत दूर आहेत, आणि ते त्यास सुमारें आपल्या ३ ते ६ वर्षांत एक प्रदक्षिणा

करतात. हे सर्व ग्रह इतके लहान आहेत कीं, त्यांच्या आकाराचा व आपल्या अंगाभोंवतीं फिरण्याच्या कालाचा अद्यापि शोध लागूं शकत नाहीं.

## बृहस्पति.

सर्व अल्पग्रहांनंतर सूर्यासभोंवतीं फिरणारा ग्रह बृहस्पति आहे. सर्व ग्रहांहून तो मोठा आहे. त्याचा व्यास सुमारें ४३००० कोशांचा आहे, करितां तो आपल्या पृथ्वीहून घनफळानें अर्थात् स्वतःच्या सर्व अंगानें १२५० पट मोठा आहे. तो सूर्यापासून २४ कोटि कोश दूर आहे, आणि एका तासांत सुमारें १४५०० कोशांच्या वेगानें त्यास सुमारें आपल्या १२ वर्षांमध्यें एक परिक्रमा करतो. त्यामुळें त्याच्यावर तितक्या वेळानें एक वर्ष होतें, आणि तेथें एक एक ऋतूहि आमच्या दोन दोन वर्षांचा असला पाहिजे. भास्कराचार्यांनीं शिरोमणीच्या ग्रहगणिताध्यायांत सांगितलें आहे कीं,

**पंचपंचयुगषट्कलोचनव्द्यब्धिषड्गुणमिता गुरोर्मताः ॥ १८९ ॥**

४ अब्ज ३२ कोटि वर्षांत बृहस्पतीच्या ३६४२२६४५५ परिक्रमा होतात, या हिशोबानें त्याची एक परिक्रमा होण्यास सुमारें आमचीं १२ वर्षे लागतात ॥ १८९ ॥

तो स्वतःच्या अंगाभोंवतीं आमच्या १० तासांत फेरी करत असल्यानें त्याच्यावर राहणाऱ्या लोकांस जवळजवळ आपल्या अर्ध्या दिवसाएवढा दिवस अर्ध्या रात्रीएवढी रात्र होत असेल. तेथें सूर्यप्रकाश पोंचण्यास ४० मिनिटें लागतात; आणि तेथून सूर्य आपल्यापेक्षां २७ पट लहान दिसतो, आणि तेथें प्रकाश व उष्णताहि तितकी कमी असते. करितां तेथें प्राण्यांची वस्तीहि त्यास योग्य अशी झाली असेल. दूरदर्शक यंत्रानें पाहिलें असतां या ग्रहाच्या अंगावर उभे काळे पट्टे दिसतात, त्यांचें स्थान वारंवार सरकलेलें दिसल्यानें असें अनुमान करण्यांत आलें आहे कीं, या ग्रहाच्या स्वतःच्या अंगाभोंवतीं फिरण्याच्या वेगानें याच्या आसपासच्या वातावरणांत असलेल्या अभ्रांचे पट्टे होऊन राहिले असतील. पुनः आपल्या पृथ्वीभोंवतीं फिरणारा जसा आपला चंद्र आहे, तसे दूरदर्शक यंत्रानें या ग्रहाकडे

पाहिलें असतां याच्याभोंवतीं फिरणारे चार उपग्रह म्हणजे चंद्र दिसतात. त्यांचीं वारंवार झालेलीं ग्रहणेंहि या यंत्रानें पाहण्यांत येतात, यांपैकीं पहिल्या चंद्राचा व्यास सुमारें १२०० कोशांचा आहे आणि तो बृहस्पतीपासून सुमारें १३४००० कोश दूर आहे. आणि तो आपल्या एक दिवस १८ तासांत बृहस्पतीस एक परिक्रमा करतो. दुसऱ्या चंद्राचा व्यास सुमारें १००० कोशांचा आहे आणि तो बृहस्पतीपासून २१२००० कोश दूर आहे; आणि तो आपल्या तीन दिवस १३ तासांत त्यास एक प्रदक्षिणा करतो. तिसऱ्या चंद्राचा व्यास १७०० कोशांचा आहे, आणि तो बृहस्पतीपासून सुमारें ३४०००० कोश दूर आहे, तो आपल्या ७ दिवस ४ तासांत त्याच्याभोंवतीं एक प्रदक्षिणा करतो. चवथ्या चंद्राचा व्यास सुमारें १५०० कोशांचा आहे, तो बृहस्पतीपासून सुमारें ६००००० कोश दूर आहे; आणि तो आपल्या १६ दिवस १६ तासांत त्यास १ परिक्रमा करतो. हें सर्व दूरदर्शक यंत्रानें अवलोकन करून सिद्ध केलें आहे.

## शनि.

बृहस्पतीनंतर सूर्यास प्रदक्षिणा करणारा ग्रह शनि हा आहे. त्याचा व्यास सुमारें ३५००० कोशांचा आहे, करितां तो आपल्या पृथ्वीहून घनफळांत अर्थात् सर्वांगानें ७०० पट मोठा आहे. तो सूर्यापासून ४४०५००००० कोश दूर आहे. आणि एका तासांत १०५०० कोशांच्या वेगानें तो सूर्यास आपल्या सुमारें ३० वर्षांत प्रदक्षिणा करतो. त्यामुळें त्याच्यावर राहणाऱ्यांस तितक्या वेळाचें १ वर्ष होतें, आणि त्यामुळें त्याचा एक एक ऋतु आपल्या पांच पांच वर्षांचा असला पाहिजे. भास्कराचार्यांनीं ग्रहगणिताध्यायांत सांगितलें आहे कीं,

**भुजङ्गनन्दद्विनगाङ्गबाणषट्कृतेन्दवः सूर्यसुतस्य पर्ययाः ॥१९०॥**

४१३२००००००० वर्षांमध्यें शनीच्या १४६५६७२९८ परिक्रमा होतात, या हिशोबानें त्याची एक परिक्रमा होण्यास आपलीं सुमारें ३० वर्षें लागतात ॥ १९० ॥

शनि आपल्या अंगाभोंवतीं आपल्या १० १/४ तासांत एक वेळ फेरी करतो, त्यामुळें त्याच्यावर राहणाऱ्या लोकांच्या दिवसरात्री आपल्याहून अर्ध्या वेळाच्या होतात. तेथें सूर्यप्रकाश पोंचण्यास आपले १ १/४ तास लागतात, आणि तेथून सूर्य आपल्यापेक्षां ९० पट लहान भासतो, त्यामुळें प्रकाश आणि उष्णताहि तेथें तितकीं कमी पडतात. करितां तेथें प्राण्यांची वसतीहि त्यास योग्य अशी झाली असेल. दूरदर्शक यंत्रानें पाहिलें असतां बृहस्पतीप्रमाणें शनीच्या अंगावर उभे पट्टे दिसतात, आणि त्याच्या भोंवतीं परिभ्रमण करणारे ८ उपग्रह ह्मणजे चंद्र दिसतात. त्यांपैकीं पहिल्या चंद्राचा व्यास ५०० कोशांचा आहे, आणि तो शनीपासून सुमारें ५०५०० कोशांच्या अंतरावर आहे. आणि त्यास आपल्या २२ ५/३ तासांत १ प्रदक्षिणा करतो. दुसऱ्या चंद्राचा व्यास अद्यापि मापतां आला नाहीं, पण तो शनीपासून सुमारें ७७५०० कोशांच्या अंतरावर आहे, आणि तो त्यास आपल्या एक दिवस ९ तासांत १ प्रदक्षिणा करतो. तिसऱ्या चंद्राचा व्यास २५० कोशांचा आहे, आणि तो शनीपासून ९५५०० कोशांच्या अंतरावर आहे, व तो आपल्या १ दिवस २१ तासांत त्यास १ परिक्रमा करतो. चवथ्या चंद्राचा व्यासहि २५० कोशांचा आहे, आणि तो शनीपासून सुमारें १२३००० कोशांच्या अंतरावर आहे, आणि आपल्या २ दिवस १८ तासांत त्यास १ परिक्रमा करतो. पांचव्या चंद्राचा व्यास ६०० कोशांचा आहे, आणि तो शनीपासून १७१५०० कोश दूर आहे, आणि तो आपल्या ४ दिवस १२ १/२ तासांत त्यास १ फेरी घालतो. सहाव्या चंद्राचा व्यास १५५० कोशांचा आहे, तो शनीपासून ४६९५०० कोश दूर आहे, आणि तो आपल्या २१ दिवस ७ तासांत त्यास १ प्रदक्षिणा करतो, आठव्या चंद्राचा व्यास ९०० कोशांचा आहे, आणि तो शनीपासून सुमारें ११५६५०० कोश दूर आहे, आणि तो आपल्या ७९ दिवस ८ तासांत त्यास १ प्रदक्षिणा करतो. पुनः शनीवर सर्व ग्रहांहून असें एक वैलक्षण्य आहे कीं, त्याच्या अंगाभोंवतीं फिरणारीं एकामागून एक अशीं गोल, चपटीं ३ चक्रें आहेत, त्यांपैकीं वरचें चक्र ५००० कोश व मधलें

८२५० कोश रुंद आणि सुमारें ५० ते १०० कोसपर्यंत जाड आहे. मधलें चक्र शनीपासून सुमारें ९००० कोश दूर आहे. हीं दोन्ही चक्रें अत्यंत तेजस्वी दिसतात, व त्यांच्या खालीं एक तिसरें फिकें चक्र दिसतें. हें सर्व दूरदर्शक यंत्रानें पाहून सिद्ध केलें आहे; आणि जर याप्रमाणें शनिग्रहाभोंवतीं फिरणारीं तेजस्वी चक्रें आणि ८ चंद्र आहेत, तर या सर्वांच्या प्रकाशानें तेथील रहिवास्यांची रात्र कशी रमणीय होत असेल ?

## युरानस.

शनीच्यानंतर सूर्याभोंवतीं फिरणारा ग्रह युरानस आहे. तो सूर्यापासून ८८५५०००० कोशांच्या अंतरावर आहे. त्याचा व्यास सुमारें १५८५० कोशांचा आहे. करितां तो आपल्या पृथ्वीहून घनफळांत अर्थात् सर्वांगानें ६५ पट मोठा आहे, आणि तो एका तासांत सुमारें ७५५० कोशांच्या वेगानें सूर्यास आपल्या ८४ वर्षांत १ फेरी करतो. त्यामुळें त्याच्यावरच्या रहिवास्यांचें तितक्या वेळाचें १ वर्ष होतें, आणि त्यांचा एक एक ऋतु आपल्या चवदा चवदा वर्षांचा होत असेल. दूरदर्शक यंत्रानें पाहिलें असतां अद्यापि त्याच्या अंगावर कांहीं स्पष्ट डाग पाहण्यांत आला नाहीं, त्यामुळें त्याचा स्वतःच्या अंगाभोंवतीं फिरण्याचा काल नक्की करतां न आल्याकारणानें त्याच्यावर होणाऱ्या अहोरात्रीच्या वेळेची माहिती मिळाली नाहीं. त्याच्यावरून सूर्य आपल्यापेक्षां ३६० पट लहान दिसतो व प्रकाश आणि उष्णताहि तेथें तितकीं कमी पडतात. त्यामुळें तेथें प्राण्यांची वसतीहि त्यास योग्य अशी झाली असेल. तेथें सूर्यप्रकाश पोहोंचण्यास आपले २½ तास लागतात. पुनः दूरदर्शक यंत्रानें पाहून केलेल्या अखेरच्या शोधाप्रमाणें त्या ग्रहाच्या भोंवतीं फिरणारे ४ चंद्र माहीत झाले आहेत. त्यांपैकीं पहिला चंद्र त्यापासून ६१५०० कोशांच्या अंतरावर आहे, आणि त्यास आपल्या ४ दिवस ३½ तासांत १ प्रदक्षिणा करतो. दुसरा चंद्र त्याच्यापासून सुमारें ८५५०० कोशांच्या अंतरावर आहे, आणि तो त्यास आपल्या ४ दिवस ३½ तासांत १ प्रदक्षिणा करतो. तिसरा चंद्र त्याच्यापासून १४०५०० कोश दूर आहे,

व त्यास तो आपल्या ८ दिवस १७ तासांत १ परिक्रमा करतो. चवथा चंद्र त्याच्यापासून १८८००० कोश दूर आहे. तो त्यास आपल्या १३ दिवस १७ तासांत १ परिक्रमा करतो. आपल्या सूर्याभोंवतीं फिरणारे सर्व ग्रह व ग्रहाभोंवतीं फिरणारे सर्व उपग्रह पश्चिमेकडून पूर्वेस जात असतां एकाच सामान्य रीतीनें फिरतात, परंतु या युरानस ग्रहाचे ४ चंद्र तर विलक्षण रीतीनें पूर्वेकडून पश्चिमेस जात असतां त्यास परिभ्रमण करतात.

## नेप्च्युन्.

युरानसानंतर सूर्याभोंवतीं फिरणारा ग्रह नेप्च्युन आहे. तो सूर्यापासून १,३८,७५००००० कोश दूर आहे. त्याचा व्यास सुमारें १७२५० कोशांचा आहे, करितां तो आपल्या पृथ्वीहून घनफळांत अर्थात् सर्वांगानें ८५ पट मोठा आहे, तो एका तासांत ६०४८ कोशांच्या वेगानें सूर्यास आपल्या १६४ ३/४ वर्षांत १ परिक्रमा करतो. त्यामुळें त्याच्यावरच्या रहिवास्यांचें तितक्या कालाचें १ वर्ष होतें; आणि त्यांचा एक एक ऋतु जवळजवळ आपल्या २७१/२ वर्षांचा होत असेल. दूरदर्शक यंत्रानें अवलोकन केलें असतां अद्यापि त्याच्या अंगावरहि कांहीं स्पष्ट चिन्ह पाहण्यांत आलेलें नाहीं, त्यामुळें त्याचा स्वतःच्या अंगाभोंवतीं फिरण्याचा काल जाणण्यांत न आल्यानें त्याच्या वरच्या अहोरात्रांच्या वेळेची समज पडलेली नाहीं. त्याच्यावरून सूर्य आपल्यापेक्षां ९०० पट लहान दिसतो व प्रकाश आणि उष्णताहि तितकीं कमी पडतात, त्यामुळें तेथें प्राण्यांची वसतीहि त्यास योग्य अशी झाली असेल. तेथें सूर्यप्रकाश पोंचण्यास आपले ४ तास लागतात. पुनः दूरदर्शक यंत्रानें केलेल्या अखेरच्या शोधाप्रमाणें त्याच्याभोंवतीं फिरणारा एक उपग्रह समजण्यांत आला आहे, तो त्याच्यापासून ११९००० कोश दूर आहे, व त्यास आपल्या ५ दिवस २१ तासांत १ प्रदक्षिणा करतो. हाहि युरानसच्या उपग्रहांप्रमाणें उलट्या दिशेनें फिरतो. आपल्याप्रमाणें ज्यांस पाहण्याची शक्ति असेल, असे लोक जर बृहस्पति, शनि, युरानस आणि नेप्च्युन या ग्रहांवर राहत असतील, तर त्यांस सूर्याभोंवतीं फिरणाऱ्या सर्व ग्रहांपैकींहि ४ ग्रह मात्र परस्परांस

दिसत असतील. परंतु ज्यांमध्यें आपली पृथ्वीहि येऊन जाते असे वल्कन्-पासून अल्प ग्रहांपर्यंतचे सर्व ग्रह दिसत नसतील! कारण ते सर्व या ४ ग्रहांपासून अतिशय दूर व सारख्या प्रमाणांत अतिशयच लहान आहेत. करितां जर आपल्याहून या चारहि ग्रहांवर राहणाऱ्या लोकांची पाहण्याची शक्ति अधिक असेल, अथवा जर त्यांच्या जवळ आपल्यासारखीं दूरदर्शक यंत्रें असतील तर मात्र त्यांच्या सृष्टीमध्यें आपल्या पृथ्वीसारख्या पदार्थांच्या अस्तित्वाचें किंचित् भान होत असेल. नाहीं तर त्यांच्या मनानें तर वल्कन्पासून अल्प ग्रहापर्यंतच्या सर्व ग्रहांचें अस्तित्व कालत्रयांत नाहीं! अखेरच्या शोधाप्रमाणें सूर्याभोंवतीं फिरणाऱ्या ग्रहांपैकीं शेवटचा नेप्च्युन समजण्यांत आला आहे, त्यानंतरचा एखादा ग्रह समजण्यांत आलेला नाहीं. परंतु कधींकाळीं यापुढें आतांच्याहून अधिक शक्तीचीं यंत्रें तयार झाल्यास कदाचित् त्यानंतरचाहि एखादा ग्रह उपलब्ध होईल. त्याविषयीं आज कांहीं सांगवत नाहीं.

## धूमकेतु.

ग्रहांच्या नंतर सूर्याभोंवतीं फिरणारे धूमकेतु आहेत; ते पुच्छांचे तारे ह्मटले जातात. दूरदर्शक यंत्रानें पाहिलें असतां ते कांहीं स्पष्ट पदार्थ भासत नाहींत, तर वाफेच्या गोळ्यांसारखे भासतात. करितां ते कांहीं ग्रह किंवा उपग्रह याप्रमाणें वसतियुक्त गोल असतील असें वाटत नाहीं. त्यांचीं पुच्छें सूर्याच्या समोरच्या बाजूस असतात, त्यामुळें छायेप्रमाणें जणूं सूर्यप्रकाशानें त्यांच्या वरची वाफ विस्तार पावून प्रकाशत असेल, असें दिसतें. पुनः त्या पुच्छांमधून त्यांच्या पलिकडचे तारे दिसतात. ते जर भरींव असतील तर दिसले नसते. हे धूमकेतु किती आहेत तें अजून बरोबर समजणें शक्य झालें नाहीं, कारण त्यांचें सूर्याभोंवतीं फिरणें कांहीं ग्रहांप्रमाणें नाहीं. ते ग्रहांचा मार्ग भेदून सूर्याच्या अतिशयच जवळ येऊन पुनः अतिशयच दूर जातात. याप्रमाणें ते सूर्याभोंवतीं एक दुसऱ्यापासून दूर राहून फिरतात. त्यामुळें ज्यांचा फिरण्याचा मार्ग लहान आहे, ते सूर्याजवळ लवकर आल्या-मुळें थोड्या वर्षांच्या अंतरानें पुनः दिसतात, आणि ज्यांचा फिरण्याचा

मार्ग मोठा आहे, ते सूर्याजवळ दीर्घ कालानें आल्यामुळें हजारों वर्षांच्या अंतरानें पुनः दिसतात, त्यामुळें त्यांचें गणितहि बरोबर होऊं शकत नाहीं. यद्यपि धूमकेतूंची संख्या नक्की सांगवत नाहीं, तथापि अतिशय प्राचीन काळापासून आज मितीपर्यंत बहुतकरून ते २०० पेक्षां अधिक समजण्यांत आलेले नाहींत. ते आकाशाच्या सर्व भागांमध्यें दिसतात, आणि सर्व दिशांस फिरतात. या धूमकेतूंविषयीं वराहमिहिरानें बृहत्संहितेच्या ११ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**दर्शनमस्तमयो वा न गणितविधिनाऽस्य शक्यते ज्ञातुम् ।**
**दिव्यान्तरिक्षभौमास्त्रिविधाः स्युः केतवो यस्मात् ॥ १९१ ॥**

धूमकेतूंचा उदय आणि अस्त गणितानें जाणणें शक्य होत नाहीं, कारण ते दिव्य, आंतरिक्ष आणि भौम असे तीन प्रकारचे आहेत ॥ १९१ ॥

**अहुताशेऽनलरूपं यस्मिंस्तत्केतुरूपमेवोक्तम् ।**
**खद्योतपिशाचालयमणिरत्नादीन् परित्यज्य ॥ १९२ ॥**

काजवा, पिशाचांचें स्थान, आणि मणि रत्नें वगैरे सोडून जे अग्नीशिवायच्या स्थानांमध्यें अग्निरूप भासतात, तें धूमकेतूंचें स्वरूप सांगितलें आहे; अर्थात् ते वाफरूप आहेत ॥ १९२ ॥

**शतमेकाधिकमेके सहस्रमपरे वदन्ति केतूनाम् ।**
**बहुरूपमेकमेव प्राह मुनिर्नारदः केतुम् ॥ १९३ ॥**

धूमकेतूंची संख्या कितीएक १०१ आणि कितीएक १००० आहे असें ह्मणतात, परंतु नारद मुनी तर, एकच केतु अनेक रूपांनीं भासतो असें ह्मणतो ॥ १९३ ॥

## खरणारे तारे.

पुनः जसे ग्रह आणि उपग्रह होतात, तसे आकाशांत असलेले अनेक जातींचे सूक्ष्म परमाणू परस्पर आकर्षणाच्या धर्मानें एकत्र होऊन कांहीं कालानें लहान लहान गोल बनतात. तेहि ग्रहांसारखे सूर्याभोंवतीं फिरतात. ते फिरतां फिरतां ज्या ग्रहाच्या आकर्षणामध्यें येऊन जातात, त्या ग्रहावर जाऊन

पडतात. पडतां पडतां त्या ग्रहाच्या वातावरणाबरोबर त्यांचें घर्षण झाल्यानें प्रकाश उत्पन्न होतो. हा पडणारा गोल खरणारा तारा किंवा उल्का या नांवानें प्रसिद्ध आहे. पृथ्वीवर असे तारे पुष्कळ पडतात, त्यांत अतिशय मोठा ७०० फुटांच्या घेराचा तारा पडलेला दिसला आहे. या खरणाऱ्या ताऱ्यांविषयीं शिरोमणीच्या २६७ पृष्ठावरील टिप्पणींमध्यें सांगितलें आहे कीं,

**यासां गतिर्दिवि भवेद्गणितेन गम्या**
**तास्तारकाः सकलखेचरतोऽतिदूरे ।**
**तिष्ठन्ति या अनियतोद्गतयश्च तारा–**
**श्चन्द्रादधो हि निवसन्ति तदाश्रितास्ताः ॥ १९४ ॥**

आकाशांतील ज्या ताऱ्यांची गति जाणली आहे, ते तारे सर्व ग्रहांहून अतिशय दूर राहिलेले आहेत, व ज्यांची गति जाणलेली नाहीं असे जे तारे आहेत, ते चंद्राचा आश्रय करून त्याच्या खालीं राहिले आहेत ॥ १९४ ॥

**सीतांशुवज्जलमयास्तपनात्स्फुरन्ति**
**ताश्चावहप्रवहमारुतसंधिसंस्थाः ।**
**पूर्वानिलैः स्तिमितभावमुपागतेऽस्मिन्**
**ताराः पतन्ति कुहचिद्गुरुतावशेन ॥ १९५ ॥**

ते चंद्राप्रमाणें जलमय असल्यामुळें सूर्यानें प्रकाशित होतात, व आवह आणि प्रवह नांवाच्या वायूंच्या संधीमध्यें राहिले आहेत, आणि पूर्वेच्या वायूनें संधि चलायमान झाला असतां जड झाल्याकारणानें कोठें तरी पडतात ॥ १९५ ॥

## सूर्य.

आतां उपग्रहांसहवर्तमान ग्रह, धूमकेतु आणि उल्का ज्यास प्रदक्षिणा करितात असा सूर्य त्या सर्वांच्या मध्यें आहे. तो स्वतः स्वयंप्रकाश आहे, ह्मणजे त्याच्यामध्यें प्रकाश उत्पन्न करण्याची आणि तो दुसऱ्या पदार्थांवर टांकण्याची स्वतः शक्ति आहे. तो स्वतःच्या आकर्षणशक्तीनें ग्रहादिकांस धारण करून आपल्या आसपास फिरवितो; व त्यांनां प्रकाश देतो. सर्व ग्रहांवर ऋतूसंबंधीं फेरफार त्याच्यामुळेंच होतात, व त्याच्यायोगेंच प्राणिमात्र

जीवन करूं शकतात. करितां ऋग्वेदाच्या पहिल्या मंडळांतील ११५ व्या सूक्ताच्या पहिल्या ऋचेंत सांगितलें आहे कीं,

**सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च ॥ १९६ ॥**

सूर्य स्थावर आणि जंगम पदार्थांचा आत्मा आहे ॥ १९६ ॥

सूर्याचा व्यास ह्मणजे उभी मध्यरेषा अर्थात् जाडी ४३०००० कोशांची आहे. करितां घनफळांत अर्थात् सर्वांगानें तो आपल्या पृथ्वीहून १२५०००० पट मोठा आहे. दूरदर्शक यंत्रानें सूर्याकडे पाहिलें असतां त्याच्यावर नानाप्रकारचे काळे डाग आणि उंचसखलपणा दिसतो. वराहमिहिरानें बृहत्संहितेच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**तामसकीलकसंज्ञा राहुसुताः केतवस्त्रयस्त्रिंशत् ।**
**वर्णस्थानाकारैस्तान् दृष्ट्वाऽर्के फलं ब्रूयात् ॥ १९७ ॥**

सूर्यामध्यें जे काळे डाग दिसतात, ते तमापासून उत्पन्न होणारे तामसकीलक नांवाचे ३३ केतु कल्पिले आहेत; ते सूर्यामध्यें पाहून त्यांचे वर्ण, स्थानें व आकार यांवरून फळ सांगावें ॥ १९७ ॥

हे डाग आणि उंचसखलपणा सरकलेले दिसतात. करितां असें अनुमान होतें कीं, सूर्य स्वतःच्या अंगाभोंवतीं भ्रमण करतो. जो स्पष्ट उंचसखलपणा एकवेळ दिसला असेल, तोच पुनः दिसण्यास आपले २५३ दिवस लागतात; करितां तितक्या दिवसांमध्यें सूर्य आपल्या अंगाभोंवतीं फिरत राहतो, असा निश्चय करण्यांत आला आहे. सर्व ग्रहांचें स्वतःच्या अंगाभोंवतीं फिरणें पश्चिमेकडून पूर्वेकडे आहे, परंतु सूर्याचें मात्र पूर्वेकडून पश्चिमेस आढळलें आहे, करितां जसें एखादें दांत्यांचें चक्र आपल्यासमोर चिकटलेल्या तशाच चक्रास स्वतः फिरतांना आपल्याहून उलट्या दिशेनें फिरवितें, तसा सूर्य जणुं आकर्षणरूपी किंवा प्रकाशकिरणरूपी दांत्यांनीं आपल्यासमोर चिकटलेल्या ग्रहांस त्यांच्या अंगाभोंवतीं व आपल्या अंगाभोंवतीं फिरण्याच्या दिशेहून उलट्या दिशेस फिरवितो. सूर्यावरच्या डागांविषयीं अशी अटकळ बांधण्यांत आली आहे कीं, सूर्याच्या आसपास निरंतर रसायनी क्रियेनें प्रकाश उत्पन्न

करणारें वातावरण आहे त्यामध्यें मोठा क्षोभ उत्पन्न होऊन खांचा पडतात; त्यांतून सूर्याचें काळें अंग नजरेस पडून आपणास डागरूपानें भासतें. पुनः कितीएक विद्वान् असेंहि समजतात कीं, सूर्याच्या अंगांतच वारंवार हजारों ज्वाला उत्पन्न होऊन प्रकाशतात, व ज्या ठिकाणीं त्या शांत होतात, तें स्थान काळ्या डागांप्रमाणें भासतें. सूर्याची उष्णता पाहिली असतां त्यावर प्राण्यांची वसती मुळींच संभवत नाहीं, परंतु कदाचित् असल्यास तशी उष्णता सहन करूं शकेल अशा प्रकारची ती उत्पन्न झाली असावी. याविषयीं मानवी ज्ञान अतिशय अल्पशक्तीचें असल्यानें कांहीं निश्चय सांगतां येणें शक्य नाहीं. हे सूर्य, ग्रह आणि उपग्रह यांचीं अंतरें आणि आकार त्रिकोण-मितीच्या गणितानें शोधून काढलेले आहेत. ज्यांस या गणिताचें ज्ञान असेल, त्यांस तर याविषयीं कांहीं संशय राहणार नाहीं, तर जणुं प्रत्यक्ष मापून काढले आहेत कीं काय, असें वाटेल. या गणितानें पृथ्वीवरील दूरच्या पदार्थाचें अंतर आणि आकार दूरून शोधून काढला असल्यास तो बरोबर सांपडतो, तर आकाशामध्यें असलेल्या दूरच्या पदार्थांचें अंतर आणि आकार याच गणितानें शोधून काढले आहेत, तेहि बरोबर असले पाहिजेत. आणि किंचित् फरक आला तरी जास्त येणार नाहीं. प्राचीन आर्य ज्योतिर्वेत्त्यांनींहि याच गणितानें ग्रहांचीं अंतरें व आकार शोधून काढिले आहेत, परंतु त्यांच्याजवळ सूक्ष्म रीतीनें निर्णय करण्याकरितां आतांसारखीं दूरदर्शकादि यंत्रें नव्हतीं, त्यामुळें त्यांचीं शोधून काढिलेलीं अंतरें व आकार यांत फरक आलेला आहे. त्यांनींहि जरी वांबूच्या नलिका करून त्यांच्याद्वारा पाहून सिद्ध केलें आहे, तथापि त्या नलिकांमध्यें हल्लींच्याप्रमाणें कांचेची सहायता नसल्यानें साध्या दृष्टीनें पाहिलें, म्हणून आतांच्यासारखा सूक्ष्म सिद्धांत होऊं शकला नाहीं. भास्कराचार्यांनीं ग्रहगणिताध्यायांत सांगितलें आहे कीं,

**दृगुच्चमूलं नलकं निवेश्य वंशद्वयाधारमथास्य रन्ध्रे ।**
**विलोकयेत् खे खचरं किलैवं जले विलोमं तदपि प्रवक्ष्ये ॥१९८॥**

दोन वायूंच्या आधारानें असलेली नलिका उंच दृष्टि ठेवून पाहतां येईल अशा रीतीनें ठेवून, तिच्या मूळांतील छिद्रद्वारा आकाशांतील ग्रह पहावे, आणि असेच पाण्यामध्यें याहून उलट्या रीतीनें पहावे तेंहि मी सांगतों ॥१९८॥

सर्व ग्रह सूर्याभोंवतीं फिरतात, असें प्राचीन आर्य ज्योतिष्यांनांहि माहित असलें पाहिजे; कारण कोणताहि ग्रह पृथ्वीच्या अतिशय समीप येतो, त्या वेळीं तो ग्रह आणि पृथ्वी दोन्ही सूर्याच्या एकाच बाजूस येतात. जर सूर्यासच सर्व ग्रह प्रदक्षिणा करीत असतील, तरच असें होईल. पृथ्वीस प्रदक्षिणा करित असतील, तर त्यांच्या अतिशय दूर असण्याच्या वेळीं सूर्य मध्येंच असला पाहिजे, आणि अतिशय जवळ असण्याच्या वेळीं पृथ्वी आणि तो ग्रह दोघे सूर्याच्या एकाच बाजूस असले पाहिजेत, असा नियम राहणार नाहीं. ही गोष्ट प्राचीन ज्योतिष्यांस माहित नसेल असें वाटत नाहीं, तथापि प्रत्यक्ष लोकदृष्टींत, सूर्यासहवर्तमान सर्व ग्रह पृथ्वीभोंवतीं वेगवेगळ्या गतीनें फिरतात, असें आल्यामुळें त्यानींहि तसेंच वर्णन केलें आहे; कारण तसें केलें असतां ग्रहांचें गणित करण्यामध्यें कांहीं फरक येत नाहीं, व लोकमताहून विरुद्ध जावें लागत नाहीं, तसें करणें त्या काळीं अतिशय कठीण होतें. करितां भास्कराचार्यांनीं शिरोमणीच्या ग्रहगणिताध्यायांत सांगितलें आहे कीं,

कक्षाः सर्वा अपि दिविषदां चक्रलिप्तांकितास्ता
वृत्ते लघ्व्यो लघुनि महति स्युर्महत्यश्च लिप्ताः ।
तस्मादेते शशिजभृगुजादित्यभौमेज्यमन्दा
मन्दाक्रान्ता इव शशधराद्भान्ति यान्तः क्रमेण ॥ १९९ ॥

सर्व ग्रहांचे फिरण्याचे मार्ग चक्रास वेष्टन केल्याप्रमाणें गोल आहेत, व लहान वृत्तामध्यें लहान आणि मोठ्या वृत्तामध्यें मोठे होतात; करितां बुध, शुक्र, सूर्य, मंगळ, गुरु आणि शनि हे ग्रह क्रमानें चंद्रापेक्षां मंद गतीनें जात असलेले दिसतात ॥ १९९ ॥

तसेंच आर्यभट्टानें स्वतःच्या सिद्धांताच्या कालक्रियापादांत सांगितलें आहे कीं,

भानामधः शनैश्वरसुरगुरुभौमार्कशुक्रबुधचन्द्राः ।
तेषामधश्च भूमिर्मेधीभूता खमध्यस्था ॥ २०० ॥

नक्षत्रांच्या खालीं क्रमानें शनि, गुरु, मंगळ, सूर्य, शुक्र, बुध आणि चंद्र राहिले आहेत, व त्या सर्वांच्या खालीं आकाशाच्या मध्यभागीं घाण्याच्या खांबलीप्रमाणें पृथ्वी राहिली आहे ॥ २०० ॥

मण्डलमल्पमधस्तात् कालेनाल्पेन पूरयति चन्द्रः ।
उपरिष्टात्सर्वेषां महच्च महता शनैश्चारी ॥ २०१ ॥

सर्वांच्या खालीं असल्यानें चंद्र, स्वतःच्या लहान मार्गानें अल्पकालपर्यंत फिरत राहतो व सर्वांच्या वर असल्यानें शनैश्वर स्वतःच्या मोठ्या मार्गानें दीर्घकालपर्यंत फिरत राहतो ॥ २०१ ॥

हे ग्रह पृथ्वीपासून किती दूर आहेत, त्याविषयीं शिरोमणीच्या चंद्रग्रहणाधिकारांत भास्कराचार्यांनीं सांगितलें आहे कीं,

नगनगाग्निनवाष्टरसा रवे रसरसेषुमहीषुमिता विधोः ।
निगदितावनिमध्यत उच्छ्रितिः श्रुतिरियं किल योजनसंख्यया ॥

पृथ्वीच्या मध्यापासून सूर्याची उंची ६८९३७७ योजनें आणि चंद्राची उंची ५१५६६ योजनें सांगितली आहे, असें ऐकिलें आहे ॥ २०२ ॥

आणि शिरोमणीच्या १५४ पृष्ठावरील टिप्पणीमध्यें सांगितलें आहे कीं,

भौमस्य गोकुरसषण्नवसूर्यसंख्या
दन्ताभ्रषण्नृपमिता श्रुतिरिन्दुजस्य ।
पूज्यस्य नागगुणपञ्चरसाद्रिभूमि-
नागाश्च सर्पगजखाब्धियमाब्धयोऽथ ॥ २०३ ॥

पृथ्वीपासून मंगळाची उंची १२९६६१९ योजनें आहे. तशीच बुधाची १६६०३२ योजनें. गुरूची ८१७६५३८ योजनें. शुक्राची ४२४०८८ योजनें ॥ २०३ ॥

शुक्रस्य, सूर्यतनयस्य कुसप्तखाङ्क-
भूत्र्यभ्रदस्रमितयोजनकर्ण एवम् ।

नागाक्षषड्यमरसाग्निकुवेदसंख्यो
नक्षत्रमण्डलभवश्रवणो निरुक्तः ॥ २०४ ॥

शनीची २०३१९०७१ योजनें. आणि नक्षत्रमंडलाची ४१३६२६५८ योजनें सांगितली आहे ॥ २०४ ॥

पृथ्वीच्या आसपास ग्रहांच्या फिरण्याच्या मार्गाच्या लांबीविषयीं सिद्धांत-शिरोमणीच्या ग्रहगणिताध्यायांत सांगितलें आहे कीं,

सार्धाद्रिगोमनुसुराब्धिमितार्ककक्षा
चांद्रीसहस्रगुणिताजिनरामसंख्या ॥ २०५ ॥

सूर्याची कक्षा ४३३१४९७½ योजनें. आणि चंद्राची ३२४००० योजनें सांगितली आहे ॥ २०५ ॥

बाकीच्या ग्रहांच्या कक्षांचीं योजनें श्रीपतीनें याप्रमाणें सांगितलीं आहेत कीं,

अष्टयङ्कषण्मनुगजा क्षितिनन्दनस्य
ज्ञस्यैशदन्तकृतखेन्दुमिताऽथ सूरेः ।
रूपाश्विनागयुगशैलगुणेन्दुबाणाः
खाग्न्यङ्गसागररसोत्कृतयः सितस्य ॥ २०६ ॥

मंगळाची कक्षा ८१४६९१६ योजनें. बुधाची कक्षा १०४३२११ योजनें. गुरूची ५१३७४८२१ योजनें. शुक्राची २६६४६३० योजनें ॥ २०६ ॥

भूधराहिनगनागरसर्तुक्ष्माधराश्विशशिनः शनिकक्षा ॥ २०७ ॥

आणि शनीची कक्षा १२७६६८७८७ योजनें सांगितली आहे ॥२०७॥

सूर्यगोलाच्या आणि चंद्रगोलाच्या व्यासाविषयीं शिरोमणींतील चंद्रग्रहणा-धिकारांत सांगितलें आहे कीं,

विम्बं रवेर्द्विद्विशरर्तुसंख्यानीन्दोः खनागाम्बुधियोजनानि ॥२०८॥

सूर्याचा व्यास ६५२२ योजनें व चंद्राचा व्यास ४८० योजनें आहे ॥ २०८ ॥

श्रीपतीनेंहि सांगितलें आहे कीं,

**व्यासा रवीन्दुक्षितिगोलकानां क्रमेण तेजोजलमृण्मयानाम् ।**
**स्युर्योजनैराकृतिबाणषड्भिर्व्योमाष्टवेदैः कुगजेषुचन्द्रैः ॥ २०९ ॥**

क्रमानें तेजोमय, जलमय, आणि मृण्मय अशा सूर्य, चंद्र आणि पृथ्वी यांच्या गोलांचे व्यास अनुक्रमें ६५२२,४८० आणि १५८१ योजनांचे आहेत ॥ २०९ ॥

सूर्यसिद्धांताच्या चंद्रग्रहणाधिकारांत सांगितलें आहे कीं,

**सार्धानि षट् सहस्राणि योजनानि विवस्वतः ।**
**विष्कम्भो मण्डलस्येन्दोः सहाशीत्या चतुश्शतम् ॥ २१० ॥**

सूर्याचा व्यास ६५०० योजनांचा आणि चंद्रमंडलाचा ४८० योजनांचा आहे ॥ २१० ॥

इतर ग्रहांचे व्यास सूर्यसिद्धांताच्या ग्रहयुत्यधिकाराच्या १३ व्या श्लोकामध्यें सांगितलेल्या गणिताच्या रीतीनें काशीविद्यासुधानिधींत काशीचे बापुदेवशास्त्री यांनीं याप्रमाणें लिहून समजाविले आहेतः—

**क्षितिजस्याब्धिबाणाद्रिप्रमितस्त्रिलवान्वितः ।**
**दिगंशोनेषु वेदेन्दुप्रमितः शशिजस्य च ॥ २११ ॥**

मंगळाचा व्यास ७५४$\frac{१}{३}$ योजनें, बुधाचा व्यास १४४$\frac{१}{१०}$ योजनें ॥२११॥

**व्यंघ्रीषुदन्तवसवो गुरोरथ भृगोस्तथा ।**
**विंशत्यंशोनसार्धाग्निनन्दाब्धिप्रमितस्तथा ॥ २१२ ॥**

गुरूचा व्यास ८३२४$\frac{३}{४}$ योजनें, शुक्राचा व्यास ४९३$\frac{१}{२०}$ योजनें ॥२१२॥

**शनेः पञ्चगुणार्कांशरसाभ्यद्रीन्द्रसंयुतिः ।**
**विष्कम्भो योजनैरित्थमर्काद्युक्तिप्रमाणतः ॥ २१३ ॥**

आणि शनीचा व्यास १४७७$\frac{६५}{१२}$ योजनांचा आहे. त्याप्रमाणें सूर्यसिद्धांतांतून युक्तीनें आणि प्रमाणांनीं ग्रहांचीं व्यास व योजनें सांगितलीं आहेत ॥ २१३ ॥

याच विषयावर आर्यभट्टानें याप्रमाणें सांगितलें आहेः—

**नृपियोजनं जिलाभूव्यासोऽर्केन्द्वोर्घ्रिंआगिणकमेरोः ।**
**भृगुगुरुबुधशनिभौमाश्शशिङ्ञणनमांशकाः समार्कसमाः ॥ २१४ ॥**

८००० दंडांचें १ योजन अशीं १०५० योजनें पृथ्वीचा, ४४१० योजनें सूर्याचा, ३१५ योजनें चंद्राचा व १ योजन मेरूचा व्यास आहे. आणि शुक्र, गुरु, बुध, शनि व मंगळ यांचे व्यास क्रमानें ५१८, ४९९५, ६८, ६२०६, आणि ३१७ योजनांचे आहेत ॥ २१४ ॥

सूर्यचंद्रांशिवाय इतर ग्रहांच्या व्यासांविषयीं भास्कराचार्यांनीं याप्रमाणें सांगितलें आहे:—

**व्यङ्घ्रीषवः सचरणा ऋतवः सभाग–**
**युक्ताद्रयो नव च स त्रिलवेषवश्च ।**
**स्युर्मध्यमास्तनुकलाः क्षितिजादिकानाम् ॥ २१५ ॥**

मंगळ, बुध, गुरु, शुक्र आणि शनि या ग्रहांच्या बिंबांच्या मध्यकला क्रमानें ४$\frac{3}{4}$, ६$\frac{1}{4}$, ७$\frac{1}{3}$, ९ आणि ५$\frac{1}{3}$ आहे, त्या चंद्रकक्षेप्रमाणें साधल्या असतां १७९१, ३०१, १७४४२, १११० आणि ३१५२३ योजनें व्यास होतात ॥ २१५ ॥

परंतु आधुनिक विद्वानांनीं सूक्ष्मयंत्रांच्या योगें वारंवार वेध घेऊन ग्रहांचे जे व्यास निर्णीत केले आहेत, ते काशीचे बापुदेवशास्त्री ज्योतिषी यांनीं काशीविद्यासुधानिधीमध्यें याप्रमाणें दाखविले आहेत:—

**व्यासो भुवः खाद्र्यहियोजनानि रवेः खखाभ्राद्रिनवप्रमाणि ।**
**सुधाकरस्याभ्रजिनैः समानि खाक्षाब्धिसंख्यानि महीसुतस्य २१६**
**चान्द्रेः खबाणानिलयोजनानि व्यासो गुरोः खेष्विषुगोमितानि ।**
**भृगोः खबाणेभमितानि सौरेः खखाश्वनागप्रमितानि नूनम् ॥२१७॥**

पृथ्वीचा व्यास ८७० योजनें, सूर्याचा व्यास ९७००० योजनें, चंद्राचा व्यास २४० योजनें, मंगळाचा व्यास ४५० योजनें, ॥२१६॥ बुधाचा व्यास ३५० योजनें, गुरूचा व्यास ९५५० योजनें, शुक्राचा व्यास ८५० योजनें आणि शनीचा व्यास ८७०० योजनें आहे ॥ २१७ ॥

## तारा.

आतां ग्रह, उपग्रह, धूमकेतु, उल्का आणि आपला सूर्य यांशिवाय आकाशामध्यें दुसरे अनेक तारे पाहण्यांत येतात, ते सर्व आपल्या सूर्याप्रमाणें स्वयंप्रकाश गोल दिसतात; कारण त्यांचा प्रकाशहि सूर्याच्या प्रकाशासारखा चकचकतो. जे परप्रकाश गोल ग्रह आणि उपग्रह ह्मटले जातात, त्यांचा प्रकाश चकचकत नाहीं, तर स्थिर भासतो, आणि कमी जास्ती कलांचा होतो. याप्रमाणें अनंत आकाशामध्यें परस्पर आकर्षण धर्मानें नियमांत असलेले हे अनेक गोल स्वयंप्रकाश आणि परप्रकाश असे दोन प्रकारचे आहेत. स्वयंप्रकाश गोल सूर्य समजावे आणि परप्रकाश गोल ग्रह आणि उपग्रह जाणावेत. दोन्ही प्रकारचे गोल त्यांच्या प्रकाशाच्या जातीनें लगेच ओळखितां येतात. हे स्वयंप्रकाश गोल आपणांस चकचकित तारारूपानें भासतात, त्यांत जितका तारासमूह अर्थात् ताऱ्यांचा जमाव, ग्रहांच्या सूर्याभोंवतीं फिरण्याच्या मार्गावर आलेला आहे, त्याचे प्राचीन आर्य ज्योतिष्यांनीं २७ विभाग कल्पून त्यांस अश्विनी, भरणी इत्यादिक नावें देऊन नक्षत्रें या नांवानें प्रसिद्ध केले आहेत. फिरून त्या नक्षत्रांचे २¼ नक्षत्रांचा एक भाग या रीतीनें १२ भाग कल्पून त्यांस मेष, वृषभ वगैरे नांवें देऊन राशि या नांवानें प्रसिद्ध केले आहेत. यांशिवाय उत्तरध्रुव आणि दक्षिणध्रुव यांच्या आसपास पुष्कळच तारासमूह दिसतात. त्यांसहि ओळखण्याकरितां बृहदक्ष अर्थात् सप्तऋषि उत्तरध्रुवमत्स्य आणि दक्षिणध्रुवमत्स्य इत्यादि नांवें दिलीं आहेत. हे सर्व स्वप्रकाश तारे आपल्या भूगोलाभोंवतीं स्वतःच्या अंगानें नित्य भ्रमण करतात, त्यामुळें पूर्वेस उदय पावून पश्चिमेस अस्तास गेलेले दिसतात. असें असतांहि उत्तरध्रुवाचा तारा मुळींच सरकलेला भासत नाहीं; कारण तो पृथ्वीगोलाच्या उत्तर टोंकावर आला असल्यानें पृथ्वीभ्रमणाच्या विकारांत येऊं शकत नाहीं. पुनः तो इतका दूर आहे कीं, त्याच्या अंतराच्या प्रमाणांत पृथ्वीचा सूर्यास प्रदक्षिणा करण्याचा मार्ग अत्यंत सूक्ष्म आहे. त्यामुळें पृथ्वीच्या वार्षिक गतीनेंहि तो सरकलेला दिसत नाहीं. याचप्रमाणें दक्षिणध्रुवाच्या ताऱ्याविषयीं

समजावें, परंतु तो आपणास दिसत नाहीं. कारण आपला देश पृथ्वीच्या वर्तुलमध्यरेषेपासून उत्तरेस आला असल्यानें पृथ्वीचा मध्य पृष्ठभाग आपणास आड आलेला आहे. याचप्रमाणें पृथ्वीच्या वर्तुल मध्यरेषेच्या दक्षिणेस आलेल्या देशांत राहणाऱ्यांस उत्तरध्रुव दिसत नाहीं. साध्या दृष्टीनें दिसणाऱ्या ताऱ्यांशिवाय आकाशांत पांढरे फिक्के डाग दिसतात, ते दूरदर्शक यंत्रानें पाहिले असतां डाग नव्हेत, तर मानवी नेत्रांना न दिसणाऱ्या अतिशय दूरच्या ताऱ्यांचा प्रकाश आहे असें दिसून येतें. असे डाग अनेक दिसतात, आणि त्यांमध्यें अनेक तारे पाहण्यांत येतात. सर्वांत अतिशय मोठा पांढरा डाग लांब गोल पट्ट्याच्या आकारानें आकाशाच्या मध्यभागांतून दक्षिणध्रुवापासून तो उत्तरध्रुवापर्यंत वक्र गेलेला दिसतो, त्यास आकाशगंगा ह्मणतात. दूरदर्शक यंत्रानें त्याकडे पाहिलें असतां त्यांत लक्षावधि तारे दिसतात. पुनः साध्या दृष्टीनें आकाशाचा जो भाग ताऱ्यांशिवायचा दिसत असेल, तोच भाग दूरदर्शक यंत्रानें पाहिला असल्यास त्यांत अनेक तारे दिसतात. यावरून असें अनुमान होतें कीं, जसें आकाश अनंत आहे, तसा त्यामध्यें उत्पन्न होऊन राहिलेल्या गोलांच्या संख्येचाहि अंत नाहीं. पाण्यांत जसा बर्फ बांधला जाऊन तरतो, तद्वत् आकाशांत असलेले सूक्ष्म परमाणु बद्ध होऊन गोलरूप होऊन तरतात. हे असंख्य स्वयंप्रकाश गोल जे सूर्य आहेत, त्यांच्या आसपास असलेले गोल आपल्या पृथ्वीप्रमाणें ग्रहरूप होऊन आपल्या उपग्रहांप्रमाणें त्यांचे उपग्रह होऊन त्यांस फेरे करीत असतील. आपणास तो प्रत्येक गोल ताऱ्यासारखा दिसतो, परंतु त्याचे ग्रह उपग्रहादि मुळींच दिसत नाहींत, कारण त्यांचा आकार लहान असेल व अंतरहि अधिक असेल. याचप्रमाणें त्या ग्रहांवरच्या रहिवास्यांसहि आपला सूर्य ताऱ्यासारखा दिसत असेल, परंतु त्याच्या भोंवतीं फिरणारे आपले ग्रह वगैरे दिसत नसतील. सृष्टिकर्त्या ईश्वरानें निर्माण केलेली आकर्षणशक्ति सर्व गोलांमध्यें व्याप्त असल्यानें असा नियम झाला आहे कीं, अनंत आकाशांत कोणत्याहि लहान गोलानें आपल्या जवळच्या मोठ्या गोलाभोंवतीं फिरलें पाहिजे.

असा नियम असल्याकारणानें ग्रहाभोंवतीं उपग्रह फिरतात, त्यांची उपग्रहमाला म्हटली जाते, उपग्रहांसहित ग्रह सूर्याभोंवतीं फिरतात, करितां त्यांची ग्रहमाला म्हटली जाते. ग्रहांसहित सूर्य आपणाहून मोठ्या एखाद्या सूर्यगोलाभोंवतीं फिरतात, त्यांची सूर्यमाला म्हटली जाते. हे सूर्य आपल्या मध्यभागीं असलेल्या त्या मोठ्या सूर्यगोलापासून इतके दूर आहेत कीं, त्यांची एक परिक्रमा पूर्ण होण्यास आपलीं कोट्यवधि वर्षें लागतात. करितां त्यांची गति आपल्या ध्यानांत येऊं शकत नाहीं, त्यामुळें ते स्थिर भासतात. परंतु वास्तविक रीतीनें पाहिलें असतां सृष्टींतील कोणताहि पदार्थ स्थिर नाहीं. तो मोठा सूर्यगोल आणि त्याच्यासारखे दुसरे गोल स्वतःभोंवतीं फिरणाऱ्या सूर्यांसहित एखाद्या महासूर्याभोंवतीं परिभ्रमण करितात, त्यांस सूर्यमालासमूह असें ह्मणतात, त्याची एक परिक्रमा पूर्ण होण्यास आपलीं अब्जावधि वर्षें लागतात. असे सूर्यमालासमूह पुष्कळ आहेत, व तेहि आपल्यामधील एखाद्या अतिमहासूर्यगोलाभोंवतीं फिरतात, त्यामुळें नक्षत्रपुंजांच्या माला होतात. त्यांची एक परिक्रमा पूर्ण होण्यास आपलीं खर्वाहूनहि वरच्या संख्येचीं वर्षें लागतात. त्यामुळें ते सर्व स्थिर भासतात. त्या नक्षत्रपुंजांच्या माला आपणास ताऱ्यांच्या निरनिराळ्या झुपक्यांच्या रूपानें दिसतात. त्यांतील ग्रहांवरून आपला सूर्य दिसत नसेल, व कदाचित् दिसलाच तर, तो एखाद्या नक्षत्रपुंजांच्या मालेंतील अतिशय सूक्ष्म ताऱ्यासारखा दिसत असेल. जर एवढा मोठा सूर्यहि अशा रीतीनें दिसला, तर तेथून आपले ग्रह दिसण्याची तर कथाच कशाला ?

याप्रमाणें प्रमाणसहस्रीच्या सृष्टिप्रकरणापैकीं खगोलवर्णन समाप्त.

## ईश्वरमहिमा.

अहा ! सृष्टीचा केवढा मोठा विस्तार आहे ! ज्यास जाणण्यास मानवी ज्ञान बिलकूल समर्थ नाहीं ! अनंत आकाशामध्यें ईश्वरनिर्मित आकर्षणशक्तीनें सूक्ष्म परमाणूंपासून पृथ्वी, जल, तेज, आणि वायु यांची उत्पत्ति व चारहि महाभूतांनीं बरोबर नियमांत राहून एकमेकांस मिळून राहणें आणि पुनः

गोलरूप होणें, हें काय थोडें आश्चर्य आहे ! पुनः त्या गोलांवर महदाकर्षण-शक्तीनें याच महाभूतांच्या कांहीं विलक्षण मिश्रित योगानें विचित्र प्रकारच्या स्थावर–जंगमात्मक प्राण्यांचीं शरीरें व्हावीं, हें काय थोडें विस्मयकारक आहे ? एखादा फलपुष्पयुक्त स्थावर प्राणी अर्थात् वृक्ष पहावा, तर त्याची रचना होण्यामध्यें इतकें कांहीं चातुर्य दिसतें कीं मानवी ज्ञान त्याचें वर्णन करण्यास समर्थ नाहीं. कुठें तें बीज आणि कुठें त्यांतून वृक्ष ! कुठें त्या पृथ्वींतील रस आणि कुठें त्या रसांमधून–जरी जवळ जवळ लाविले असले तरीहि–आपल्या योग्य अशा रसाचें वृक्षानें ग्रहण करणें ! आणि पृथ्वींतून मूळांकडून व वायूंतून पानांकडून स्वतःस योग्य आहाराचें ग्रहण करून रेषांकडून तो आपल्या सर्वांगांत फैलावून जीवन करणें ! पुनः रंगीवेरंगी पत्रें, पुष्पें व फळें उत्पन्न करून त्यांनीं शोभणें, आणि आपल्या कोमल अंगाचें आणि फलांच्या गर्भाचें रक्षण होण्याकरितां त्यांच्यावर जाड त्वचा उत्पन्न करणें, इत्यादि रचनेची व्यवस्था होण्यामध्यें कांहीं विलक्षण चातुर्य भासतें ! याच रीतीनें सूक्ष्म वनस्पतीविषयींहि समजावें. पुनः जंगम प्राण्यांची रचनाहि कांहीं अगाध शहाणपणानें झाली असावी असें वाटतें. कारण कुठें तें वीर्य आणि कुठें त्याचें मातेच्या गर्भामध्यें पोषण होऊन अवयवयुक्त रुधिर, अस्थि आणि मांसमय शरीर होणें ! आणि पुनः त्याच्या रक्षणासाठीं त्वचेचें आच्छादन ! कुठें तें अन्नादिकांचें भक्षण आणि कुठें त्यांपासून रुधिरादिकांची उत्पत्ति आणि त्यांनीं शरीराचें जीवन ! इत्यादि रचनेची व्यवस्था होण्यामध्यें कांहीं कमी शहाणपण भासतें ! याचप्रमाणें विचित्र प्रकारचे रंगीवेरंगी पशु, पक्षी व मत्स्यादि सूक्ष्म जीव–जंतूंविषयींहि समजावें. विद्यारण्यमहामुनींनीं रचलेल्या पंचदशींतील चित्रदीप प्रकरणांत सांगितलें आहे कीं,

**एतस्मात् किमिवेन्द्रजालमपरं यद्गर्भवासस्थितं**
**रेतश्चेतति हस्तमस्तकपदप्रोद्भूतनानाङ्कुरम् ।**

**पर्यायेण शिशुत्वयौवनजरावेषैरनेकैर्वृतं**
**पश्यत्यत्ति शृणोति जिघ्रति तथा गच्छत्यथागच्छति ॥ २१८ ॥**

गर्भाशयांत असलेलें वीर्य, जें हात, पाय व मस्तकरूप अंकुरयुक्त शरीर बनून, क्रमानें बाल्य, यौवन व वार्धक्यरूप अनेक वेषेंकरून वेष्टित होत्सातें पहातें, खातें, ऐकतें, वास घेतें, व जातें आणि येतें, याहून दुसरें आश्चर्य काय ! ॥ २१८ ॥

**देहवद्वटधानादौ सुविचार्य विलोक्यताम् ।**
**क्व धाना कुत्र वा वृक्षस्तस्मान्मायेति निश्चिनु ॥ २१९ ॥**

देहाप्रमाणें वटादि वृक्षांच्या बीजाविषयींहि उत्तम रीतीनें विचार करून पहावें; कुठें तें बीज आणि कुठें तो वृक्ष ! करितां ही ईश्वरी शक्ति असा निश्चय कर ॥ २१९ ॥

अहा ! काय हा ईश्वराच्या शक्तीचा महिमा ! कीं आपल्या प्रत्यक्ष भूगोलासंबंधीं रचनेचा विचार करीत असतां आपलें मन मुग्ध होऊन जातें, तर त्याच्यासारख्या दुसऱ्या असंख्य परोक्ष गोलांवर स्थावर–जंगमात्मक प्राण्यांची कशा रीतीची रचना झाली असेल, त्याचा विचार कसा करूं शकेल ! जरी उपग्रहमाला, ग्रहमाला, सूर्यमाला, सूर्यमालासमूह आणि नक्षत्रपुंजमाला या सर्वांचा आतां दूरदर्शक यंत्रानें शोध झालेला आहे, तथापि अनंत आकाशांत सर्व गोलांची याचप्रमाणें व्यवस्था झालेली आहे, असें कांहीं निश्चयानें सांगवत नाहीं. कारण मानवी बुद्धीची शक्ति अल्प, गोलांची संख्या मोठी आणि आपणापासून ते इतके दूर आहेत कीं, या विषयावर कांहीं निश्चितपणें सांगणें शक्य नाहीं. जगतावर जगत् आणि मजल्यावर मजला हें पाहून सृष्टीच्या महत्त्वाचा विचार करण्यांत आपलें मन एकदम हार जातें ! योगवासिष्ठाच्या उत्पत्तिप्रकरणाच्या ३० व्या सर्गांत वसिष्ठानें श्रीरामास सांगितलें आहे कीं,

**यथा विन्ध्यवनाभोगे प्रस्फुरन्ति करेणवः ।**
**तथा तस्मिन् पराभोगे ब्रह्माण्डत्रसरेणवः ॥ २२० ॥**

जशा विंध्याचल पर्वतासंबंधीं वनांतील, सर्व उपचारेंकरून परिपूर्ण स्थानामध्यें हत्तिणी संचार करितात, तसे त्या परमात्म्याच्या संपूर्ण शक्तियुक्त संस्थानामध्यें ब्रह्मांडरूपी त्रसरेणु स्फुरण पावतात ॥ २२० ॥

**प्रत्येकस्याण्डगोलस्य स्थितः कटकरत्नवत् ।**
**भूताकृष्टिकरो भावः पार्थिवः स्वस्वभावतः ॥ २२१ ॥**

या प्रत्येक गोलांत आपापल्या स्वभावानें पदार्थांस आकर्षण करणारी पृथ्वीसंबंधी आकर्षणशक्ति रत्नजडित वलयाप्रमाणें चारहि बाजूंनीं राहिली आहे ॥ २२१ ॥

**यः सर्वविभवोऽस्माकं धियां न विषयस्ततः ।**
**तज्जगत्कथने शक्तिर्न ममास्ति महामते ॥ २२२ ॥**

हे महामते! परमात्म्याच्या शक्तीचें सर्व वैभव आहे, तें माझ्या बुद्धीचा विषय नाहीं, करितां या सर्व सृष्टीचें वर्णन करण्याची माझी शक्ति नाहीं ॥ २२२ ॥

**भीमान्धकारगहने सुमहत्यरण्ये नृत्यन्त्यदर्शितपरस्परमेव मत्ताः ।**
**यक्षा यथा प्रवितते परमाम्बरेऽन्तरेवं स्फुरन्ति सुबहूनि महाजगन्ति ॥**

भयंकर अंधकारानें गहन अशा अत्यंत मोठ्या अरण्यामध्यें जसे मदोन्मत्त यक्ष एकमेकांस न दिसतां नाचतात, तशीं अनंत अशा परमाकाशामध्यें असंख्य मोठीं जगतें स्फुरण पावत आहेत ॥ २२३ ॥

याप्रमाणें ब्रह्मांडांच्या संख्येचा अंत नाहीं, तर जें आपण पहात आहों तें सर्व उत्पत्तीचा किंचित् अंशमात्र आहे! अहा! सृष्टिकर्त्या ईश्वराच्या शक्तीशीं तुलना करून पाहिलें असतां मानवी शक्ति अतितुच्छ आहे. कारण आपला भूगोल ज्या अनंत आकाशांत असलेल्या असंख्य गोलांपैकीं एक गोल आहे, त्याच्यावरील एका खंडांत, त्या खंडाच्याहि एका देशांत, त्या देशाच्याहि एका प्रांतांत, त्या प्रांताच्याहि एका शहरांत, आणि त्या शहराच्याहि एका गृहांत, आणि त्या गृहाच्याहि एका भागांत राहणारे आपण कसल्या गणतींत आहों! अर्थात् कांहींच नाहीं. इतकें असूनहि स्त्री-पुरुषांस

स्वतःच्या रूप, यौवन, विद्या आणि धनादिक संपत्ति यांचा गर्व आल्या-खेरीज राहत नाहीं. परंतु ज्या वेळीं असा गर्व येईल त्या वेळीं त्यांनीं विचार करावा कीं, एवढ्या मोठ्या विस्तारयुक्त सृष्टीमध्यें त्यांच्या वर्तमानसमयीं त्यांच्या सारखे रूप, यौवन, विद्या आणि धनादिक संपत्ति यांनीं युक्त किती अस-तील आणि भविष्य कालामध्यें किती होतील! पुन्हां भूतकालामध्यें यांच्या-सारखे किती होऊन गेले असतील! आणि पुनः हें सर्व नाशिवंत! असा वारंवार विचार करून सर्व स्त्री–पुरुषांनीं गर्वापासून अलिप्त राहण्याचा प्रयत्न नेहमीं जारीनें ठेवावा, आणि कोणाचाहि तिरस्कार करूं नये. कारण तिर-स्कारापासून प्राणिमात्राचा अंतरात्मा दुःखित होतो. करितां श्रीमहाभारताच्या आदिपर्वाच्या ८७ अध्यायांत ययाति राजानें सांगितलें आहे कीं,

**न हीदृशं संवननं त्रिषु लोकेषु किंचन ।**
**दया मैत्री च भूतेषु दानं च मधुरा च वाक् ॥ २२४ ॥**

प्राणिमात्राविषयीं दया, मैत्री, दान आणि मधुर वाणी यांनीं वागावें, यांच्यासारखें वशीकरण तीन्ही लोकांत दुसरें कांहीं नाहीं ॥ २२४ ॥

याप्रमाणें वर्तन करीत असतां नित्य मनुष्यानें सृष्टिकर्त्या ईश्वरासंबंधीं विचार करून त्यास शरण जावें. असें केल्यानें अंतःकरण शुद्ध होतें, आणि पापाविषयीं प्रवृत्ति होत नाहीं. प्राचीन आर्यधर्म प्रतिपादन करणाऱ्या वेदांच्या अंतभागामध्यें अर्थात् वेदांत नांवानें प्रसिद्ध असलेल्या आरण्यकांच्या अंतर्भूत उपनिषद् ग्रंथांमध्यें उत्तम रीतीनें विचार करून ईश्वराचें स्वरूप व महिमा याप्रमाणें सांगितला आहे. कृष्णयजुर्वेदांतील तैत्तिरीयारण्यकाच्या १० व्या प्रपाठकांत सांगितलें आहे कीं,

**यतः प्रसूता जगतः प्रसूती तोयेन जीवान् व्यचसर्ज भूम्याम् ।**
**यदोषधीभिः पुरुषान् पशूंश्च विवेश भूतानि चराचराणि ॥ २२५ ॥**

जेथून जगताची उत्पत्ति झाली आहे, आणि जें पृथ्वीच्या ठायीं जलानें जंतूंस आणि ओषधींनीं मनुष्यांस व पशूंस उत्पन्न करून चराचर भूतांमध्यें प्रविष्ट आहे ॥ २२५ ॥

अतः परं नान्यदणीयसं हि परात्परं यन्महतो महान्तम् ।
यदेकमव्यक्तमनन्तरूपं विश्वं पुराणं तमसः परस्तात् ॥ २२६ ॥

याहून दुसरें श्रेष्ठ आणि अतिसूक्ष्म कांहीं नाहीं, हें श्रेष्ठांमध्यें श्रेष्ठ, महतामध्यें महत्, एक, अव्यक्त, अनंत, विश्वरूप, अनादि आणि अज्ञानाहून पर आहे ॥ २२६ ॥

यस्मात्परं नापरमस्ति किञ्चिद्यस्मान्नाणीयो न ज्यायोऽस्ति किञ्चित् ।
वृक्ष इव स्तब्धो दिवि तिष्ठत्येकस्तेनेदं पूर्णं पुरुषेण सर्वम् ॥२२७॥

ज्याच्याहून श्रेष्ठ, अतिसूक्ष्म आणि अतिशय मोठें दुसरें कांहीं नाहीं, तो एकच ईश्वर स्वतःच्या प्रकाशरूप महिम्यामध्यें वृक्षाप्रमाणें निश्चल राहतो आणि तेणेंकरून हें सर्व व्याप्त आहे ॥ २२७ ॥

सर्वेन्द्रियगुणाभासं सर्वेन्द्रियविवर्जितम् ।
सर्वस्य प्रभुमीशानं सर्वस्य शरणं सुहृत् ॥ २२८ ॥

तो सर्व इंद्रियांच्या गुणांस प्रकाशित करणारा, सर्व इंद्रियांनीं रहित आणि सर्वांचा प्रभु, सर्वांचा नियंता, सर्वांचें रक्षण करणारा आणि सर्वांचा बंधु आहे ॥ २२८ ॥

अपाणिपादो जवनो गृहीता पश्यत्यचक्षुः स शृणोत्यकर्णः ।
स वेत्ति वेद्यं नच तस्यास्ति वेत्ता तमाहुरग्र्यं पुरुषं महान्तम् ॥२२९॥

तो हात व पाय नसून ग्रहण व गमन करितो, आणि नेत्र व कान नसून पाहतो व ऐकतो. वस्तुमात्रांस तो जाणतो, परंतु त्यास जाणणारा कोणी नाहीं; त्यास आदिकारण, पूर्ण व महान् ह्मणतात ॥ २२९ ॥

नैनमूर्ध्वं न तिर्यञ्चं न मध्ये परिजग्रभत् ।
न तस्य प्रतिमा अस्ति यस्य नाम महद्यशः ॥ २३० ॥

ज्याचें महत् यश नांव आहे, अशा या परमेश्वरास उंच, आड व मध्यें कोणी ग्रहण करूं शकत नाहीं, कारण त्याची प्रतिमा नाहीं ॥ २३० ॥

सर्वा दिश ऊर्ध्वमधश्च तिर्यक् प्रकाशयन् भ्राजते यद्वदनड्वान् ।
एवं स देवो भगवान् वरेण्यो योनिस्वभावानधितिष्ठत्येकः ॥२३१॥

सूर्य जसा सर्व दिशांस वर, खालीं, आड प्रकाशित करीत असतां शोभतो, तसा तो प्रार्थना करण्यास योग्य स्वयंप्रकाश एकच परमेश्वर, जगताचें उपादान कारण पृथिव्यादि पंचमहाभूतांस नियमांत ठेवितो ॥ २३१ ॥

**यच्च स्वभावं पचति विश्वयोनिः पाच्यांश्च सर्वान् परिणामयेद्यः ।**
**सर्वमेतद्विश्वमधितिष्ठत्येको गुणांश्च सर्वान् विनियोजयेद्यः ॥२३२॥**

जो पदार्थांमध्यें स्वाभाविक धर्म निर्माण करतो, सर्व पाकयोग्य वस्तूंस परिपक्व करतो, आणि सर्व गुणांस योग्य अशा रीतीनें योजितो, तो विश्वाचा आदिकारण एकच परमेश्वर या सर्व विश्वास नियमांत ठेवितो ॥ २३२ ॥

**स्वभावमेके कवयो वदन्ति कालं तथाऽन्ये परिमुह्यमानाः ।**
**देवस्यैष महिमा तु लोके येनेदं भ्राम्यते ब्रह्मचक्रम् ॥ २३३ ॥**

कितीएक मोह पावलेले पंडित जगताचें कारण स्वभाव आहे असें ह्मणतात व कितीएक काल ह्मणतात; परंतु जेणेंकरून हें मोठें सृष्टिचक्र फिरत आहे, असा हा, लोकांमध्यें देवाचाच महिमा ह्मटला जातो ॥ २३३ ॥

**न तस्य कार्यं करणं च विद्यते न तत्समश्चाभ्यधिकश्च दृश्यते ।**
**परास्य शक्तिर्विविधैव श्रूयते स्वाभाविकी ज्ञानबलक्रिया च ॥२३४॥**

त्यास शरीर व इंद्रियें नाहींत, त्याच्या बरोबरीचा व त्याहून श्रेष्ठ कोणी दिसत नाहीं; याची उत्कृष्ट शक्ति नानाप्रकारची ऐकूं येते, आणि यांत ज्ञानाची व बलाची क्रिया स्वाभाविक आहे ॥ २३४ ॥

**न तस्य कश्चित्पतिरस्ति लोके न चेशिता नैव च तस्य लिङ्गम् ।**
**स कारणं करणाधिपाधिपो न चास्य कश्चिज्जनिता नचाधिपः ॥२३५॥**

लोकामध्यें याचा स्वामी व नियंता नाहीं, तसेंच त्याचें चिन्हहि नाहीं; तो सर्वांचें कारण व मनाचा अधिपति आहे परंतु याचा पिता किंवा अधिपति नाहीं ॥ २३५ ॥

**न तत्र सूर्यो भाति न चन्द्रतारकं नेमा विद्युतो भान्ति कुतोऽयमग्निः ।**
**तमेव भान्तमनुभाति सर्वं तस्य भासा सर्वमिदं विभाति ॥ २३६ ॥**

त्यास सूर्य चंद्र तारे आणि ही विद्युत्‌हि प्रकाशित करूं शकत नाहीं, तर हा अग्नि तरी कोठून प्रकाशित करूं शकणार! त्या स्वयंप्रकाशाच्या मागाहून सर्व शोभतें आणि त्याच्याच प्रकाशानें हें सर्व प्रकाश पावत आहे ॥ २३६ ॥

**स विश्वकृद्विश्वविदात्मयोनिर्ज्ञः कालकारो गुणी सर्वविद्यः ।**
**प्रधानक्षेत्रज्ञपतिर्गुणेशः संसारमोक्षस्थितिबन्धहेतुः ॥ २३७ ॥**

तो सृष्टीचा कर्ता व ज्ञाता, स्वयंभू, प्रज्ञावान्, कालाचा कर्ता, गुणी, सर्वज्ञ, माया आणि जीव या दोहोंचा प्रभु, गुणांचा नियंता आणि संसाराच्या मोक्ष, स्थिति आणि बंध यांचें कारण आहे ॥ २३७ ॥

अशा ईश्वरास आपल्या हृदयांत पाहून त्याची उपासना करून त्यास शरण राहण्यास याच उपनिषदांत सांगितलें आहे:—

**आदिः स संयोगनिमित्तहेतुः परस्त्रिकालादकालोऽपि दृष्टः ।**
**तं विश्वरूपं भवभूतमीड्यं देवं स्वचित्तस्थमुपास्य पूर्वम् ॥ २३८ ॥**

तो सर्वांचा आदि, सर्व संयोगांचा निमित्त कारण, तिन्ही कालांहून पर आणि कालरहित पहिला आहे; तो विश्वरूप, विश्वाचें कारण, सत्यस्वरूप, स्तुति करण्यास योग्य व आपल्या चित्तामध्यें असलेला अशा देवाची प्रथम उपासना करून—॥ २३८ ॥

**स वृक्षकालाकृतिभिः परोऽन्यो यस्मात्प्रपञ्चः परिवर्ततेऽयम् ।**
**धर्मावहं पापनुदं भगेशं ज्ञात्वाऽऽत्मस्थममृतं विश्वधाम ॥ २३९ ॥**

आणि जेथून हा प्रपंच वारंवार उत्पन्न होतो, व जो प्रपंचाहून पृथक् आहे, तो संसाररूप वृक्ष, काल आणि आकृति यांहून पर, धर्मास वहन करणारा, पापास घालविणारा, मरणधर्मानें रहित आणि विश्वाचा आधारभूत, अशा ईश्वरास आपल्या आत्म्यामध्यें असलेला जाणून—॥ २३९ ॥

**तमीश्वराणां परमं महेश्वरं तं देवतानां परमं च दैवतम् ।**
**पतिं पतीनां परमं परस्ताद्विदाम देवं भुवनेशमीड्यम् ॥ २४० ॥**

तो नियमांत ठेवणाऱ्यांसहि नियमांत ठेवणारा, प्रकाशित करणाऱ्यांसहि प्रकाशित करणारा, स्वामींचाहि स्वामी, मायेहून पर, जगताचा नियंता व स्तुति करण्यास योग्य, अशा देवास जाणूं या ॥ २४० ॥

**यो ब्रह्माणं विदधाति पूर्वं यो वै वेदांश्च प्रहिणोति तस्मै ।**
**तं ह देवमात्मबुद्धिप्रकाशं मुमुक्षुर्वै शरणमहं प्रपद्ये ॥ २४१ ॥**

जो पूर्वीं पितामहास उत्पन्न करतो व त्यास ज्ञानाची प्रेरणा करितो, त्या जीवांच्या बुद्धीस प्रकाशित करणाऱ्या देवास, मोक्षाची इच्छा धरून मी शरण जात आहें ॥ २४१ ॥

याप्रमाणें यदुवंशी ठाकरसीसुत प्रयागजीरचित प्रमाणसहस्रीच्या सृष्टिप्रकरणापैकीं ईश्वरमहिमावर्णन समाप्त.

**॥ इति सृष्टिप्रकरणम् ॥**

———

॥ ॐ तत्सद्ब्रह्मणे नमः ॥

श्री

# प्रमाणसहस्री.



## ॥ आचारप्रकरणप्रारंभः ॥

### उपदेश.



**य एकोऽवर्णो बहुधा शक्तियोगाद्वर्णाननेकान्निहितार्थो दधाति ।**
**विचैति चान्ते विश्वमादौ स देवः स नो बुद्ध्या शुभया संयुनक्तु ॥१॥**

—श्वेताश्वतरोपनिषद्.

अवर्ण जो एक अनेकशक्ती अनेकवर्णां सृजितो स्वभक्ती ।
हें विश्व आद्यंतिं जयीं विराजे तो देव आह्मां शुभ बुद्धि दीजे ॥

पहिल्या प्रकरणांत सृष्टीसंबंधीं विचार केला आहे, आणि या दुसऱ्या प्रकरणांत आचाराचा विचार करण्यांत येत आहे. आचाराचे सदाचार आणि दुराचार असे दोन भेद आहेत. सदाचरणाहून विरुद्ध रीतीनें वर्तन करणें त्यास दुराचरण ह्मणतात. जशी सृष्टिसंबंधीं ज्ञान मिळविण्याची जरूर आहे, तशी सदाचार समजून घेण्याची अतिशयच आवश्यकता आहे. कारण जसें सृष्टीच्या विचित्र रचनेचें ज्ञान झालें असतां तिचा कर्ता सर्वशक्तिमान् जो परमेश्वर त्याच्या अस्तित्वाविषयीं निश्चय झाल्यामुळें मनुष्य आस्तिक बनून त्यास शरण राहून शांति—सुख पावतो; तसा सदाचार जाणला असतां त्याप्रमाणें वागल्यानें तो जीवंतपणीं चांगली प्रतिष्ठा पावून मृत्यूनंतर सद्गतीस प्राप्त होतो. कृष्णयजुर्वेदांतील तैत्तिरीय उपनिषदाच्या शिक्षावल्लीमध्यें आचार्यानें शिष्यास सदाचरणाविषयीं याप्रमाणें उपदेश केला आहे:—

सत्यं वद । धर्मं चर । स्वाध्यायान्मा प्रमदः ।
आचार्याय प्रियं धनमाहृत्य प्रजातन्तुं मा व्यवच्छेत्सीः ।
सत्यान्न प्रमदितव्यम् । धर्मान्न प्रमदितव्यम् ।
कुशलान्न प्रमदितव्यम् । भूत्यै न प्रमदितव्यम् ।
यान्यनवद्यानि कर्माणि तानि सेवितव्यानि नो इतराणि ।
यान्यस्माकं सुचरितानि तानि त्वयोपास्यानि नो इतराणि ॥ २ ॥

खरें बोल, धर्माचरण कर, विद्याभ्यासामध्यें प्रमाद करूं नकोस, विद्यागुरूस प्रिय धन दे व प्रजातंतूचा विच्छेद करूं नकोस. त्वां सत्यामध्यें प्रमाद करूं नये, धर्मामध्यें प्रमाद करूं नये, कुशलामध्यें प्रमाद करूं नये, समृद्धि मिळविण्यामध्यें प्रमाद करूं नये, जीं अनिंदित कर्में असतील तीं करावीं इतर करूं नयेत, आणि जीं आमचीं चांगलीं आचरणें असतील तीं त्वां ग्रहण करावीं, इतर ग्रहण करूं नयेत ॥ २ ॥

---

## ॥ सत्यं वद ॥

आतां प्रथम उपदेश सत्य बोलण्याविषयीं आहे. कारण सर्व सदाचरणाचें मूळ सत्य आहे. सत्यानें सर्व लहान–मोठ्या राज्यांची व्यवस्था बरोबर राहूं शकते. कारण राजा, प्रधान, नोकर व प्रजा परस्परांमध्यें सत्य ठेवून वागत असतील, तरच राज्यामध्यें सुख-शांति राहते. त्यांपैकीं एखादाहि असत्य रीतीनें वागेल तर सुख-शांतीचा नाश होऊन क्लेश उत्पन्न होतो. करितां ज्या राज्यामध्यें असत्याची वृद्धि होते, तें राज्य समूळ नाश पावतें. सर्व प्रकारची शेतकी करणारे, कारागीर, व व्यापारी आदिकरून सर्व प्रजेचा व्यवहार परस्परांतील सत्याच्या योगानें समाधानानें चालतो. किंचित्हि असत्य वागतील तर तेथें क्लेश होतो, तो शमविण्याकरितां व फिरून सत्य प्रवृत्त करण्याकरितां राजानें निर्माण केलेल्या न्यायाधीशाजवळ प्रजेस जावें लागतें. पिता, पुत्र, स्त्री, पुरुष, बंधु व मित्र यांमध्यें वाटेल तेवढी प्रीति असली, तथापि असत्याच्या योगानें तुटून जाते. यावरून असें सिद्ध होतें कीं, सृष्टीचा

सर्व व्यवहार सत्यानें चालतो, करितां सर्व स्त्री-पुरुषांनीं सत्य बोलावें आणि सत्य आचरण करावें. तसें करण्यानें प्रतिष्ठा वाढते, आणि सर्वांच्या विश्वासास पात्र होतो. आणि ज्याच्यावर विश्वास बसला त्याचा व्यवहार उत्तम रीतीनें चालतो. पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**विश्वासः सम्पदां मूलं तेन यूथपतिर्गजः ।**
**सिंहो मृगाधिपत्येऽपि न मृगैः परिवार्यते ॥ ३ ॥**

आपल्या ठिकाणीं मिळविलेला विश्वास संपत्तीचें मूळ आहे. कारण विश्वासामुळें हत्ती यूथपति होतो, आणि सिंह वनचर पशूंचा पति ह्मटला जातो, तथापि विश्वासाच्या अभावीं त्यांच्याकडून वेष्टिला जात नाहीं ॥ ३ ॥

सर्वांस सत्य रीतीनें वागविण्यासाठीं फार प्राचीन काळापासून राजे नियम बांधीत आले आहेत. आर्यप्रजेचे प्रथम नियम मनूनें बांधले आहेत. त्या नियमांविरुद्ध वागणाऱ्यास त्यानें शिक्षा करण्यास सांगितली आहे. कारण मानवधर्मशास्त्राच्या ७व्या अध्यायांत त्यानें सांगितलें आहे कीं,

**सर्वो दण्डजितो लोको दुर्लभो हि शुचिर्नरः ।**
**दण्डस्य हि भयात्सर्वं जगद्भोगाय कल्पते ॥ ४ ॥**

शिक्षेच्या भीतीमुळें सर्व लोक नियमामध्यें राहतात, कारण केवळ निरपराधी मनुष्य मिळणें कठीण आहे. दंडाच्या भयानेंच सर्व जगत् भोग भोगण्यास समर्थ होतें ॥ ४ ॥

तसेंच पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**नियतविषयवर्ती प्राशयो दण्डयोगा-**
**ज्जगति परवशेऽस्मिन् दुर्लभः साधुवृत्तः ।**
**कृशमतिविकलं वा व्याधितं वाऽधनं वा**
**पतिमपि कुलनारी दण्डभीत्याऽभ्युपैति ॥ ५ ॥**

मनुष्य बहुतकरून दंडाच्या योगानेंच विषयांमध्यें नियमानें वागणारा होतो, कारण या परवश जगतामध्यें चांगलें आचरण करणारा पुरुष दुर्लभ.

कारण अतिशय विकल, रोगी किंवा निर्धन अशा पतीसहि कुलीन स्त्री दंडाच्या भयानें भजते ॥ ५ ॥

पुनः सत्य रीतीनें वागण्याची इतकी जरूर आहे कीं, कदाचित् वडील, मित्र, संबंधी—आप्त अथवा राजा स्वतः असत्य रीतीनें वागले असतील तर त्यांसहि शिक्षा करावी, अशी आर्यशास्त्रामध्यें आज्ञा आहे. मनुस्मृतीच्या ८व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**पिताऽऽचार्यः सुहृन्माता भार्या पुत्रः पुरोहितः ।**
**नादण्ड्यो नाम राज्ञोऽस्ति यः स्वधर्मे न तिष्ठति ॥ ६ ॥**

पिता, गुरु, मित्र, माता, स्त्री, पुत्र आणि पुरोहित यांपैकींहि जो स्वधर्मामध्यें न राहील, अर्थात् अन्यायानें वागेल त्यास राजानें शिक्षा करणें योग्य आहे ॥ ६ ॥

**कार्षापणं भवेद्दण्ड्यो यत्रान्यः प्राकृतो जनः ।**
**तत्र राजा भवेद्दण्ड्यः सहस्रमिति धारणा ॥ ७ ॥**

पुनः ज्या अपराधासाठीं एखाद्या साधारण मनुष्यास १ रुपया दंड करण्यांत आला असेल, तसा अपराध जर राजा करील तर त्यास न्यायाधीशानें १००० रुपये दंड करावा असा शास्त्राचा ठराव आहे ॥ ७ ॥

तसेंच श्रीमहाभारतांतर्गत शांतिपर्वाच्या ५७ व्या अध्यायांत भीष्मपितामहानें युधिष्ठिरास आणि आदिकाव्य रामायणाच्या अयोध्याकांडाच्या २१ व्या सर्गांत लक्ष्मणानें रामास सांगितलें आहे कीं,

**गुरोरप्यवलिप्तस्य कार्याकार्यमजानतः ।**
**उत्पथप्रतिपन्नस्य कार्यं भवति शासनम् ॥ ८ ॥**

उद्धत होऊन गेलेल्या, कार्याकार्यास न जाणणाऱ्या, आणि गैरमार्गानें चालणाऱ्या गुरूसहि शिक्षा करावी ॥ ८ ॥

जसें सत्य वागविण्याकरितां राजानें बांधलेल्या नियमाप्रमाणें मनुष्य दंडाच्या भयानेंच वर्तन करतात, तसें सृष्टिकर्त्या परमेश्वराच्या स्वतःसिद्ध अद्भुत शक्तीनें बद्ध नियमाप्रमाणें सर्व पदार्थ जणूं हानीच्या भयानें वागत

असतील असें वाटतें ! कोणाकडूनहि त्या नियमांचें उल्लंघन करणें शक्य नाहीं. कारण तसें झाल्यानें त्या पदार्थांची महाहानि होते. ती ही कीं त्यांस नियमाविरुद्ध रीतीनें वागल्यास जणूं दंड होईल कीं काय असें वाटतें ! करितां त्यांचें नियमाप्रमाणें वर्तन हा सत्याचाच महिमा आहे. तैत्तिरीय उपनिषदाच्या ब्रह्मानंदवल्लींत सांगितलें आहे कीं,

**भीषाऽस्माद्वातः पवते । भीषोदेति सूर्यः ।**
**भीषाऽस्मादग्निश्चेन्द्रश्च । मृत्युर्धावति पंचमः ॥ ९ ॥**

ईश्वराच्या भयानें वायु वाहतो, सूर्य उदय पावतो, आणि अग्नि ज्वलन पावेतो, मेघ जल वर्षितो व पांचवा मृत्यु धांवत आहे ॥ ९ ॥

तसेंच तैत्तिरीयारण्यकाच्या १० व्या प्रपाठकाच्या ६३ व्या अनुवाकांत सांगितलें आहे कीं,

**सत्येन वायुरावाति । सत्येनादित्यो रोचते दिवि । सत्यं वाचः प्रतिष्ठा । सत्ये सर्वं प्रतिष्ठितम् । तस्मात्सत्यं परमं वदन्ति ॥ १० ॥**

सत्यानें वायु वाहतो व सूर्य आकाशामध्यें प्रकाशतो, सत्य वाणीची प्रतिष्ठा आहे, सत्याचे ठिकाणीं सर्व राहिलें आहे, याकरितां सत्यास श्रेष्ठ ह्मणतात ॥ १० ॥

याचप्रमाणें चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**सत्येन धार्यते पृथ्वी सत्येन तपते रविः ।**
**सत्येन वाति वायुश्च सर्वं सत्ये प्रतिष्ठितम् ॥ ११ ॥**

सत्यानें पृथ्वी धारण केली जाते, सूर्य तापतो, व वायु वाहतो, म्हणून सर्व सत्याचे ठिकाणीं प्रतिष्ठित आहे ॥ ११ ॥

सत्यामध्यें सर्व राहिलें आहे, अर्थात् त्याची सर्व कार्यांमध्यें जरूर पडते, त्याशिवाय कोणत्याहि कार्याची सिद्धि होत नाहीं. दुष्ट पुरुष देखील दुसऱ्याची शरीरासंबंधीं किंवा संपत्तिसंबंधीं हानी करण्यामध्यें वरवर सत्य दाखवितात. जर तसें न करतील तर त्यांचें कार्य सिद्ध होत नाहीं. कारण प्राणिमात्रास सत्य प्रिय आहे, कारण सत्यामध्यें याचें कल्याण भरलें आहे; त्यामुळें

वरवरच्या सत्यास खरें मानून ते स्वतःचें कल्याण होण्याच्या लोभास्तव विश्वासानें दुष्टांनीं रचलेल्या पाशांमध्यें फसून जातात. सत्य सर्वत्र प्रतिष्ठेस पावतें, आणि सत्याचाच सर्वत्र जय होतो. अथर्ववेदाच्या मुंडकोपनिषदांत सांगितलें आहे कीं,

**सत्यमेव जयते नानृतम् ॥ १२ ॥**

सत्याचाच जय होतो, असत्याचा जय होत नाहीं ॥ १२ ॥

पुनः सत्य बोलल्यानें कपट करावें लागत नाहीं, परंतु एक असत्य बोललें असेल तर त्यास झांकण्यासाठीं दुसरें असत्य बोलावें लागतें आणि या रीतीनें जर कोणी तपास करणारा मिळेल तर असत्य बोलण्याचा पार लागणार नाहीं. आणि शेवटीं सत्य बोलावें लागतें, करितां पहिल्यापासूनच सत्य बोलावें. श्रीमहाभारताच्या आदिपर्वाच्या ७४ व्या अध्यायांत शकुंतलेनें दुष्यंतास सांगितलें आहे कीं,

**नास्ति सत्यसमो धर्मो न सत्याद्विद्यते परम् ।**
**नहि तीव्रतरं किञ्चिदनृतादिह विद्यते ॥ १३ ॥**

या लोकीं सत्यासारखा धर्म नाहीं, सत्याहून कांहीं श्रेष्ठ नाहीं आणि असत्याहून दुसरें कांहीं अतिशय वाईट नाहीं ॥ १३ ॥

**नासत्यवादिनः सख्यं न पुण्यं न यशो भुवि ।**
**दृश्यते नापि कल्याणं कालकूटमिवाश्नतः ॥ १४ ॥**

जगतांत खोटें बोलणारास मित्रता, पुण्य आणि यश मिळत नाहींत, विष खाणाऱ्याप्रमाणें त्याचें कोठेंहि कल्याण दिसत नाहीं ॥ १४ ॥

करितां नेहमीं सत्य बोलावें. परंतु एखादेवेळीं असा प्रसंग येईल कीं, सत्य बोलल्यानें महाअनर्थ ओढवण्याचा संभव असेल, तर त्या वेळीं चालेल तोंपर्यंत मौन स्वीकारावें. परंतु कदाचित् बोलण्याची जरूरच पडेल तर युक्तीनें बोलावें, पण अनर्थ घडूं देऊं नये. याप्रमाणें आचार्यानें शिष्यास सत्य बोलण्याविषयीं उपदेश केला आहे.

या प्रकारें प्रमाणसहस्रीच्या आचारप्रकरणापैकीं सत्यवचनोपदेश.

---

## ॥ धर्मं चर ॥

दुसरा उपदेश धर्म आचरण करण्याविषयीं केला आहे. कारण कृष्ण-यजुर्वेदाच्या तैत्तिरीयारण्यकाच्या १० व्या प्रपाठकाच्या ६३ व्या अनुवाकांत सांगितलें आहे कीं,

**धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा लोके धर्मिष्ठं प्रजा उपसर्पन्ति । धर्मेण पापमपनुदन्ति धर्मे सर्वं प्रतिष्ठितं तस्माद्धर्मं परमं वदन्ति १५**

धर्म सर्व प्राण्यांचा आश्रय आहे, जगतांत धर्माधर्म जाणण्यासाठीं लोक धर्मिष्ठाच्या जवळ जातात, धर्मेंकरून पापाचें क्षालन करितात, आणि धर्मामध्यें सर्व राहिलें आहे; करितां धर्मास श्रेष्ठ ह्मणतात ॥ १५ ॥

परंतु हा धर्म काय आहे, तो सर्व मनुष्यांनीं जाणणें अवश्य आहे, करितां आपस्तंब धर्मसूत्राच्या प्रथम प्रश्नाच्या ७ व्या पटलामध्यें सांगितलें आहे कीं,

**यं त्वार्याः क्रियमाणं प्रशंसन्ति स धर्मो यं गर्हन्ते सोऽधर्मः ॥१६॥**

ज्या आचरणास आर्यपुरुष वाखाणितात तो धर्म, आणि ज्यास निंदितात तो अधर्म ह्मटला जातो ॥ १६ ॥

तसेंच वैशेषिक दर्शनाच्या पहिल्या अध्यायाच्या प्रथम आह्निकामध्यें सांगितलें आहे कीं,

**यतोऽभ्युदयनिःश्रेयससिद्धिः स धर्मः ॥ १७ ॥**

ज्याच्यापासून उत्कर्ष व कल्याण होईल तोच धर्म ॥ १७ ॥

पुनः श्रीमहाभारतांतर्गत वनपर्वाच्या २७ व्या अध्यायांत धर्मव्याधानें कौशिक ब्राह्मणास सांगितलें आहे कीं,

**आरंभो न्याययुक्तो यः स हि धर्म इति स्मृतः ।**
**अनाचारस्त्वधर्मेति एतच्छिष्टानुशासनम् ॥ १८ ॥**

जें कार्य आरंभापासूनच न्याययुक्त असेल तोच धर्म आणि जो अनाचार तो अधर्म ह्मटला आहे; असें आर्य पुरुषांचें सांगणें आहे ॥ १८ ॥

याप्रमाणें प्राणिमात्राचें ज्यापासून हित होतें अशा सदाचरणास धर्म ह्मटलेला आहे, करितां मनुष्यानें नेहमीं सदाचारानें वागावें, त्यामुळें तो इहलोकीं सुख व यश पावतो, आणि मरणानंतर दुर्गतीस पावत नाहीं. श्रीमद्भगवद्गीतेच्या ६ व्या अध्यायांत श्रीकृष्णानें अर्जुनास सांगितलें आहे कीं,

**नहि कल्याणकृत् कश्चित् दुर्गतिं तात गच्छति ॥ १९ ॥**

हे तात! शुभाचरण करणारा कोणीहि मनुष्य दुर्गतीस जात नाहीं ॥१९॥

पुन: सदाचरणरूप धर्मानें उच्चता व असदाचरणरूप अधर्मानें नीचता प्राप्त होते. आपस्तम्बधर्मसूत्राच्या दुसऱ्या प्रश्नाच्या चवथ्या पटलांत सांगितलें आहे कीं,

**धर्मचर्यया जघन्यो वर्णः पूर्वं पूर्वं वर्णमापद्यते जातिपरिवृत्तौ ॥२०॥**

जाति बदलण्यामध्यें हलका वर्गहि धर्माचरणानें स्वत: उत्तम उत्तम वर्णत्वास प्राप्त होतो ॥ २० ॥

**अधर्मचर्यया पूर्वो वर्णो जघन्यं जघन्यं वर्णमापद्यते जातिपरिवृत्तौ २१**

आणि उत्तम वर्णहि अधर्माचरणेंकरून स्वत: हलक्या हलक्या वर्णत्वास प्राप्त होतो ॥ २१ ॥

कारण शुक्रनीतीच्या चवथ्या अध्यायाच्या चवथ्या प्रकरणामध्यें सांगितलें आहे कीं,

**विश्वामित्रो वसिष्ठश्च मतङ्गो नारदादयः ।**
**तपोविशेषैः संप्राप्ता उत्तमत्वं न जातितः ॥ २२ ॥**

विश्वामित्र, वसिष्ठ, मतंग व नारदादिक ऋषि तपोविशेषेंकरून उत्तमपणास पोंचले परंतु जातीमुळें नाहीं ॥ २२ ॥

कारण श्रीमहाभारतांतर्गत शांतिपर्वाच्या १८८ व्या अध्यायांत भृगुऋषीनें भारद्वाजास सांगितलें आहे कीं,

**न विशेषोऽस्ति वर्णानां सर्वं ब्राह्ममिदं जगत् ।**
**ब्रह्मणा पूर्वसृष्टं हि कर्मभिर्वर्णतां गतम् ॥ २३ ॥**

ब्रह्मदेवानें उत्पन्न केलेलें हें सर्व जगत् पूर्वीं ब्राह्मण जातीचें होतें, कांहीं वर्णभेद नव्हता; परंतु मागाहून कर्मेंकरून वर्णत्वास पोंचलें ॥ २३ ॥

**कामभोगप्रियास्तीक्ष्णाः क्रोधनाः प्रियसाहसाः ।**
**त्यक्तस्वधर्मा रक्ताङ्गास्ते द्विजाः क्षत्रतां गताः ॥ २४ ॥**

त्यांत जे ब्राह्मण काम व भोग यांमध्यें आसक्त असणारे, तीक्ष्ण स्वभावाचे, क्रोधी, साहसी, स्वधर्म सोडून देणारे आणि रजोगुणविशिष्ट होते, ते क्षत्रियपणास प्राप्त झाले ॥ २४ ॥

**गोभ्यो वृत्तिं समास्थाय पीताः कृष्युपजीविनः ।**
**स्वधर्मान्नानुतिष्ठन्ति ते द्विजा वैश्यतां गताः ॥ २५ ॥**

जे ब्राह्मण पशूंचें पालन करून त्यापासून आपली उपजीविका चालविणारे रजोगुणी व तमोगुणी, शेतकी करणारे आणि आपल्या धर्मापासून विमुख झालेले ते वैश्यत्वास प्राप्त झाले ॥ २५ ॥

**हिंसानृतप्रिया लुब्धाः सर्वकर्मोपजीविनः ।**
**कृष्णाः शौचपरिभ्रष्टास्ते द्विजाः शूद्रतां गताः ॥ २६ ॥**

जे ब्राह्मण हिंसा व असत्य यांमध्यें आसक्त असणारे, लोभी, वाटेल तीं कर्में करून आपला निर्वाह चालविणारे, तमोगुणी व अपवित्र होते ते शूद्रत्वास प्राप्त झाले ॥ २६ ॥

**इत्येतैः कर्मभिर्व्यस्ता द्विजा वर्णान्तरं गताः ।**
**धर्मो यज्ञक्रिया तेषां नित्यं न प्रतिषिध्यते ॥ २७ ॥**

या रीतीनें सांगितलेलीं कर्में करून पृथक् होऊन ब्राह्मण वर्णांतरास प्राप्त झाले, परंतु त्या सर्व वर्णांस धर्म आणि यजन क्रिया करण्याची निरंतर मनाई नाहीं ॥ २७ ॥

पुनः याच पर्वाच्या १८९ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**सत्यं दानमथाद्रोह आनृशंस्यं त्रपा घृणा ।**
**तपश्च दृश्यते यत्र स ब्राह्मण इति स्मृतः ॥ २८ ॥**

ज्याच्या ठिकाणीं सत्य, दान, अद्रोह, अक्रूरता, लज्जा, दया आणि इंद्रियनिग्रह हे गुण दिसत असतील तो ब्राह्मण असें ह्मटलें आहे ॥ २८ ॥

**क्षत्रजं सेवते कर्म वेदाध्ययनसंगतः ।**
**दानादानरतिर्यस्तु स वै क्षत्रिय उच्यते ॥ २९ ॥**

जो युद्धकर्म करणारा, युद्धविद्या शिकलेला आणि दान देण्यामध्यें व प्रजेपासून तिच्या रक्षणाबद्दल आपला हक्क घेण्यामध्यें आसक्त असेल त्यास क्षत्रिय ह्मटला आहे ॥ २९ ॥

**वणिज्या पशुरक्षा च कृष्यादानरतिः शुचिः ।**
**वेदाध्ययनसंपन्नः स वैश्य इति संज्ञितः ॥ ३० ॥**

जो व्यापारी, पशूंचें पालन करणारा, शेतीपासून उत्पन्न करण्यामध्यें आसक्त, पवित्र व विद्याभ्यास केलेला असेल, तो वैश्य ह्मटला आहे ॥ ३० ॥

**सर्वभक्षरतिर्नित्यं सर्वकर्मकरोऽशुचिः ।**
**त्यक्तवेदस्त्वनाचारः स वै शूद्र इति स्मृतः ॥ ३१ ॥**

जो अभक्ष्याचेंहि भक्षण करण्यामध्यें आसक्त, निरंतर सर्व काम करणारा, अपवित्र, मूर्ख व आचरणशून्य असेल, तो शूद्र ह्मटला आहे ॥ ३१ ॥

पुनः शुक्रनीतीच्या प्रथमाध्यायांत सांगितलें आहे कीं,

**न जात्या ब्राह्मणः कश्चित् क्षत्रियो वैश्य एव वा ।**
**न च शूद्रो न वै म्लेच्छो भेदिता गुणकर्मभिः ॥ ३२ ॥**

या लोकामध्यें जन्मतः कोणी ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र आणि म्लेच्छ नाहीं, परंतु गुण आणि कर्में यांहींकरून झालेले आहेत ॥ ३२ ॥

**ज्ञानकर्मोपासनाभिर्देवताराधने रतः ।**
**शान्तो दान्तो दयालुश्च ब्राह्मणः स गुणैः स्मृतः ॥ ३३ ॥**

जो ज्ञान, कर्म आणि उपासना यांच्यायोगेंकरून ईश्वरोपासना करण्यामध्यें आसक्त, शांत, जितेंद्रिय आणि दयाळु असेल तो अशा गुणेंकरून ब्राह्मण म्हटला आहे ॥ ३३ ॥

**लोकसंरक्षणे दक्षः शूरो दान्तः पराक्रमी ।**
**दुष्टनिग्रहशीलो यः स वै क्षत्रिय उच्यते ॥ ३४ ॥**

जो प्रजेचें संरक्षण करण्यामध्यें निपुण, शूर, वीर, जितेंद्रिय, पराक्रमी आणि दुष्टांस दंड देण्याच्या स्वभावाचा असेल तोच क्षत्रिय म्हटला जातो ॥३४॥

**क्रयविक्रयकुशला ये नित्यं पण्यजीविनः ।**
**पशुरक्षाः कृषिकरास्ते वैश्याः कीर्तिता भुवि ॥ ३५ ॥**

जे नित्य माल घेण्यामध्यें आणि विकण्यामध्यें कुशल व व्यापार, पशुपालन आणि शेतकी यांवर निर्वाह करणारे असतात, ते वैश्य ह्मटले जातात ॥ ३५ ॥

**द्विजसेवार्चनरताः शूराः शान्ता जितेन्द्रियाः ।**
**सीरकाष्ठतृणवहास्ते नीचाः शूद्रसंज्ञकाः ॥ ३६ ॥**

जे इतर वर्णांची हलकी चाकरी आणि तावेदारी करण्यामध्यें आसक्त, काम करण्यामध्यें समर्थ, चांगल्या स्वभावाचे, जितेंद्रिय, आणि नांगर, काष्ठ व गवत काढण्याचें हलकें काम करणारे असतील ते शूद्र ह्मटले जातात ॥३६॥

**त्यक्तस्वधर्माचरणा निर्घृणाः परपीडकाः ।**
**चण्डाश्च हिंसका नित्यं म्लेच्छास्ते ह्यविवेकिनः ॥ ३७ ॥**

जे धर्माचरणानें रहित, निर्दय, दुसऱ्यास उपद्रव देणारे, क्रूर, निरंतर हिंसा करणारे व अविवेकी असतील ते म्लेंछ ह्मटले जातात ॥ ३७ ॥

पुनः याच ग्रंथाच्या चवथ्या अध्यायाच्या तिसऱ्या प्रकरणांत सांगितलें आहे कीं,

**कर्मणोत्तमनीचत्वं कालतस्तु भवेद्गुणैः ।**
**विद्याकलाश्रयेणैव तन्नाम्ना जातिरुच्यते ॥ ३८ ॥**

मनुष्यास कर्मानें व गुणांनीं कालेंकरून उत्तमत्व आणि नीचत्व प्राप्त होतें, आणि ज्या ज्या विद्येच्या व कलेच्या आश्रयानें तो स्वतःचा निर्वाह चालवितो, त्या त्या विद्येच्या आणि कलेच्या नांवानें त्याची जाति संबोधिली जाते ॥३८॥

परंतु ज्यामध्यें असदाचरण नसेल असा कोणत्याहि प्रकारचा धंदा करण्यांत हलकेपणा नाहीं, कारण हलकेपणा आणणारें तर केवळ असदाचरणच आहे. याप्रमाणें आपल्या आर्यशास्त्रामध्यें जर सदाचरणरूप धर्म पाळल्यानें उत्तमत्वाची आणि असदाचरणरूप अधर्म पाळल्यानें अधमत्वाची प्राप्ति सांगितली

आहे, आणि पाहण्यांतहि असेंच येतें, तर सर्व स्त्री—पुरुषांनीं असदाचरणाचा त्याग करून सदाचरणानें वागणें योग्य आहे, करितांच आचार्यांनें शिष्यास धर्म आचरण करण्याचा उपदेश केला आहे.

याप्रकारें प्रमाणसहस्रीच्या आचारप्रकरणापैकीं धर्माचरणोपदेश समाप्त.

---

## ॥ स्वाध्यायान्मा प्रमदः ॥

तिसरा उपदेश विद्याभ्यासामध्यें सावध राहण्याबद्दल आहे; कारण जशी नांगरून सुधारलेली जमीन तीमध्यें लाविलेल्या बीजास पोषण करून वृक्षरूप करण्यामध्यें अतिशय सहायता करते तशी विद्याभ्यासानें सुशिक्षित केलेली बुद्धि, प्राप्त झालेलें कोणतेंहि कार्य सिद्ध करण्यास अतिशय उपयोगी पडते. ज्याची बुद्धि सुशिक्षित नसते तो नांगरल्यावांचून जमीन जशी वनस्पतींस वाढूं देत नाहीं तसें प्राप्त झालेलें कार्य बिघडवून टाकितो. यासाठीं विद्याभ्यासरूप नांगरानें बुद्धिरूप जमीन अवश्य सुधारली पाहिजे. पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**अनेकसंशयोच्छेदि परोक्षार्थस्य दर्शकम् ।**
**सर्वस्य लोचनं शास्त्रं यस्य नास्त्यन्ध एव सः ॥ ३९ ॥**

अनेक संशयांस दूर करणारें आणि परोक्ष अर्थास दाखविणारें शास्त्र सर्वांचा नेत्र आहे, करितां तो ज्यास नाहीं, तो आंधळाच आहे ॥ ३९ ॥

भर्तृहरीनें नीतिशतकांत सांगितलें आहे कीं,

**विद्या नाम नरस्य रूपमधिकं प्रच्छन्नगुप्तं धनं**
**विद्या भोगकरी यशःसुखकरी विद्या गुरूणां गुरुः ।**
**विद्या बन्धुजनो विदेशगमने विद्या परं दैवतं**
**विद्या राजसु पूज्यते नहि धनं विद्याविहीनः पशुः ॥ ४० ॥**

विद्याच मनुष्याचें अधिक रूप व झांकलेलें गुप्त धन, भोग यश व सुख देणारी, गुरूंचाहि गुरु, प्रवासामध्यें बंधुजनासमान, आणि परम दैवतरूप

आहे. राजद्वारामध्यें विद्याच पूज्य आहे, धन पूज्य नाहीं, यासाठीं विद्याहीनास पशुतुल्य जाणावा ॥ ४० ॥

तसेंच भोजप्रबंधाच्या आरंभीं सांगितलें आहे कीं,

**मातेव रक्षति पितेव हिते नियुङ्क्ते**
**कान्तेव चाभिरमयत्यपनीय खेदम् ।**
**लक्ष्मीं तनोति वितनोति च दिक्षु कीर्तिं**
**किं किं न साधयति कल्पलतेव विद्या ॥ ४१ ॥**

विद्या मातेप्रमाणें रक्षण करिते, पित्याप्रमाणें हितामध्यें जोडते, स्त्रीप्रमाणें खेद दूर करून आनंद देते, लक्ष्मीस वाढविते, आणि सर्व दिगंतरीं कीर्ति पसरविते, करितां ती कल्पलतेप्रमाणें काय काय मिळवून देत नाहीं ? अर्थात् सर्व मिळवून देते ॥ ४१ ॥

पुनः सिद्धांतशिरोमणीच्या ग्रहगणिताध्यायांतील त्रिप्रश्नाधिकाराच्या भाष्यामध्यें सांगितलें आहे कीं,

**विद्या नाम नरस्य कीर्तिरतुला भाग्यक्षये चाश्रयो**
**धेनुः कामदुघा रतिश्च विरहे नेत्रं तृतीयं च सा ।**
**सत्कारायतनं कुलस्य महिमा रत्नैर्विना भूषणं**
**तस्मादन्यमुपेक्ष्य हेतुविषयं विद्याधिकारं कुरु ॥ ४२ ॥**

विद्या मनुष्यास अतुल कीर्ति देणारी, पडत्या दशेमध्यें आश्रयरूप, कामधेनूप्रमाणें इच्छित फल देणारी, स्नेह्यांच्या वियोगाचे वेळींहि आनंद देणारी, तृतीय नेत्ररूप, मान देवविणारी, कुलाचा महिमा वाढविणारी आणि रत्नाशिवायचें भूषण अशी आहे. करितां इतर उद्योग सोडून विद्या संपादन कर ॥ ४२ ॥

तसेंच सभातरंगांत सांगितलें आहे कीं,

**न चोरहार्यं नच राजहार्यं न भ्रातृभाज्यं न च भारकारि ।**
**व्यये कृते वर्द्धत एव नित्यं विद्याधनं सर्वधनप्रधानम् ॥ ४३ ॥**

विद्यारूपी धन (इतर द्रव्याप्रमाणें) चोर व राजा यांकडून हरण होण्यासारखें नाहीं, भावांकडून विभागिलें जाण्यासारखें नाहीं, कांहीं भार करणारें नव्हे, आणि कोणासहि दिल्यानें कमी होण्याच्या ऐवजीं वाढतच जातें, तस्मात् विद्याधन सर्व धनांमध्यें मुख्य आहे ॥ ४३ ॥

ज्यांनीं विद्याभ्यास केला नाहीं त्यांच्या करितां लोक अतिशय श्रेष्ठ मत ठेवत नाहींत, कारण विद्येवांचून त्यांचें शहाणपण अतिशय कमी असतें, त्यामुळें कांहीं कार्यप्रसंगीं त्यांनीं दिलेल्या विचारावर विशेष वजन ठेवण्यांत येत नाहीं. सभेमध्यें बोलावयाचें असेल तर त्यांच्याकडून कांहीं बोलवत नाहीं, त्यांस गप्प बसून ऐकावें लागतें. करितां आईबापांनीं बालकांकडून विद्याभ्यास अवश्य करविला पाहिजे. पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**मातापितृकृताभ्यासो गुणितामेति बालकः ।**
**न गर्भच्युतिमात्रेण पुत्रो भवति पण्डितः ॥ ४४ ॥**

आईबापांनीं अभ्यास करविलेला बालक गुणवान् होतो. केवळ जन्म दिल्यानें कांहीं पुत्र पंडित होत नाहीं ॥ ४४ ॥

**माता शत्रुः पिता वैरी याभ्यां बालो न पाठितः ।**
**न शोभते सभामध्ये हंसमध्ये बको यथा ॥ ४५ ॥**

ज्यांनीं आपल्या मुलांस सुशिक्षित केलें नाहीं, ते मातापिता दोन्ही त्याचे शत्रु समजावे; कारण तो अशिक्षित पुत्र, हंसाच्या कळपामध्यें बगळ्याप्रमाणें विद्वानांच्या सभेमध्यें शोभत नाहीं ॥ ४५ ॥

**रूपयौवनसंपन्ना विशालकुलसंभवाः ।**
**विद्याहीना न शोभन्ते निर्गन्धा इव किंशुकाः ॥ ४६ ॥**

सुखरूप, तरुण आणि मोठ्या कुलामध्यें उत्पन्न झालेले असले तरी जे विद्याहीन असतील, ते सुगंधाशिवायच्या पळसाप्रमाणें शोभत नाहींत ॥ ४६ ॥

**विद्या रूपं कुरूपाणां क्षमा रूपं तपस्विनाम् ।**
**कोकिलानां स्वरो रूपं स्त्रीणां रूपं पतिव्रतम् ॥ ४७ ॥**

कुरूपांचें रूप विद्या, तपस्व्यांचें रूप क्षमा, कोकिलांचें रूप स्वर, आणि स्त्रियांचें रूप पातिव्रत्य आहे ॥ ४७ ॥

**मूर्खोऽपि शोभते तावत्सभायां वस्त्रवेष्टितः ।**
**यावन्न भाषते किञ्चित् पण्डितानां पुरः स वै ॥ ४८ ॥**

सभेमध्यें सुशोभित वस्त्रें पांघरलेला मूर्ख जोंपर्यंत पंडितांच्या पुढें कांहीं बोलत नाहीं, तोंपर्यंतच शोभतो ॥ ४८ ॥

**कृष्णं वपुर्वहतु चुम्बतु सत्फलानि**
**रम्येषु संवसतु चाम्रवणान्तरेषु ।**
**पुंस्कोकिलस्य चरितानि करोतु कामं**
**काकः कलध्वनिविधौ स तु काक एव ॥ ४९ ॥**

भले कावळा काळें शरीर धारण करो, उत्तम फळें खावो, आणि मनोहर आमराईच्या बागेमध्यें राहो, याप्रमाणें कोकिलाचें चरित्र इच्छेप्रमाणें करो, परंतु मधुर शब्द बोलण्याच्या वेळीं जो कावळा तो कावळाच ॥ ४९ ॥

करितां सांगितलें आहे कीं,

**विद्याविनयोपेतो हरति न चेतांसि कस्य मनुजस्य ।**
**काञ्चनमणिसंयोगो नो जनयति कस्य लोचनानन्दम् ॥ ५० ॥**

विद्या आणि विनय यांनीं युक्त पुरुष कोणच्या मनुष्याच्या चित्ताचें हरण करीत नाहीं ? कारण सुवर्ण आणि रत्न यांचा संयोग कोणाच्या नेत्रांस आनंद देत नाहीं ? ॥ ५० ॥

**यः पठति लिखति पश्यति परिपृच्छति पण्डितानुपासयति ।**
**तस्य दिवाकरकिरणैर्नलिनीदलमिव विकासते बुद्धिः ॥ ५१ ॥**

जो पढतो, लिहितो, विचार करतो, प्रश्न करतो, आणि पंडितांची शुश्रूषा करतो, त्याची बुद्धि सूर्यकिरणेंकरून कमळांच्या पाकळ्यांप्रमाणें प्रफुल्लित होते ॥ ५१ ॥

**कुत्र विधेयो यत्नो विद्याभ्यासे सदौषधे दाने ।**
**अवधीरणा क्व कार्या खल–परयोषित्–परधनेषु ॥ ५२ ॥**

यत्न कुठें करावा ? तर विद्याभ्यासामध्यें, चांगल्या औषधामध्यें आणि परोपकारामध्यें, तसाच अनादर कुठें करावा ? तर दुर्जन, परस्त्री आणि परधन यांचे ठिकाणीं ॥ ५२ ॥

करितां बालकाकडून विद्याध्ययन करवावें, परंतु तें अपुरें करवूं नये. कारण अपुऱ्या अभ्यासानें तो अपुऱ्या घड्याप्रमाणें डुचमळून जातो, अर्थात् त्यास विद्या शिकलेल्याचा गर्व होतो; त्यामुळें स्वतः पंडितंमन्य होऊन वसतो. ह्मणजे कोणाची चांगली शिकवण ऐकत नाहीं, आणि स्वतःच्या विचाराप्रमाणें चालावयास जातो; त्यामुळें पुष्कळ ठेंचा खाऊन भविष्यकाळीं सुखी होणें असल्यास ताळ्यावर येतो. चाणक्य नीतींत सांगितलें आहे कीं,

**यस्य नास्ति स्वयं प्रज्ञा शास्त्रं तस्य करोति किम् ।**
**लोचनाभ्यां विहीनस्य दर्पणः किं करिष्यति ॥ ५३ ॥**

ज्यास स्वतःची बुद्धि नाहीं, त्यास उपदेश काय करूं शकणार ? कारण नेत्ररहित मनुष्यास आरसा काय कामाचा ? ॥ ५३ ॥

पुनः भर्तृहरीनें सांगितलें आहे कीं,

**अज्ञः सुखमाराध्यः सुखतरमाराध्यते विशेषज्ञः ।**
**ज्ञानलवदुर्विदग्धं ब्रह्मापि नरं न रञ्जयति ॥ ५४ ॥**

साफ अज्ञानी मनुष्य सरळ रीतीनें समजविण्यास योग्य आहे, तसा विशेष जाणणाराहि अधिक सरळपणानें समजविणें शक्य आहे; परंतु ज्ञानाच्या लेशमात्रानें स्वतःस पंडित समजणाऱ्या मनुष्यास साक्षात् प्रजापतीहि समजवूं शकत नाहीं ॥ ५४ ॥

**शक्यो वारयितुं जलेन हुतभुक् छत्रेण सूर्यातपो**
**नागेन्द्रो निशिताङ्कुशेन समदो दण्डेन गोगर्दभौ ।**
**व्याधिर्भेषजसंग्रहैश्च विविधैर्मन्त्रप्रयोगैर्विषं**
**सर्वस्यौषधमस्ति शास्त्रविहितं मूर्खस्य नास्त्यौषधम् ॥५५॥**

अग्नि जलानें, सूर्याचा ताप छत्रीनें, मदोन्मत्त हत्ती तीक्ष्ण अंकुशानें, बैल आणि गाढव काठीनें, रोग विविध प्रकारचीं औषधें सेविल्यानें आणि विष

विचारपूर्वक औषधांच्या प्रयोगानें निवारण करणें शक्य आहे; याप्रमाणें सर्व आपत्तींच्या परिहाराचे उपाय शास्त्रामध्यें सांगितले आहेत, परंतु पंडितंमन्य मूर्खास समजविण्यास उपायच नाहीं ॥ ५५ ॥

पुनः कल्पतरूमध्यें सांगितलें आहे कीं,

**मूर्खस्य पञ्च चिन्हानि गर्वो दुर्वचनं तथा ।**
**क्रोधश्च दृढवादश्च परवाक्येष्वनादरः ॥ ५६ ॥**

गर्व, दुर्भाषण, क्रोध, आग्रह आणि दुसऱ्याच्या वचनाचा अनादर हीं पंडितम्मन्य मूर्खाचीं पांच चिन्हें असतात ॥ ५६ ॥

पुनः एके ठिकाणीं सांगितलें आहे कीं,

**संपूर्णकुम्भो न करोति शब्दमर्धो घटो घोषमुपैति नूनम् ।**
**विद्वान् कुलीनो न करोति गर्वं जल्पन्त्यवाच्यानि गुणैर्विहीनाः ॥५७॥**

संपूर्ण भरलेला कुंभ जसा शब्द करीत नाहीं, परंतु अर्धा असलेलाच शब्द करतो; तसा कुलीन व विद्वान् मनुष्य गर्व करीत नाहीं, परंतु गुणहीन मनुष्यच पुष्कळ वडवड करतात ॥ ५७ ॥

परंतु ते पंडितम्मन्य पुरुष कदाचित् विद्वानांच्या सभेमध्यें जातील तर त्यांस आपली अपूर्णता समजून येईल. भर्तृहरीनें सांगितलें आहे कीं,

**यदा किञ्चिज्ज्ञोऽहं द्विप इव मदान्धः समभवं**
**तदा सर्वज्ञोऽस्मीत्यभवदवलिप्तं मम मनः ।**
**यदा किञ्चित् किञ्चिद्बुधजनसकाशादवगतं**
**तदा मूर्खोऽस्मीति ज्वर इव मदो मे व्यपगतः ॥ ५८ ॥**

ज्या वेळीं मी थोडें जाणत होतों, त्या वेळीं हत्तीसारखा मदांध झालों, सर्वज्ञ आहें असें माझें मन गर्विष्ठ झालें, परंतु ज्या वेळीं मी पंडित लोकांच्या जवळून थोडें थोडें अधिक जाणूं लागलों, त्या वेळीं मी मूर्ख आहें असें मला कळून आलें, आणि ज्वराप्रमाणें माझा मद कमी होत गेला ॥ ५८ ॥

८ वर्षे पुरीं झालीं कीं बालकास विद्याभ्यासामध्यें लावणें योग्य आहे, कारण तितकें वय झालें असतां त्याची स्मरणशक्ति शिकविलेलें धारण

करण्यास समर्थ होते. आणि कोंवळें झाड जसें वळवावें तसें वळतें; पण मोठें होऊन जून झाल्यानंतर वळत नाहीं, तसा तोहि लहानपणीं जसा शिकवावा तसा शिकतो. मोठेपणामध्यें शिकवितां येणें शक्य नाहीं, करितां ८ ते २० वर्षांचा होईतोंपर्यंत त्याचेकडून विद्याभ्यास करवावा, कारण तितका काळ अभ्यास केल्याशिवाय विद्याज्ञान चांगल्या रीतीनें होऊं शकत नाहीं. आश्वलायन गृह्यसूत्राच्या प्रथमाध्यायाच्या २२ व्या कंडिकेंत सांगितलें आहे कीं,

**द्वादश वर्षाणि वेदब्रह्मचर्यम् ॥ ५९ ॥**

विद्याभ्यासाकरितां ब्रह्मचर्यव्रत १२ वर्षांपर्यंत सांगितलें आहे ॥ ५९ ॥

आतां मनुष्याचें आयुष्य १०० वर्षांचें सांगितलें आहे, परंतु तो सर्वज्ञ नसल्यानें अजाणपणें सृष्टिनियमाविरुद्ध रीतीनें वागल्यामुळें लवकर मरण पावतो. तथापि कोणी कोणी १०० वर्षें किंवा त्यांहूनहि किंचित् अधिक काळपर्यंत जगतो. करितां ऋग्वेदाच्या पहिल्या मंडलाच्या ८९ व्या सूक्ताच्या ९ व्या ऋचेंत सांगितलें आहे कीं,

**शतमिन्नु शरदो अन्ति देवाः ॥ ६० ॥**

हे देव हो, मनुष्यांचें आयुष्य तुम्हीं १०० वर्षेंच निर्माण केलें आहे ॥६०॥

ऋग्वेद मंडल ३ सूक्त ३६ ऋचा १० वी मध्यें सांगितलें आहे कीं,

**अस्मे शतं शरदो जीवसे धाः ॥ ६१ ॥**

हे देव हो, आह्मांस जीवंत राहण्यासाठीं १०० वर्षें द्या ॥ ६१ ॥

पुनः ७ व्या मंडलाच्या ६६ व्या सूक्ताच्या १६ व्या ऋचेंत सांगितलें आहे कीं,

**पश्येम शरदः शतं जीवेम शरदः शतम् ॥ ६२ ॥**

आम्ही १०० वर्षें पहावीं आणि जीवंत राहावें ॥ ६२ ॥

तसेंच १० व्या मंडलाच्या १६१ व्या सूक्ताच्या चवथ्या ऋचेंत सांगितलें आहे कीं,

**शतं जीव शरदो वर्धमानः शतं हेमन्ताञ्छतमु वसन्तान् ॥ ६३ ॥**

वृद्धीस पावणारा तूं १०० शरदृऋतु १०० हेमंत ऋतु आणि १०० वसंत ऋतु जीवंत रहा ॥ ६३ ॥

पुनः ऋग्वेदाच्या कौषीतकि ब्राह्मणोपनिषदाच्या दुसऱ्या अध्यायांत पुत्रास याप्रमाणें आशीर्वाद देण्याकरितां मंत्र सांगितला आहे कीं,

**अङ्गादङ्गात्संभवसि हृदयादधिजायसे ।**
**आत्मा वै पुत्रनामासि स जीव शरदः शतम् ॥ ६४ ॥**

हे पुत्रा, तूं माझ्या प्रत्येक अवयवापासून व हृदयापासून उत्पन्न झाला आहेस, करितां पुत्रनामानें माझेंच स्वरूप आहेस, तो तूं १०० वर्षें जीवंत रहा ॥ ६४ ॥

सृष्टीमध्यें असा कोणताहि पदार्थ नाहीं कीं, ज्याची वृद्धि व क्षय होत नसतील, हा नियम कोणास अल्प कालानें तर कोणास बहुत कालानें पण प्राप्त होतो. ज्यास बहुत कालानें प्राप्त होतो, तो पदार्थ अनादिसारखा भासतो, परंतु तसें नाहीं. स्थावरजंगमात्मक सर्व जिवंत प्राण्यांचीं शरीरें वेगवेगळ्या वेळीं वृद्धि आणि क्षय पावलेलीं पाहण्यांत येतात; यावरून असें अनुमान होतें कीं, प्रत्येक जातीच्या प्राण्यांचीं शरीरें जिवंत राहण्यासाठीं ठराविक अवधि निर्माण झालेला आहे, त्यास आयुष्य म्हणतात. शुक्रनीतीच्या चवथ्या अध्यायाच्या ७ व्या प्रकरणांत सांगितलें आहे कीं,

**शतमायुर्मनुष्याणां गजानां परमं स्मृतम् ।**
**मनुष्यगजयोर्बाल्यं यावद्विंशतिवत्सरम् ॥ ६५ ॥**

मनुष्य आणि हत्ती यांचें आयुष्य १०० वर्षांचें सांगितलें आहे. आणि त्यांची बाल्यावस्था २० वर्षांपर्यंत असते ॥ ६५ ॥

**नृणां हि मध्यमं यावत् षष्टिवर्षं वयः स्मृतम् ।**
**अशीतिवत्सरं यावद्गजस्य मध्यमं वयः ॥ ६६ ॥**

मनुष्याची मध्यम अवस्था ६० वर्षांची आणि हत्तीची ८० वर्षांपर्यंत सांगितली आहे ॥ ६६ ॥

**चतुस्त्रिंशत्तु वर्षाणामश्वस्यायुः परं स्मृतम् ।**
**पंचविंशतिर्वर्षं हि परमायुर्वृषोष्ट्रयोः ॥ ६७ ॥**

घोड्याचें आयुष्य ३४ वर्षांचें आणि बैलाचें व उंटाचें जास्तींत जास्त २५ वर्षें सांगितलें आहे ॥ ६७ ॥

**बाल्यमश्ववृषोष्ट्राणां पञ्चमं वत्सरं स्मृतम् ।**
**मध्यं यावत्षोडशाब्दं वार्द्धक्यं तु ततः परम् ॥ ६८ ॥**

घोडा, बैल व उंट यांची ५ वर्षेंपर्यंत बाल्यावस्था, १६ वर्षेंपर्यंत मध्यमावस्था आणि त्यानंतर वृद्धावस्था सांगितली आहे ॥ ६८ ॥

मनुष्यशरीरास कांहीं विघ्न न येईल तर वृद्धीचा नियम ४० ते ५० वर्षांपर्यंत आणि त्यानंतर ५० वर्षेंपर्यंत क्षयाचा नियम लागू पडतो, त्यावरून त्याचें आयुष्य १०० वर्षांचें निर्माण झालेलें भासतें. तें संपूर्ण रीतीनें भोगणें शक्य व्हावें एतदर्थ प्राचीन आर्यांनीं त्याचा चवथा भाग अर्थात् २५ वर्षेंपर्यंत ब्रह्मचर्यव्रत पाळण्याविषयींची आज्ञा केलेली आहे. कदाचित् जसें चांगल्या रीतीनें पोषण करून मोठें केलेलें झाड व पुष्कळ वर्षें सांभाळपूर्वक पोषण करून ब्रह्मचर्य पाळविलेले पशु अंगानें बळकट झाल्यामुळें आपापलें निर्माण झालेलें आयुष्य कांहीं विघ्न न येईल तर संपूर्ण रीतीनें भोगूं शकतात, तसा पूर्वावस्थेमध्यें सरळरीतीनें सांचवून ब्रह्मचर्य पाळविलेला मनुष्यहि अंगानें बळकट झाल्यानें आपलें १०० वर्षांचें आयुष्य बहुतकरून कांहीं विघ्न न येईल तर पूर्णपणानें भोगूं शकतो. पुनः जर पाया भक्कम बांधला असेल तर तो पुष्कळ काळपर्यंत कांहीं विघ्न न आल्यास इमारत टिकवून धरतो, तशीं जर पहिल्या अवस्थेमध्यें शरीराचीं गात्रें नियमानें सुदृढ केलीं असतील, तर तीं शरीरास कांहीं विघ्न न आल्यास पुष्कळ काळपर्यंत वांचवूं शकतात. करितां २५ वर्षेंपर्यंत ब्रह्मचर्य पाळून शरीर सुदृढ करावें, आणि त्या काळांत विद्याभ्यास करून घ्यावा. कारण शुक्रनीतीच्या चवथ्या अध्यायाच्या चवथ्या प्रकरणामध्यें सांगितलें आहे कीं,

**विद्यार्थं ब्रह्मचारी स्यात् सर्वेषां पालने गृही ॥ ६९ ॥**

विद्या शिकण्यासाठीं ब्रह्मचारी आणि सर्वांचें पालन करण्यासाठीं गृहस्थ व्हावें ॥ ६९ ॥

आतां विद्यार्थ्यास ब्रह्मचर्य पाळविण्याकरितां आणि विद्याभ्यासांत तत्पर ठेवण्याकरितां आर्यशास्त्रामध्यें कित्येक नियम पाळण्याची आज्ञा केली आहे. आश्वलायन गृह्यसूत्राच्या प्रथमाध्यायाच्या २२ व्या कंडिकेंत सांगितलें आहे कीं,

**दिवा मा स्वाप्सीराचार्याधीनो वेदमधीष्वेति ॥ ७० ॥**

दिवसा झोपूं नको, विद्यागुरूच्या स्वाधीन राहून विद्याभ्यास कर ॥ ७० ॥

तसेंच आपस्तंबधर्मसूत्राच्या प्रथम प्रश्नाच्या पहिल्या पटलांत सांगितलें आहे कीं,

**हितकारी गुरोरप्रतिलोमयन् वाचा । उत्सन्नश्लाघः ।**
**अनृत्तदर्शी । अजनवादशीलः । रहःशीलः । स्त्रीभिर्या-**
**वदर्थं संभाषी । मृदुः । शान्तः । दान्तः । ह्रीमान् ।**
**दृढधृतिः । अग्लास्नुः । अक्रोधनः । अनसूयुः ॥ ७१ ॥**

विद्यार्थ्यानें वाणीनें समोर न बोलतां विद्यागुरूच्या हिताविषयीं तत्पर रहावें, आत्मश्लाघा करूं नये, विशेषेंकरून नाच रंग पाहूं नयेत, लोकांशीं वाद करूं नये, पाठ करतेवेळीं एकांतीं बसावें, स्त्रियांशीं कार्यपरत्वें बोलावें, कठोर बोलूं नये, शांत रहावें, इंद्रियें नियमामध्यें ठेवावीं, वडील माणसांची मर्यादा ठेवावी, बळकट धैर्य धरावें, दीन होऊं नये, क्रोध करूं नये, आणि कोणाची निंदा करूं नये ॥ ७१ ॥

पुनः मनुस्मृतीच्या दुसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**वर्जयेन्मधु मांसं च गन्धं माल्यं रसान् स्त्रियः ।**
**शुक्तानि यानि सर्वाणि प्राणिनां चैव हिंसनम् ॥ ७२ ॥**

विद्यार्थ्यानें मदिरा, मांस, गंध, पुष्पमाला, नानाप्रकारचे रस, स्त्रिया, शोधलेले सर्व मादक पदार्थ, प्राण्यांची हिंसा—॥ ७२ ॥

द्यूतं च जनवादं च परिवादं तथाऽनृतम् ।
स्त्रीणां च प्रेक्षणालम्भमुपघातं परस्य च ॥ ७३ ॥

जुगार, लोकांशीं वाद, निंदा, असत्य, दुष्ट भावनेनें स्त्रियांचें दर्शन व आलिंगन आणि दुसऱ्याचें नुकसान करणें इतक्या गोष्टी टांकाव्या ॥ ७३ ॥

शरीरं चैव वाचं च बुद्धीन्द्रियमनांसि च ।
नियम्य प्राञ्जलिस्तिष्ठेद्वीक्षमाणो गुरोर्मुखम् ॥ ७४ ॥

पुनः शरीर, वाणी, बुद्धि, इंद्रियें आणि मन यांस नियमामध्यें ठेवून हात जोडून गुरूच्या मुखाकडे पाहत उभें रहावें ॥ ७४ ॥

नित्यमुद्धृतपाणिः स्यात्साध्वाचारः सुसंयतः ।
आस्यतामिति चोक्तः सन्नासीताभिमुखं गुरोः ॥ ७५ ॥

याप्रमाणें शिष्यानें सदाचारसंपन्न व जितेंद्रिय होऊन नित्य हात जोडून उभें रहावें, आणि ज्या वेळीं गुरु बसण्यास सांगेल, त्या वेळीं त्याच्या संमुख बसावें ॥ ७५ ॥

नीचमेवासनं चास्य सर्वदा गुरुसन्निधौ ।
गुरोस्तु चक्षुर्विषये न यथेष्टासनो भवेत् ॥ ७६ ॥

परंतु गुरूच्या जवळ याचें आसन नेहमीं खालीं असलें पाहिजे, आणि यानें गुरु पाहत असतां मर्यादा सोडून बसूं नये ॥ ७६ ॥

नोदाहरेदस्य नाम परोक्षमपि केवलम् ।
न चैवास्यानुकुर्वीत गतिभाषितचेष्टितम् ॥ ७७ ॥

पुनः गुरूच्या गैरहजिरींतहि त्याचें केवळ नांव उच्चारूं नये, तर मानपूर्वक उच्चारावें, आणि त्याच्या गतीचें भाषणाचें व आचरणाचें अनुकरण करूं नये ॥ ७७ ॥

य आवृणोत्यवितथं ब्राह्मणः श्रवणावुभौ ।
स माता स पिता ज्ञेयस्त न द्रुह्येत् कदा च न ॥ ७८ ॥

कारण जो विद्वान् सद्विद्येच्या घोषानें दोन्ही कान पूर्ण करतो, त्यास आईबापांसमान समजावा, आणि त्याचा कधींहि द्रोह करूं नये ॥ ७८ ॥

अज्ञो भवति वै बालः पिता भवति मन्त्रदः ।
अज्ञं हि बालमित्याहुः पितेत्येव तु मन्त्रदम् ॥ ७९ ॥

अज्ञानी बालक आणि ज्ञान देणारा पिता ह्मटला जातो, कारण ऋषी पूर्वी अज्ञान्यास बालक व ज्ञानदात्यास पिताच ह्मणत होते ॥ ७९ ॥

पुनः चाणक्यनीतींतहि सांगितलें आहे कीं,

कामं क्रोधं तथा लोभं स्वादुशृङ्गारकौतुकम् ।
आलस्यमतिनिद्रां च विद्यार्थी ह्यष्ट वर्जयेत् ॥ ८० ॥

विद्यार्थ्यानें नानाप्रकारची इच्छा, क्रोध, लोभ, स्वाद, शृंगार, नाच–तमाशा, आळस आणि अतिनिद्रा या ८ दोषांचा त्याग करावा ॥ ८० ॥

या प्रकारचे नियम पाळिल्यानें विद्यार्थी दुर्गुणांपासून दूर राहून ब्रह्मचर्य पाळून विद्या शिकूं शकतो, करितां हे नियम पाळण्यामध्यें कोणत्याहि विद्यार्थ्यानें अनादर करूं नये. कदाचित् अनादर करील तर त्याच्या आई बाप वगैरे वडील मंडळींनीं समजावून, धाक दाखवून ते त्याचेकडून पाळवावे. आणि कोणत्याहि प्रकारें तो कुसंगतीमध्यें पडून शरीरास खराब करीत असेल तर सावध रहावें, त्याच्यावर पुत्राप्रमाणें स्नेह ठेवून त्यास विद्याभ्यासाविषयीं अभिरुचि उत्पन्न होईल अशी, शिष्यांमध्यें त्यांतल्यात्यांत चढाओढ उत्पन्न करणें, आणि परीक्षेमध्यें विद्याभ्यासांत जो हुषार ठरेल त्यास वर चढविणें, वगैरे युक्तीनें शिकवावा; परंतु कधीं क्रूरता करूं नये. मनुस्मृतीच्या दुसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

अहिंसयैव शिष्याणां कार्यं श्रेयोऽनुशासनम् ।
वाक्चैव मधुरा श्लक्ष्णा प्रयोज्या धर्ममिच्छता ॥ ८१ ॥

धर्मेच्छु विद्यागुरूनें शिष्यांस मारल्याशिवाय चांगल्या रीतीनें शिक्षण द्यावें व वाणीहि आस्ते आणि मधुर बोलावी ॥ ८१ ॥

आतां चांगल्या जातीपासून विद्या शिकावी असा कांहीं नियम ठेवूं नये; कारण त्या जातींत कदाचित् विद्या थोडी असेल तर विशेष विद्येची प्राप्ति

होणार नाहीं, करितां सर्वांजवळून विद्या शिकून घ्यावी. मानवधर्मशास्त्राच्या दुसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

श्रद्दधानः शुभां विद्यामाददीतावरादपि ।
अन्त्यादपि परं धर्मं स्त्रीरत्नं दुष्कुलादपि ॥ ८२ ॥

श्रद्धा असलेल्या पुरुषानें नीचापासूनहि चांगली विद्या, चांडाळापासूनहि उत्तम धर्म, आणि हलक्या कुळांतून देखील उत्कृष्ट कन्या असेल तर ग्रहण करावी ॥ ८२ ॥

विषादप्यमृतं ग्राह्यं बालादपि सुभाषितम् ।
अमित्रादपि सद्वृत्तममेध्यादपि काञ्चनम् ॥ ८३ ॥

विषांतूनहि अमृत, बालकापासूनहि चांगली वाणी, शत्रूपासूनहि सदाचार आणि अपवित्र वस्तूपासूनहि सुवर्ण, असेल तर ग्रहण करावें ॥ ८३ ॥

स्त्रियो रत्नान्यथो विद्या धर्मः शौचं सुभाषितम् ।
विविधानि च शिल्पानि समादेयानि सर्वतः ॥ ८४ ॥

स्त्रिया, रत्नें, विद्या, धर्म, पवित्रता, सुंदर वचन आणि अनेक प्रकारच्या कला सर्वांजवळून ग्रहण कराव्या ॥ ८४ ॥

पुनः शुक्रनीतीच्या चवथ्या अध्यायांतील तिसऱ्या प्रकरणांत सांगितलें आहे कीं,

योऽधीतविद्यः सकलः स सर्वेषां गुरुर्भवेत् ।
नच जात्याऽनधीतो हि गुरुर्भवितुमर्हति ॥ ८५ ॥

जो विद्या शिकलेला आणि कलांमध्यें कुशल असेल तो सर्वांचा गुरु होऊं शकतो; परंतु शिकल्यावांचून केवळ जातीनें गुरु होण्यास योग्य नाहीं ॥ ८५ ॥

अशा एक किंवा अनेक विद्वान् गुरूंपासून पाठशाळेमध्यें किंवा खासगी रीतीनें विद्या ग्रहण करावी, परंतु अर्थासहित ग्रहण करावी, केवळ तोंडपाठ करीत शिकूं नये, कारण अर्थ समजल्यावांचून विद्या शिकल्यानें कांहीं लाभ होत नाहीं. यास्कमुनीनेंहि निरुक्तामध्यें सांगितलें आहे कीं,

**स्थाणुरयं भारहारः किलाभूदधीत्य वेदं न विजानाति योऽर्थम् ।**
**योऽर्थज्ञ इत्सकलं भद्रमश्नुते नाकमेति ज्ञानविधूतपाप्मा ॥ ८६ ॥**

जो विद्याभ्यास करून त्याचा अर्थ जाणत नाहीं, तो हा व्यर्थ भार वाहणारा खांबासारखा आहे, जो अर्थ जाणणारा असेल, तो ज्ञानेंकरून निर्धूतपाप होऊन उत्तम लोकास पावून समग्र सुख भोगितो ॥ ८६ ॥

तसेंच वैद्यशास्त्राच्या सुश्रुत ग्रंथाच्या सूत्रस्थानांतील चवथ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**यथा खरश्चन्दनभारवाही भारस्य वेत्ता नतु चन्दनस्य ।**
**एवं हि शास्त्राणि बहून्यधीत्य चार्थेषु मूढाः खरवद्वहन्ति ॥ ८७ ॥**

जसा चंदनाच्या काष्ठांचें ओझें वाहणारा गाढव भारास जाणतो, परंतु चंदनास जाणत नाहीं, तसे जे पुष्कळ शास्त्र शिकून अर्थाविषयीं मूढ असतील, ते गाढवांप्रमाणें केवळ शव्दांचें ओझें वाहतात ॥ ८७ ॥

आतां आर्यांनीं अवश्य कोणची कोणची भाषा शिकावी त्याविषयीं विचार करूंया. सुमारें ५००० वर्षांच्या पूर्वीं या भरतखंडामध्यें सर्व व्यवहार संस्कृत भाषेंत चालत होता. सर्व आर्य लोक संस्कृत बोलत व संस्कृत लिहीत असत, कारण ही त्यांची स्वतःची भाषा होती. पुनः राज्यहि त्यांचें स्वतःचें असल्यानें त्यांचा सर्व व्यवहारहि याच भाषेमध्यें चालत असे. त्यांच्या सर्व विद्यांचे ग्रंथहि याच वाणीमध्यें रचले गेले; ह्मणजे त्यांस एकच भाषा शिकावी लागत असे, आणि ते येथपर्यंत शिकून विद्वान् होत कीं, त्यांस पद्यमयच रचना आवडत होती, गद्य तर त्यांच्या गणनेंतहि नव्हतें; यासाठींच त्या काळच्या विद्वानांनीं बहुतकरून त्यांच्या सर्व विद्यांचे ग्रंथ पद्यांमध्येंच रचले आहेत. पुनः त्या वेळीं आर्य लोक भरभराटीच्या नियमामध्यें असल्यामुळें चांगले समजदार होते, त्यामुळें सर्व प्रजेस सामान्य लाभ व सामान्य हानि कशापासून होईल, तें चांगल्या रीतीनें जाणत होते. करितां ज्यापासून सामान्य लाभ होईल अशीं कार्यें ते उत्साहानें सिद्ध करीत होते, परंतु जर सामान्य हानिकारक कार्य प्राप्त होईल, तर त्याच्या समोर एक संप करून

तें कार्य सिद्धीस जाऊं देत नसत. याप्रमाणें ऐक्यानें व कलाकौशल्यामध्यें अतिनिपुण असल्यानें आर्य लोक त्या वेळच्या भूमंडळांतील सर्व लोकांहून विशेष बलवान्, चतुर, सुधारलेले व चांगली राज्यव्यवस्था ठेवणारे होते. त्यामुळें कोणाहि परक्या देशाच्या माणसास आपल्यावर चढूं देत नव्हते, तर उलट त्याच्यावर आपली सत्ता बसवत होते, आणि त्यांच्या देशांमध्यें आपला माल खपवून चांगला फायदा मिळवत होते. त्यामुळें स्वतः सुखी होऊन या भरतखंडास इतका समृद्ध केला होता कीं, त्याची ख्याती सर्व भूमंडलामध्यें झाली होती, ती अद्यापि कायम आहे. हें त्यांच्या ऐक्याचें फळ होय, कारण श्रीमहाभारताच्या उद्योगपर्वाच्या ३६ व्या अध्यायांत विदुरानें धृतराष्ट्रास सांगितलें आहे कीं,

**अथ ये सहिता वृक्षाः सर्वतः सुप्रतिष्ठिताः ।**
**ते हि शीघ्रतमान् वातान् सहन्तेऽन्योन्यसंश्रयात् ॥ ८८ ॥**

जे वृक्ष जवळ जवळ असलेले आणि चाऱ्ही बाजूंनीं चांगल्या प्रकारें दृढ झाले असतील, ते एकमेकांच्या आश्रयास असल्याकारणानें जोराचा वायु सहन करितात ॥ ८८ ॥

याप्रमाणें आर्य लोक प्राचीन काळापासून सुख भोगत होते, परंतु सुख नेहमीं राहत नाहीं. कारण जसा वृद्धीनंतर क्षय आणि उदयानंतर अस्त होण्याचा नियम आहे तसाच उन्नतीनंतर अवनति येण्याचाहि नियम आहे. उत्कर्षाच्या वेळीं सर्व अनुकूल व बुद्धि चांगली असल्यानें सुखाची प्राप्ति होते; परंतु अपकर्षाच्या काळांत सर्व प्रतिकूल आणि बुद्धि वाईट झाल्यानें दुःखाची प्राप्ति होते. श्रीमहाभारतांतर्गत सभापर्वाच्या ७६ व्या अध्यायांत वैशंपायनानें जनमेजय राजास सांगितलें आहे कीं,

**असंभवे हेममयस्य जन्तोस्तथापि रामो लुलुभे मृगाय ।**
**प्रायः समापन्नपराभवाणां धियो विपर्यस्ततरा भवन्ति ॥ ८९ ॥**

सृष्टीमध्यें सुवर्णमय प्राण्याचा संभव नसतांहिं राम मृगास सुवर्णमय मानून त्याविषयीं लुब्ध झाला; कारण बहुतकरून विपत्काल ज्यांच्याजवळ आला आहे अशा पुरुषांची बुद्धि विपरीत होऊन जाते ॥ ८९ ॥

याच अभिप्रायाचें वाक्य चाणक्यनीतींतहि याप्रमाणें आलें आहे:—

**न निर्मितः केन न दृष्टपूर्वो न श्रूयते हेममयः कुरङ्गः ।**
**तथापि तृष्णा रघुनन्दनस्य विनाशकाले विपरीतबुद्धिः ॥९०॥**

सोन्याचा मृग सृष्टीमध्यें निर्माण झालेला किंवा पूर्वीं कोणीं पाहिलेला नाहीं. तसाच कोठें ऐकूंहि येत नाहीं. तरीहि रामास त्याची इच्छा झाली. कारण विनाशाच्या वेळीं बुद्धि विपरीत होते ॥ ९० ॥

तसेंच पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**पौलस्त्यः कथमन्यदारहरणे दोषं न विज्ञातवान्**
**रामेणापि कथं न हेमहरिणस्यासंभवो लक्षितः ।**
**अक्षैश्चापि युधिष्ठिरेण सहसा प्राप्तो ह्यनर्थः कथं**
**प्रत्यासन्नविपत्तिमूढमनसां प्रायो मतिः क्षीयते ॥ ९१ ॥**

रावणानें परस्त्री हरण करण्यामध्यें दोष कसा जाणला नाहीं ? रामानेंहि सोन्याच्या मृगाचा असंभव मनामध्यें कसा आणला नाहीं ? आणि युधिष्ठिर फाशांच्या द्यूतानें अकस्मात् अनर्थास कसा प्राप्त झाला ? करितां जवळ आलेल्या विपत्तीनें ज्यांचें मन मूढ झालें अशा मनुष्यांची बुद्धि बहुतकरून क्षीण होते ॥ ९१ ॥

तसेच आर्यलोकहि अतिसमृद्ध होऊन गेल्यामुळें " आमच्यासारखे कोण आहेत " असा मिथ्या अभिमान धारण करून अनेक प्रकारच्या वैभवांमध्यें पडून आळशी होऊं लागले; ही त्यांची प्रथम विपरीत बुद्धि झाली. नंतर आळस असल्याकारणानें लाभदायक कार्याची सिद्धि आणि हानिकारक कार्याची असिद्धि करण्यामध्यें विलंब करूं लागले, त्यामुळें विपत्तीचा नियम त्यांच्यावर लागू पडला. भर्तृहरीनें सांगितलें आहे कीं,

**आलस्यं हि मनुष्याणां शरीरस्थो महारिपुः ।**
**नास्त्युद्यमसमो बन्धुः कृत्वा यं नावसीदति ॥ ९२ ॥**

आलस्य हा मनुष्याच्या शरीरामध्यें राहिलेला मोठा शत्रु आहे, आणि उद्योगासारखा कोणी बंधु नाहीं, कारण तो केल्यामुळें मनुष्य दुःखी होत नाहीं ॥९२॥

नंतर स्वतः खाणें–पिणें व गाणें–वजावणें इत्यादि विषयसुखांमध्यें मग्न राहिल्यानें आपली प्रजा यथायोग्य विद्याभ्यास करीत आहे कीं नाहीं, याचा तपास ठेवण्यामध्यें दुर्लक्ष करूं लागले ह्मणजे त्यांच्या प्रजेमध्यें विद्याभ्यास कमी होत चालला. त्यामुळें संस्कृत भाषा शुद्ध बोलण्यामध्यें व लिहिण्यामध्यें कालेंकरून फरक पडूं लागला, ह्मणजे मूळ शब्दांचे अपभ्रंश होऊन नवीन भाषा व अक्षरांचें वळण बदलतां बदलतां नवीन लिपी उत्पन्न झाल्या. तेव्हांपासून आर्यलोक त्या आपापल्या नव्या भाषा व लिपी शिकूं लागले. परंतु सर्व विद्यांचे ग्रंथ संस्कृत भाषेमध्यें असल्यानें ती शिकल्यावांचून संपूर्ण विद्वान् होतां येत नव्हतें, त्यामुळें कोणी कोणी संस्कृत भाषाहि शिकत होते. याप्रमाणें आर्य लोकांस दोन भाषा व लिपी शिकाव्या लागत होत्या. परंतु त्यांचा पुष्कळ भाग विद्या शिकल्यावांचून राहिल्यानें त्यांची जी सामान्य लाभकारक आणि सामान्य हानिकारक कार्यें जाणण्याची बुद्धि होती, ती कमी होऊं लागली आणि सर्व आपापला स्वार्थ पाहूं लागले. त्यामुळें त्यांच्यामध्यें जें ऐक्य होतें तें तुटून गेलें. ह्मणजे स्वार्थी लोकांनीं संशयात्मक ग्रंथ रचून त्यांनीं त्यांचा मतभेद करून आपापल्या सत्तेखालीं त्यांचे अनेक वर्ग उत्पन्न केले. ते मागाहून मतभेदाच्या कारणास्तव परस्परांमध्यें द्वेष ठेवून कार्यपरत्वें वाढवूं लागले. त्यामुळें आर्य जनतेचें बळ क्षीण होऊन गेलें. ही गोष्ट सुमारें ९०० वर्षांपूर्वीं परदेशी लोकांच्या समजण्यांत आल्यानें त्यांनीं स्थलमार्गानें या भरतखंडावर वारंवार स्वाऱ्या करून आर्यलोकांचें द्रव्य हरण करण्यास सुरवात केली; तेव्हां मतलबी लोकांनीं केवळ आपलाच स्वार्थ साधण्यासाठीं त्यांस रस्ता दाखविला. त्यामुळें “ घरफुटे घरजाय ” या ह्मणीप्रमाणें शेवटीं ते हा खंड जिंकून आर्यांस वश करून येथेंच राहून, आपण राज्य करूं लागले. कारण सभातरंगांत सांगितलें आहे कीं,

**यत्राऽऽत्मीयो जनो नास्ति भेदस्तत्र न विद्यते ।**
**कुठारे दण्डनिर्मुक्ते भिद्यन्ते तरवः कथम् ॥ ९३ ॥**

जेथें आपल्यापैकीं लोक परक्यांशीं मिळून जात नाहींत, तेथें परक्यांकडून आपलें नुकसान होत नाहीं; कारण लांकडाचा दांडा मिळाल्यावांचून एकट्या कुऱ्हाडीनें वृक्ष कसे कापले जातील ? ॥ ९३ ॥

पुनः सांगितलें आहे कीं,

कुठारमालिकां दृष्ट्वा कम्पिताः सकला द्रुमाः ।
वृद्धस्तरुरुवाचेदं स्वजातिर्नैव दृश्यते ॥ ९४ ॥

दोरामध्यें ओंविलेल्या कुऱ्हाडींची मालिका पाहून सर्व वृक्ष थरथर कांपूं लागले; त्यावेळीं एक म्हातारा वृक्ष ह्मणाला कीं, बंधुहो, तुम्हीं भिऊं नका, अद्यापि त्यांमध्यें आमची जात मिळालेली दिसत नाहीं ॥ ९४ ॥

नंतर त्यांनीं सर्व राज्यासंबंधीं व्यवहारामध्यें आपली भाषा व लिपि दाखल करून आर्यलोकांस ती शिकविण्याची पद्धत पाडिली. पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

महानप्येकजो वृक्षो बलवान् सुप्रतिष्ठितः ।
प्रसह्य एव वातेन शक्यो धर्षयितुं क्षणात् ॥ ९५ ॥

चांगल्या रीतीनें भूमीमध्यें दृढमूल झालेला, मोठा बलवान् वृक्षहि जर एकटा उभा असेल, तर त्यास तुफानी वायु बलात्कारानें क्षणमात्रांत उपटून टाकण्यास समर्थ होतो ॥ ९५ ॥

एवं मनुष्यमप्येकं शौर्येणापि समन्वितम् ।
शक्यं द्विषन्तो मन्यन्ते हिंसन्ति च ततः परम् ॥ ९६ ॥

याप्रमाणें एकटा मनुष्य शौर्यादि गुणांनीं युक्त जरी असला तथापि त्यास शत्रू पराभव करण्यास शक्य मानतात, आणि नंतर संधि सांपडली असतां मारतात ॥ ९६ ॥

नंतर ते परदेशी लोकहि आर्यलोकांप्रमाणें वैभवांमध्यें पडून आळशी होऊं लागले, त्यामुळें त्यांचीहि उतरती कळा होऊं लागली. तिचा लाभ घेऊन सुमारें २०० वर्षांपूर्वीं या भरत खंडाच्या दक्षिण भागांतील रहिवासी आर्यांनीं त्यांच्या सत्तेचा नाश करण्यास सुरवात केली. ती सुमारें एका शतकामध्यें तर

बहुतकरून समग्र नाश करून आपली सत्ता स्थापिली, परंतु ती चिरकाल राहूं शकली नाहीं. कारण तितक्यांत फूट पाडून त्यांसहि वश केले, त्यामुळें आपापसांत कलह करून ते लगेच दुर्बळ होऊन गेले. त्याचा फायदा घेऊन, त्यावेळीं व्यापारासाठीं आलेल्या दुसऱ्या परदेशी लोकांनीं, त्यांची सत्ता तोडून आपली सत्ता स्थापण्यास प्रारंभ केला. ती येथपर्यंत कीं, आज ते या भरतखंडास भारी होऊन बसले आहेत. अर्थात् चक्रवर्तीपदास पोंचले आहेत. त्यानींहि आपली भाषा व लिपि सर्व राज्यव्यवहारामध्यें दाखल केली आहे. म्हणजे आर्यलोकांस पहिलीच्या ऐवजीं ही दुसऱ्या परदेशांची भाषा व लिपि शिकावी लागते. करितां सर्व आर्यलोकांस पहिली स्वभाषा ह्मणजे आपल्या देशाची भाषा आणि लिपि जरूर जाणली पाहिजे; कारण तिच्यावांचून स्वदेशीयांशीं व्यवहार करण्यामध्यें त्यांस अतिशय अडचण पडते. दुसरी मूळभाषा ह्मणजे जीमधून आपली स्वभाषा उत्पन्न झाली आहे, अशी संस्कृत भाषाहि अवश्य जाणली पाहिजे. कारण प्राचीन आर्यांच्या सर्व विद्यांचे ग्रंथ त्या भाषेमध्यें आहेत, शिवाय ती मूळभाषा जाणल्यानें तींतून उत्पन्न झालेल्या आपल्या भाषेसारख्या दुसऱ्या भाषाहि सहजगत्या समजूं शकतात. तिसरी राजकीय भाषा ह्मणजे ज्यांचें राज्य असेल त्यांची भाषाहि जरूर शिकली पाहिजे, कारण तिच्यावांचून त्यांच्याशीं व्यवहार करण्यामध्यें अतिशय अवघडपणा होतो. कोणतीहि भाषा शिकत असतां तिच्याबरोबर त्या भाषेचें व्याकरण आणि कोश अवश्य शिकावा, कारण त्यावांचून त्या भाषेचें शुद्ध आणि संपूर्ण अर्थासह ज्ञान होत नाहीं. कारण सांगितलें आहे कीं,

यद्यपि बहु नाधीतं तथापि पठ पुत्र व्याकरणम् ।
स्वजनः श्वजनो मा भूत्सकलं शकलं सकृच्छकृत् ॥ ९७ ॥

हे पुत्रा, जरी तूं पुष्कळ शिकला नसलास तरी पण व्याकरण शिक, त्यावांचून स्वजन ह्मणजे आपले जन या ठिकाणीं श्वजन म्हणजे कुतऱ्यांचा जन, सकल ह्मणजे समग्र या ठिकाणीं शकल म्हणजे तुकडा आणि सकृत् ह्मणजे एकवार याठिकाणीं शकृत् म्हणजे विष्ठा असा अर्थ न होवो ॥ ९७ ॥

**अव्याकरणमधीतं भिन्नद्रोण्या तरङ्गिणीतरणम् ।**
**भेषजमपथ्यसहितं त्रयमिदमकृतं वरं न कृतम् ॥ ९८ ॥**

व्याकरण शिकल्यावांचून अध्ययन, फुटलेल्या होडीमध्यें वसून नदी तरणें आणि पथ्य केल्यावांचून औषध घेणें हीं न केलेलीं वरीं परंतु केलेलीं वरीं नव्हेत ॥ ९८ ॥

**कोशस्येव महीपानां कोशस्य विदुषामपि ।**
**उपयोगो महान् यस्मात्क्लेशस्तेन विना भवेत् ॥ ९९ ॥**

राजास खजिन्याप्रमाणें विद्वानांस कोशाचा म्हणजे शब्दांच्या खजिन्याचा मोठा उपयोग होतो; कारण त्याशिवाय क्लेश होतो ॥ ९९ ॥

आतां भाषा शिकत असतां वरोवर कोणकोणत्या विद्यांचा व कलांचा अभ्यास करावा त्याविषयीं विचार केला तर पत्ता येणार नाहीं; कारण तसें अनुभवांत येतें. तसेंच शुक्रनीतीच्या चवथ्या अध्यायांतील तिसऱ्या प्रकरणामध्यें सांगितलें आहे कीं,

**विद्या ह्यनन्ताश्च कलाः संख्यातुं नैव शक्यते ॥ १०० ॥**

विद्या व कला अनंत आहेत, त्यांची गणना करणें शक्य नाहीं ॥ १०० ॥

**यद्यत्स्याद्वाचिकं सम्यक् कर्म विद्याभिसंज्ञकम् ।**
**शक्तो मूकोऽपि यत्कर्तुं कलासंज्ञं तु तत्स्मृतम् ॥ १०१ ॥**

करितां वाणीनें जें चांगल्या प्रकारें शिकतां येतें ती विद्या, आणि जें मुकाहि करण्यास समर्थ होईल ती कला ह्मटली जाते ॥ १०१ ॥

तथापि विद्वानांनीं त्यांचे येणेंप्रमाणें वर्ग केले आहेत:—

## निर्वाहासाठींच्या विद्या आणि कला.

१ **वैद्यशास्त्रः**—यामध्यें सर्व प्रकारच्या औषधींच्या तत्त्वांचें ज्ञान, औषधींचें स्वरूप, गुणदोष आणि उत्पत्तिस्थान, सर्व प्राण्यांच्या शरीरांचें अंतरंगज्ञान, त्यांस झालेल्या रोगांचें कारण, स्वरूप आणि त्यावर औषधें आणि तीं न लागू पडल्यांस शस्त्रोपचार वगैरे वैद्यकसंबंधीं सर्व विद्या येऊन जाते.

२ **व्यवहारशास्त्रः**—यामध्यें सर्व प्रकारचा व्यवहार चांगल्या रीतीनें चालविण्याकरितां राजानें बांधलेले नियम, अर्थात् कायद्यासंबंधीं सर्व विद्या येऊन जाते.

३ **युद्धशास्त्रः**—यामध्यें सर्व प्रकारचे व्यूह अर्थात् कवाईत करण्याची आणि अनेक प्रकारचीं शस्त्रास्त्रें लक्ष ठेवून वापरण्याची पद्धति इत्यादि युद्धासंबंधीं सर्व विद्या येऊन जाते.

४ **कृषिशास्त्रः**—यामध्यें सर्व प्रकारचीं झाडें चांगल्या प्रकारें पोषण करून त्यांतून चांगलें फळ मिळविण्यासाठीं जमीन कोणकोणत्या रीतीनें तयार करावी, तीमध्यें कस कमी होत असतां कोणत्या जातीच्या झाडांस कोणत्या जातीचें खत फायदेशीर होईल आणि प्रत्येक वर्षी कोणत्या जातीचें बीं लाविल्यानें जमीनीमध्यें पुनः कस येतो, इत्यादि शेतीसंबंधीं सर्व विद्या येऊन जाते.

५ **नौकाशास्त्रः**—यामध्यें पृथ्वीच्या एका ठिकाणापासून नौकेस जलमार्गानें दुसऱ्या स्थानावर बरोबर निर्विघ्नपणें घेऊन जाण्यासंबंधीं सर्व विद्या येऊन जाते.

६ **व्यापारशास्त्रः**—यामध्यें सर्व प्रकारच्या व्यापारामध्यें उपयोगी पडणारें लेखन आणि रीतिभातीसंबंधीं सर्व विद्या येऊन जाते.

७ **शिल्पशास्त्रः**—यामध्यें बंगले, घरें, तलाव, विहिरी, पूल आणि रस्ते वगैरे बांधकाम करण्याची सर्व विद्या येऊन जाते.

८ **कलाशास्त्रः**—यामध्यें कडिया, सुतार, लोहार, सोनार, कांसार, कुंभार, घांची, चांभार, न्हावी, धोबी, रंगारी, शिंपी, कांतणारा, विणणारा, गुंफणारा, भरणारा, जडिया, स्वयंपाकी, चित्रकार, छापणारा, आणि कोतणारा इत्यादि अनेक प्रकारच्या कारागिरांच्या कला, त्या कलांमध्यें आणि सर्व विद्यांमध्यें उपयोगी पडणारीं यंत्रें तयार करण्याच्या कला आणि तीं यंत्रें बनविण्यामध्यें लागणाऱ्या व त्या कलांच्याद्वारें वापरल्या जाणाऱ्या अनेक प्रकारच्या वस्तु, पृथ्वी, जल तेज आणि वायु, यांमधून शोधून काढून प्रसिद्धीमध्यें

आणण्याच्या कला इत्यादि सर्व प्रकारची हुन्नर आणि कला–कौशल्य यांचा समावेश होतो.

---

## निर्वाहाच्या विद्येबरोबर उपयोगी पडणाऱ्या विद्या.

१ **गणितशास्त्रः**—यामध्यें सर्व प्रकारचा हिशोब मोजण्याची विद्या येऊन जाते.

२ **खनिजपदार्थविज्ञानः**—यामध्यें खाणींतून निघणारे धातु, क्षार, तेलें, कोळसे आणि रत्नें वगैरे वस्तूंच्या विवेचनासंबंधीं सर्व विद्या येऊन जाते.

३ **सिद्धपदार्थविज्ञानः**—यामध्यें सृष्टीमध्यें जितकीं मूलतत्वें आहेत तितक्यांचीं नांवें आणि स्वाभाविक धर्म यांविषयीं विवेचनासंबंधीं सर्व विद्या येऊन जाते.

४ **रसायनशास्त्रः**—यामध्यें मूल तत्त्वें एकत्र मिळून अनेक पदार्थ झालेले आहेत, ते आणि पदार्थांचें मिश्रण झाल्यामुळें उत्पन्न झालेल्या अनेक चमत्कार यांसंबंधीं सर्व विद्या येऊन जाते.

५ **भूगोलशास्त्रः**—यामध्यें पृथ्वीचा आकार, तिच्यावर असलेले देश, शहरें, गांव, पर्वत, नद्या, सरोवरें आणि समुद्र वगैरेंचीं स्थानें आणि वर्णनें यांसंबंधीं सर्व विद्या येऊन जाते.

६ **ज्योतिषशास्त्रः**—यामध्यें आकाशांत असलेले सूर्य, चंद्र, ग्रह आणि नक्षत्रें वगैरे गोलांचीं स्वरूपें, महत्त्व, अंतर व गतिसंबंधीं काल समजविणारी सर्व विद्या येऊन जाते.

७ **सामान्य नीतिः**—यामध्यें मनुष्यानें सर्व व्यवहारांत कशा रीतीनें वागावें वगैरे नीतीची सर्व विद्या येऊन जाते.

८ **राजनीतिः**—यामध्यें राजानें प्रजेचें पालन, देशाचें रक्षण, कला-कौशल्य आणि व्यापार यांची वृद्धि, हीं कशीं करावीं, आणि शत्रूस कसा वश करावा वगैरे सर्व विद्या येऊन जाते.

---

## सृष्टिज्ञान मिळवून चतुर होण्याच्या विद्या.

१ **भूगर्भशास्त्रः**—यामध्यें पृथ्वीच्या पोटांत असलेल्या उष्ण प्रवाही रसांवर कालांतरानें अनेक प्रकारचे थर होऊन पृथ्वीचें पृष्ठ हल्लींच्या स्थितीस कसें पोंचलें त्यासंबंधीं सर्व विद्या येऊन जाते.

२ **मनुष्यजातिविचारः**—यामध्यें भूगोलाच्या सर्व भागांमध्यें राहणाऱ्या मनुष्यांचे वेगवेगळे आकार, वर्ण, चेहेरे आणि रीतिभाती जाणण्या-संबंधीं सर्व विद्या येऊन जाते.

३ **पशुजातिविचारः**—यामध्यें भूगोलाच्या सर्व भागांमध्यें राहणाऱ्या अनेक प्रकारच्या पशूंच्या जाती, आकार, वर्ण आणि रीतिभाती जाणण्या-संबंधीं सर्व विद्या येऊन जाते.

४ **पक्षिजातिविचारः**—यामध्यें भूगोलाच्या सर्व भागामध्यें राहणाऱ्या अनेक प्रकारच्या पक्ष्यांच्या जाति, आकार, वर्ण आणि रीतिभाती यासंबंधीं सर्व विद्या येऊन जाते.

५ **कीटपतंगादिजातिविचारः**—यामध्यें भूगोलाच्या सर्व भागांतून राहणारे अनेक प्रकारचे पोटानें सरपटणारे किडे आणि त्यांस पंख फुटून झालेल्या पतंगादि जंतूच्या जाती, वर्ण, आकार, आणि रीतभात जाणण्या-संबंधीं विद्या येऊन जाते.

६ **मत्स्यादिजलचरजातिविचारः**—यामध्यें भूगोलाच्या सर्व भागाच्या १२ अथवा गोड्या पाण्यामध्यें होणाऱ्या अनेक प्रकारच्या मत्स्यादिप्राण्यांच्या जाति, वर्ण, आकार आणि रीतिभाती जाणण्यासंबंधीं सर्व विद्या येऊन जाते.

७ **वनस्पतिजातिविचारः**—यामध्यें पृथ्वीच्या सर्व भागांमध्यें उत्पन्न झालेल्या अनेक प्रकारच्या वृक्षांच्या जाति, वर्ण, आकार आणि रीतिभाति जाणण्यासंबंधीं सर्व विद्या येऊन जाते.

८ **पाषाणजातिविचारः**—यामध्यें भूगोलाच्या सर्व भागांतून निघणाऱ्या पाषाणांच्या जाति, रंग आणि घडण जाणण्यासंबंधीं सर्व विद्या येऊन जाते.

---

**फावल्यावेळीं कालक्रमण करून ज्ञान मिळविण्याच्या विद्या.**

१ **इतिहासः**—यामध्यें होऊन गेलेल्या राजांचा आणि प्रजांचा सर्व वृत्तांत येऊन जातो.

२ **चरित्रलेखनः**—यामध्यें वर्तमानकालीन राजा किंवा प्रजा यांचें चरित्र लिहिण्याची सर्व विद्या येऊन जाते.

३ **रसालंकारशास्त्रः**—यामध्यें ऐकण्यानें रसिकांस गोडी उत्पन्न होईल अशी अलंकारिक भाषा कशी लिहावी, त्यासंबंधीं सर्व विद्या येऊन जाते.

४ **छंदःशास्त्रः**—यामध्यें गद्यात्मक वाक्यांस पद्यात्मक करण्यासंबंधानें सर्व विद्या येऊन जाते.

५ **गानविद्याः**—यामध्यें सर्व प्रकारच्या राग–रागिणी गाण्याची विद्या येऊन जाते.

६ **तर्कविद्याः**—यामध्यें सर्व प्रकारच्या तर्कासंबंधीं विद्या येऊन जाते.

७ **योगविद्याः**—यामध्यें सर्व इंद्रियांस वश करून चित्त स्थिर करण्याची सर्व विद्या येऊन जाते.

८ **ब्रह्मविद्याः**—यामध्यें जगत्, जीव, ईश्वर आणि परमात्मा यांसंबंधीं सर्व विद्या येऊन जाते.

या सर्व विद्यांचा आणि कलांचा संपूर्ण अभ्यास करण्याकरितां शेंकडो वर्षें पाहिजेत, तें मनुष्यशरीरानें होण्यासारखें नाहीं; कारण त्याचें आयुष्य केवळ १०० वर्षांचें आहे. करितां भाषा आणि लिपि शिकून संसारामध्यें जेवढ्यानें आपला निर्वाह चालूं शकेल अशा एका विद्येचा किंवा कलेचा संपूर्ण दृढ अभ्यास करावा. कारण सांगितलें आहे कीं,

**एकापि विद्या गुणवत्तराणां या चित्तमारोहति सैव धन्या ॥१०२॥**

एकहि जी परीक्षकांच्या चित्तामध्यें ठसेल, तीच विद्या धन्य आहे ॥१०२॥

करितां कच्चा अभ्यास करूं नये, कारण कच्च्या अभ्यासानें विद्या किंवा कला ज्यावेळीं पाहिजे त्यावेळीं बरोबर स्मरत नाहीं; त्यामुळें केलेले श्रम फुकट जातात, आणि फिरून पुस्तकांमध्यें पहावें लागतें. परंतु ही पुस्तकी

विद्या कांहीं वेळेवर कामास येत नाहीं. चाणक्यनीतीमध्यें सांगितलें आहे कीं,

**पुस्तकेषु च या विद्या परहस्तेषु यद्धनम् ।**
**उत्पन्नेषु च कार्येषु न सा विद्या न तद्धनम् ॥ १०३ ॥**

पुस्तकीं असलेली विद्या आणि परक्याच्या हातीं असलेलें धन हीं दोन्हीं जरूर पडली असतां उपयोगास येत नाहींत ॥ १०३ ॥

करितां एक विद्या किंवा कला पक्की करून बाकीच्या सर्व विद्यांचें आणि होईल तितक्या कलांचें सामान्य ज्ञान मिळवून सर्व गोष्टींमध्यें चतुर व्हावें. त्यामुळें निर्वाहहि चालेल आणि कोणाकडून फसावयासहि होणार नाहीं. पुनः अवकाशाच्या वेळीं त्या त्या विद्येचे किंवा कलेचे ग्रंथ वाचल्यानें कंटाळाहि येणार नाहीं, आणि कांहीं नवीन शोध हातास लागेल. मनुस्मृतीच्या चवथ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**यथा यथा हि पुरुषः शास्त्रं समधिगच्छति ।**
**तथा तथा विजानाति विज्ञानं चास्य रोचते ॥ १०४ ॥**

जसजसा पुरुष शास्त्राचा विचार करीत जातो, तसतसा ज्ञानवान् होत जातो आणि त्यास विशेष ज्ञान आवडतें ॥ १०४ ॥

परंतु बहुतकरून ग्रंथ दिवसास वाचावे, रात्रीस वाचूं नयेत. कारण दिवा आणि कागद यांच्या उष्णतेनें रात्रीस डोळ्यांस इजा होते; आणि ते खेंचावे लागतात, त्यामुळें त्यांच्या कनीनिकांचें पाणी कमी होऊन पाहण्याची शक्ति मंद होते, ह्मणजे उपनेत्र अर्थात् चष्मा धारण करण्याची जरूर पडते. सर्व विद्या किंवा कला संपूर्णपणें शिकणें शक्य नाहीं, करितां चाणक्यनीतीमध्यें सांगितलें आहे कीं,

**अनन्तशास्त्रं बहुलाश्च विद्या ह्यल्पश्च कालो बहुविघ्नता च ।**
**यत्सारभूतं तदुपासनीयं हंसैर्यथा क्षीरमिवाम्बुमध्यात् ॥ १०५ ॥**

शास्त्र अनंत आहे आणि विद्या अनेक आहेत, आयुष्य थोडें आहे आणि त्यामध्यें विघ्नें पुष्कळ आहेत. करितां जसे हंसपक्षी दूधमिश्रित पाण्यांतून दुधाचें ग्रहण करितात, तसें त्या सर्वांतून सार ग्रहण करावें ॥ १०५ ॥

आतां जसें भविष्यकालीं सुखी होण्याकरितां पहिल्या अवस्थेमध्यें ब्रह्मचर्य पाळून विद्याभ्यास करून मनास सुसंस्कृत करण्याची जरूर आहे, तशीच शरीरासहि व्यायामानें सुधारण्याची अतिशय आवश्यकता भासते. कारण केवळ मनाचें शिक्षण घेतलें असतां मनास अतिशय परिश्रम पडल्यानें तें थकून जाऊन दुर्बळ होतें, त्याचा परिणाम शरीरावर होतो; त्यामुळें बरोबर आरोग्य राहत नाहीं. पुनः एकाच विषयापासून कंटाळा येणें स्वाभाविक आहे, करितां दिवसाच्या ठराविक वेळापर्यंत विद्याभ्यास करून मनास आणि व्यायाम करून शरीरास सुधरावें. योग्य प्रकारच्या विद्याभ्यासानें जसें मन सुधरतें, तसें शरीरहि योग्य व्यायामानें सुधरतें. मनाचा परिणाम शरीरावर आणि शरीराचा परिणाम मनावर होत असलेला दिसतो. कारण मन प्रसन्न असल्यास शरीर निरोगी असतें, आणि शरीर निरोगी असल्यानें मन प्रसन्न राहतें. परंतु मन जर चिंतातुर असेल तर शरीर बिघडतें, आणि शरीर बिघडलें असल्यास मनास सुख असत नाहीं. श्रीमहाभारताच्या शांतिपर्वांतील राजधर्माच्या १६ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**शारीराज्जायते व्याधिर्मानसो नात्र संशयः ।**
**मानसाज्जायते चापि शारीर इति निश्चयः ॥ १०६ ॥**

शरीरास व्याधि झाल्यानें मनास व्याधि होते, यांत संशय नाहीं; आणि मनास व्याधि झाल्यानें शरीरास व्याधि होते, असा निश्चय जाणावा ॥१०६॥

याप्रमाणें शरीर आणि मन या दोहोंचा परस्पर संबंध आहे, यासाठीं दोन्ही चांगल्या स्थितीमध्यें राहतील त्याप्रमाणें वागावें. त्यामुळें दीर्घ आयुष्य भोगणें शक्य होईल. शरीर सुधारण्याविषयीं व त्यापासून होणाऱ्या फायद्याविषयीं आयुर्वेदाच्या चरकसंहितेंतील ७ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**शरीरचेष्टा या चेष्टा स्थैर्यार्था बलवर्द्धिनी ।**
**देहव्यायामसंख्याता मात्रया तां समाचरेत् ॥ १०७ ॥**

शरीराची जी चेष्टा हित करणारी, दृढता देणारी, आणि बल वाढविणारी असेल ती शरीराच्या व्यायामामध्यें गणिली आहे; करितां ती थोडी थोडी करावी ॥१०७॥

**लाघवं कर्मसामर्थ्यं स्थैर्यं क्लेशसहिष्णुता ।**
**दोषक्षयोऽग्निवृद्धिश्च व्यायामादुपजायते ॥ १०८ ॥**

कारण व्यायामामुळें शरीरामध्यें चपलता, काम करण्याचें सामर्थ्य, दृढता, क्लेश सहन करण्याची शक्ति, वातादि दोषांचा क्षय आणि जठराग्नीची वृद्धि होते ॥ १०८ ॥

**श्रमः क्लमः क्षयस्तृष्णा रक्तपित्तं प्रतामकः ।**
**अतिव्यायामतः कासो ज्वरश्छर्दिश्च जायते ॥ १०९ ॥**

परंतु अतिशय व्यायाम केल्यानें थकवा, ग्लानि क्षयरोग, तृष्णा, रक्तपित्त-रोग, प्रतामक नांवाचा श्वास, खोकला, ज्वर आणि वांति होते ॥ १०९ ॥

यावरून असेंहि समजावें कीं, जर अति व्यायामानें शरीरामध्यें इतके दोष उत्पन्न होतात, तर इतक्यांपैकीं कोणताहि दोष जर शरीरामध्यें असेल तर व्यायाम करूं नये. पुनः शरीर कसदार होईल त्या प्रकारच्या स्थला-वरच्या आणि पोहणें वगैरे जलावरच्या अनेक क्रीडाहि शिकाव्या; कारण त्यामुळें शरीर सुधरतें; तसेंच मन कसदार होईल त्या प्रकारच्या बुद्धिबळ वगैरे खेळांचा अभ्यास करावा, कारण तेहि विचारशक्तीस वाढवितात. आतां पुरुषजातीप्रमाणें स्त्रीजातीनेंहि भविष्यकालीं सुखी होण्याकरितां आपल्या पहिल्या अवस्थेमध्यें ब्रह्मचर्य पाळून शारीरिक व मानसिक शिक्षण घेण्याची जरूर आहे, करितां आईबाप वगैरे वडील माणसांनीं मुलाप्रमाणें मुलीसहि हीं दोन्ही शिक्षणें द्यावीं. मुलाकडून जसा पुरुषगुरूच्या द्वारा २० वर्षांच्या वयापर्यंत विद्याभ्यास करवावयाचा, तसाच मुलीकडून स्त्रीगुरूच्या द्वारा १३ वर्षांच्या वयापर्यंत विद्याभ्यास करवावा, कारण जरी सामान्य रीतीनें आयुष्य सर्वांचें सारखेंच सांगितलें आहे, तथापि पुरुषाहून स्त्री वयांत लवकर येते. वैद्यशास्त्राच्या सुश्रुत ग्रंथांतील सूत्रस्थानाच्या ३५ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**पञ्चविंशे ततो वर्षे पुमान्नारी तु षोडशे ।**
**समत्वागतवीर्यौ तौ जानीयात् कुशलो भिषक् ॥ ११० ॥**

जन्मापासून २५ व्या वर्षी पुरुष आणि १६ व्या वर्षी स्त्री दोन्ही समान वीर्यास प्राप्त होतात असें कुशल वैद्यानें जाणावें ॥ ११० ॥

करितां मुलास जसा ८ वर्षे पुरीं होतांच अभ्यास सुरू करतात, तसाच मुलीस ५ वर्षे पुरी होतांच विद्याभ्यास सुरू करावा. तीस १३ वर्षे अर्थात् रजोदर्शन होईतोंपर्यंत लिपि आणि भाषा शिकवून स्त्रियांच्या उपयोगीं येईल अशी विद्या आणि शिवणें, भरणें वगैरेच्या कला चांगल्या रीतीनें शिकवाव्या, आणि बाकीच्या सर्व विद्यांचें शक्य तितकें सामान्य ज्ञान देऊन मानसिक, आणि शरीर कसदार होईल त्या रीतीचें शारीरिक शिक्षण द्यावें. त्यामुळें ती सर्व गोष्टींमध्यें हुषार होऊन भविष्यकाळीं सुखी होईल. पुनः तिच्याकडूनहि ब्रह्मचर्य पाळून विद्या शिकणें शक्य होण्यासाठीं पुरुष–विद्यार्थ्यास जे नियम पाळण्यास सांगितले आहेत, ते अवश्य पाळवावे. अंतर मात्र एवढेंच कीं, जेथें या नियमामध्यें पुरुष सांगितला आहे तेथें स्त्री आणि जेथें स्त्री सांगितली आहे तेथें पुरुष समजावा. याप्रमाणें प्रथम अवस्थेमध्यें ब्रह्मचर्य पाळून सर्व स्त्री–पुरुषांनीं विद्याभ्यासानें मनास आणि व्यायामानें शरीरास सुधरावें, त्यामुळें भविष्यकाळीं सुखी होतां येईल. याकरितां आचार्यानें शिष्यास विद्याभ्यासांत प्रमाद न करण्याचा उपदेश केला आहे.

याप्रकारें प्रमाणसहस्त्रीच्या आचारप्रकरणापैकीं विद्याभ्यासोपदेश समाप्त.

---

## ॥ आचार्याय प्रियं धनमाहृत्य प्रजातन्तुं मा व्यवच्छेत्सीः ॥

चवथा उपदेश आचार्यास इच्छित धन दिल्यानंतर लग्न करून प्रजा उत्पन्न करण्याचा आहे; कारण ज्याच्यापासून भविष्यकालांत सुखी होण्याकरितां विद्याभ्यास केला असेल, त्याच्या मेहनतीचा मोबदला त्यास अवश्य दिला पाहिजे. करितां आयुष्याच्या प्रथम भागांत ८ वर्षांपासून २० वर्षांचें वय होईतोंपर्यंत विद्याभ्यास करून बाकीच्या ५ वर्षांपर्यंत द्रव्यार्जन करण्यास शिकावें. तितक्या वेळांत मिळविलेल्या धनांतून –जर गुरूनें कांहीं मासिक मोबदला घेतल्यावांचून शिकविलें असेल तर–

त्यास इच्छित द्यावें; परंतु प्रत्येक महिन्यास शिकविण्याबद्दल त्यानें कांहीं ठराविक द्रव्य घेतलें असल्यास त्यास कांहीं देऊं नये. परंतु आई–बाप किंवा संबंधी आदिकरून जर कोणी, त्या गुरूस मासिक वेतन देण्याचा आणि शिक्षणास लागणारीं पुस्तकें वगैरेचा खर्च करून आपणास शिकविलें असेल, तर त्यास इच्छित द्यावें, ह्मणजे विद्या शिकण्याच्या ऋणांतून मुक्त झाला. स्त्रियांस तसें करण्याची जरूर नाहीं, कारण ती अबला जाति असल्यानें उपकारार्ह आहे, त्यामुळें त्यांच्या स्त्रीविद्यागुरूस त्यांनीं केलेल्या विद्याभ्यासाचा मोबदला त्यांचे आईबाप वगैरे वडिलांनीं देणें योग्य आहे. आणि त्याच्याबद्दल त्यांनीं लग्न होण्यापूर्वीं आई–बाप वगैरे वडिलांच्या घरचीं कामें करण्यामध्यें तत्पर रहावें, आणि लग्न झाल्यानंतरहि काम पडेल त्यावेळीं आपला पति व सासू–सासरा वगैरे वडिलांची संमति घेऊन आई–बाप वगैरे वडिल माणसांच्या कार्यांमध्यें हजर रहावें. आतां संसारांत द्रव्यार्जन करण्यास शिकावें लागतें, कारण कोणत्याहि विद्येचा किंवा कलेचा केवळ अभ्यास करण्यापासून कांहीं धनाची प्राप्ति होत नाहीं; तर त्या अभ्यास केलेल्या विद्येनें किंवा कलेनें जर लोकांस कांहीं उपयोग झाला तरच त्याचा मोबदला ह्मणून त्यांच्याजवळून धनाची प्राप्ति होते, असें करित असतां पुष्कळ लोकांची ओळख करून घेऊन त्यास अनुकूल राहून त्यांची प्रीति संपादन करावी लागते; इत्यादि वर्तणुकीस "धन मिळविण्यास शिकणें किंवा ह्मणणें तसें गणणें" ह्मणतात. अशा ५ वर्षांच्या अभ्यासानें बुद्धि दृढ होते आणि स्वतंत्र मिळविण्याची हिम्मत येते. पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**शास्त्राण्यधीत्यापि भवन्ति मूर्खा यस्तु क्रियावान्पुरुषः स विद्वान् ।**
**सुचिन्तितं चौषधमातुराणां न नाममात्रेण करोत्यरोगम् ॥ १११ ॥**

शास्त्रें शिकून देखील जे उद्योगरहित असतील ते मूर्ख, आणि जे उद्योगी असतील त्यांस विद्वान् म्हणतात; कारण चांगल्या रीतीनें योजिलेलें औषध नाममात्रेंकरून रोग्यास आरोग्य देत नाहीं, तर सेवन केल्यानें देतें ॥ १११ ॥

पुनः एके ठिकाणीं सांगितलें आहे कीं,

**अपि शास्त्रेषु कुशला लोकाचारविवर्जिताः ।**
**सर्वे ते हास्यतां यान्ति यथा मूर्खाः सुशोभिताः ॥ ११२ ॥**

जे शास्त्रांमध्यें कुशल पण लौकिक व्यवहारानें रहित असतील ते सर्व सुशोभित मूर्खाप्रमाणें उपहासास पात्र होतात ॥ ११२ ॥

**वरं बुद्धिर्वरं विद्या विद्याया बुद्धिरुत्तमा ।**
**बुद्धिर्यस्य बलं तस्य निर्बुद्धेस्तु कुतो बलम् ॥ ११३ ॥**

बुद्धि आणि विद्या हीं दोन्हीं चांगलीं आहेत, त्यामध्यें विद्येहून बुद्धि श्रेष्ठ ह्मटली जाते. कारण ज्यास बुद्धि आहे त्यासच बल आहे, बुद्धिहीनास बल कोठलें ॥ ११३ ॥

याप्रमाणें द्रव्यार्जन करण्यास शिकण्यामध्यें ५ वर्षें काढिलीं असतां २५ वर्षांचें वय होतें, ह्मणजे ब्रह्मचर्याचा काल पूर्ण होऊन गृहस्थ होण्याच्या कालास सुरुवात झाली. करितां यौवनावस्था प्राप्त होतांच पुरुषानें आई–बाप वगैरे वडिलांच्या द्वारा एखाद्या चांगल्या सद्गुणी आणि वयांत आलेल्या कन्येचा शोध करवून तिला पसंत करून तिच्याशीं विवाह करावा. मनुस्मृतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**अव्यङ्गाङ्गीं सौम्यशीलां हंसवारणगामिनीम् ।**
**तनुलोमकेशदशनां मृद्वङ्गीमुद्वहेत्स्त्रियम् ॥ ११४ ॥**

अंगास खोड नसलेली, शांत स्वभावाची, हंस आणि हत्तीसारख्या गतीची, अल्प लोम व केश आणि नाजुक दांत असलेली, कोमलांगी अशा कन्येशीं विवाह करावा ॥ ११४ ॥

पुनः सांगितलें आहे कीं,

**अनिन्दितां कन्यां वरयेत् कुलतो लक्षणतश्च ।**
**यवीयसीं वयसा वपुषा च ॥ ११५ ॥**

कुल व लक्षणें यांहींकरून अनिंदित आणि अवस्थेनें व शरीरानें आपल्याहून लहान अशा कन्येशीं विवाह करावा ॥ ११५ ॥

प्रथम अवस्थेमध्यें पुरुष ब्रह्मचर्य पाळून शारीरिक शिक्षणानें अंगानें सुदृढ आणि मानसिक शिक्षणानें सर्व गोष्टींत चतुर होऊन द्रव्य मिळविण्यास शिकला असल्यानें घरसंसाराचा भार सहज उचलूं शकतो. परंतु तितकी पूर्णता मिळविल्यावांचून कदाचित् संसाराचा बोजा उचलण्यास जाईल तर अतिशय भारानें कच्च्या अवस्थेच्या पशूप्रमाणें अंगानें क्षीण होऊन लवकर नाश पावतो. करितां प्राचीन आर्यांनीं पूर्णता मिळवून अवस्थेंत आल्यानंतरच स्त्रीपुरुषांस गृहस्थाश्रमी होण्याची आज्ञा केली आहे. कदाचित् त्याच्यापूर्वी जर गृहस्थ होऊन प्रजा उत्पन्न केली असेल तर ती चांगली होत नाहीं, याविषयीं आयुर्वेदाच्या सुश्रुतग्रंथांतील शारीरस्थानाच्या १० व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**ऊनषोडशवर्षायामप्राप्तः पञ्चविंशतिम् ।**
**यद्याधत्ते पुमान् गर्भं कुक्षिस्थः स विनश्यति ॥ ११६ ॥**

१६ वर्षांच्या आंतील स्त्रीच्या ठिकाणीं २५ वर्षांच्या आंतील पुरुष जर गर्भाधान करील, तर तो गर्भ कुशींतच नाश पावेल ॥ ११६ ॥

**जातो वा न चिरं जीवेज्जीवेद्वा दुर्बलेन्द्रियः ।**
**तस्मादत्यन्तबालायां गर्भाधानं न कारयेत् ॥ ११७ ॥**

आणि कदाचित् जन्मला तर तो जगत नाहीं, आणि जगलाच तर दुर्बल होईल; ह्मणून अतिबाला स्त्रीच्या ठिकाणीं गर्भाधान करूं नये ॥ ११७ ॥

करितां पुरुषानें जसें २५ वर्षांच्या वयापर्यंत ब्रह्मचर्य पाळणें योग्य आहे, तसेंच स्त्रीनें १६ वर्षांच्या वयापर्यंत पाळावें. त्यामध्यें पूर्ण ८ वर्षांपासून ते २० वर्षांपर्यंतचा अभ्यास झाल्यानंतर ५ वर्षेंपर्यंत जसें पुरुषानें धन मिळविण्यास शिकणें, तसेंच स्त्रीनें पूर्ण ५ वर्षांपासून ते १३ वर्षांपर्यंत अर्थात् रजोदर्शनापर्यंतचा विद्याभ्यास झाल्यानंतर, त्याची आवृत्ति करीत तीन वर्षेंपर्यंत आई—बाप वगैरे वडील माणसांच्या हाताखालीं घरासंबंधीं स्वयंपाक वगैरे सर्व कामें शिकून घ्यावीं. त्यामुळें त्याहि पुरुषांसारख्या आपल्या पूर्ण वयांत येऊन, सर्व गोष्टींत हुषार झाल्यानें, घरसंसाराचें

ओझें उचलण्यास समर्थ होतात. नंतर त्यांनींहि पुरुषाप्रमाणें, आपल्या आई-बाप वगैरे वडिलांच्याद्वारा एखाद्या चांगल्या, सद्गुणी आणि वयांत आलेल्या पुरुषाचा शोध करवून त्यास पसंत करून त्याच्याशीं विवाह करावा. मनुस्मृतीच्या ९ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**त्रीणि वर्षाण्युदीक्षेत कुमार्यृतुमती सती ।**
**ऊर्ध्वं तस्मात्तु कालादेर्विन्देत सदृशं पतिम् ॥ ११८ ॥**

कन्येनें ऋतु प्राप्त झाल्यानंतर तीन वर्षेपर्यंत आपल्याहून अधिक गुणी वराची प्रतीक्षा करावी; तितक्या अवधींत तसा वर न मिळेल तर नंतर आपल्यासारख्या गुणी वराशीं विवाह करावा ॥ ११८ ॥

याप्रमाणें वयांत येऊन घरसंसाराचा भार उचलण्यास समर्थ झालेल्या स्त्री-पुरुषांनीं वडिलांच्या मर्यादेंत राहून परस्परांनीं परस्परांस स्वीकारावें आणि त्यांच्या आई-बाप वगैरे वडिलांनीं आपली सम्मति देऊन विवाह करावा. यास प्राजापत्य विवाह म्हणतात. मनुस्मृतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**सह नौ चरतं धर्ममिति वाचाऽनुभाष्य च ।**
**कन्याप्रदानमभ्यर्च्य प्राजापत्यो विधिः स्मृतः ॥ ११९ ॥**

"तुम्ही दोघेंहि बरोबर मिळून आमच्या रीतीनें धर्माचरण करा" असें सांगून पूजनपूर्वक कन्यादान करणें तो प्राजापत्य विवाह सांगितला आहे ॥ ११९ ॥

परंतु एकानें दुसऱ्यास स्वीकारण्यापूर्वीं वर-कन्यांनीं, आणि त्यांस सम्मति देऊन लग्न करण्याच्यापूर्वीं दोन्ही पक्षांच्या वडिलांनीं परस्परांचें कुल आणि वर-कन्येचे गुण यांची खात्री करून घेतली पाहिजे; कारण कोणतेंहि साधारण कार्य तपासून करण्यांत येतें, तर ज्यामुळें स्त्रीपुरुषांस हयात असेपर्यंत बरोबर राहून घरसंसार चालवावा लागतो, असें लग्नरूप महत्त्वाचें कार्य पूर्ण तपासून केल्याशिवाय कसें होईल ? आश्वलायन गृह्यसूत्राच्या प्रथमाध्यायांतील ५ व्या कंडिकेंत सांगितलें आहे कीं,

**कुलमग्रे परीक्षेत, बुद्धिमते कन्यां प्रयच्छेत् ।**
**बुद्धिरूपशीललक्षणसंपन्नामरोगामुपयच्छेत ॥ १२० ॥**

कुलाची परीक्षा प्रथम करावी, बुद्धिमंतास कन्या द्यावी, आणि सुंदर बुद्धि, रूप, स्वभाव आणि लक्षणें यांनीं युक्त व निरोगी अशा कन्येशीं विवाह करावा ॥ १२० ॥

पुनः याज्ञवल्क्यस्मृतीच्या प्रथमाध्यायांत सांगितलें आहे कीं,

**एतैरेव गुणैर्युक्तः सवर्णः श्रोत्रियो वरः ।**
**यत्नात् परीक्षितः पुंस्त्वे युवा धीमाञ्जनप्रियः ॥ १२१ ॥**

आणि वरहि अशा गुणांनीं युक्त, समान वर्णाचा, विद्वान्, पुरुषत्वामध्यें यत्नानें परीक्षा केलेला, तरुण, बुद्धिमान् आणि लोकप्रिय असला पाहिजे॥ १२१॥

तसेंच शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**आदौ कुलं परीक्षेत ततो विद्यां ततो वयः ।**
**शीलं धनं ततो रूपं देशं पश्चाद्विवाहयेत् ॥ १२२ ॥**

प्रथम कुलाची, नंतर विद्या, अवस्था, स्वभाव, धन, रूप आणि देश यांची परीक्षा करून वर–कन्येचा विवाह करावा ॥ १२२ ॥

याप्रमाणें यौवनावस्था प्राप्त झाली असतां सर्व स्त्री–पुरुषांनीं लग्न करणें जरूर आहे, कारण या अवस्थेमध्यें स्वभावतःच इंद्रियें इतकीं बलवान् होतात कीं, कोणाकडूनहि तीं नियमामध्यें ठेवणें शक्य होत नाहीं. त्यामुळें ब्रह्मचर्य पाळणें अतिशय कठिण होऊन जातें. भर्तृहरीनें सांगितलें आहे कीं,

**विश्वामित्रपराशरप्रभृतयो वाताम्बुपर्णाशना–**
**स्तेऽपि स्त्रीमुखपङ्कजं सुललितं दृष्ट्वैव मोहं गताः ।**
**शाल्यन्नं सघृतं पयोदधियुतं भुञ्जन्ति ये मानवा–**
**स्तेषामिन्द्रियनिग्रहो यदि भवेद्विन्ध्यस्तरेत्सागरे ॥ १२३ ॥**

विश्वामित्र, पराशर प्रभृति जे कोणी वायु, कोण पाणी, आणि कोण पानें खाणारे महात्मे ऋषि होते, तेहि स्त्रीचें मनोहर मुखकमल अवलोकन करतांच मोह पावले; तर जे मनुष्य तूप, दहीं, दूध यांबरोबर सुगंधी अन्न भोजन

करतात, त्यांचीं इंद्रियें जर ताब्यांत राहतील, तर समुद्रामध्यें विंध्य पर्वत तरेल. अर्थात् इंद्रियें वश राहणें अशक्य आहे ॥ १२३ ॥

अशा रीतीनें जर पुरुषांकडून इंद्रियें ताब्यांत ठेवणें शक्य होत नाहीं, तर स्त्रियांकडून कसें शक्य होईल ? कारण त्यांच्यामध्यें पुरुषांहून कामाचा वेग अधिक असतो. चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**आहारो द्विगुणः स्त्रीणां लज्जा चापि चतुर्गुणा ।**
**साहसं षड्गुणं चैव कामश्चाष्टगुणः स्मृतः ॥ १२४ ॥**

बहुतकरून स्त्रियांचा आहार पुरुषांहून दुप्पट, लज्जा चौपट, साहस ६ पट आणि काम ८ पट असतो असें सांगितलें आहे ॥ १२४ ॥

हा कामाचा वेग स्थावर—जंगमात्मक सर्व प्राण्यामध्यें तारुण्यावस्था प्राप्त होतांच स्वभावतःच उत्पन्न होतो. अशा वेळीं लोह आणि लोहचुंबकाप्रमाणें त्या त्या जातींच्या नरनारी कांहीं अलौकिक आकर्षणशक्तीच्या बलात्कारानें परस्परांस आकर्षण करितात. सृष्टीची उत्पत्ति आकर्षणशक्तीमुळें झालेली आहे, आणि तिची स्थितीहि याच शक्तीनें झाली आहे. सर्व पदार्थ याच शक्तीच्या योगानें आपापल्या गुणांस धारण करून राहिले आहेत. जड पदार्थाप्रमाणें जंगम प्राण्यांचीहि क्रिया याच शक्तीमुळें होते. नर आणि नारी जातीचा संयोग, गर्भाशयानें गर्भ धारण करणें, गर्भानें आपणास योग्य पोषण मिळवून वृद्धि पावणें, जन्मल्यानंतर पोषणाच्या वस्तु मिळविण्याची इच्छा, आणि ती प्राप्त झाली असतां तिचें पाचन होऊन रुधिर होणें आणि त्यामुळें शरीराची पुष्टि व वृद्धि वगैरे सर्व आकर्षणानेंच होतें. स्थावर प्राण्यांमध्येंहि यांच्यासारख्या सर्व क्रिया प्रकारांतरानें झालेल्या दिसतात. संक्षेपतः पाहिलें असतां सृष्टीचा सर्व व्यवहार आकर्षणशक्तीनेंच चालतो. जेथें या शक्तीचें सत्त्व कमी होतें तेथें होत असलेली क्रिया बंद पडूं लागते; करितां या स्वभावतःच उत्पन्न झालेल्या कामरूप आकर्षणास तोडणें अतिशय कठिण आहे, त्यामुळें युवावस्थेमध्यें स्त्री—पुरुष विवाह न करतील तर आडमार्गानें ओढिले जातात. शार्ङ्गधर पद्धतींत सांगितलें आहे कीं,

**हृदयतृणकुटीरे दीप्यमाने स्मराग्ना-**
**वुचितमनुचितं वा वेत्ति नो पण्डितोऽपि ॥ १२५ ॥**

ज्यावेळीं हृदयरूप गवताच्या घरांत कामरूप अग्नि प्रदीप्त होतो, त्यावेळीं पंडितहि योग्यायोग्याचा विचार करीत नाहीं ॥ १२५ ॥

कदाचित् बलात्कारानें ब्रह्मचर्य पाळण्यांत आलें तरीहि गृहस्थांमध्यें त्यासंबंधीं प्रतिष्ठा राहत नाहीं. पुनः कामाच्या वेगास बलात्कारानें आवरण्यास गेलें असतां शरीरामध्यें त्यासंबंधीं व्याधि होण्याचा संभव असतो. करितां आचार्यानें विद्याभ्यास करविणाऱ्या गुरूस प्रिय धन दिल्यानंतर गृहस्थाश्रमी होऊन प्रजा उत्पन्न करण्याची आज्ञा केली आहे.

याप्रकारें प्रमाणसहस्रीच्या आचारप्रकरणापैकीं गुरुदक्षिणादानोत्तर विवाहोपदेश समाप्त.

---

## ॥ सत्यान्न प्रमदितव्यम् ॥

पांचवा उपदेश गृहस्थ झाल्यानंतर सत्यापासून प्रमाद न करण्याविषयींचा आहे. कारण सर्व स्त्री-पुरुष सत्याचरणानें वागल्यामुळेंच सुखी होतात. जर कोणी असत्य रीतीनें वागण्यास जाईल तर त्याची गृहस्थांमध्यें प्रतिष्ठा कमी होते, आणि तो विश्वासास पात्र होत नाहीं. त्यामुळें आपला निर्वाह चालविण्यामध्यें त्यास अतिशय अडचण पडते. पुनः असत्य रीतीनें वागण्याची छाप जर त्याच्यावर प्रसिद्ध रीतीनें पडली असेल, तर त्याची कोठेंच प्रतिष्ठा होत नाहीं, आणि तो राजदरबारामध्यें किंवा गृहस्थांच्या सभेमध्यें हलका पडून जातो. नंतर कदाचित् तो चांगल्या रीतीनें वागूं लागला, तरी पण गृहस्थांचा त्याच्यावर विश्वास बसत नाहीं. करितां सर्व स्त्री-पुरुषांनीं सत्याचरणानें वागणें योग्य आहे. श्रीमहाभारतांतर्गत शांतिपर्वाच्या १६२ व्या अध्यायांत भीष्मानें युधिष्ठिरास सांगितलें आहे कीं,

**नास्ति सत्यात् परो धर्मो नानृतात् पातकं परम् ।**
**श्रुतिर्हि सत्यं धर्मस्य तस्मात्सत्यं न लोपयेत् ॥ १२६ ॥**

सत्याहून दुसरा श्रेष्ठ धर्म नाहीं आणि असत्याहून दुसरें अधिक पाप नाहीं; सत्यच धर्म ऐकण्यांत येतो, करितां सत्याचा लोप करूं नये ॥१२६॥

कदाचित् असत्य रीतीनें वागून कोणीहि स्त्री किंवा पुरुष आपला निर्वाह चालवित असतील तर त्यांसहि वरून सत्य सांगण्याची जरूर पडते. कारण असत्य कोणासहि प्रिय नाहीं, परंतु सत्य मात्र सर्वांस प्रिय आहे, आणि त्यामुळेंच सर्व व्यवहार चालतो. श्रीमहाभारताच्या वनपर्वांत सांगितलें आहे कीं,

**सत्ये कृत्वा प्रतिष्ठां तु प्रवर्तन्ते प्रवृत्तयः ।**
**सत्यमेव गरीयस्तु शिष्टाचारसमन्वितम् ॥ १२७ ॥**

सर्व प्रवृत्ति सत्यामध्यें राहूनच प्रवृत्त होतात. करितां सदाचारयुक्त सत्य अतिशय श्रेष्ठ आहे ॥ १२७ ॥

ह्मणूनच आचार्यानें शिष्यास गृहस्थाश्रमी झाल्यानंतर सत्यापासून प्रमाद न करण्याविषयीं आज्ञा केली आहे.

याप्रकारें प्रमाणसहस्रीच्या आचारप्रकरणापैकीं सत्यवृत्तोपदेश समाप्त.

---

## ॥ धर्मान्न प्रमदितव्यम् ॥

सहावा उपदेश गृहस्थ झाल्यानंतर धर्माचरणापासून प्रमाद न करण्याविषयीं आहे. कारण सर्व स्त्री–पुरुष धर्माचरणानें सुखी होतात. आरंभापासूनच जें न्याययुक्त तो धर्म, आणि अन्यायुक्त तो अधर्म ह्मटला जातो. याज्ञवल्क्यस्मृतीच्या आचाराध्यायांत सांगितलें आहे कीं,

**अहिंसा सत्यमस्तेयं शौचमिन्द्रियनिग्रहः ।**
**दानं दया दमः क्षान्तिः सर्वेषां धर्मसाधनम् ॥ १२८ ॥**

अहिंसा, सत्य, चोरी न करणें, पवित्रता, इंद्रियनिग्रह, परोपकार, दया, मनाचें दमन आणि क्षमा हीं ९ सर्वांचीं धर्मसाधनें आहेत ॥ १२८ ॥

पुनः श्रीभारतांतर्गत शांतिपर्वाच्या १६२ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**अद्रोहः सर्वभूतेषु कर्मणा मनसा गिरा ।**
**अनुग्रहश्च दानं च सतां धर्मः सनातनः ॥ १२९ ॥**

मन, वाणी आणि कर्म यांहींकरून प्राणिमात्राचा द्रोह न करणें, दया ठेवणें, आणि उपकार करणें हा सत्पुरुषांचा सनातन धर्म आहे ॥ १२९ ॥

धर्माचीं अहिंसादि ९ साधनें स्वाभाविक आहेत, असें न्यायी पुरुषांच्या अनुभवास येतें; कारण कोणत्याहि स्त्रीस किंवा पुरुषास स्वतःकरितां हें सर्व प्रिय आहे. जसें हिंसा करणारासहि आपली किंवा आपल्या प्रियाची हिंसा आवडत नाहीं. असत्य बोलणारासहि स्वतःजवळ असत्य बोलणाराची चीड येते. चोरास आपली वस्तू चोरणाराचा क्रोध येतो. मलिन असणारासहि दुसऱ्याकडून स्वतःस होणारा मलिनपणा आवडत नाहीं. इंद्रियें वश न ठेवणारासहि आपल्याविषयीं दुसऱ्यांचीं वश नसलेलीं इंद्रियें सहन होत नाहींत. परोपकार न करणारासहि स्वतःवर दुसऱ्याच्या उपकाराची इच्छा असते. निर्दयासहि आपल्यावर दुसऱ्याची दया असावी असें वाटतें. मन ताब्यांत न ठेवणारासहि आपल्याविषयीं दुसऱ्याचें शांत मन असलेलें आवडतें. यावरून हीं धर्माचीं अहिंसादि ९ स्वाभाविक साधनें सिद्ध झालेलीं आहेत. करितां हीं सर्व स्त्री-पुरुषांनीं अवश्य आचरण करावीं. सृष्टीमध्यें एक दुसऱ्याचें भक्षण करून प्राणी जीवन करितात, असें प्रत्यक्ष पाहण्यांत येतें; त्यावरून श्रीमद्भागवताच्या प्रथमस्कंधांत सांगितलें आहे कीं,

**जीवो जीवस्य जीवनम् ॥ १३० ॥**

जीव जीवाचें जीवन आहे ॥ १३० ॥

ज्या प्राण्यांमध्यें न्याय–अन्याय जाणण्याचा विवेक नाहीं ते खुशाल आपल्या जीविताचा निर्वाह दुसऱ्या रीतीनें शोधून काढण्यास अशक्त असल्या-मुळें जंगम जीवांचें भक्षण करोत, परंतु ज्यांमध्यें न्याय–अन्याय जाणण्याचा विवेक आणि आपल्या जीविताचा निर्वाह दुसऱ्या रीतीनें शोधून काढण्याची शक्ति आहे, असे मनुष्य जर घातकी प्राण्यांप्रमाणें निरपराधी जंगम जीवांच्या देहांचा घात करतील आणि त्यांच्या मांसानें आपला निर्वाह चालवितील, तर ते मनुष्य आणि घातकी प्राणी यांमध्यें काय फरक समजावा ! अर्थात् कांहींच फरक नाहीं, कारण चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**आहारनिद्राभयमैथुनानि सामान्यमेतत्पशुभिर्नराणाम् ।**
**एको विवेको ह्यधिको मनुष्ये विवेकहीनाः पशुभिः समानाः ॥१३१॥**

आहार, निद्रा, भय आणि मैथुन या चार गोष्टी पशू आणि मनुष्य यांमध्यें सामान्य आहेत, परंतु एक विवेकच मनुष्यामध्यें अधिक आहे, या कारणास्तव जे विवेकशून्य असतील ते पशुसमान जाणावे ॥ १३१ ॥

ह्मणून विवेक मनांत आणून प्राण्यांच्या शरीराचा घात केल्याशिवाय अन्नादि वनस्पतींपासून मनुष्यानें आपल्या जीविताचा निर्वाह करणें योग्य आंहे. याविषयीं पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**योऽत्ति यस्य यदा मांसमुभयोः पश्यतान्तरम् ।**
**एकस्य क्षणिका प्रीतिरन्यः प्राणैर्वियुज्यते ॥ १३२ ॥**

ज्या वेळीं जो कोणी ज्याचें मांस खातो, त्यावेळीं त्या दोघांचें अंतर पाहिलें, तर एकास ह्मणजे मांस खाणाऱ्यास पोट भरण्याइतका क्षणिक आनंद होतो, आणि दुसरा प्राणांस मुकतो ॥ १३२ ॥

**मर्तव्यमिति यद्दुःखं पुरुषस्योपजायते ।**
**शक्यस्तेनानुमानेन परोऽपि परिरक्षितुम् ॥ १३३ ॥**

पुरुषास मरण ह्मटलें कीं त्यासंबंधी जें दुःख होतें, त्याच्या अनुमानानें अन्य प्राणीहि रक्षण करण्यास योग्य आहे ॥ १३३ ॥

**स्वच्छन्दवनजातेन शाकेनापि प्रपूर्यते ।**
**अस्य दग्धोदरस्यार्थे कः कुर्यात् पातकं महत् ॥ १३४ ॥**

अरण्यामध्यें आपोआप उत्पन्न झालेल्या शाकादिकेंकरूनहि जर तृप्ति होते, तर या जळणाऱ्या पोटासाठीं कोण मोटें पाप करील ! ॥ १३४ ॥

तसेंच श्रीमहाभारतांतर्गत अनुशासनपर्वाच्या ११५ व्या आणि ११६ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**प्राणा यथाऽऽत्मनोऽभीष्टा भूतानामपि ते तथा ।**
**आत्मौपम्येन मन्तव्यं बुद्धिमद्भिः कृतात्मभिः ॥ १३५ ॥**

जसे आपले प्राण आपणास प्रिय आहेत, तसे इतर प्राण्यांसहि ते प्रिय असतील, असा आपल्या दृष्टांतानें बुद्धिमान् ज्ञान्यांनीं विचार करावा ॥१३५॥

**स्वमांसं परमांसेन यो वर्धयितुमिच्छति ।**
**नास्ति क्षुद्रतरस्तस्मात्स नृशंसतरो नरः ॥ १३६ ॥**

जो दुसऱ्याच्या मांसानें आपलें मांस वाढविण्याची इच्छा करितो, त्याहून मोठा कोणी अधम नाहीं, आणि तो अतिशय क्रूर आहे ॥ १३६ ॥

**नहि प्राणात्प्रियतरं लोके किञ्चन विद्यते ।**
**तस्माद्दयां नरः कुर्याद्यथाऽऽत्मनि तथा परे ॥ १३७ ॥**

जगतांत प्राणाहून अधिक प्रिय दुसरें कांहीं नाहीं, करितां मनुष्यानें आपल्याप्रमाणें दुसऱ्यावर दया करावी ॥ १३७ ॥

**प्राणदानात् परं दानं न भूतं न भविष्यति ।**
**नह्यात्मनः प्रियतरं किञ्चिदस्तीह निश्चितम् ॥ १३८ ॥**

प्राणदानाहून दुसरें श्रेष्ठ दान झालें नाहीं व होणारहि नाहीं; कारण या लोकांत आत्म्याहून अधिक प्रिय दुसरें कांहीं नाहीं हें खचित ॥ १३८ ॥

**अनिष्टं सर्वभूतानां मरणं नाम भारत ।**
**मृत्युकाले हि भूतानां सद्यो भवति वेपथुः ॥ १३९ ॥**

प्राणिमात्रास मरण अप्रिय आहे, कारण मरणाचे वेळीं त्यास तत्काळ कंप होऊं लागतो ॥ १३९ ॥

करितां आपल्या अल्प सुखासाठीं निरपराधी जीवांचे जीवनापर्यंतचें सुख तोडून टाकावें, यासारखें दुसरें पापाचरण कांहीं नाहीं. पुनः सर्व जातींच्या प्राण्यांमध्यें आनंद राहिलेला आहे, त्यामुळें त्यांसहि मनुष्यांप्रमाणें जिवंत राहण्याची अतिशय हौस असते; आणि आपापल्या कुटुंबांमध्यें अतिशय स्नेह असतो. त्यामुळें एकास दुसऱ्याचा वियोग झाला असतां फार दुःख होतें, हें प्रत्यक्ष आपल्या अनुभवास येतें. कदाचित् या निरपराधी प्राण्यांची हिंसा न होईल तर, त्यांची वस्ती अतिशय वाढत जाऊन मनुष्यास पीडाकारक होईल, असा विचार मनांत आणून मनुष्याच्या निर्वाहासाठींच प्राण्यांचीं

शरीरें उत्पन्न केलीं आहेत, " असें समजून त्यांची हिंसा करावी, हें मनुष्या-सारख्या विवेकी प्राण्यास मुळींच शोभत नाहीं. कारण निरपराधी पशूंची वृद्धि होऊं न देणें, हें तर मनुष्याच्या हातीं आहे. कारण जरूर नसेल तर त्यांच्या जोडप्यांस एकत्र होण्याचा योग येऊं देऊं नये. पुनः सृष्टींत असा नियम आहे कीं, ज्याची अतिशय वृद्धि होईल, त्याचा नंतर नाशहि आपल्या आपणच होतो. त्याप्रमाणें वृद्धि पावलेल्या पशु—पक्ष्यांचाहि स्वभावतःच दुष्काळ किंवा रोगादिक उत्पन्न होऊन क्षय होतो; ह्मणजे ते वाढून मनुष्यांस पीडाकारक होणार नाहींत. हजारो वर्षांपासून जेथें हिंसा झाली नाहीं, तेथें हल्लींहि मनुष्यांस पीडा होईल अशी पशु—पक्ष्यांची गर्दी पाहण्यांत येत नाहीं ! कदाचित् शरीरामध्यें बल आणि वीर्य यांची वृद्धि होण्यासाठीं मांसा-हाराची जरूर आहे, अशा विचारानेंहि प्राण्यांची हिंसा करणें योग्य नाहीं. कारण घरांत बसून राहणाऱ्या मांसाहाऱ्यांहून मेहनत करून शरीरास कसविणाऱ्या अन्नाहाऱ्यांमध्यें विशेष बळ आणि वीर्य पाहण्यांत येतें. यावरून असें दिसून येतें कीं, शरीरास कसविल्यानेंच बल आणि वीर्य यांची वृद्धि होते. वैद्यशास्त्राच्या भावप्रकाश ग्रंथाच्या पूर्वखंडांतील प्रथम भागांत सांगितलें आहे कीं,

**लाघवं कर्मसामर्थ्यं विभक्तघनगात्रता ।**
**दोषक्षयोऽग्निवृद्धिश्च व्यायामादुपजायते ॥ १४० ॥**

व्यायाम केल्यानें शरीरांत हलकेपणा, काम करण्याचें सामर्थ्य अवयव वेगवेगळे आणि दृढ होतात, वातादि दोषांचा क्षय आणि जठराग्नीची वृद्धि होते ॥ १४० ॥

आतां सूक्ष्म जंतू कांहीं कामाचे नाहींत अशा विचारानें त्यांचाहि नाश करणें योग्य नाहीं. कारण त्यांसहि आपापल्या जीवनाचें सुख असतें. त्यामुळें त्यांस स्पर्श केल्यावरोवर ते मरणाच्या भीतीनें खूप पळून जातात. करितां पहिल्यापासूनच ते ज्या रीतीनें उत्पन्न होणार नाहींत, त्या रीतीची मनुष्यांनीं स्वच्छता ठेवावी; आणि उत्पन्न झाले असतील तर त्यांस स्थानभ्रष्ट करावे.

पुनः स्वच्छता ठेविल्यानें नवीन उत्पन्न होणार नाहींत. कदाचित् दुसऱ्यांची व्यथा न जाणणाऱ्या त्या जंतूंपासून मनुष्यांस थोडी पीडा होईल, तरी त्याकरितां त्यांस देहांताची शिक्षा करणें योग्य नाहीं. कारण अशी शिक्षा तर मनुष्याच्या प्राणांचा घात करील त्यासच केली पाहिजे, असा न्याय भासतो. करितां त्या अल्प पीडा करणाऱ्या प्राण्यांस स्थानभ्रष्ट करावे हीच त्यांनीं केलेल्या अपराधाची शिक्षा योग्य भासते. नंतर त्यांचा नाश तर आपोआपच होऊन जाणार आहे. अन्नादि स्थावर वनस्पतींतहि जीवन आहे, तथापि त्यांचा आहार करण्यामध्यें कांहीं हिंसा होत नाहीं. कारण स्थावर आणि जंगम प्राण्यांच्या ज्ञानासंबंधीं स्थितींत मोठें अंतर आहे. यद्यपि स्थावर–जंगमात्मक सर्व प्राण्यांमध्यें मनुष्याप्रमाणें ज्ञानाच्या जाग्रत्, स्वप्न आणि सुषुप्ति अशा तीन अवस्था आहेत, तथापि त्या मनुष्यांच्या अवस्थांहून उत्तरोत्तर न्यूनशक्तीच्या आहेत. मनुष्याच्या जाग्रदवस्थेसारखें ज्ञान इतर कोणत्याहि प्राण्यांमध्यें दिसून येत नाहीं, परंतु बहुतकरून स्वप्नावस्थेसारखें ज्ञान इतर जंगम प्राण्यांच्या जागृत अवस्थेमध्यें आणि सुषुप्ति अवस्थेसारखें ज्ञान स्थावर प्राण्यांच्या जागृत अवस्थेमध्यें दिसून येतें. अर्थात् मनुष्याच्या स्वप्नावस्थेसारखी इतर जंगम प्राण्यांची जागृत अवस्था असते, तर त्यांची दुसरी अवस्था अतिशयच न्यून-शक्तीची असली पाहिजे. मनुष्याच्या स्वप्नावस्थेच्या स्मृतीप्रमाणें जर इतर जंगम प्राण्यांच्या जागृत अवस्थेची स्मृति चिरकालपर्यंत राहूं शकत नाहीं. करितां त्या दोन्ही अवस्थांच्या ज्ञानास एकसारखें गणिलें आहे. परंतु जसें स्वप्नामध्यें मनुष्यास त्या अवस्थांच्या सुखदुःखांचें भान, जीवनाची इच्छा आणि मरणाचें भय असतें, तसें जंगम प्राण्यांमध्येंहि प्रत्यक्ष पाहण्यांत येतें; करितां त्यांच्या देहाचा घात करणें ही धडधडीत हिंसा सिद्ध होते. परंतु सुषुप्ति अवस्थेच्या मनुष्याप्रमाणें अन्नादि स्थावर प्राण्यांमध्यें जीवनाची क्रिया चालू असतां सुख–दुःखाचें भान, जीवनाची इच्छा आणि मरणाचें भय प्रसिद्धपणें पाहण्यांत येत नाहीं, त्यामुळें त्यांच्या ज्ञानास मनुष्याच्या सुषुप्ति अवस्थेच्या ज्ञानासारखें गणलें आहे; आणि सुषुप्तींतून जसा मनुष्य जागृत होतो, तसा स्थावर प्राणी

जागृत होण्याचा संभव नाहीं. करितां त्यांचा आहार करण्यामध्यें कांहीं हिंसा गणलेली नाहीं. विचारदृष्टीनें पाहिलें असतां जंगमप्राण्यांचें जीवन स्थावर प्राणी आणि स्थावर प्राण्यांचें जीवन जंगम प्राणी आहे. कारण अन्नादि स्थावर वनस्पतींच्या शरीरांमध्यें जीं तत्त्वें आहेत तीं जंगम प्राण्यांच्या शरीरास आणि जंगम प्राण्यांच्या शरीरांमध्यें जीं तत्त्वें आहेत, तीं अन्नादि स्थावर प्राण्यांच्या शरीरास पुष्टिदायक आहेत. त्यामुळेंच अन्नादि वनस्पतींच्या भक्षणानें जंगमप्राणी सुखानें जगून बलवान् होतात आणि जंगम प्राण्यांच्या शरीरासंबंधीं खतानें अन्नादि वनस्पती चांगल्या रीतीनें पोषण पावून दृढ होतात. याप्रमाणें दोहोंचा परस्पर संबंध आहे; आणि जंगमाचें जीवन स्थावर आहे. करितां जशी होईल तशी अन्नादि वनस्पतींची वृद्धि करणें योग्य आहे. तैत्तिरीयारण्यकाच्या ८ व्या व ९ व्या प्रपाठकांत सांगितलें आहे कीं,

**अन्नं न निन्द्यात् । अन्नं बहु कुर्वीत ।**
**अन्नाद्भूतानि जायन्ते । जातान्यन्नेन वर्द्धन्ते ।**
**अन्नं हि भूतानां ज्येष्ठम् । तस्मात्सर्वौषधमुच्यते ॥ १४१ ॥**

अन्नाची निंदा करूं नये आणि त्याची वृद्धि होईल असें करावें. अन्नापासून प्राणी उत्पन्न होतात व अन्नापासूनच वृद्धि पावतात. अन्नच प्राण्यांच्या पूर्वीं उत्पन्न झालें आहे, करितां सर्वांचें औषध ह्मटलें जातें ॥ १४१ ॥

ह्मणून अन्नादि वनस्पती जशा पुष्कळ पिकतील तसें करावें. कदाचित् त्यांच्या पीकास, दुष्काळ पडेल अशा तऱ्हेच्या हानीचा संभव इतर जीव–जंतूंपासून जर होईल तर त्या जीव–जंतूंचा नाश करून पीकाचें रक्षण करावें, हा न्याय भासतो. कारण अन्न हें मुख्यत्वेंकरून मनुष्याचें जीवन आहे, आणि मनुष्यप्राणी हा सर्व प्राण्यांमध्यें उत्तम आहे. याकरितां त्याच्या रक्षणाविषयीं सर्वांहून पूर्वीं ध्यान पोंचविलें पाहिजे. पुनः सिंह व्याघ्र वगैरे अतिशय क्रूर जनावरें, जीं मनुष्यांच्या आणि त्यांच्या पशूंच्या प्राणांचा घात करणारीं आहेत, त्यांचा नाश करावा, हाहि न्याय भासतो. कारण

हे क्रूर प्राणी जर वृद्धि पावतील, तर मनुष्यांस आणि त्यांच्या उपयोगी जनावरांस पृथ्वीवर सुखानें राहूं देणार नाहींत. चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**कृते प्रतिकृतं कुर्याद्धिंसने प्रतिहिंसनम् ।**
**तत्र दोषो न पतति दुष्टे दुष्टवदाचरेत् ॥ १४२ ॥**

जो जसें करील त्यास तसें करावें आणि जो मारील त्यास मारावें, त्यांत दोष लागत नाहीं; कारण दुष्टाजवळ दुष्टाप्रमाणें आचरण करणें हा न्याय आहे.

पुनः श्रीमद्भागवताच्या सप्तमस्कंधांतील ९ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**मोदेत साधुरपि वृश्चिकसर्पहत्या ॥ १४३ ॥**

विंचू आणि सर्पादि क्रूर प्राणी यांचा नाश झाल्यानें सत्पुरुषहि हर्ष पावतो ॥ १४३ ॥

याप्रमाणें न्याय--अन्यायाचा विचार करून सर्व स्त्री--पुरुषांनीं अहिंसा धर्म पाळणें श्रेष्ठ आहे, कारण ही सर्व धर्माचरणांमध्यें मुख्य आहे. श्रीमहाभारताच्या अनुशासनपर्वाच्या ११६ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**अहिंसा परमो धर्मस्तथाऽहिंसा परो दमः ।**
**अहिंसा परमं दानमहिंसा परमं तपः ॥ १४४ ॥**

अहिंसा हा उत्तम धर्म, उत्तम दम, उत्तम दान आणि उत्तम तप आहे ॥ १४४ ॥

सत्य बोलावें आणि सत्य आचरावें, हें धर्माचें दुसरें स्वाभाविक साधन आहे. कारण सत्य सर्वांस प्रिय आहे, आणि त्यामुळेंच सर्व व्यवहार चालतो; परंतु असत्य कोणासहि प्रिय नाहीं, करितां त्याचा त्याग करून सर्व स्त्री--पुरुषांनीं सत्याचेंच ग्रहण करणें योग्य आहे. कल्पतरूमध्यें सांगितलें आहे कीं,

**असत्यमप्रत्ययमूलकारणं कुवासनासद्मसमृद्धिवारणम् ।**
**विपन्निदानं परवञ्चनोर्जितं कृतापराधं कृतिभिर्विवर्जितम् ॥१४५॥**

खोटें बोलणें हें अविश्वासाचें मूळ कारण, दुष्ट वासनेचें स्थान, समृद्धीचें प्रतिबंधक, विपत्तींचा हेतु, दुसऱ्यास ठकविण्याविषयीं समर्थ आणि अपराध करविणारें आहे. करितां विद्वानांनीं तें सोडलेलें आहे ॥ १४५ ॥

चोरी करूं नये हें धर्माचें तिसरें स्वाभाविक साधन आहे; कारण कोणत्याहि स्त्रीस किंवा पुरुषास, जीच्यावर त्यांची ममता लागली असेल, अशा वस्तूचें त्यांच्या मर्जीवांचून हरण होतांच क्लेश होतात. दुसऱ्याची सत्ता ज्याच्यावर असेल, असा कोणत्याहि प्रकारचा पदार्थ त्याच्या मालकाची परवानगी मिळाल्याशिवाय आपल्या उपयोगाकरितां घेणें ती चोरी ह्मटली जाते. चोरी करणाराची प्रतिष्ठा गृहस्थांमध्यें कमी होते, आणि त्याचा कोणी विश्वास करीत नाहींत. त्यामुळें स्वतःचा निर्वाह चालविण्यास त्यास अतिशयच अवघड पडतें. परंतु ज्याची दानत स्वच्छ असते, अशा मनुष्याचा सर्व लोक विश्वास करतात, आणि तो आपला निर्वाह पुष्कळच चांगल्या रीतीनें करूं शकतो. करितां सर्व स्त्री–पुरुषांनीं आपली निष्ठा चोख ठेवून कोणाचेंहि कांहीं हरण करूं नये. पञ्चतंत्रांत सांगितलें आहे कीं,

मातृवत्परदारेषु परद्रव्येषु लोष्टवत् ।
आत्मवत्सर्वभूतेषु वीक्षन्ते धर्मबुद्धयः ॥ १४६ ॥

धर्मबुद्धि असलेले मनुष्य परस्त्रीस मातेसमान, परधनास मातीसमान आणि सर्व प्राण्यांस आपल्यासमान पाहतात ॥ १४६ ॥

स्वच्छता ठेवावी, हें धर्माचें चवथें स्वाभाविक साधन आहे. कारण ही सर्वांस प्रिय आहे, मलिनता कोणासहि प्रिय नाहीं. अज्ञान बालकहि स्वच्छता इच्छितें. शरीर स्वच्छ ठेविल्यानें आणि साधीं पण स्वच्छ वस्त्रें धारण केल्यानें अंतःकरण प्रसन्न राहतें, आणि बहुतकरून त्वचेसंबंधीं रोग होण्याची भीति राहत नाहीं, गृहस्थांमध्यें जातेवेळीं लाज वाटत नाहीं, उलट सन्मानाची प्राप्ति होण्याचा संभव असतो. घर आणि त्याच्या आसपासची जागा, वापरण्याचें आणि पिण्याचें पाणी, खाण्यापिण्याचे पदार्थ, हवा आणि पोषाकाचीं वस्त्रें हीं सर्व ज्याचीं स्वच्छ असतील तो प्रायः निरोगी असतो. मलिनता

ठेवणारास याहून उलट होतें. करितां सर्व स्त्री–पुरुषांनीं सर्व प्रकारची स्वच्छता ठेवणें योग्य आहे. इन्द्रियें वश ठेवणें हें धर्माचें पांचवें स्वाभाविक साधन आहे. कारण सर्व लोकांस आपल्याविषयीं दुसऱ्याच्या इंद्रियांचा प्रकोप रुचत नाहीं. इंद्रियें दोन प्रकारचीं आहेत. कर्मेंद्रियें आणि ज्ञानेंद्रियें. ज्या इंद्रियांनीं क्रिया होते त्याला कर्मेंद्रियें ह्मणतात, आणि ज्या इंद्रियांनीं ज्ञान होतें त्यांस ज्ञानेंद्रियें ह्मणतात. वाणी, हात, पाय गुद आणि उपस्थ हीं कर्मेंद्रियें आहेत, कारण वाणीनें शब्द बोलला जातो, हातांनीं वस्तु ग्रहण केली जाते, पायांनीं मार्ग चालला जातो, गुदानें मलत्याग केला जातो, आणि उपस्थानें प्रजोत्पत्ति केली जाते. तशींच कान, त्वचा, नेत्र, जिव्हा आणि नाक यांस ज्ञानेंद्रियें ह्मणतात. कारण कानांनीं शब्द ऐकिला जातो, त्वचेनें स्पर्श केला जातो, नेत्रानें रूप पाहिलें जातें, जिह्वेनें रस चाखिला जातो आणि नाकानें गंधाचें ग्रहण केलें जातें. हीं दहाहि इंद्रियें नियमांत ठेवावीं, अर्थात् विचार करून दुसऱ्याची आणि आपली कोणत्याहि प्रकारची हानि होईल अशा रीतीनें त्यांचा उपयोग करूं नये. त्यास इंद्रियनिग्रह ह्मणतात. हीं इंद्रियें इतकीं बलवान् आहेत कीं, आपापल्या विषयाकडे मनास ओढून नेतात. त्यांस जर नियमांत ठेवण्याचा अभ्यास केला नसेल, तर मनास इतकें विषयांमध्यें आसक्त करतात कीं, तें सारासार जाणण्याचा विवेक विसरून जाऊन मनुष्यास महाहानिरूप खड्डयांत ढकलून देतें. शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**न पीडयेदिन्द्रियाणि नचैतान्यतिलालयेत् ।**
**इन्द्रियाणि प्रमाथीनि हरन्ति प्रसभं मनः ॥ १४७ ॥**

इंद्रियें बलवान् असल्यानें बलात्कार करून मनास विषयांमध्यें ओढून नेतात. करितां त्यांस अतिशय पीडूं नये. तसेंच अतिशय बहकावूंहि नये ॥ १४७ ॥

**एणो गजः पतङ्गश्च भृङ्गो मीनस्तु पञ्चमः ।**
**शब्दस्पर्शरूपगन्धरसैरेते हताः खलु ॥ १४८ ॥**

कारण हरिण, हत्ती, पतंग, भ्रमर आणि पांचवा मासा हे क्रमानें शब्द, स्पर्श, रूप, गंध आणि रस यांहींकरून नाश पावतात ॥ १४८ ॥

करितां सर्व स्त्री-पुरुषांनीं इंद्रियांस नियमांत ठेवणें योग्य आहे. दान देणें हें धर्माचें सहावें स्वाभाविक साधन आहे; कारण सर्वांस स्वतःस तें प्रिय आहे. कांहींहि प्रत्युपकाराची इच्छा ठेविल्याशिवाय कोणत्याहि प्राण्यास कोणत्याहि प्रकारची जरूरीची वस्तू, आपल्याकडून होईल त्या रीतीनें न्यायानें मिळवून देणें यास दान ह्मणतात. श्रीमद्भगवद्गीतेच्या १७ व्या अध्यायांत श्रीकृष्णानें अर्जुनास सांगितलें आहे कीं,

**दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे ।**
**देशे काले च पात्रे च तद्दानं सात्त्विकं स्मृतम् ॥ १४९ ॥**

ज्याच्यापासून प्रत्युपकार मिळविण्याची इच्छा नाहीं अशा सत्पात्रास देश काल पाहून देण्यास योग्य जें दिलें जाईल तें सात्त्विक दान ह्मटलें आहे ॥ १४९ ॥

पुनः पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**मरुस्थल्यां यथा वृष्टिः क्षुधार्ते भोजनं यथा ।**
**दरिद्रे दीयते दानं सफलं पाण्डुनन्दन ॥ १५० ॥**

जशी मारवाड देशामध्यें वृष्टि होणें, जसें भुकेलेल्यास भोजन देणें, तसेंच गरीबास जें दान दिलें जाईल तें सफल जाणावें ॥ १५० ॥

**दरिद्रान् भर कौन्तेय मा प्रयच्छेश्वरे धनम् ।**
**व्याधितस्यौषधं पथ्यं नीरुजस्य किमौषधैः ॥ १५१ ॥**

दरिद्र्यांस दान देऊन पोषण कर. समर्थास धन देऊं नको, कारण रोग्यास औषध हितकर आहे. परंतु निरोग्यास औषधांचा काय उपयोग ? ॥ १५१ ॥

तसेंच चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**वृथा वृष्टिः समुद्रेषु वृथा तृप्तेषु भोजनम् ।**
**वृथा दानं धनाढ्येषु वृथा दीपो दिवापि च ॥ १५२ ॥**

समुद्रामध्यें वृष्टि होणें, तृप्त झालेल्यांस भोजन देणें, श्रीमंतांस दान देणें आणि दिवसास दिवा लावणें हीं सर्व वृथा जाणावीं ॥ १५२ ॥

**जले तैलं खले गुह्यं पात्रे दानं मनागपि ।**
**प्राज्ञे शास्त्रं स्वयं याति विस्तारं वस्तुशक्तितः ॥ १५३ ॥**

परंतु पाण्यांमध्यें टांकलेलें, तेल, दुर्जनास सांगितलेलें गुह्य, सत्पात्रीं दिलेलें दान आणि बुद्धिमंतास शिकविलेलें शास्त्र, हीं अल्प असलीं तरी वस्तुशक्तीनें स्वतः होऊन विस्तार पावतात ॥ १५३ ॥

जरी संसारांत अनेक वस्तूंची गरज लागते, तथापि ज्यांच्याशिवाय चालतच नाहीं अशी गरज ह्मटली ह्मणजे अन्न, पाणी, वस्त्र, औषध, स्थान आणि विद्या—कला यांची असते. भुकेलेल्यास अन्न, तहानेल्यास पाणी, उघड्यास वस्त्र, रोग्यास औषध, थकलेल्यास जागा आणि बालकास विद्या—कला देणें हीं दानें सर्व दानांहून श्रेष्ठ आहेत. अन्नापासून शरीराचें पोषण होतें, आणि अन्नावांचून जीवंत राहतां येणें शक्य नाहीं, हें प्रत्यक्ष पाहण्यांत येतें; करितां याची अत्यंत जरूर आहे, त्यामुळें त्याचें दान श्रेष्ठ सांगितलें आहे. श्रीमहाभारताच्या अनुशासनपर्वांतील ६७ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**अन्नाद्बलं च तेजश्च प्राणिनां वर्धते सदा ।**
**अन्नदानमतस्तस्माच्छ्रेष्ठमाह प्रजापतिः ॥ १५४ ॥**

अन्नापासून प्राण्यांचें बल आणि तेज नेहमीं वाढतें, ह्मणून प्रजापतीनें अन्नदान श्रेष्ठ असें सांगितलें आहे ॥ १५४ ॥

करितां ज्यांस शक्ति असेल अशा लोकांनीं भुकेलेल्यास अन्न मिळेल अशा प्रकारचें धर्मार्थ अन्नसत्र स्थापन करणें योग्य आहे. तसेंच पाण्याशिवायहि जीवंत राहतां येणें शक्य नाहीं, हें सर्वांस माहीत आहे; त्यामुळें पाणी ही अत्यंत जरूरीची वस्तू असल्यामुळें याचें दानहि श्रेष्ठ असें सांगितलें आहे. श्रीमहाभारताच्या अनुशासन पर्वांत सांगितलें आहे कीं,

**पानीयं परमं दानं दानानां मनुरब्रवीत् ।**
**तस्मात् कूपांश्च वापीश्च तडागानि च खानयेत् ॥ १५५ ॥**

मनूनें सर्व प्रकारच्या दानांमध्यें पाण्याचें दान श्रेष्ठ असें सांगितलें आहे, करितां कूप वापी आणि तलाव खोदवावे ॥ १५५ ॥

आणि जेथें जलस्थान नसेल तेथें पाणपोई बांधवावी. पुनः क्षुधा आणि तृषा यांपासून शरीराचें रक्षण करण्यासाठीं जशी अन्न आणि पाणी यांच्या आहाराची जरूर आहे, तशीच शीतोष्णापासून शरीराचें रक्षण करण्यासाठीं त्यास वस्त्रांनीं झांकण्याचीहि जरूर आहे. भूक व तहान लागली असतांहि मनुष्यास फिरतां येईल; परंतु उघड्या अंगानें तर मुळींच फिरणें शक्य नाहीं; कारण तसें केलें असतां ते पशूंसारखे ठरतात, आणि त्यांस इतकी लाज वाटते कीं, मरणाहूनहि अधिक दुःख होतें. त्यामुळें वस्त्राचें दानहि श्रेष्ठ गणलें आहे. करितां शक्तिमान् लोकांनीं उघडे असलेल्यांस वस्त्रें देणें योग्य आहे. औषधांची जरूर तर अत्यंत सांगितली आहे. कारण शरीर उत्पन्न होतांच त्यास नानाप्रकारचे रोग होण्याचा संभव असतो. रोग शरीरास पीडा करतो, आणि वाढला असतां शरीराचा नाश करतो. करितां ज्यास रोग झाला असेल, त्यास पीडा झाल्यानंतर प्राणाचा वियोग होण्याचें भय असतें. त्यामुळें तो येन केन प्रकारेण रोगांपासून मुक्त होण्याची इच्छा करीत असतो. तशा वेळीं त्यास औषध देऊन चांगला करणें हें त्यास मृत्यूपासून अभय दिल्याप्रमाणें आहे, आणि अभयदान अतिशय श्रेष्ठ सांगितलें आहे. पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**न गोप्रदानं न महीप्रदानं न चान्नदानं हि तथा प्रधानम् ।**
**यथा वदन्तीह बुधाः प्रधानं सर्वप्रदानेष्वभयप्रदानम् ॥ १५६ ॥**

या लोकांत पंडित सर्व दानांमध्यें ज्याप्रमाणें अभय दानास मुख्य समजतात, त्याप्रमाणें गोप्रदान, भूमिदान आणि अन्नदान यांस मुख्य समजत नाहींत ॥ १५६ ॥

ह्मणून औषधांचें दानहि श्रेष्ठ गणिलें आहे, करितां समर्थ लोकांनीं ज्यांतून गरीबांस मोफत औषध मिळेल अशीं धर्मार्थ औषधालयें स्थापन करणें योग्य आहे. पुनः थकलेल्यांस विश्रांति घेण्याकरितां जागेची केवढी

जरूर पडते हें यात्रेकरू लोकांच्या अनुभवास चांगल्याप्रकारें येतें. कारण मार्गाचे श्रम झाल्यानें शरीरामध्यें अतिशय थकवा येतो, त्यामुळें विश्रांति घेण्याची अत्यंत जरूर वाटते. तशा वेळीं त्यांस उतरण्याकरितां स्थान देणें हें अत्युत्तम सांगितलें आहे. महानिर्वाणतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**जलाशयाश्च वृक्षाश्च विश्रामगृहमध्वनि ।**
**सेतुः प्रतिष्ठितो येन तेन सर्वं वशीकृतम् ॥ १५७ ॥**

जो विहिरी, तलाव वगैरे जलस्थानें करवितो, वृक्ष लावितो आणि धर्मशाळा व पूल बांधवितो, त्यानें सर्व वश केलें असें जाणावें ॥ १५७ ॥

पुनः बालकांस विद्या आणि कला शिकविण्याची तर अतिशयच आवश्यकता आहे, कारण त्यांस भविष्यकालीं आपला निर्वाह चालवून सुखी होण्याचा सर्व आधार त्या शिकण्यावर आहे. कारण संसारांत असा कोणी नाहीं कीं, जो स्वार्थाशिवाय प्रीति करील. सांगितलें आहे कीं,

**स्वार्थस्तु सर्वप्रियः ॥ १५८ ॥**

स्वार्थ सर्वांस प्रिय आहे ॥ १५८ ॥

पुनः श्रीमहाभारताच्या शांतिपर्वांतील १३८ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**न कश्चित्कस्यचिन्मित्रं न कश्चित्कस्यचिद्रिपुः ।**
**अर्थतस्तु निबध्यन्ते मित्राणि रिपवस्तथा ॥ १५९ ॥**

कोणी कोणाचा मित्र नाहीं आणि कोणी कोणाचा शत्रु नाहीं, परंतु स्वार्थामुळेंच शत्रु आणि मित्र होतात ॥ १५९ ॥

करितां ज्याच्यापासून कोणाचा कांहीं स्वार्थ साधत नाहीं, त्याच्यावर कोणी प्रीति करीत नाहीं, त्यामुळें त्याचा निर्वाह चालूं शकत नाहीं, परंतु ज्याच्यापासून कांहींतरी स्वार्थ साधतां येतो, असा विद्या आणि कला शिकलेला पुरुष लोकांच्या उपयोगीं पडल्यानें सर्वांस प्रिय होतो. आणि त्यांच्याजवळून आपल्या श्रमाचा मोबदला मिळवून सुखानें आपला निर्वाह चालवूं शकतो. पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**विद्या ददाति विनयं विनयाद्याति पात्रताम् ।**
**पात्रत्वाद्धनमाप्नोति धनाद्धर्मं ततः सुखम् ।। १६० ।।**

मनुष्यास विद्या विनय देते, आणि विनयामुळें तो व्यवहारांत पात्र अर्थात् लोकांच्या विश्वासास योग्य होतो; त्यामुळें द्रव्य मिळवूं शकतो, द्रव्यानें दानादिकांच्या द्वारें धर्म करूं शकतो, आणि धर्माच्या योगें अंतःकरणास सुख होतें ।। १६० ।।

पुनः सांगितलें आहे कीं,

**अन्नदानात् परं दानं विद्यादानमतः परम् ।**
**अन्नेन क्षणिका तृप्तिर्यावज्जीवं तु विद्यया ।। १६१ ।।**

सर्व दानांहून अन्नदान श्रेष्ठ आहे. आणि विद्यादान त्याहूनहि श्रेष्ठ आहे. कारण अन्नानें क्षणिक तृप्ति होते, परंतु विद्येनें तर जीवित असेपर्यंत तृप्ति होते ।। १६१ ।।

म्हणून विद्या–कलांचें दान सर्व दानांहून श्रेष्ठ गणलें आहे. करितां ज्यांस शक्ति असेल अशा लोकांनीं धर्मार्थ विद्या आणि कला शिकण्याच्या शाळा स्थापन करणें योग्य आहे. याप्रमाणें अन्नापासून तों विद्येपर्यंतचीं सर्व दानें एकाहून एक श्रेष्ठ आहेत, करितां प्रत्येक दान अतिशय श्रेष्ठ सांगितलें आहे. यांशिवाय अशक्तांस ज्या ज्या वस्तूची गरज पडेल, ती ती वस्तू देणें हें अनेक प्रकारचें दान आहे. या सर्व दानांपैकीं जें जें आपणास शक्य असेल, तें तें सर्व स्त्री–पुरुषांनीं देणें अवश्य आहे. कारण पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**यस्मिन्जीवति जीवन्ति बहवः सोऽत्र जीवति ।**
**काकोऽपि किं न कुरुते चञ्च्वा स्वोदरपूरणम् ।। १६२ ।।**

जो मनुष्य जिवंत असतां त्याच्या आश्रयानें अनेक जीव जीवन करितात तोच या लोकीं जीवंत आहे असें जाणावें; कारण आपलें पोट कावळाहि चोंचीनें भरित नाहीं काय ? ।। १६२ ।।

प्राण्यांवर दया करणें हें धर्माचें सातवें स्वाभाविक साधन आहे, कारण आपल्यावद्दल सर्व कोणी दुसऱ्याच्या दयेस इच्छितात. दया करणारास सर्व वश होतात; बहुतकरून त्याचा कोणी शत्रु होत नाहीं, त्यामुळें त्यास दुसऱ्यापासून भय वाटण्याचा संभव कमी असतो. श्रीमहाभारताच्या अनुशासन पर्वांतील ११६ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**अभयं सर्वभूतेभ्यो यो ददाति दयापरः ।**
**अभयं तस्य भूतानि ददतीत्यनुशुश्रुम ॥ १६३ ॥**

जो दयाळु मनुष्य सर्व प्राण्यांस अभय देतो त्यास सर्व प्राणीहि अभय देतात, असें आम्ही ऐकिलें आहे ॥ १६३ ॥

पुनः प्राण्यांवर दया करावी याविषयीं पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**प्राणा यथाऽऽत्मनोऽभीष्टा भूतानामपि ते तथा ।**
**आत्मौपम्येन भूतेषु दयां कुर्वन्ति साधवः ॥ १६४ ॥**

जसे आपले प्राण आपणास प्रिय आहेत, तसे इतर प्राण्यांचेहि प्राण त्यांस प्रिय आहेत; ह्मणून आपल्या दृष्टांतानें सत्पुरुष प्राण्यांवर दया करितात ॥ १६४ ॥

करितां सर्व स्त्री–पुरुषांनीं अंतःकरणांत सर्वांवर दया ठेवावी, त्यांचें आपणाकडून होईल त्याप्रमाणें न्यायानें कोणत्याहि प्रकारचें चांगलें करावें, परंतु कधींहि वाईट करूं नये. मनास नियमांत ठेवणें हें धर्माचें आठवें स्वाभाविक साधन आहे. कारण कोणासहि आपल्याविषयीं दुसऱ्याचें कठोर मन आवडत नाहीं. इंद्रियांकडून विषयांच्या बाजूस खेंचलें जाणाऱ्या मनास आवरणें आणि विवेकानें त्यास काम, क्रोध, लोभ, मोह, मद, आणि मत्सर या ६ दुर्गुणांपासून दूर ठेवणें यास मनाचें दमन ह्मणतात. ज्याचें मन शांत असतें, त्याच्यावर बहुतकरून सर्व प्रेम ठेवितात, आणि स्वभावतःच त्याचा कोणी द्रोही होत नाहीं. श्रीमहाभारताच्या शांतिपर्वांतील १६० व्या अध्यायांत भीष्मानें युधिष्ठिरास सांगितलें आहे कीं,

**दमस्तेजो वर्द्धयति पवित्रं च दमः परम् ।**
**विपाप्मा तेजसा युक्तः पुरुषो विन्दते महत् ॥ १६५ ॥**

दम तेजास वाढवितो आणि दम अतिशय पवित्र आहे, अर्थात् दमवान् पुरुष तेजस्वी व निष्पाप होऊन महत्त्वास पोंचतो ॥ १६५ ॥

करितां सर्व स्त्री–पुरुषांनीं विचार करून दुसऱ्याची व आपली कोणत्याहि प्रकारची हानि होईल असा मनाचा उपयोग करूं नये. क्षमा करणें हें धर्माचें नववें स्वाभाविक साधन आहे. कारण सर्वजण आपल्याविषयीं दुसऱ्याच्या क्षमेस इच्छितात. क्षमा करणारा सर्वांस प्रिय होतो व त्याचा अपराध करणारा स्वतःच पश्चात्तापास पावतो. सांगितलें आहे कीं,

**नरस्याभरणं रूपं रूपस्याभरणं गुणः ।**
**गुणस्याभरणं ज्ञानं ज्ञानस्याभरणं क्षमा ॥ १६६ ॥**

नराचें भूषण रूप, रूपाचें भूषण गुण, गुणाचें भूषण ज्ञान आणि ज्ञानाचें भूषण क्षमा आहे ॥ १६६ ॥

पुनः श्रीमहाभारताच्या उद्योगपर्वांत व वनपर्वांत सांगितलें आहे कीं,

**क्षमा बलमशक्तानां शक्तानां भूषणं क्षमा ।**
**क्षमा वशीकृतिर्लोके क्षमया किं न सिध्यति ॥ १६७ ॥**

क्षमा दुर्बलांचें बल, क्षमा समर्थांचें भूषण आणि या जगांत क्षमा वशीकरण आहे; करितां एका क्षमेनें काय सिद्ध होत नाहीं ? ॥ १६७ ॥

**अबुद्धिमाश्रितानां तु क्षन्तव्यमपराधिनाम् ।**
**नहि सर्वत्र पाण्डित्यं सुलभं पुरुषेण वै ॥ १६८ ॥**

समजूत नसलेल्या अपराध्यांच्या अपराधाची क्षमा करणें योग्य आहे, कारण पुरुषास सर्व विषयांमध्यें शहाणपणा असणें सुलभ नाहीं ॥ १६८ ॥

**पूर्वोपकारी यस्ते स्यादपराधे गरीयसि ।**
**उपकारेण तत्तस्य क्षन्तव्यमपराधिनः ॥ १६९ ॥**

ज्यानें पूर्वीं तुझ्यावर उपकार केला असेल, त्यानें कदाचित् मोठा अपराध केला असला तरी, त्यानें केलेल्या उपकाराचें स्मरण करून त्यास अपराधाबद्दल क्षमा करावी ॥ १६९ ॥

करितां सर्व स्त्रीपुरुषांनीं विचार करून क्षमा ठेवणें योग्य आहे. सृष्टींत असा नियम आहे कीं, कोणतेंहि कार्य झालें कीं त्याचें प्रतिकार्य झालें पाहिजे. त्यामुळें बिंबाचें प्रतिबिंब, आघाताचा प्रत्याघात आणि ध्वनीचा प्रतिध्वनि होतो. याचप्रमाणें आचरणाचेंहि प्रत्याचरण होतें. जसें कीं आपण एखाद्या मनुष्यावर रागावलों तर तो आपल्यावर रागावतो. थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे जसें आपण दुसऱ्याविषयीं आचरण करूं, तसें दुसरा आपल्याविषयीं आचरण करितो. अज्ञान बालक व पशु यांवर आपण प्रेम केलें तर तेहि आपल्यावर प्रेम करितात, व क्रोध केला तर क्रोध करितात. जसें बालक हंसून प्रेम दाखवितें व रडून क्रोध दाखवितें, तसें जनावरहि पुच्छ हालवून जवळ येऊन चाटून व मस्तक नम्र करून प्रेम दाखवितें आणि समोर गुर्‌गुरून क्रोध दाखवितें. करितां विचार करून मन, वाणी आणि कर्म यांहींकरून सर्वांशीं सरळ रीतीनें आचरण करावें, त्यामुळें दुसऱ्याची व आपली कोणत्याहि प्रकारची हानि न होतां उलट लाभ होतो. कोणाचेंहि कोणत्याहि प्रकारचें अन्यायानें अहित करणें हें पाप ह्मटलें जातें, आणि न्यायानें हित करणें हें पुण्य ह्मटलें जातें. धर्माचीं वर सांगितलेलीं ९ साधनें आचरिल्यानें प्राण्यांचें हित होतें, करितां हें पुण्य समजावें, आणि याहून उलट हिंसादि आचरण केलीं असतां अहित होतें, करितां तें पाप समजावें. शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**हिंसास्तेयान्यथाकामं पैशुन्यं परुषानृते ।**
**संभिन्नालापव्यापादमभिध्या दृग्विपर्ययम् ।**
**पापं कर्मेति दशधा कायवाङ्मानसैस्त्यजेत् ॥ १७० ॥**

हिंसा, चोरी व अगम्यागमन हीं तीन कायिक, चहाडी, कठोर वचन, असत्य भाषण व यथेच्छ प्रलाप हीं चार वाचिक आणि परद्रोहाचें चिंतन, परधनाची इच्छा व ईश्वराविषयीं अनास्था हीं तीन मानसिक मिळून १० प्रकारचीं पापकर्में काया, वाचा आणि मन यांहींकरून सोडावीं ॥ १७० ॥

करितां सर्व स्त्री--पुरुषांनीं हिंसादि अधर्माचा त्याग करून अहिंसादि धर्माचें पालन करणें योग्य आहे. तसें करण्याविषयीं कदाचित् अनादर होईल तर स्वतःच्या उपमेनें पहावें; त्यामुळें अनादर नाहींसा होऊन धर्माचरणाविषयीं प्रीति उत्पन्न होते. श्रीमहाभारताच्या अनुशासनपर्वांतील ११३ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**प्रत्याख्याने च दाने च सुखदुःखे प्रियाप्रिये।**
**आत्मौपम्येन पुरुषः प्रमाणमधिगच्छति ॥ १७१ ॥**

तिरस्कार प्रार्थनाभंग करण्यानें, दान देण्यानें, सुख व दुःख देण्यानें आणि प्रिय व अप्रिय करण्यानें दुसऱ्यास कसें वाटतें, याचा अनुभव मनुष्य आपल्या उपमेनें जाणूं शकतो ॥ १७१ ॥

हीं अहिंसा वगैरे धर्माचीं ९ स्वाभाविक साधनें, बालकापासून तो वृद्धापर्यंत सर्व स्त्री--पुरुषांस आचरण करण्यास साधारण असल्यामुळें सामान्य धर्म ह्मटला जातो. याशिवाय स्त्रीजातीनें आणि पुरुषजातीनें आपल्या अनेक प्रकारच्या सत्संबंधीयांशीं कशा रीतीनें वर्तन करावें, याविषयीं जो विवेक आहे, त्यास विशेष धर्म ह्मणतात. प्रथम लग्न केल्यानंतर स्त्री--पुरुषांनीं परस्पर प्रेमानें वागावें, याविषयीं मानवधर्मशास्त्राच्या ९ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**अन्योन्यस्याव्यभीचारो भवेदामरणान्तिकः।**
**एष धर्मः समासेन ज्ञेयः स्त्रीपुंसयोः परः ॥ १७२ ॥**

मरेतोंपर्यंत एकमेकांनीं दांपत्यसंबंध न तोडणें हाच स्त्री-पुरुषांचा संक्षेपानें परम धर्म जाणावा ॥ १७२ ॥

**तथा नित्यं यतेयातां स्त्रीपुंसौ तु कृतक्रियौ।**
**यथा नाभिचरेतां तौ वियुक्तावितरेतरम् ॥ १७३ ॥**

करितां विवाहित स्त्री--पुरुषांच्या जोडप्यानें एकमेकांहून वेगळीं असतांहि जसा परस्पर संबंध न तुटेल त्या रीतीनें वागण्याचा यत्न करावा ॥ १७३ ॥

**प्रजनार्थं स्त्रियः सृष्टाः सन्तानार्थं च मानवाः ।**
**तस्मात्साधारणो धर्मः श्रुतौ पत्न्या सहोदितः ॥ १७४ ॥**

गर्भ धारण करण्याकरितां स्त्रिया उत्पन्न केल्या आहेत आणि गर्भाधान करण्याकरितां पुरुष उत्पन्न केले आहेत; करितां वेदामध्यें साधारण धर्मकार्य पतीनें पत्नीसहित करावें असें सांगितलें आहे ॥ १७४ ॥

**संतुष्टो भार्यया भर्ता भर्त्रा भार्या तथैव च ।**
**यस्मिन्नेव कुले नित्यं कल्याणं तत्र वै ध्रुवम् ॥ १७५ ॥**

ज्या कुळांत स्त्रीच्या योगें पुरुष आणि पुरुषाच्या योगें स्त्री संतुष्ट राहते, अर्थात् दोघांमध्यें परस्पर प्रीति असते, त्या कुळाचें नेहमीं कल्याणच होतें ॥ १७५ ॥

करितां वेदव्यासानें सांगितलें आहे कीं,

**सम्यग्धर्मार्थकामेषु दम्पतीभ्यामहर्निशम् ।**
**एकचित्ततया भाव्यं समानव्रतवृत्तिभिः ॥ १७६ ॥**

उत्तम प्रकारें धर्म, अर्थ आणि काम संपादन करण्यामध्यें स्त्री–पुरुषांनीं नेहमीं समान व्रतानें एकचित्तेंकरून वर्तन करावें ॥ १७६ ॥

आतां स्त्रियांनीं नेहमीं आपल्या सत्संबंधी पुरुषांच्या रक्षणामध्यें रहावें, कधीं स्वतंत्र राहूं नये; कारण त्यांच्यामध्यें पुरुषजातीहून स्वभावतःच शारीरिक आणि मानसिक बळ कमी असतें. त्यामुळें त्या जर स्वतंत्रपणें राहतील, तर कपटी पुरुष त्यांस भुलवून आपल्या फंदांत फसवितील. त्यामुळें त्यांचें शील भ्रष्ट, होईल, व त्या मोठ्या अपयशास प्राप्त होऊन संसारामध्यें प्रतिष्ठेनें राहूं शकणार नाहींत. याविषयीं मनुस्मृतीच्या ५ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**बालया वा युवत्या वा वृद्धया वापि योषिता ।**
**न स्वातन्त्र्येण कर्तव्यं किञ्चित्कार्यं गृहेष्वपि ॥ १७७ ॥**

बाला, तरुणी आणि वृद्धा स्त्रीनें आपल्या घरींहि पति वगैरे वडील माणसांस विचारिल्यावांचून स्वतंत्रपणें कोणतेंहि कार्य करूं नये ॥ १७७ ॥

**बाल्ये पितुर्वशे तिष्ठेत् पाणिग्राहे तु यौवने ।**
**पुत्राणां भर्तरि प्रेते न भजेत्स्त्री स्वतन्त्रताम् ॥ १७८ ॥**

स्त्रीनें बालपणीं आई—बापांच्या, तारुण्यांत पतीच्या आणि कदाचित् वैधव्य येईल तर पुत्रांच्या आज्ञेमध्यें रहावें, परंतु कधींच स्वतंत्रपणें राहूं नये ॥१७८॥

याप्रमाणें आपले सत्संबंधीं जे असतील त्यांच्या स्वाधीन राहून स्त्रियांनीं नित्य गृहसंबंधी सर्व कार्य करण्यामध्यें तत्पर असावें. आळसानें पडून राहूं नये. कारण तसें केल्यानें काम बिघडतें, सर्वांची अप्रीति होते, शरीर जड होतें, आणि खाल्लेलें बरोबर पचत नाहीं. त्यामुळें बल कमी होतें, व लगेच रोग होण्याचा संभव असतो. परंतु याहून उलट कामामध्यें तत्पर राहिल्यामुळें काम चांगलें होतें, सर्वांची प्रीति संपादन होते, शरीरांत तरतरी येते, व खाल्लेलें लगेच पचून जातें. त्यामुळें बल वाढतें आणि रोग होण्याचा संभव कमी असतो. वैद्यशास्त्राच्या भावप्रकाशाच्या पूर्वखंडांतील प्रथम भागांत सांगितलें आहे कीं,

**व्यायामदृढगात्राणां व्याधिर्नैवोपजायते ॥ १७९ ॥**

ज्यांचें शरीर मेहनतीनें बळकट झालें आहे त्यांस बहुत करून रोग होत नाहीं ॥ १७९ ॥

स्वभावतःच पुरुषशरीरांहून स्त्रीशरीर दुर्बळ उत्पन्न केलें आहे, त्यामुळें पुरुषामध्यें जितकें शारीरिक आणि मानसिक बल असतें तितकें स्त्रीमध्यें असत नाहीं. करितां अनादिकालापासून अशी समजूत झालेली दिसते कीं, आपल्या आणि कुटुंबाच्या भरण—पोषणाकरितां स्त्रीनें घरचें आणि पुरुषानें बाहेरचें कार्य करावें. परंतु तसें न चालल्यास स्त्रीनें बाहेरचें आणि पुरुषानें घरचें कार्य करावें. स्त्रियांचें काय काय कर्तव्य आहे त्या विषयीं ऋग्वेदाच्या ८ व्या अष्टकाच्या तिसऱ्या अध्यायाच्या शेवटीं स्त्रीस आज्ञा केली आहे कीं,

**सम्राज्ञी श्वशुरे भव सम्राज्ञी श्वश्र्वां भव ।**
**ननान्दरि सम्राज्ञी भव सम्राज्ञी अधिदेवृषु ॥ १८० ॥**

सासू, सासरा, नणंद आणि दीर इत्यादिकांचे ठिकाणीं योग्य अशा आचरणानें त्यांस वश करणारी हो ॥ १८० ॥

तसेंच शुक्रनीतीच्या चवथ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**पत्युः पूर्वं समुत्थाय देहशुद्धिं विधाय च ।**
**उत्थाप्य शयनीयानि कृत्वा वेश्मविशोधनम् ॥ १८१ ॥**

प्रभातकालीं स्त्रीनें पतीच्या पूर्वीं उठून शौच–मुखमार्जन वगैरे करून अंथरुणें काढून घर झाडून साफ करावें ॥ १८१ ॥

**मृद्भिस्तु शोधयेच्चुल्लीं तत्राग्निं सेन्धनं न्यसेत् ।**
**महानसस्थपात्राणि बहिः प्रक्षाल्य सर्वशः ॥ १८२ ॥**

आणि स्वयंपाकघरांतील सर्व भांडीं घराच्या बाहेर चांगल्या रीतीनें घांसून, मातीनें चूल लिंपावी व तींत स्वयंपाकासाठीं लांकडांसह अग्नि ठेवावा ॥ १८२ ॥

**स्मृत्वा नियोगपात्राणि रसान्नद्रविणानि च ।**
**कृतपूर्वाह्णकार्येयं श्वशुरावभिवादयेत् ॥ १८३ ॥**

नंतर घरामध्यें वापरण्याचीं दुसरीं भांडीं, तूप तेल वगैरे रस, धान्य आणि नित्य खर्चाकरितां घेतलेला पैसा तपासावा. याप्रमाणें सकाळचें काम करून नाहून धुवून स्वच्छ होऊन, तिनें सासू आणि सासरा यांच्या पायां पडावें ॥ १८३ ॥

**ताभ्यां भर्त्रा पितृभ्यां वा भ्रातृमातुलबान्धवैः ।**
**वस्त्रालङ्काररत्नानि प्रदत्तान्येव धारयेत् ॥ १८४ ॥**

नंतर तिनें पति, आई–बाप, बंधु, मामा व आप्त यांनीं दिलेलीं वस्त्रें, अलंकार आणि रत्नें धारण करावीं ॥ १८४ ॥

**मनोवाक्कर्मभिः शुद्धा पतिदेशानुवर्तिनी ।**
**छायेवानुगता स्वच्छा सखेव हितकर्मसु ।**
**दासीव दिष्टकार्येषु भार्या भर्तुः सदा भवेत् ॥ १८५ ॥**

आणि नेहमीं मन, वाणी व कर्म यांहींकरून शुद्ध, स्वामीची आज्ञा पालन करणारी, पतीस छायेप्रमाणें अनुसरणारी, निर्मल शरीर व वस्त्रें धारण करणारी, पतीच्या हितकार्यांमध्यें मित्रासमान आणि हुकूम बजावण्यामध्यें दासीसमान व्हावें ॥ १८५ ॥

ततोऽन्नसाधनं कृत्वा पतये विनिवेद्य सा ।
वैश्वदेवोद्धृतैरन्नैर्भोजनीयांश्च भोजयेत् ॥ १८६ ॥

नंतर स्वयंपाक तयार करून पतीस निवेदन करून त्यानें केलेल्या वैश्वदेवानें पवित्र झालेल्या अन्नाच्या योगेंकरून श्वशुरादिकांस वाढावें ॥ १८६ ॥

पतिं च तदनुज्ञाता शिष्टमन्नाद्यमात्मना ।
भुक्त्वा नयेदहःशेषं सदाऽऽयव्ययचिन्तया ॥ १८७ ॥

आणि पतीसहि वाढून त्याचा निरोप घेऊन बाकी राहिलेल्या अन्नानें आपण भोजन करून तिसरा प्रहर, घरांत पाहिजे ती वस्तू स्वच्छ करण्यामध्यें आणि तिच्या आयव्ययाचा विचार करण्यामध्यें घालवावा ॥ १८७ ॥

पुनः सायं पुनः प्रातर्गृहशुद्धिं विधाय च ।
कृतान्नसाधना साध्वी सभृत्यं भोजयेत्पतिम् ॥ १८८ ॥

याप्रमाणें साध्वी स्त्रीनें पुनः सायंकाळीं नित्य गृहाची शुद्धि करून स्वयंपाक तयार करून श्वशुरादिकांसह आपल्या पतीस वाढावें ॥ १८८ ॥

नातितृप्ता स्वयं भुक्त्वा गृहनीतिं विधाय च ।
आस्तृत्य साधु शयनं ततः परिचरेत् पतिम् ॥ १८९ ॥

आणि रात्रीं आपल्या रुचीप्रमाणें जेवून, घरांतील बाकी असलेलें काम संपवून आणि चांगल्या रीतीनें बिछाना अंथरून पतीच्या सेवेस हजर रहावें ॥ १८९ ॥

सुप्ते पत्यौ तदध्यास्य स्वयं तद्गतमानसा ।
अनग्ना चाप्रमत्ता च निष्कामा च जितेन्द्रिया ॥ १९० ॥

आणि पती निद्रावश होईल त्यावेळीं त्याचे ठिकाणीं मन ठेवून त्याच शय्येवर निष्काम आणि जितेंद्रिय होऊन सावधगिरीनें वस्त्रांसह झोंपावें ॥१९०॥

नोच्चैर्वदेन्न परुषं न बह्वाहूतिमप्रियम् ।
न केनचिच्च विवदेदप्रलापविवादिनी ।
न चास्य व्ययशीला स्यान्न धर्मार्थविरोधिनी ॥ १९१ ॥

तिनें उंच स्वरानें, कठोर, अप्रिय आणि अनेक वेळ ज्यामध्यें हाक मारावी लागेल असें वाक्य बोलूं नये. कोणाशीं वाद करूं नये व वाद करित असतां कधीं अनर्थकारक शब्द बोलूं नये, पुनः पतीस अतिशय खर्च करण्यास लावूं नये आणि त्यास धर्मार्थ संपादन करण्यामध्यें विरोध करूं नये ॥१९१॥

प्रमादोन्मादरोषेर्ष्यावचनान्यतिनिन्दिताम् ।
पैशुन्यहिंसाविषयमोहाहङ्कारदर्पताम् ।
नास्तिक्यसाहसस्तेयदम्भान् साध्वी विवर्जयेत् ॥ १९२ ॥

आणि गाफिलपणा, अविवेक, क्रोध, निंदावचन, आणि निंदित अशी चहाडी, हिंसा, विषयमोह, अहंकार, आपली बढाई, ईश्वराविषयीं अनास्था, साहस, चौर्य आणि दंभ या दोषांचा साध्वी स्त्रीनें त्याग करावा ॥ १९२ ॥

कृषिपण्यादिपुङ्कृत्ये भवेयुस्ताः प्रसाधिकाः ।
संगीतैर्मधुरालापैः स्वायत्तस्तु पतिर्यथा ॥ १९३ ॥

पुनः स्त्रियांनीं शेती आणि व्यापार वगैरे पुरुषाच्या कृत्यांमध्यें मदतगार व्हावें, आणि संगीत व मधुर भाषण यांच्या योगेंकरून जसा आपला पति वश राहील त्याप्रमाणें आचरण करावें ॥ १९३ ॥

मण्डनं वर्जयेन्नित्यं तथा प्रोषितभर्तृका ।
धारयेन्मङ्गलार्थानि किञ्चिदाभरणानि च ।
देवताराधनपरा तिष्ठेद्भर्तृहिते रता ॥ १९४ ॥

आणि ज्या स्त्रीचा पति परदेशीं गेला असेल, त्या स्त्रीनें विशेष अलंकार धारण करूं नयेत, परंतु सौभाग्याचे द्योतक मात्र अलंकार धारण करावे, व पतीच्या हिताविषयीं प्रीति ठेवून देवसेवेमध्यें तत्पर असावें ॥ १९४ ॥

नास्ति भर्तृसमो नाथो नास्ति भर्तृसमं सुखम् ।
विसृज्य धनसर्वस्वं भर्ता वै शरणं स्त्रियाः ॥ १९५ ॥

कारण स्त्रीस पतिसमान कोणी पालन कर्ता नाहीं आणि पतिसमान दुसरें सुख नाहीं, करितां धनादि सर्व वैभव गेलें असतांहि तोच आश्रय आहे॥१९५॥

मितं ददाति हि पिता मितं भ्राता मितं सुतः ।
अमितस्य प्रदातारं भर्तारं का न पूजयेत् ॥ १९६ ॥

पुनः स्त्रीस पिता, बंधु आणि पुत्र मोजकें देणारे आहेत, करितां अगणित किंबहुना सर्वस्व देणाऱ्या पतीची सेवा कोणती स्त्री करणार नाहीं ? " अर्थात् आपल्या पतीची सेवा करणें हें सर्व स्त्रियांचें कर्तव्य आहे " ॥ १९६ ॥

तसेंच मनुस्मृतीच्या ५ व्या आणि ९ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

पित्रा भर्त्रा सुतैर्वापि नेच्छेद्विरहमात्मनः ।
एषां हि विरहेण स्त्री गर्ह्ये कुर्यादुभे कुले ॥ १९७ ॥

स्त्रीनें माता, पिता, पति किंवा पुत्र यांपासून दूर राहण्याची कधींहि इच्छा करूं नये; कारण यांच्या वियोगानें एकटी झाल्या कारणास्तव चांगली स्त्रीहि आपल्या पित्याच्या आाणि पतीच्या कुलास दूषित करिते ॥ १९७ ॥

विधाय प्रोषिते वृत्तिं जीवेन्नियममास्थिता ।
प्रोषिते त्वविधायैव जीवेच्छिल्पैरगर्हितैः ॥ १९८ ॥

आणि भरण–पोषणाची तजवीज करून पति परदेशीं गेला असल्यास शरीरशृंगार वगैरे सोडून नियमानें रहावें. कदाचित् पोषणाची व्यवस्था केल्या-वांचूनच गेला असल्यास अनिंद्य अशा कला–कुशलतेचा धंदा करून जीवन करावें ॥ १९८ ॥

पुनः याज्ञवल्क्यस्मृतीच्या पहिल्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

क्रीडां शरीरसंस्कारं समाजोत्सवदर्शनम् ।
हास्यं परगृहे यानं त्यजेत्प्रोषितभर्तृका ॥ १९९ ॥

जीचा पति परदेशीं गेला असेल, त्या स्त्रीनें खेळ, शरीरसंस्कार, मनुष्यांच्या समुदायांनीं युक्त उत्सव पाहणें, अतिशय हास्य करणें, आणि परक्या घरीं जाणें इतक्या गोष्टींचा त्याग करावा ॥ १९९ ॥

याप्रमाणें नेहमीं वर्तन करून आणि गृहकार्य करून स्त्रीनें आपल्या स्वामीस प्रसन्न ठेवावा. कदाचित् श्रीमंती असेल व गृहकार्य नोकरांकडून होत असेल, तथापि स्वतःचें शरीर कसदार होईल या रीतीनें स्त्रीनें तीं कामें

बरोबर होतात कीं नाहींत, त्याची पूर्ण चवकशी ठेवावी. परंतु आपल्या पतिसंबंधीं कार्य तर स्त्रीनें स्वतःच करून पतीस प्रसन्न करावा. कोणत्याहि प्रकारें त्यास अप्रसन्न होऊं देऊं नये. कारण स्त्रियांच्या सर्व सुखाचा आधार त्यांचा स्वामी आहे. त्यामुळें त्यांनीं पतीस सुख झालें असतां सुख आणि पतीस दुःख झालें असतां दुःख मानणें योग्य आहे. सर्व प्रकारच्या संबंधांमध्यें पति–पत्नीचा संबंध अतिशय निकटचा आहे, त्यामुळें पत्नीच्या सुखदुःखाची चिंता जितकी पतीस असते, तितकी दुसऱ्यास असत नाहीं, आणि पति जितका पत्नीच्या कल्याणाविषयीं तत्पर राहतो, तितका दुसरा कोणी राहत नाहीं. अशा पतीची सेवा करणें हा स्त्रीचा परमधर्म आहे. श्रीमहाभारताच्या अनुशासन पर्वांतील १४६ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

सुस्वभावा सुवचना सुवृत्ता सुखदर्शना ।
अनन्यचित्ता सुमुखी भर्तुः सा धर्मचारिणी ॥ २०० ॥

जी स्त्री पतीशीं चांगल्या स्वभावानें वागणारी, मधुर भाषण करणारी, शुद्धाचरणानें संपन्न, दर्शनमात्रानें सुख देणारी, पतीच्याच ठिकाणीं चित्त ठेवणारी आणि प्रसन्नमुखयुक्त असेल, ती धर्मचारिणी जाणावी ॥ २०० ॥

परुषाण्यपि चोक्ता या दृष्टा दुष्टेन चक्षुषा ।
सुप्रसन्नमुखी भर्तुर्या नारी सा पतिव्रता ॥ २०१ ॥

पतीनें कदाचित् कठोर वचन बोललें असतां, आणि क्रोध दृष्टीनें पाहिलें असतांहि त्याच्याजवळ जी नारी चांगल्या प्रकारें सुप्रसन्न मुद्रेनें राहील ती पतिव्रता ह्मटली जाते ॥ २०१ ॥

शुश्रूषां परिचर्यां च करोत्यविमनाः सदा ।
सुप्रतीता विनीता च सा नारी धर्मभागिनी ॥ २०२ ॥

जी प्रसन्न मनानें निरंतर पतीची सेवाचाकरी करिते, मर्यादेमध्यें राहते आणि विनयानें वागते ती स्त्री धर्मिष्ठ जाणावी ॥ २०२ ॥

पतिर्हि देवो नारीणां पतिर्बन्धुः पतिर्गतिः ।
पत्या समा गतिर्नास्ति दैवतं वा यथा पतिः ॥ २०३ ॥

कारण स्त्रियांस पतीच देव, स्नेही, आणि गति आहे व त्याच्यासारखी कोणी दुसरी गति आणि देवता नाहीं ॥ २०३ ॥

**श्वश्रूश्वशुरयोः पादौ जोषयन्ती गुणान्विता ।**
**मातापितृपरा नित्यं या नारी सा तपोधना ॥ २०४ ॥**

पुनः जी गुणवती स्त्री सासू—सासऱ्यांच्या चरणांची सेवा करिते आणि मातापित्यांच्या भक्तीविषयीं तत्पर राहते, ती परम तपस्विनी जाणावी ॥२०४॥

तसेंच महानिर्वाणतंत्रामध्यें सांगितलें आहे कीं,

**नेक्षेत्पतिं क्रूरदृष्ट्या श्रावयेन्नैव दुर्वचः ।**
**नाप्रियं मनसा वापि चरेत्पत्युः पतिव्रता ॥ २०५ ॥**

पतिव्रता स्त्रीनें पतीस क्रूर दृष्टीनें पाहूं नये, दुष्ट भाषण ऐकवूं नये आणि मनानेंहि त्याचें अप्रिय करूं नये ॥ २०५ ॥

पुनः शार्ङ्गधरकृत नीतिशास्त्रांत सांगितलें आहे कीं,

**कार्येषु मन्त्री करणेषु दासी भोज्येषु माता शयनेषु रम्भा ।**
**धर्मेऽनुकूला क्षमया धरित्री षाड्गुण्यमेतद्धि पतिव्रतानाम् ॥ २०६ ॥**

स्त्रीनें पतीस कार्य करण्यामध्यें सल्ला देणाऱ्या मंत्र्यासमान होणें, काम करण्यामध्यें दासीसारखें होणें, भोजनाच्या वेळीं लक्ष पुरविणाऱ्या मातेसारखें होणें, शय्येच्या ठिकाणीं आनंद देणाऱ्या रंभेसारखें होणें, धर्मकार्यामध्यें मित्राप्रमाणें होणें आणि क्षमा करण्यामध्यें पृथ्वीप्रमाणें होणें, हे पतिव्रतांचे ६ गुण सांगितले आहेत ॥ २०६ ॥

**अभ्युत्थानमुपागते गृहपतौ तद्भाषणे नम्रता**
**तत्पदार्पितदृष्टिरासनविधिस्तस्योपचर्या स्वयम् ।**
**सुप्ते तत्र शयीत तत्प्रथमतो जह्याच्च शय्यामिति**
**प्राच्यैः पुत्रि निवेदितः कुलवधूसिद्धान्तधर्मागमः ॥ २०७ ॥**

पुनः स्त्रीनें पति घरामध्यें येतांच उठून उभें राहणें, त्याच्याशीं भाषण करतेवेळीं नम्रता ठेवणें, त्याचे चरणांवर दृष्टि ठेवून आसन देणें, त्याच्या सेवेमध्यें स्वतः हजर राहणें, तो झोंपीं गेल्यानंतर आपण झोंपणें आणि तो

उठण्याचे पूर्वी आपण उठणें, हे पुत्रि ! हीं प्राचीन पुरुषांनीं कुलस्त्रियांच्या धर्माचीं सिद्धांतसूत्रें निवेदन केलीं आहेत ॥ २०७ ॥

पुनः चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**न दानैः शुद्ध्यते नारी नोपवासशतैरपि ।**
**न तीर्थसेवया तद्वद्भर्तुः पादोदकैर्यथा ॥ २०८ ॥**

स्त्रीची पतीच्या चरणोदकेंकरून जशी शुद्धि होते, तशी अनेक दानें, शेंकडो उपोषणें आणि तीर्थें सेवन केल्यानेंहि होत नाहीं ॥ २०८ ॥

तसेंच पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**नगरस्थो वनस्थो वा पापो वा यदि वा शुचिः ।**
**यासां स्त्रीणां प्रियो भर्ता तासां लोके महोदयः ॥ २०९ ॥**

ज्या स्त्रियांस आपला पति नगरामध्यें असो किंवा अरण्यामध्यें असो, तसाच पापी असो किंवा पवित्र असो, तथापि प्रिय असतो, त्या स्त्रियांचा लोकामध्यें मोठा उदय होतो ॥ २०९ ॥

**भर्ता हि परमं नार्या भूषणं भूषणैर्विना ।**
**एषा विरहिता तेन शोभनापि न शोभना ॥ २१० ॥**

कारण स्त्रियांस भूषणाशिवायहि पतीच परम भूषण आहे. कारण पतीशिवायची स्त्री सुशोभित असली तरी शोभत नाहीं ॥ २१० ॥

**न सा स्त्रीत्यभिमन्तव्या यस्यां भर्ता न तुष्यति ।**
**तुष्टे भर्तरि नारीणां तुष्टः स्यात्परमेश्वरः ॥ २११ ॥**

जीच्या ठिकाणीं भर्ता संतोष पावत नाहीं, ती स्त्री असें समजूं नये; कारण स्त्रियांस पति प्रसन्न झाला असतां परमेश्वर प्रसन्न होतो ॥ २११ ॥

तसेंच प्रसंगरत्नावलींत सांगितलें आहे कीं,

**विद्वत्कवयः कवयः केवलकवयस्तु केवलं कपयः ।**
**कुलजा या सा जाया केवलजाया तु केवलं मायाः ॥ २१२ ॥**

ज़े कवि विद्वान् असतील तेच कवि, आणि जे केवळ कवि असतील ते केवळ कपी समजावे; तशीच जी स्त्री कुलीन असेल तीच जाया, आणि जी केवळ स्त्री ती केवळ माया समजावी ॥ २१२ ॥

पुनः सांगितलें आहे कीं,

**न कामेषु न भोगेषु नैश्वर्ये न सुखे तथा ।**
**स्पृहा यस्या यथा पत्यौ सा नारी धर्मभागिनी ॥ २१३ ॥**

ज्या स्त्रीस जशी पतीविषयीं आवड असते, तशी काम, भोग, ऐश्वर्य आणि सुख यांविषयींहि असत नाहीं, ती स्त्री साध्वी जाणावी ॥ २१३ ॥

**भर्ता देवो गुरुर्भर्ता धर्मतीर्थव्रतानि च ।**
**तस्मात्सर्वं परित्यज्य पतिमेकं भजेत्सती ॥ २१४ ॥**

कारण स्त्रीस पतीच देव, गुरु, स्वामी, धर्म, तीर्थ आणि व्रतरूप आहे; करितां सर्व सोडून तिनें एका पतीचीच सेवा करावी ॥ २१४ ॥

**सा कविता सा वनिता यस्याः श्रवणेन दर्शनेनापि ।**
**कविहृदयं पतिहृदयं सरलं तरलं च सत्वरं भवति ॥ २१५ ॥**

कारण जीच्या श्रवणमात्रेंकरून कवीचें हृदय सरल होतें तीच कविता आणि जीच्या दर्शनमात्रेंकरून पतीचें हृदय चंचल होतें तीच वनिता जाणावी ॥ २१५ ॥

आतां स्त्री ज्यास प्राप्त झाली आहे असा पुरुष गृहस्थ ह्मटला जातो. त्यानें संसारांत कशा रीतीनें वागावें त्याविषयीं महानिर्वाणतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**गृहस्थः पालयेद्दारान् विद्यामभ्यासयेत्सुतान् ।**
**गोपयेत्स्वजनान् बन्धूनेष धर्मः सनातनः ॥ २१६ ॥**

गृहस्थानें स्त्रीचें रक्षण करावें, बालकांस विद्याभ्यास शिकवावा आणि स्वजन व बंधुवर्ग यांचें रक्षण करावें हा सनातन धर्म आहे ॥ २१६ ॥

गृहस्थानें सर्व प्रकारें स्त्रीचें अवश्य पालन करावें, कारण त्याच्या संसारांतील सर्व सुखाचा आधार स्त्री आहे. निर्वाहाकरितां नेहमीं उद्योगामध्यें तत्पर असलेल्या गृहस्थास कार्य करण्यामध्यें जे श्रम होतात., ते घरांत येतांच स्त्रीच्या

आश्वासनानें दूर होतात. ज्याच्या घरामध्यें स्त्री आहे,त्यास घरांतील कार्यांची कांहीं चिंता असत नाहीं. जसा पुरुष स्त्रीच्या सुख–दुःखांमध्यें भाग घेणारा असतो, तशीच स्त्री पुरुषाच्या सुख–दुःखामध्यें भाग घेणारी असल्यामुळें अर्धांगी ह्मणजे पुरुषाचें अर्धें अंग ह्मटली जाते. श्रीमहाभारताच्या अनुशासन पर्वामध्यें सांगितलें आहे कीं,

**यावन्न विन्दते जायां तावदर्धो भवेत्पुमान् ।**
**नार्धं प्रजायते, पूर्णः प्रजायेतेत्यपि श्रुतिः ॥ २१७ ॥**

जेथपर्यंत पुरुष अविवाहित असतो, तेथपर्यंत अर्धा ह्मटला जातो; कारण एकट्या पुरुषापासून प्रजा उत्पन्न होत नाहीं, तर लग्न करून स्त्रीस आणिल्यानंतर पूर्ण होईल त्यावेळीं त्याच्यापासून प्रजा उत्पन्न होऊं शकेल ॥ २१७ ॥

करितां सर्व प्रकारें स्त्रीचें पालन करणें, हें पुरुषास आपल्या अर्ध्या अंगाचें पालन केल्यासारखें आहे. स्त्री घराची शोभा आहे व तीच्यावांचून घर शून्य भासतें. श्रीमहाभारताच्या शांतिपर्वांतील १४४ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**न गृहं गृहमित्याहुर्गृहिणी गृहमुच्यते ।**
**गृहं तु गृहिणीहीनमरण्यसदृशं भवेत् ॥ २१८ ॥**

गृहास गृह ह्मणत नाहींत तर स्त्रीच गृह ह्मटली जाते; कारण स्त्रीविरहित गृह अरण्यासारखें दिसतें ॥ २१८ ॥

**वृक्षमूलेऽपि दयिता यस्य तिष्ठति तद्गृहम् ।**
**प्रासादोऽपि तया हीनः कान्तार इति निश्चितम् ॥ २१९ ॥**

झाडाखालीं कां असेना, परंतु ज्या पुरुषास स्त्री असते, तें त्याचें गृह जाणावें; परंतु स्त्रीशिवायचा महाल जरी असला तरी तो गहन विपिनरूपच होय! हें खचीत ॥ २१९ ॥

**धर्मार्थकामकालेषु भार्या पुंसः सहायिनी ।**
**विदेशगमने चास्य सैव विश्वासकारिका ॥ २२० ॥**

धर्म, अर्थ आणि काम संपादन करतेवेळीं पुरुषास सहायता करणारी स्त्री आहे, आणि परदेशास जातेवेळीं त्यास विश्वास ठेवण्यास योग्यही तीच आहे ॥ २२० ॥

तथा रोगाभिभूतस्य नित्यं कृच्छ्रगतस्य च ।
नास्ति भार्यासमं किंचिन्नरस्यार्तस्य भेषजम् ॥ २२१ ॥

तसेंच रोगानें पीडिलेल्या आणि विपत्तीमध्यें सांपडलेल्या अशा दुःखी पुरुषास नेहमीं स्त्रीसमान दुसरें कांहींहि औषध नाहीं ॥ २२१ ॥

नास्ति भार्यासमो बन्धुर्नास्ति भार्यासमा गतिः ।
नास्ति भार्यासमो लोके सहायो धर्मसंग्रहे ॥ २२२ ॥

पुरुषास जगतांत स्त्रीसारखा कोणी सोयरा, गति आणि धर्मसंग्रह करण्यामध्यें मदतगार नाहीं ॥ २२२ ॥

पुनः याच ग्रंथाच्या आदिपर्वांत सांगितलें आहे कीं,

अर्धं भार्या मनुष्यस्य भार्या श्रेष्ठतमः सखा ।
असहायस्य लोकेऽस्मिँल्लोकयात्रासहायिनी ॥ २२३ ॥

या लोकांत स्त्री, पुरुषाचें अर्धें अंग आणि परम श्रेष्ठ सखा आहे, कारण सहायतेशिवायच्या पुरुषास लौकिक व्यवहारांत ती पूर्ण साहाय्य करणारी आहे ॥ २२३ ॥

कान्तारेष्वपि विश्रामो जनस्य गृहिणी मता ।
यः सदारः स विश्वास्यस्तस्माद्दाराः परा गतिः ॥ २२४ ॥

पुरुषास अरण्यामध्येंहि स्त्री विश्रांतिरूप मानली आहे; शिवाय जो पुरुष स्त्रीसहित असेल तो विश्वास ठेवण्यास योग्य आहे, करितां स्त्री परम गति आहे ॥ २२४ ॥

तसेंच प्रसंगरत्नावलींत सांगितलें आहे कीं,

सरसा सालङ्कारा सुपदन्यासा सुवर्णमयमूर्तिः ।
आर्या तथैव भार्या न लभ्यते यत्नहीनेन ॥ २२५ ॥

रस आणि अलंकार यांनीं सहित, सुंदर पदन्यासयुक्त आणि सुवर्णमय आहे मूर्ति जीची एवंगुणविशिष्ट आर्या आणि भार्या यत्नहीनास प्राप्त होत नाहीं ॥ २२५ ॥

पुनः सांगितलें आहे कीं,

**अनुकूलां विमलाङ्गीं कुलजां कुशलां सुशीलसंपन्नाम् ।**
**एतादृशीं सुभार्यां पुरुषो यत्नोदयाल्लभते ॥ २२६ ॥**

अनुकूल वर्तन करणारी, निर्मल अंग असलेली, सत्कुलामध्यें जन्मलेली, सर्व कार्यांमध्यें हुशार, आणि उत्कृष्ट शीलानें संपन्न, या प्रकारची उत्तम स्त्री पुरुषास यत्नाचा उदय झाल्यानें प्राप्त होते ॥ २२६ ॥

करितां श्रीमहाभारताच्या उद्योगपर्वांत विदुरानें धृतराष्ट्रास सांगितलें आहे कीं,

**पूजनीया महाभागाः पुण्याश्च गृहदीप्तयः ।**
**स्त्रियः श्रियो गृहस्योक्तास्तस्माद्रक्ष्या विशेषतः ॥ २२७ ॥**

सदाचरणशील, पवित्र आणि गृहामध्यें कांतिरूप अशा सत्कार करण्यास योग्य स्त्रिया गृहशोभा होत असें सांगितलें आहे; त्यामुळें त्या विशेषेंकरून रक्षण करण्यास योग्य आहेत ॥ २२७ ॥

तसेंच मनुस्मृतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**पितृभिर्भ्रातृभिश्चैताः पतिभिर्देवरैस्तथा ।**
**पूज्या भूषयितव्याश्च बहुकल्याणमीप्सुभिः ॥ २२८ ॥**

पुष्कळ कल्याणास इच्छिणाऱ्या पिता, बंधू, पति आणि दीर इत्यादिकांनीं स्त्रियांचा सत्कार करावा आणि त्यांस भूषणादिकांनीं सुशोभित कराव्या ॥ २२८ ॥

**शोचन्ति जामयो यत्र विनश्यत्याशु तत्कुलम् ।**
**न शोचन्ति तु यत्रैता वर्द्धते तद्धि सर्वदा ॥ २२९ ॥**

ज्या कुलामध्यें स्त्रिया दुःखी होत असतात, तें कुल नाश पावतें, व ज्या कुलामध्यें त्या दुःख पावत नाहींत, तें कुल सदा वृद्धि पावतें ॥ २२९ ॥

तस्मादेताः सदा पूज्या भूषणाच्छादनाशनैः ।
भूतिकामैर्नरैर्नित्यं सत्कारेषूत्सवेषु च ॥ २३० ॥

करितां समृद्धि इच्छिणाऱ्या पुरुषांनीं नेहमीं स्त्रियांचा, भूषणें, वस्त्रें आणि खाणें—पिणें यांहींकरून सत्कार करावा. तसेंच उत्सवाच्या दिवशीं आणि विवाहादि मंगल कार्यांमध्येंहि निरंतर त्यांचा आदर करावा ॥ २३० ॥

स्त्रियां तु रोचमानायां सर्वं तद्रोचते कुलम् ।
तस्यां त्वरोचमानायां सर्वमेव न रोचते ॥ २३१ ॥

कारण स्त्रियांस शोभविल्यानें सर्व कुल सुशोभित दिसतें व त्यांस न शोभविल्यानें सर्वहि कुल विशोभित दिसतें ॥ २३१ ॥

करितां श्रीमहाभारतांतर्गत वनपर्वांत सांगितलें आहे कीं,

शाश्वतोऽयं धर्मपथः सद्भिराचरितः सदा ।
यद्भार्याः परिरक्षन्ति भर्तारोऽल्पबला अपि ॥ २३२ ॥

अल्पशक्तीच्याहि पुरुषांनीं आपल्या स्त्रियांचें रक्षण करावें; कारण सत्पुरुषांनीं सदा आचरण केलेला हा सनातन धर्म आहे ॥ २३२ ॥

याप्रमाणें स्त्रियांचें पालन करून त्यांस गृहकार्यांमध्यें लावाव्या, कारण जसा पुरुष उद्योगधंद्यामध्यें पडून आपल्या शरीरास व मनास आळवितो, तसें स्त्रीनें घरच्या कार्यांमध्यें पडून आपल्या देहास व मनास आळवावें, त्यामुळें शरीर निरोगी राहतें व मनास अवकाश न मिळाल्यानें वाईट मार्गानें जातां येत नाहीं. मनुस्मृतीच्या ९ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

अर्थस्य संग्रहे चैनां व्यये चैनां नियोजयेत् ।
शौचे धर्मेऽन्नपक्त्यां च पारिणाह्यस्य चेक्षणे ॥ २३३ ॥

घरखर्चासाठीं द्रव्य सांचविणें, त्याचा खर्च करणें, घर स्वच्छ ठेवणें, पतिसंबंधी कार्यें करणें, स्वयंपाक तयार करणें आणि घरांतील भांडीं वगैरे सर्व वस्तू सांभाळणें हीं कार्यें स्त्रीकडून नित्य करवावीं ॥ २३३ ॥

परंतु गृहकार्यापासून अवकाश मिळतांच स्त्रिया जर निर्दोष खेळ—गंमत करूं लागल्या असतील तर त्यापासून त्यांस प्रतिबंध करूं नये. कारण एकाच

कार्यामध्यें गुंतल्यानें सर्वांचें शरीर आणि मन थकून व कंटाळून जातें. तसा थकवा आणि कंटाळा दूर करण्यासाठीं सर्वांस थोडावेळ खेळ—गंमत करण्याची आवश्यकता असते. जर का स्त्री स्वतंत्र राहील तर, स्वभावतःच देहानें आणि मनानें पुरुषाहून ती नेहमीं दुर्बल असल्यामुळें, नीच पुरुषांच्या फंदांत फसून जाऊन पिता आणि पति यांच्या उभयकुळांच्या प्रतिष्टेस कलंक लावील, अशा भीतीनें मनुस्मृतीच्या ९ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**पिता रक्षति कौमारे भर्ता रक्षति यौवने ।**
**रक्षन्ति स्थविरे पुत्रा न स्त्री स्वातन्त्र्यमर्हति ॥ २३४ ॥**

स्त्रीचें बालपणीं पिता, तरुणपणीं पति आणि वृद्धपणीं पुत्र रक्षण करितात. कारण ती स्वतंत्रतेनें राहण्यास योग्य नाहीं ॥ २३४ ॥

**अस्वतन्त्राः स्त्रियः कार्याः पुरुषैः स्वैर्दिवानिशम् ।**
**विषयेषु च सज्जन्त्यः संस्थाप्या आत्मनो वशे ॥ २३५ ॥**

पति वगैरे पालनकर्त्या पुरुषांनीं रात्रंदिवस स्त्रिया आपल्या स्वाधीन ठेवाव्या, परंतु त्या जर निर्दोष खेळ—गंमत करूं लागल्या असतील तर त्यामध्यें त्यांस स्वतंत्रतेनें वागूं द्यावें ॥ २३५ ॥

जरी स्वतंत्रता ही सर्वांस प्रिय आहे, तथापि ती नियमित असली पाहिजे. राजापासून रंकापर्यंत आणि बालापासून वृद्धापर्यंत सर्वांस स्वतंत्रपणें राहणें आवडतें. परंतु ज्या ज्या विषयामध्यें अज्ञान असतें त्या त्या विषयामध्यें स्वतंत्रता हानिकारक आहे. मनुष्य सर्वज्ञ नसल्याकारणानें स्वातंत्र्यानें वागत असतां मोठी चूक करून महाहानिरूप खड्डयांत येऊन पडतो. यासाठीं ज्याज्या विषयाचा जो जो ज्ञाता असेल त्याची, त्याल्या विषयासंबंधी कांहीं कार्य उपस्थित झालें असतां संमति घेणें योग्य आहे. अनुभवांतहि असें येतें कीं, कोणीहि नियमित विश्रांति घ्यावी, कारण अधिक विश्रांति घेतली असतां खचित पीडा प्राप्त होते. करितां स्त्रियांस नियमित असलेली विश्रांति सुखानें भोगूं द्यावी, परंतु घरांत कोंडून ठेवूं नये; कारण तसें केल्यानें कांहीं त्या पवित्र राहूं शकतीलच असें नाहीं. मनुस्मृतीच्या ९ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**अरक्षिता गृहे रुद्धाः पुरुषैराप्तकारिभिः ।**
**आत्मानमात्मना यास्तु रक्षेयुस्ताः सुरक्षिताः ॥ २३६ ॥**

कदाचित् स्त्रियांस, चौकशी ठेवणाऱ्या पुरुषांनीं घरांत कोंडून ठेविल्या असल्या, तरीहि त्या सुरक्षित राहत नाहींत. परंतु ज्या स्त्रिया आपल्या मनानें आपलें रक्षण करितात, त्याच सुरक्षित असतात ॥ २३६ ॥

पुनः सर्वांस अप्राप्त वस्तूची इच्छा आणि प्राप्त वस्तूचा अनादर होणें, स्वाभाविक असतें, याविषयीं सांगितलें आहे कीं,

**लोके स्वभावः परिदृश्यते वै लब्धेष्ववज्ञाऽनुपलब्धवाञ्छा ॥ २३७ ॥**

मिळालेल्या वस्तूची अवज्ञा आणि न मिळालेल्या वस्तूची इच्छा होणें असा जगतांत स्वभाव दिसून येतो ॥ २३७ ॥

तसेंच घरामध्यें बसून राहणाऱ्यास बाहेर फिरण्याची इच्छा आणि बाहेर फिरणाऱ्यास घरामध्यें येऊन बसण्याची इच्छा होणें स्वाभाविक आहे. कोणतीहि वस्तु पाहिली नसेल तोंपर्यंत तीविषयीं मोह असतो, परंतु पाहिल्यानंतर कांहीं असत नाहीं. त्याप्रमाणें घरामध्यें बसणाऱ्यास ज्यावेळीं बाहेरील विचित्र स्थानांविषयीं वर्णन ऐकूं येतें, त्यावेळीं तीं स्थानें पाहण्याची त्यास इच्छा होते. त्यास जसजसा अडवावा तसतशी त्यास अधिक इच्छा उत्पन्न होते. ती येथपर्यंत कीं, संधि मिळाल्यास गुप्त रीतीनें पाहून येण्याचीहि तो हिम्मत करतो. करितां ज्यांत कांहीं बाध नसेल, अशीं निर्दोष बाहेरचीं विचित्र स्थानें पाहण्याची कधीं स्त्रियांस इच्छा होईल, तर कुटुंबांतील वडिलांनीं स्वतः बरोबर जाऊन त्यांस अवश्य दाखवावीं. परंतु त्यांस एकट्या मात्र फिरूं देणें मना केलें आहे, कारण स्वभावतःच त्या देहानें आणि मनानें दुर्बल असल्याकारणानें घरच्या कोणत्याहि पुरुषाकडून रक्षण होण्यास पात्र आहेत. महानिर्वाणतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**उत्सवे लोकयात्रायां तीर्थेष्वन्यनिकेतने ।**
**न पत्नीं प्रेषयेत्प्राज्ञः पुत्रामात्यविवर्जिताम् ॥ २३८ ॥**

बुद्धिमान् पुरुषानें स्त्रीस उत्सव, लोकसमुदाय, तीर्थें आणि परक्याचें घर इतक्या ठिकाणीं, बरोबर पुत्र किंवा विश्वासू मनुष्य दिल्यावांचून एकटी पाठवूं नये ॥ २३८ ॥

याप्रमाणें स्त्रियांस ठराविक सुट्टी द्यावी, परंतु अधिक सुट्टी देऊं नये, अर्थात् इच्छेस येईल त्याप्रमाणें त्यांस वागूं देऊं नये, कारण इच्छेप्रमाणें वागूं लागलें असतां कोणीहि स्त्री किंवा पुरुष सुखी होत नाहीं, सर्वांस वरून वरून असें दिसतें कीं, इच्छेप्रमाणें वागल्यानेंच सुख होतें; परंतु विचारदृष्टीनें पाहिलें असतां कोणीहि स्त्री किंवा पुरुष यथेच्छ वर्तन केल्यानें सुखी झालेले नाहींत. परंतु जे सृष्टिनियम, राजनियम व लोकनियम यांच्या आधीन राहून, आपल्या आयाच्या प्रमाणांत व्यय ठेवून वागले आहेत तेच सुखी झालेले आहेत. यथेच्छ वर्तन करीत असतां सृष्टिनियमाच्या विरुद्ध चालल्यास रोगी होतो, राजनियमाचें उल्लंघन केल्यास अपराधी होऊन दंडास पात्र होतो, लोकनियम सोडिल्यास लोकांकडून तिरस्कार होऊन दुःखी होतो, आणि आयाच्या प्रमाणांत व्यय न ठेवील तर दरिद्री होतो. तर यथेच्छ वर्तन केल्यामुळें सुख कोठून मिळणार? करितां ज्यापासून कांहीं हानि होण्याचा संभव असेल, त्या रीतीनें स्त्रिया वर्तन करूं इच्छितील तर त्यांस प्रतिबंध करावा. मनुस्मृतीच्या ९ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**पानं दुर्जनसंसर्गः पत्या च विरहोऽटनम् ।**
**स्वप्नोऽन्यगेहवासश्च नारीसंदूषणानि षट् ॥ २३९ ॥**

मद्यपान, दुर्जनाची संगति, पतीचा वियोग, फिरणें, अकालीं झोंपणें आणि परगृहीं वास, या सहा गोष्टी स्त्रियांस दूषणावह आहेत ॥ २३९ ॥

**सूक्ष्मेभ्योऽपि प्रसंगेभ्यः स्त्रियो रक्ष्या विशेषतः ।**
**द्वयोर्हि कुलयोः शोकमावहेयुररक्षिताः ॥ २४० ॥**

करितां स्त्रियांचें स्वल्प अशा कुसंगतीपासूनहि रक्षण करावें; कारण तसें रक्षण करण्यांत न येईल तर त्या पतीच्या आणि पित्याच्या दोन्हीं कुलांस कलंक लावून अनर्थास पोंचवितील ॥ २४० ॥

**यादृशं भजते हि स्त्री सुतं सूते तथाविधम् ।**
**तस्मात्प्रजाविशुद्ध्यर्थं स्त्रियं रक्षेत्प्रयत्नतः ॥ २४१ ॥**

कारण स्त्री जशा पुरुषास सेविते तसा पुत्र प्रसवते; करितां प्रजेच्या शुद्ध्यर्थ प्रयत्नानें स्त्रियांचें रक्षण करावें ॥ २४१ ॥

पुनः पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**भ्रमन् संपूज्यते राजा भ्रमन् संपूज्यते धनी ।**
**भ्रमन् संपूज्यते विद्वान् स्त्री भ्रमन्ती विनश्यति ॥ २४२ ॥**

बाहेर फिरल्यानें राजा, धनवान् आणि विद्वान् यांची पूजा होते, परंतु स्त्रीमात्र बाहेर फिरल्यानें भ्रष्ट होते ॥ २४२ ॥

**स्वातन्त्र्यं पितृमन्दिरे च वसतिर्यात्रोत्सवे संगति-**
**र्गोष्ठी पूरुषसन्निधावनियमो वासो विदेशे तथा ।**
**संसर्गः सह पुंश्चलीभिरसकृद्वृत्तेर्निजायाः क्षतिः**
**पत्युर्वार्द्धकमीप्सितं प्रवसनं नाशस्य हेतुः स्त्रियाः ॥ २४३ ॥**

स्वतंत्रता, पित्याच्या घरीं राहणें, मनुष्यांच्या समुदायामध्यें व उत्सवामध्यें एकटें जाणें, परपुरुषाशीं गुप्त गोष्टी करणें, नियम सोडून वागणें, प्रायः पतीचा परदेशीं वास, वारंवार खराब स्त्रियांची संगति, स्वतःच्या भरण-पोषणाचा अभाव, पतीची वृद्धावस्था आणि यथेच्छ प्रवास, इतक्या गोष्टी स्त्रियांस भ्रष्ट होण्यास कारणीभूत होऊं शकतात ॥ २४३ ॥

करितां इतक्यांपासून त्यांचें रक्षण करावें. याप्रमाणें स्त्रीचें रक्षण करीत असतां गृहस्थानें कधींहि परस्त्रीच्या ठिकाणीं आसक्त होऊं नये. कारण जसा पति, आपल्या स्त्रीस परपुरुषाच्या ठिकाणीं आसक्त झालेली पाहील तर खेद पावतो, तशी स्त्रीहि, आपल्या पतीस परस्त्रीच्या ठिकाणीं आसक्त असलेला पाहील तर खरोखर क्लेश पावेल. आणि असें होणें स्वाभाविक आहे, कारण सृष्टींत असा नियम आहे कीं, ज्याचा हक्क लुटिला जाईल त्यास खेद होतो. पतीचा हक्क पत्नीच्या ठिकाणीं आणि पत्नीचा हक्क पतीच्या ठिकाणीं असतो, तो जर इतराकडून हाणिला जाईल, तर क्लेशाची उत्पत्ति होईल

यांत कांहीं आश्चर्य नाहीं, करितां परस्त्रीच्या ठिकाणीं आसक्त झाल्यानें आपल्या घरामध्यें आपल्या स्त्रीचें मन आणि दुसऱ्याच्या घरामध्यें त्या स्त्रीच्या पतीचें मन दुखविल्याकारणानें दोन्ही ठिकाणीं क्लेश होतो. त्याचें कारण तो परस्त्रीगमन करणारा पुरुष ठरतो, करितां दोन्ही घरांमध्यें जिवंत असेपर्यंत स्त्रीपुरुषांच्या मनास जो विक्षेप होत रहातो त्याचा सर्व दोष त्यास लागतो. कोणाचेंहि कोणत्याहि प्रकारें अन्यायानें अहित करणें, हा दोष ह्मटला जातो. पुनः परस्त्रीगमन ही एका जातीची चोरी आहे, कारण परस्त्रीवर दुसऱ्याची सत्ता आहे व दुसऱ्याची सत्ता जीच्यावर असेल अशी वस्तु तीच्या मालकाची परवानगी घेतल्यावांचून आपल्या उपयोगांत आणणें ही चोरी ह्मटली जाते. चोरी करणारा जसा दंडास पात्र होतो, तसा परस्त्रीगमन करणाराहि शिक्षेस पात्र होतो. करितां कोणीहि परस्त्रीच्या ठिकाणीं आसक्त होऊं नये. कदाचित् मन स्वाधीन न राहील, तर त्यानें आपल्यावरून विचार करून पहावें कीं, कदाचित् अन्य पुरुष तुझ्या स्वतःच्या स्त्रीच्या ठिकाणीं आसक्त असेल तर तुला केवढें दुःख होईल ! अशा विचारानें मन स्वाधीन ठेवणें शक्य होतें. कारण दुसऱ्याशीं वर्तन करण्यामध्यें मनुष्य जर वारंवार आपली उपमा घेईल, तर कधींहि आड रस्त्यानें जाणार नाहीं. पुनः पुरुषांचें ह्मणणें असें आहे कीं, "व्यभिचार होण्याचें कारण स्त्रिया आहेत, कारण त्यांच्या हाव–भावांनीं पुरुषांस लालुच लागून ते फसून जातात." परंतु विचारदृष्टीनें पाहिलें असतां स्त्रिया कांहीं व्यभिचाराचें कारण दिसत नाहींत; कारण त्या जशा हाव–भावांनीं पुरुषांचें मन आकर्षण करितात, तसे पुरुषहि आपल्या चेष्टांनीं त्यांचें मन हरण करितात. हें तर दोघांमध्येंहि सारखेंच आहे. परंतु स्त्रिया केव्हांच पुरुषांची प्रार्थना करीत असलेल्या समजण्यांत आल्या नाहींत, आणि पुरुष तर त्यांची प्रार्थना करितात हें प्रसिद्धच आहे. यासाठीं व्यभिचार होण्याचें कारण पुरुषच आहेत. जर पुरुष आपलें मन स्वाधीन ठेवून स्त्रियांची प्रार्थना न करतील, तर कधींहि व्यभिचार होणार नाहीं; कारण स्त्रिया कधीं आपण होऊन पुरुषांची प्रार्थना करणार नाहींत.

कदाचित् एखाद्या पुरुषास पहिल्यापासून स्त्रीची प्राप्ति झाली नसेल, किंवा प्राप्त झाल्यानंतर मृत झाली असेल, व अद्यापि त्याची विषयवासना पूर्ण झाली नसेल, तर त्यानें जीच्यावर कोणाचीहि सत्ता नाहीं, अशा योग्य स्त्रीपाशीं जावें, कारण तिच्या जवळ गेलें असतां कोणाच्याहि हक्काचें नुकसान न झाल्यामुळें दोष लागत नाहीं. परंतु ज्या पुरुषाची घरामध्यें स्त्री असेल त्यानें तशा स्त्रीपाशींहि जाऊं नये, कारण तसें केल्यानें त्याच्या स्वतःच्या स्त्रीच्या हक्काचें नुकसान होतें; त्यामुळें त्यास दोष लागतो. करितां विधुर पुरुषानेंच इच्छा झाल्यास तशा स्त्रीपाशीं जावें, परंतु जीच्यावर दुसऱ्याची सत्ता आहे, अशा गृहस्थ स्त्रीची कधींहि त्यानें इच्छा करूं नये, कारण तसें केलें असतां लोकामध्यें निंदा होते. ज्याच्या हक्काचें नुकसान होईल त्याच्या अंतःकरणास क्लेश उत्पन्न करण्याचा दोष लागतो, आणि त्याच्या बाजूनें भय होण्याची शंका राहते. ह्मणून सांगितलें आहे कीं;

परदारा न गन्तव्या पुरुषेण विपश्चिता ।
यतो भवन्ति दुःखानि नृणां नास्त्यत्र संशयः ॥ २४४ ॥

बुद्धिमान् पुरुषानें परस्त्रीगमन करूं नये, कारण त्यामुळें अतिशय दुःख होतें, यांत संशय नाहीं ॥ २४४ ॥

परिहरतु पराङ्गनानुषङ्गमिदमति जीवितमस्ति वल्लभं चेत् ।
हरहर हरिणीदृशो निमित्तं दश दशकन्धरमौलयो लुठन्ति ॥२४५॥

पुनः ज्यास दीर्घकाल पर्यंत जीवन करण्याची इच्छा असेल, त्यानें परस्त्रीचा संबंध वर्ज करावा; कारण आहा! हरिणीसारख्या नेत्रांच्या सीतेनिमित्त रावणाचीं दहाहि मस्तकें पडलीं ॥ २४५ ॥

रहसि रचितमेतज्जारकर्मात्र नीचै-
र्लशुनमिव सुभुक्तं याति लोके प्रसिद्धिम् ।
तदिह सकलगर्ह्यं नैव विद्वान् विदध्यात्
क्षणिकसुखकृते स्याद्यत्प्रतिष्ठार्थनाशः ॥ २४६ ॥

नीच मनुष्यांनीं एकांतामध्यें केलेलें जारकर्म, खालील्या लक्षणीप्रमाणें लोकांमध्यें प्रसिद्धीस येतें, करितां शहाण्यानें सर्वलोकांनीं निंदित असें तें कर्म करूं नये; कारण क्षणमात्राच्या सुखासाठीं संपूर्ण प्रतिष्ठा आणि धन यांचा नाश होतो ॥ २४६ ॥

रक्षःपतिर्जनकजाहरणेन, वाली
तारापहारविधिना, स च कीचकोऽपि ।
पांचालिकाप्रमथनान्निधनं जगाम
तस्मात् कदापि परदाररतिं न कुर्यात् ॥ २४७ ॥

सीतेचें हरण केल्यामुळें रावण, तारेचा अपहार केल्यामुळें वाली, आणि द्रौपदीचा छळ केल्यामुळें कीचक मरण पावला; ह्मणून कधींहि परस्त्रीच्या ठिकाणीं प्रीति करूं नये ॥ २४७ ॥

पुनः सांगितलें आहे कीं,

अपसर मधुकर दूरं परिमलबहुलेऽपि केतकीकुसुमे ।
इह नहि मधुलवलाभो भवति परं धूलिधूसरं वदनम् ॥२४८॥

हे भ्रमरा ! केतकीच्या पुष्पामध्यें अतिशय सुगंध आहे, तथापि तूं तेथून दूर जा. कारण येथें तुला लेशमात्रहि पुष्परसाचा लाभ होणार नाहीं, परंतु उलट तुझें तोंड मात्र परागाच्या धूलीनें मलिन होईल ॥ २४८ ॥

पश्यति परस्य युवतीं सकाममपि तन्मनोरथं कुरुते ।
ज्ञात्वैव तदप्राप्तिं व्यर्थं मनुजो हि पापभाग् भवति ॥ २४९ ॥

परस्त्रीची प्राप्ति होणार नाहीं हें माहित असूनहि जो पुरुष तिच्याकडे चांकड्या नजरेनें पाहतो, आणि तिच्याविषयीं यथेच्छ मनोरथ करतो तो व्यर्थ पापभागी होतो ॥ २४९ ॥

करितां ज्यामुळें व्यभिचार होईल असें आचरण पहिल्यापासूनच सोडून द्यावें. मनुस्मृतीच्या ८ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

परस्त्रियं योऽभिवदेत्तीर्थेऽरण्ये वनेऽपि वा ।
नदीनां वापि संभेदे स संग्रहणमाप्नुयात् ॥ २५० ॥

पाणी नेण्याचा मार्ग, गांवाबाहेर असलेलें उपवन, अरण्य किंवा नद्यांचा संगम इतक्या ठिकाणीं जो पुरुष परस्त्रीशीं दुष्ट हेतूनें भाषण करतो तो व्यभिचार केल्याच्या दोषास पात्र होतो ॥ २५० ॥

**उपचारक्रिया केलिः स्पर्शो भूषणवाससाम् ।**
**सह खट्वासनं चैव सर्वं संग्रहणं स्मृतम् ॥ २५१ ॥**

परस्त्रीस गुप्त भेट देणें, तिच्याबरोबर हंसणें—बोलणें व क्रीडा करणें, तिच्या भूषणांस व वस्त्रांस स्पर्श करणें आणि तीच्यासह एका खाटेवर बसणें, या सर्वांची गणना व्यभिचारांत केली आहे ॥ २५१ ॥

**स्त्रियं स्पृशेददेशे यः स्पृष्टो वा मर्षयेत्तथा ।**
**परस्परस्यानुमते सर्वं संग्रहणं स्मृतम् ॥ २५२ ॥**

पुनः परस्त्रीच्या भलत्याच अंगास जर एकदां पुरुष स्पर्श करील, किंवा स्वतः तिनें केलेल्या स्पर्शास सहन करील, तर अशी परस्परांच्या अनुमोदनानें होणारी सर्व क्रिया व्यभिचार ह्मटली आहे ॥ २५२ ॥

हीं सर्व व्यभिचार होण्याचीं लक्षणें बहुतकरून एकांतावांचून बनूं शकत नाहींत, करितां कोणत्याहि स्त्रीशीं प्रथम एकांतच करूं नये. कदाचित् कांहीं कार्यप्रसंगीं एखाद्या स्त्रीस भेटणें असेल, तर आपल्याबरोबर दुसऱ्या कोणासहि घ्यावें, किंवा त्या स्त्रीच्याजवळ दुसरें कोणी बसलें असेल त्यावेळीं जावें; परंतु स्वतः एकट्यानेंच ती स्त्री एकटी बसली असेल तेथें जाऊं नये. कारण स्त्री—पुरुषांचें परस्पर आकर्षण लोह-लोह-चुंबकाप्रमाणें कांहीं विलक्षण प्रकारचें आहे. त्यामुळें तीं दोघेंहि कदाचित् शुद्ध असलीं, तथापि लोकनिंदेस पात्र होतात. चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**तप्ताङ्गारसमा नारी घृतकुम्भसमः पुमान् ।**
**तस्माद्वह्निं घृतं चैव नैकत्र स्थापयेद्बुधः ॥ २५३ ॥**

पेटणाऱ्या अग्नीसारखी स्त्री आणि तुपानें भरलेल्या घागरीसारखा पुरुष आहे; म्हणून शहाण्यानें या दोहोंस एके ठिकाणीं ठेवूं नये ॥ २५३ ॥

याकरितांच मनुस्मृतीच्या दुसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**मात्रा स्वस्रा दुहित्रा वा न विविक्तासनो भवेत् ।**
**बलवानिन्द्रियग्रामो विद्वांसमपि कर्षति ॥ २५४ ॥**

आई, बहीण किंवा मुलगी यांच्यासह एकांतामध्यें बसूं नये; कारण इंद्रियें बलिष्ठ असल्यामुळें विद्वानासहि विषयाकडे ओढून नेतात ॥ २५४ ॥

तसेंच चाणक्यनीतींतहि सांगितलें आहे कीं,

**न हि पश्यति जन्मान्धः कामान्धो नैव पश्यति ।**
**न पश्यति मदोन्मत्तः स्वार्थी दोषान्न पश्यति ॥ २५५ ॥**

जसें जन्मांधास दिसत नाहीं, तसेंच कामांध, मदांध आणि स्वार्थांध अर्थात् आपमतलवी लोकांसहि आपले दोष दिसत नाहीं ॥ २५५ ॥

**गृहासक्तस्य नो विद्या नो दया मांसभक्षिणः ।**
**द्रव्यलुब्धस्य नो सत्यं स्त्रैणस्य न पवित्रता ॥ २५६ ॥**

गृहासक्तास विद्या, मांस खाणाऱ्यास दया, द्रव्यलोभ्यास सत्य आणि स्त्रियांमध्यें वसणाऱ्यास पवित्रता असणें संभवनीय नाहीं ॥ २५६ ॥

इंद्रियें अतिशय बलिष्ठ असल्यामुळें स्वाधीन ठेवणें शक्य नाहीं. वृद्धपणामध्येंहि यद्यपि शरीराची शक्ति कमी झाली असतां कर्मेंद्रियें थकून गेल्याकारणानें त्यांच्याकडून क्रिया होऊं शकत नाहीं, तथापि ज्ञानेंद्रियांचें आपापल्या विषयांकडे आकर्षण बहुत वर्षांपर्यंत चालू राहतें. आणि ज्या वेळीं ज्ञानेंद्रियांची शक्ति कमी होते, त्या वेळीं मात्र मनाचेंहि विषयांकडे आकर्षण होतें. याप्रमाणें जीमध्यें शरीरांतील सर्व क्रिया कमी होत जाण्याचा स्वभाव आहे, अशा वृद्धावस्थेमध्येंहि इंद्रियांस बल असतें तर जीमध्यें शरीरांतील सर्व क्रिया वाढत जाणें स्वाभाविक आहे, अशा यौवनावस्थेमध्यें इंद्रियांस बल अधिक असेल यांत काय आश्चर्य ! यावरून असें दिसून येतें कीं, इंद्रियांचें आपापल्या विषयांकडे होणारें आकर्षण लोहचुंबकाप्रमाणें अतिशयच असतें. यासाठींच आर्यशास्त्रकारांनीं स्त्रियांशीं एकांत करण्याची सक्त मनाई केली आहे, व प्रजेच्छु तरुण विधवांकरितां पुनर्विवाह सांगितला आहे.

त्याविषयीं कृष्णयजुर्वेदाच्या तैत्तिरीयारण्यकांतील ६ व्या प्रपाठकाच्या प्रथम अनुवाकांत पुनर्विवाह करणाऱ्यानें मरणाऱ्यास सांगितलें आहे कीं,

**इयं नारी पतिलोकं वृणाना निपद्यत उप त्वा मर्त्य प्रेतम् ।**
**विश्वं पुराणमनुपालयन्ती तस्यै प्रजां द्रविणं चेह धेहि ॥ २५७ ॥**

हे मनुष्या, अनादि कालापासून चालत आलेल्या समग्र स्त्रीधर्मास क्रमानें पालन करणारी आणि पतिलोकास इच्छिणारी ही तुझी स्त्री, मरण पावलेल्या तुझ्याजवळ येऊन निजली आहे, तीस तूं या लोकामध्यें प्रजा आणि द्रव्य संपादण्याची आज्ञा दे ॥ २५७ ॥

पुनः त्यानें स्त्रीस सांगितलें आहे कीं,

**उदीर्ष्व नार्यभि जीवलोकमितासुमेतमुपशेष एहि ।**
**हस्तग्राभस्य दिधिपोस्त्वमेतत्पत्युर्जनित्वमभिसंबभूव ॥ २५८ ॥**

हे नारी, तूं या मरण पावलेल्या पतीजवळ निजली आहेस ती ऊठ, व जिवंत प्राणिसमूहास पाहून येथें ये; आणि या पुनः विवाह करण्याची इच्छा करणाऱ्या व तुझा हात धरणाऱ्या पतीची स्त्री हो ॥ २५८ ॥

पुनः स्वतः ब्राह्मणजाति असेल तर सांगितलें आहे कीं,

**सुवर्णहस्तादाददाना मृतस्य श्रियै ब्रह्मणे तपसे बलाय ।**
**अत्रैव त्वमिह वयं सुशेवा विश्वास्पृधो अभिमातीर्जयेम ॥ २५९॥**

हे स्त्री, तूं संपत्तीसाठीं, ब्राह्मण जातीसाठीं, कांतीसाठीं आणि शरीरबलासाठीं तुझ्या मरण पावलेल्या पुरुषाच्या हातांतून सुवर्ण ग्रहण करून या लोकांमध्यें रहा; व आपण सुखोपभोग घेत असतां आपली निंदा करणाऱ्या सर्व शत्रूंस जिंकूंया ॥ २५९ ॥

स्वतः क्षत्रियजाति असेल तर सांगितलें आहे कीं,

**धनुर्हस्तादाददाना मृतस्य श्रियै क्षत्रायौजसे बलाय ।**
**अत्रैव त्वमिह वयं सुशेवा विश्वास्पृधो अभिमातीर्जयेम ॥ २६० ॥**

हे स्त्री, तूं संपत्तीकरितां, क्षत्रिय जातीकरितां, कांतीकरितां आणि बलाकरितां, तुझ्या मरण पावलेल्या पुरुषाच्या हातांतील धनुष्य ग्रहण करून या

लोकामध्यें रहा; व आपण सुख भोगीत असतां आपली निंदा करणाऱ्या सर्व शत्रूंस जिंकूंया ॥ २६० ॥

स्वतः वैश्यजाति असेल तर सांगितलें आहे कीं,

**मणिं हस्तादाददाना मृतस्य श्रियै विशे पुष्ट्यै बलाय।**
**अत्रैव त्वमिह वयं सुशेवा विश्वास्पृधो अभिमातीर्जयेम॥ २६१ ॥**

हे स्त्री, तूं संपत्तीकरितां, वैश्य जातीकरितां, पुष्टीकरितां, आणि बलाकरितां, तुझ्या मरण पावलेल्या पुरुषाच्या हातांतील मणि ग्रहण करून या लोकीं रहा, आणि आपण सुख भोगीत असतां आपली निंदा करणाऱ्या सर्व शत्रूंस जिंकूंया ॥ २६१ ॥

तसेंच याज्ञवल्क्य मुनीनें सांगितलें आहे कीं,

**अक्षता वा क्षता चैव पुनर्भूः संस्कृता पुनः ॥ २६२ ॥**

पतीशीं समागम झालेल्या किंवा न झालेल्या ज्या विधवा स्त्रीचा पुनः लग्नसंस्कार करण्यांत येईल, ती पुनर्भू ह्मटली जाते ॥ २६२ ॥

पुनः पराशर मुनीनेंहि सांगितलें आहे कीं,

**नष्टे मृते प्रव्रजिते क्लीबे च पतिते पतौ।**
**पञ्चस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते ॥ २६३ ॥**

पति पुनः समाचार न येईल अशा रीतीनें पळून गेला असेल, मरून गेला असेल, संन्यास घेऊन निघून गेला असेल, नपुंसक निघाला असेल किंवा जातिभ्रष्ट झाला असेल, तर ह्मणजे या पांच प्रकारच्या आपत्तीच्या वेळीं स्त्रियांस दुसरा पति करण्यास सांगितला आहे ॥ २६३ ॥

परंतु याप्रमाणें गृहस्थाश्रमी होण्याच्या पूर्वीं उभयतां स्त्रीपुरुषांनीं परस्परांची योग्य अवस्था पहावी, कारण अयोग्य अवस्थांच्या स्त्री—पुरुषांची प्रीति नेहमीं राहत नाहीं, व शरीरासंबंधीं हानि होण्याचा संभव असतो. कारण सभातरंगांत सांगितलें आहे कीं,

**पाणौ गृहीताऽपि पुरस्कृताऽपि स्नेहेन नित्यं परिवर्द्धिताऽपि।**
**परोपकाराय भवेदवश्यं वृद्धस्य भार्या करदीपिकेव॥ २६४ ॥**

हातामध्यें ग्रहण केलेली, पुढें धरलेली आणि स्नेहेंकरून निरंतर वृद्धीस पोंचविलेली, अशा दीपिकेप्रमाणें, वृद्ध पुरुषाची स्त्री अवश्य परोपकाराकरितांच होईल ॥ २६४ ॥

कारण पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**शशिनीव हिमार्तानां घर्मार्तानां रवाविव ।**
**मनो न रमते स्त्रीणां जराजीर्णेन्द्रिये पतौ ॥ २६५ ॥**

चंद्राचे ठिकाणीं थंडीनें पीडित झालेल्यांचें आणि रवीच्या ठिकाणीं ऊष्म्यानें तप्त झालेल्यांचें मन जसें रमत नाहीं; तसें तरुण स्त्रियांचें मन जरेनें ज्यांचीं जीर्ण इंद्रियें झालीं अशा पतीच्या ठिकाणीं रमत नाहीं ॥ २६५ ॥

**अनभ्यासे विषं शास्त्रमजीर्णे भोजनं विषम् ।**
**क्षुधितस्य विषं गोष्ठी तरुण्याः स्थविरो विषम् ॥ २६६ ॥**

कारण अभ्यासाशिवाय शास्त्र, अजीर्ण झालें असतां भोजन, भुकेलेल्यास गोष्टी आणि तरुणी स्त्रीस वृद्ध पति विषतुल्य वाटतात ॥ २६६ ॥

याप्रमाणें स्त्री–पुरुषांनीं परस्पर वागून संसारांत हयात असेपर्यंत मिळून मिसळून रहावें. त्यामध्यें प्रजा उत्पन्न झाली तर तीस चांगल्या रीतीनें पालन–पोषण करून विद्याभ्यास शिकवावा. पूर्ण वयांत लग्न झाल्यानंतर एक किंवा दोन वर्षांच्या आंत प्रजा उत्पन्न झाली पाहिजे. कारण जशी पूर्ण अवस्थेमध्यें आलेल्या नारीजातीच्या पशु–पक्ष्यादि प्राण्यांस, त्यांच्या नरजातीच्या संयोगानें प्रजा झाल्यावांचून राहत नाहीं, तशी पूर्ण वयांत आलेल्या स्त्रीसहि पूर्णावस्थेंत आलेल्या पुरुषाचा संयोग झाला असतां प्रजा उत्पन्न झाल्यावांचून राहणार नाहीं. परंतु पशु–पक्ष्यादि प्राण्यांमध्यें सृष्टिनियम चांगल्या रीतीनें सांचविला आहे, कारण योग्य अवस्थेमध्यें आल्यानंतर ऋतु प्राप्त झाला असतां त्यांचा संयोग होतो; अयोग्य कालीं त्यांच्यामध्यें संयोगाची इच्छा झालेली पाहण्यांत येत नाहीं. त्यामुळें वेळोवेळीं त्यांस प्रजा उत्पन्न होत असते. कोणासच कांहीं शरीरसंबंधीं

कारणानें तसें होत नाहीं. याचप्रमाणें मनुष्यामध्यें जर सृष्टिनियम सांचविलेले असतील तर प्रजा उत्पन्न झाल्यावांचून राहणार नाहीं. यौवनावस्था प्राप्त झाल्यानंतर जर स्त्री–पुरुष लग्न करतील आणि नेहमीं ऋतुगामी राहतील, तर ते आपल्या वीर्याचें रक्षण झाल्यामुळें शरीरानें सुदृढ होतील, व दीर्घ आयुष्य भोगूं शकतील, आणि त्यांची प्रजाहि फार चांगली निपजेल यांत कांहीं संशय नाहीं. एखादाच कोणी तरी कांहीं शरीसंबंधीं कारणानें प्रजा झाल्यावांचून राहील. परंतु जे या नियमांचें उल्लंघन करून यथेच्छ वर्तन करतील, अर्थात् यौवनावस्था प्राप्त होण्यापूर्वीं लग्न करतील व अयोग्यकालीं संग करतील, तर ते आपलें वीर्य क्षीण झाल्यामुळें शरीरानें दुर्बल होतील व दीर्घकालपर्यंत जिवंत राहूं शकणार नाहींत. पुनः कच्चें बीज जसें उगवत नाहीं, कदाचित् अर्धकच्चें पिकलें असेल व उगवेल तर उगवल्यानंतर नाश होऊन जातें, परंतु वृक्ष होत नाहीं, तसें बहुत करून त्यांचें वीर्य कच्चें असल्यामुळें त्यांस प्रजा होणार नाहीं, व कदाचित् झालीच तर दीर्घकाल जिवंत राहणार नाहीं; व राहिलीच तर नेहमीं अशक्त असणार, यांत कांहीं संशय नाहीं. कारण तीच्या मातापितरांच्या शरीरांचें वय अतिशय लहान असतें, त्यामुळें तींहि दुर्बल असतात. विवाहित प्रत्येक दंपतीस संततीची इच्छा होणें स्वाभाविक आहे, कारण कोणतीहि क्रिया केली असतां तीच्या फलाची इच्छा सर्वांस असते. तसेंच स्त्री–पुरुषांच्या संयोगरूप क्रियेचें फल यद्यपि आपाततः आनंदरूप आहे असें वाटतें, तथापि वास्तविक रीतीनें पाहिलें असतां अरणीच्या दोन काष्ठांनीं मंथन केलें असतां त्या क्रियेचें जसें अग्निरूप फल सर्वप्रत्यक्ष आहे, तसेंच स्त्री-पुरुषांच्या संयोगजन्य क्रियेचें संतानरूप फल सर्वप्रत्यक्ष आहे. कारण आनंदाची प्राप्ति तर होईलच, तथापि संतान होण्याची इच्छा कायम राहते. प्रयोजनावांचून कोणत्याहि क्रियेचा आरंभ होत नाहीं. करितां क्रिया निष्फळ झाली असतां जसा तीच्या कर्त्यास खेद होतो, तसा संतान न झालें तर दंपतीस खेद होतो. त्यांच्या मनास एक क्षणभरहि चैन पडत नाहीं, व सदासर्वकाळ त्यांच्या मनामध्यें हाच विचार येतो कीं, अद्यापि

संतानाची प्राप्ति झाली नाहीं ! जसजसे ते सुहृत्संबंधी आणि शेजारी वगैरे दुसऱ्यांच्या घरीं संतान झालेलें ऐकतात, तसतसी त्यांची तें आपल्या येथें होण्याविषयींची इच्छा अधिकाधिक बळावत जाते. आपल्या येथें संतान न झाल्यानें अखेरीस ते दुसऱ्यांच्या लेंकरांवर प्रेम करूं लागतात, कारण बालक सर्वांस प्रिय वाटतें, व त्याचे ते बोबडे बोबडे शब्द ऐकून इतका आनंद होतो कीं, तितका आनंद इतर कशानेंहि होत नाहीं. कल्पतरु ग्रंथांत सांगितलें आहे कीं,

आनन्दस्रुतिरात्मनो नयनयोरन्तःसुधाभ्यञ्जनं
प्रस्तारः प्रणयस्य मन्मथतरोः पुष्पं प्रसादो रतेः ।
आलानं हृदयद्विपस्य विषयारण्येषु संचारिणो-
र्दम्पत्योरिह लभ्यते सुकृततः संसारसारोऽर्भकः ॥ २६७ ॥

मनास आनंद देणारा, डोळ्यांस लावलेल्या अमृतरूप अंजनाप्रमाणें थंडगार, स्नेहाचें स्थान, कामदेवरूप वृक्षाचें पुष्प, रतीचा प्रसाद, विषयरूप अरण्यामध्यें संचार करणाऱ्या अंतःकरणरूप हत्तीस बांधून ठेवण्याचा स्तंभ, आणि संसारामध्यें साररूप, असा बालक माता-पित्यांस या लोकामध्यें पुण्याईनें—सृष्टिनियम बरोबर पाळिल्यानें—प्राप्त होतो ॥ २६७ ॥

करितां ज्यांस अपत्यें होत नसतील, त्यांनीं आपल्या शरीरासंबंधीं जी कांहीं उणीव असेल ती सुधारण्याविषयीं प्रयत्न करावा. जसें पृथ्वींत लाविलेलें बीज न उगवण्यामध्यें कांहीं तरी कारण असतें, तसें पुरुषाच्या वीर्यरूप बीजासहि स्त्रीच्या गर्भाशयरूप क्षेत्रांत धारण न होण्यामध्यें कांहीं तरी शरीरासंबंधीं कारण असलें पाहिजे. कारण सृष्टींत असा नियम आहे कीं, कारणावांचून कार्य होत नाहीं. करितां ज्या ज्या कारणांमुळें गर्भधारण होत नसेल, तीं तीं कारणें कुशल वैद्याची संमति घेऊन वैद्यशास्त्रोक्त औषधोपचारांनीं व पथ्यांनीं दूर करावीं, त्यामुळें प्रजा होण्याचा संभव असतो. कारण सांगितलें आहे कीं,

पूर्णषोडशवर्षा स्त्री पञ्चविंशेन संगता ।
शुद्धे गर्भाशये मार्गे रक्ते शुक्रेऽनिले हृदि ॥ २६८ ॥

२५ वर्षांच्या पुरुषाशीं समागम करणारी पूर्ण १६ वर्षांची स्त्री, जर गर्भाशय, प्रसूतिमार्ग, रुधिर, वीर्य, वायु आणि हृदय शुद्ध असेल ॥ २६८ ॥

वीर्यवन्तं सुतं सूते ततो न्यूना द्वयोः पुनः ।
रोग्यल्पायुरधन्यो वा गर्भो भवति नैव वा ॥ २६९ ॥

–तर बलवान् पुत्र उत्पन्न करील, परंतु त्यांहून कमी वर्षांचे स्त्री–पुरुष असतील, तर त्यांस गर्भ रोगी, अल्पायुषी आणि कुरूप होईल, किंवा होणारच नाहीं ॥ २६९ ॥

आतां गर्भधारण झाल्यानंतर कदाचित् तो अकालीं स्रवून जातो, कुशींत सुकून जातो, मेलेला निपजतो, किंवा कदाचित् जन्मल्यानंतर मरून जातो; त्यांतहि शरीरासंबंधीं रोग किंवा कुपथ्याचरणरूप कांहींतरी कारण असतें. कांकीं कारण असेल तरच कार्य होतें, हा सृष्टीचा नियम आहे. करितां कुशल वैद्याची सल्ला घेऊन ज्या रीतीनें तसें न होईल त्या रीतीनें आचरण करावें; त्यामुळें प्रजावान् होतां येतें, व तसें झालें असतां कामाची शांति होऊन संतोषाची प्राप्ति होते. गर्भधारण झाल्यानंतर त्याच्या रक्षणासाठीं गर्भिणी स्त्रीनें सर्व आहार–विहारांमध्यें नियमितपणानें राहिलें पाहिजे, याविषयीं वाग्भट्टानें आपल्या अष्टांगहृदय ग्रंथाच्या शारीरस्थानांतील प्रथमाध्यायांत सांगितलें आहे कीं,

अतिव्यवायमायासं भारं प्रावरणं गुरु ।
अकालजागरस्वप्नकठिनोत्कटकासनम् ॥ २७० ॥

गर्भिणी स्त्रीनें अतिशय मैथुन, अतिशय मेहनत, पुष्कळ ओझें, अतिशय जड वस्त्र, भलत्याच वेळीं जागरण करणें किंवा झोंप घेणें, कठिण आणि विषम आसनावर वसणें,–॥ २७० ॥

शोकक्रोधभयोद्वेगवेगश्रद्धाविधारणम् ।
उपवासाध्वतीक्ष्णोष्णगुरुविष्टम्भि भोजनम् ॥ २७१ ॥

शोक, क्रोध, भय आणि उद्वेग यांचा वेग, अहिताची इच्छा, उपवास, मार्ग आणि कडवें, उष्ण, गुरु–पचनास जड, आणि विष्टंभि–अवरोधकारक भोजन,–२७१

रक्तं निवसनं श्वभ्रकूपेक्षां मद्यमामिषम् ।
उत्तानशयनं यच्च स्त्रियो नेच्छन्ति तत्त्यजेत् ॥ २७२ ॥

लाल वस्त्र, खड्ड्यांत व विहिरींत पाहणें, मद्यपान, मांसाशन, उताणें झोंपणें आणि जें अनुभवी स्त्रिया निषेध करतील तें,– ॥ २७२ ॥

तथा रक्तस्रुतिं शुद्धिं बस्तिमामासतोऽष्टमात् ।
एभिर्गर्भः स्रवेदामः कुक्षौ शुष्येन्म्रियेत वा ॥ २७३ ॥

तसेंच रक्त काढवून घेणें, शरीरशुद्धीकरितां उलटी किंवा जुलाब घेणें, आणि आठव्या महिन्यापर्यंत वस्तिकर्म, इतक्या गोष्टी टाकाव्या; कारण यांमुळें गर्भ कच्चा स्रवून जाण्याचा, कुशींत सुकून जाण्याचा, किंवा मरून जाण्याचा संभव आहे ॥ २७३ ॥

या प्रमाणें गर्भिणी स्त्रीनें नियम पाळिले असतां सहन होईल त्या रीतीनें हिंडत फिरत रहावें, एके ठिकाणीं पडून राहूं नये; कारण पडून राहिल्यानें शरीराच्या सर्व अवयवांमध्यें जडता उत्पन्न होते, ती तीस आणि तीच्या गर्भास प्रसूतिकाळीं हानिकारक होते. गर्भधारण झाल्यानंतर स्त्रीस जीं लक्षणें होतात तीं याच ग्रंथकारानें पूर्वोक्त ठिकाणींच याप्रमाणें सांगितलीं आहेत:–

लिङ्गं तु सद्योगर्भाया योन्यां बीजस्य संग्रहः ।
तृप्तिर्गुरुत्वं स्फुरणं शुक्रास्रानुबन्धनम् ॥ २७४ ॥

गर्भ धारण करणाऱ्या स्त्रीस त्याचवेळीं गर्भाशयामध्यें बीजाचा संग्रह, तृप्ति, जाड्य, स्फूर्ति, जननेंद्रियापासून शुक्र व शोणित बाहेर न निघणें, ॥ २७४ ॥

हृदयस्पन्दनं तन्द्रा तृड्ग्लानिर्लोमहर्षणम् ।
अव्यक्तः प्रथमे मासि सप्ताहात् कलली भवेत् ॥ २७५ ॥

–हृदयामध्यें कंप, सुस्ती, तृषा, थकवा आणि रोमांच, इतकीं लक्षणें होतात. नंतर तो गर्भ पहिल्या महिन्यामध्यें ७ दिवस झाल्यानंतर व्यक्त न होईल अशा रीतीनें कललरूप अर्थात् मृदु ग्रंथिरूप होतो ॥ २७५ ॥

**द्वितीये मासि कललाद्घनो व्यक्तस्य लक्षणम् ।**
**क्षामता गरिमा कुक्षौ मूर्च्छा छर्दिररोचकः ॥**
**जृम्भा प्रसेकः सदनं रोमराज्याः प्रकाशनम् ॥ २७६ ॥**

व त्यांतून दुसऱ्या महिन्यामध्यें कठिण गांठ बनते, आणि स्पष्ट झालेल्या गर्भानंतरचीं लक्षणें स्त्रीस अशक्तता, कुशींत जडपणा, वांति, अरुचि, जांभई, पाणी पडणें, अथवा रोमावलीचा प्रकाश,—॥ २७६ ॥

**अम्लचेष्टा स्तनौ पीनौ सस्तन्यौ कृष्णचूचुकौ ।**
**पादशोथो विदाहोऽन्ये श्रद्धाश्च विविधात्मिकाः ॥ २७७ ॥**

आंबट खाण्याची इच्छा, स्तनांचा मोठेपणा, त्यांमध्यें दूध उत्पन्न होणें, आणि त्यांचे अग्रभाग श्यामवर्ण होणें, पायांस सूज येणें, शरीरांत दाह होणें, आणि अनेक प्रकारची इच्छा होणें, इतक्या गोष्टी होतात ॥ २७७ ॥

**व्यक्तीभवति मासेऽस्य तृतीये गात्रपञ्चकम् ।**
**मूर्द्धा द्वे सक्थिनी बाहू सर्व सूक्ष्माङ्गजन्म च ॥ २७८ ॥**

नंतर तिसऱ्या महिन्यामध्यें गर्भास मस्तक, दोन ऊरू आणि दोन बाहू अशीं पांच अंगें, आणि दुसऱ्या सूक्ष्म अंगांचा आकार होतो ॥ २७८ ॥

**गर्भस्य नाभौ मातुश्च हृदि नाडी निबध्यते ।**
**यया स पुष्टिमाप्नोति केदार इव कुल्यया ॥ २७९ ॥**

आणि यदृच्छेनें गर्भाची नाभि व मातेचें हृदय यांस एक नाडी बांधिली जाते; त्या द्वारानें मातेनें खाल्लेल्या अन्नाचा रस मिळाल्यानें, पाटाच्या द्वारानें जाणाऱ्या पाण्यानें शेतांतील वनस्पतीप्रमाणें तो पोषण केला जातो ॥२७९॥

**चतुर्थे व्यक्तताऽङ्गानां चेतनायाश्च पञ्चमे ।**
**षष्ठे स्नायुशिरारोमबलवर्णनखत्वचाम् ॥ २८० ॥**

नंतर चवथ्या महिन्यामध्यें गर्भाचीं सर्व अंगें, पांचव्या महिन्यामध्यें चैतन्य आणि सहाव्या महिन्यामध्यें स्नायु, शिरा, रोम, बल, वर्ण, नखें आणि चामडी स्पष्ट होतात ॥ २८० ॥

सर्वैः सर्वाङ्गसंपूर्णो भावैः पुष्यति सप्तमे ।
ओजोऽष्टमे संचरति मातापुत्रौ मुहुः क्रमात् ॥ २८१ ॥

नंतर सातव्या महिन्यामध्यें सर्वांगसंपन्न गर्भ सर्व रीतीनें पोषिला जातो, आणि आठव्या महिन्यामध्यें माता–पुत्रांस क्रमानें वारंवार सर्व धातूंचें तेज प्राप्त होतें ॥ २८१ ॥

तस्मिंस्त्वेकाहयातेऽपि कालः सूतेरतः परम् ।
वर्षाद्विकारकारी स्यात् कुक्षौ वातेन धारितः ॥ २८२ ॥

आणि आठ महिने पूर्ण झाल्यानंतर नवव्या महिन्याच्या पहिल्या दिवसापासून तों वर्षापर्यंत प्रसूतीचा काल सांगितला आहे, आणि त्यानंतर वायूच्या योगें जो गर्भ कुशींत राहतो, तो विकार करणारा होतो ॥ २८२ ॥

प्राक्चैव नवमान्मासात्सूतिकागृहमाश्रयेत् ।
देशे प्रशस्ते संभारैः संपन्नं साधकेऽहनि ॥ २८३ ॥

करितां गर्भिणी स्त्रीनें नववा महिना सुरू होण्याचे पूर्वींच चांगल्या ठिकाणीं बांधलेलें आणि प्रसूतीच्या वेळीं पाहिजे त्या वस्तू ज्यामध्यें तयार करून ठेविलेल्या असतील, अशा सूतिकागृहामध्यें योग्य दिवशीं वास करावा ॥२८३॥

तत्रोदीक्षेत सा सूतिं सूतिकापरिवारिता ।
अद्यश्वःप्रसवे ग्लानिः कुक्ष्यक्षिश्लथता क्लमः ॥ २८४ ॥

तेथें तिनें ज्यांनीं पुष्कळ वेळ प्रसूतीचा अनुभव घेतलेला असेल आणि त्यावेळेच्या व्यवहारामध्यें ज्या कुशल असतील अशा दायी जवळ ठेवून प्रसूत होण्याची वाट पहावी; आणि आज उद्यां प्रसव होण्याचा असेल, तर तीस ग्लानि, कुशीची आणि नेत्रांची शिथिलता, थकवा,–॥ २८४ ॥

अधोगुरुत्वमरुचिः प्रसेको बहुमूत्रता ।
वेदनोरूदरकटिपृष्ठहृद्बस्तिवंक्षणे ॥ २८५ ॥

खालच्या भागामध्यें जडता, अरुचि, पाणी स्रवणें, बहुमूत्रता, उरू, उदर, कटि, पृष्ठ, हृदय, बस्ति आणि ऊरुमूल यांचे ठिकाणीं वेदना,–॥ २८५ ॥

योनिभेदरुजातोदस्फुरणस्रवणानि च ।
आवीनामनुजन्मातस्ततो गर्भोदकस्रुतिः ॥ २८६ ॥

आणि जननेंद्रियाचे ठिकाणीं भेद, पीडा, व्यथा, स्फुरण आणि स्रवण होतें, व नंतर प्रसवशूल उत्पन्न होऊन गर्भोदक स्रवतें ॥ २८६ ॥

याप्रमाणें झाल्यानंतर बालक जन्मतें. त्यास जन्म देण्यापूर्वीं गर्भिणी स्त्री प्रसवाच्या वेदनेनें अतिशय क्लेश पावते, तीस जवळ असलेल्या दायी स्त्रीनें धैर्य आणि हिम्मत देत जावी. नंतर बालकाचा जन्म झाला कीं, त्वरित दायीनें आणि ज्यांस पुष्कळ मुलें झालीं असतील अशा अनुभवी परंतु शहाण्या स्त्रियांनीं त्या दोघांस अतिशयच खबरदारीनें सांभाळणें अवश्य आहे. कारण त्यावेळीं प्रसवाच्या वेदनेनें तीं दोघेंजण इतकीं थकून दुर्बळ होऊन गेलेलीं असतात कीं कोणत्याहि प्रकारचा मिथ्योपचार त्यांस त्वरित हानिकारक होतो. नंतर दीड महिनापर्यंत प्रसूत झालेल्या स्त्रीस शरीरासंबंधी योग्य जे उपचार करावयाचे असतील, ते कुशल वैद्य आणि अनुभवी स्त्रिया यांच्या सल्ल्याप्रमाणें करावे; व आहारहि तीस योग्य जो सांगितला असेल, तो द्यावा. कोणत्याहि प्रकारचें तीस विरुद्धाचरण करण्यास देऊं नये, व कांहींहि तीच्या शरीरास असहन होईल, अशा प्रकारचें तिच्याशीं आचरण करूं नये. कारण याच ग्रंथकारानें पूर्वोक्त ठिकाणींच सांगितलें आहे कीं,

यत्नेनोपचरेत्सूतां दुःसाध्या हि तदामयाः ।
गर्भवृद्धिप्रसवरुक्क्लेदास्रस्रुतिपीडनैः ॥ २८७ ॥

प्रसूत झालेल्या स्त्रीस आहारादि उपचार करण्यामध्यें अतिशय सावधगिरी ठेवावी, कारण गर्भाची स्थिति, वृद्धि, प्रसव, त्यासंबंधी शूल आणि पाणी व रुधिर यांचा स्राव इत्यादिक पीडा झाल्यामुळें तीचा रोग सहज थांवत नाहीं ॥ २८७ ॥

एवं च मासादध्यर्धान्मुक्ताहारादियन्त्रणा ।
गतसूताभिधाना स्यात् पुनरार्तवदर्शनात् ॥ २८८ ॥

याप्रमाणें दीड महिनापर्यंत खबरदारी ठेवल्यानंतर खाण्या–पिण्याची जीस योग्य मोकळीक मिळाली आहे, अशी ती स्त्री पुन: रजोदर्शन होईल, त्यावेळीं बाळंतपणापासून मुक्त होते ॥ २८८ ॥

तरीहि बाळंत झाल्यानंतर चार महिनेपर्यंत ती बरोबर मुक्त होत नाहीं असें समजावें. आतां जसा बालकास जन्म देणाऱ्या स्त्रीचा सांभाळ करणें जरूरीचें आहे, तसेंच जन्मलेल्या बालकाचाहि सांभाळ ठेवणें अतिशय जरूरीचें आहे. कारण त्याचें शरीर कच्चें असतें, तें जर बरोबर सांभाळ न केला तर कच्च्या घड्याप्रमाणें हानीस प्राप्त होतें. बालकाच्या आरोग्याचा सर्व आधार त्याच्या आईवर आहे, कारण तीचें दूध पिऊनच तें आपला आहार मिळवितें. जो जो पदार्थ आईच्या खाण्यामध्यें येतो, त्या त्या पदार्थाचे गुण–दोष तीच्या दुधामध्यें येतात, व तें दूध बालकाच्या पिण्यामध्यें आल्यानें त्याच्या शरीरांत ते ते गुण–दोष प्राप्त होतात. करितां मातेनें कुशल वैद्य आणि अनुभवी असून शहाण्या स्त्रियांच्या सल्ल्याप्रमाणें बालकास गुण करतील अशा पदार्थांचाच आहार करावा, परंतु अवगुण करतील असे पदार्थ खाण्याची इच्छाच करूं नये. कारण बालकास सुखी पाहून आईबाप प्रसन्न राहतात, व दु:खी असलेला पाहून क्लेश पावतात. पशु–पक्ष्यांमध्येंहि असें पाहण्यांत येतें. यावरून असें दिसून येतें कीं, सृष्टींत असा स्वभावच आहे. करितां पहिल्यापासूनच आईबापांनीं बालकांसाठीं अशा रीतीनें वागलें पाहिजे कीं, मागाहून त्यांस पश्चात्ताप करावा लागूं नये. आरंभीं बालकाचें शरीर कोमल असल्यामुळें त्याचीं इंद्रियेंहि कोमल असतात, त्यामुळें त्यास कांहीं विशेष समजूत असत नाहीं. केवळ दूध प्यावें, झोंपावें आणि मल–मूत्राचा त्याग करावा, इतकेंच तें स्वभावत: करूं शकतें, व कांहीं दु:ख होत असेल तर रडतें, परंतु काय होतें तें जाणूं शकत नाहीं. यावरून बालक एकदम परतंत्र भासतें, करितां आईबापांनीं त्याचें चांगल्या रीतीनें रक्षण करावें. त्यास वेळेवर दूध पाजावें, झोंपवावें, मल–मूत्र केलीं असतील तर स्वच्छ करावें, रडत असेल तर त्याचें कारण शोधून काढून त्याचा उपाय करावा; त्याचा

झोंपण्याचा बिछाना, त्यावर अंथरण्याचीं वस्त्रें आणि त्याचे आंगांत घालण्याचे सर्व कपडे लहान, स्वच्छ, मृदु आणि सुगंधी ठेवावे. केव्हांहि मलिन, घामाचे, बारीक जंतू ज्यांत पडले असतील असे आणि मलमूत्रांनीं भरलेले ठेवूं नयेत, कारण तसे ठेविल्यानें त्याच्या आरोग्यास हानि होते. करितां कदाचित् अधिक नसतील तर वारंवार चांगल्या रीतीनें धुवून सुकवून तेच पुनः वापरावे. अनेक जातींचे पक्षी आणि उंदरांसारखे लहान लहान प्राणीहि आपल्या पोरांकरितां जागा अतिशयच स्वच्छ करून ठेवितात. हे उंदिर तर संधि सांपडल्यास गृहस्थांचे सुंदर रेशमी किंवा सुती कपडे तोडून घेऊन जाऊन ते आपल्या पोरांकरितां तयार केलेल्या जागेवर आंथरतात ! पुष्कळांच्या पाहण्यामध्यें असें आहे कीं, उंदीर विनाकारण कपडे तोडून खातात. परंतु तसें नाहीं, त्यांत सांगितल्याप्रमाणें कारण राहिलेलें आहे. कारण सृष्टींत असा स्वभाव आहे कीं, प्रयोजनावांचून प्रवृत्ति होत नाहीं. ज्यांच्या पाहण्यांत उंदरांचें राहण्याचें स्थान आलें असेल, त्यांस हें लगेच समजून आलें असेल. पशुपक्ष्यादि सर्व प्राणी आपल्या पोरांस सांभाळण्यांत अतिशयच काळजी घेतात. त्यांत पक्षी बाहेर फिरण्यास निघून जेथून मिळेल तेथून कच्चा–पक्का आहार मिळवून स्वतः खाण्याच्या ऐवजीं आपल्या चोंचींत भरून घेऊन घरट्यामध्यें बसलेल्या बच्चांच्या कोमल मुखांत देतात; ते जेथपर्यंत बच्चे मोठे झाले नाहींत तेथपर्यंत तसें करतात व मागाहून स्वतः खातात. बच्चे मोठे होतांच त्यांस आपल्या रीतीप्रमाणें उडण्यास, बोलण्यास आणि चारा खाण्यासाठीं बाहेर फिरण्यास शिकवितात. याचप्रमाणें सर्व अन्यजातींचे प्राणीहि आपल्या पिलांस आपापल्या रीतीप्रमाणें पोषण करून मोठीं करतात; असें शोधक पुरुषांच्या समजण्यामध्यें वारंवार आलेलें आहे. जर मनुष्य प्राण्याहून ज्ञानामध्यें अतिशयच कमी असणारे प्राणी याप्रमाणें आपल्या बच्चांचें पोषण करण्याविषयीं नेहमीं तत्पर असतात, तर मनुष्यानें तर अवश्य असलें पाहिजे. बालकाचें शरीर जसजसें वृद्धि पावत जातें, तसतसीं त्याचीं इंद्रियेंहि अधिक बलवान् होत गेल्यानें त्यास दिवसेंदिवस अधिक समजूत येत

जाते. तीन चार महिन्यांमध्यें त्यास समजूत आलेली दिसते. कारण त्यावेळेपासून त्याच्या हातामध्यें कांहीं दिलें असतां तें ग्रहण करतें, दटाविलें असतां रडतें, व खेळविलें असतां हंसतें. बहुतकरून सहा महिनेपर्यंत बालक निरोगी असतें. नंतर दांत येण्यास सुरवात झाल्यापासून त्यांच्या पीडेनें त्यास वारंवार ताप, खोकला, परसाकडणें, पडसें आणि केसतोड वगैरे रोग होतात. त्यांच्यावर कुशल असून अनुभवी वैद्याच्या सल्ल्याप्रमाणें त्याच्या आईबापांनीं धैर्यानें उपाय करणें योग्य आहे. जोंपर्यंत दांत येण्यास सुरवात झाली नाहीं तोंपर्यंत बालक केवळ दूध पिण्याच्या योग्य दिसतें, कारण अन्न चावण्याचें साधन दांत आहेत, ते येऊं लागल्यापासूनच बालकाचा जठराग्नि अन्न पचविण्यास योग्य होत जातो, असें अनुमान केलें जातें. करितां तेव्हांपासून दूध पाजण्याचें चालू ठेवून थोडें थोडें पचूं शकेल असें पौष्टिक पण मृदु अन्न बालकास भरवीत जावें; परंतु जड अन्न कधीं भरवूं नये, कारण त्याचा जठराग्नि तें पचविण्याच्या योग्य नसल्यामुळें त्यास अजीर्णादि रोग उत्पन्न होतात. बालकास मारूं नये, तसाच त्रासहि पोंचवूं नये, कारण त्याचें शरीर कोमल असल्यामुळें त्याचें हृदय मेंदू आणि त्याचीं सर्व इंद्रियेंहि कोमल असतात, त्यामुळें भय पावतांच तें एकाएकीं अलक्षित हानीस प्राप्त होतें. पुनः जसजशी बालकास समजूत येत जाईल, तसतसे त्याचेसमोर अपशब्द बोलूं नयेत, तर चांगली वाणी बोलावी, कारण तें अनुकरण करणारें असल्यानें जसें ऐकतें तसें बोलण्यास शिकतें. पुनः बालकाचें नांव ठेवावयाचें तेंहि शुभसूचक ठेवावें, अशुभसूचक ठेऊं नये, कारण अशुभसूचक नांव उच्चारिलें असतां मनास क्लेश होतो. याप्रमाणें बालकाच्या संगोपनांत जरी नेहमीं स्त्री–पुरुषांनीं दोघांनींहि तत्पर रहावें, तथापि मुख्यत्वेंकरून हें काम स्त्रीचें आहे. कारण पुरुषास बाहेरच्या व्यवसायांत पडावें लागतें, त्यामुळें तो अधिक वेळ घरांत राहूं शकत नाहीं, आणि स्त्रीस तर घरचें काम असल्यानें ती घरांत राहूं शकते. शिवाय बालक स्त्रीपासूनच उत्पन्न होतें, व तीचेंच दूध पिऊन तें आपला आहार

मिळवितें. त्यावरून असें दिसून येतें कीं, बालकास संभाळण्याचें काम स्त्रीचें आहे. परंतु पुरुषानें त्यांत पूर्ण मदतगार झालें पाहिजे. मनुस्मृतीच्या आठव्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

उत्पादनमपत्यस्य जातस्य परिपालनम् ।
प्रत्यहं लोकयात्रायाः प्रत्यक्षं स्त्रीनिबन्धनम् ॥ २८९ ॥

अपत्य उत्पन्न करणें, उत्पन्न झाल्यानंतर त्याचें पालन करणें, आणि प्रतिदिवशीं घरचें कामकाज करण्यामध्यें तत्पर असणें, हें प्रत्यक्ष स्त्रीचें काम आहे ॥ २८९ ॥

बालकास दातांची व दाढांची पीडा बहुतकरून पांच वर्षें पर्यंत वारंवार होते, त्यामुळें तेथपर्यंत तो अशक्त असतो. त्यानंतरच्या येणाऱ्या दाढा कांहीं विशेष पीडा करीत नाहींत, ह्मणजे तेव्हांपासून त्याचें शरीर दृढ होत गेल्यानें तो विवेक शिकविण्यास योग्य होतो. याविषयीं चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

लालयेत् पञ्च वर्षाणि दश वर्षाणि ताडयेत् ।
प्राप्ते तु षोडशे वर्षे पुत्रे मित्रवदाचरेत् ॥ २९० ॥

पुत्राचें पांच वर्षांपर्यंत लालन करावें, दहावर्षांपर्यंत उपदेश द्यावा, आणि सोळा वर्षांचा झाल्यापासून त्याच्याशीं मित्राप्रमाणें वागावें ॥ २९० ॥

लालनाद्बहवो दोषाः शिक्षणाद्बहवो गुणाः ।
तस्मात् पुत्रं च शिष्यं च शिक्षयेन्नतु लालयेत् ॥ २९१ ॥

लाड केल्यानें अतिशय हानि होते व उपदेश दिल्यानें अतिशय लाभ होतो; करितां पुत्र आणि शिष्य यांस पांच वर्षांनंतर उपदेश द्यावा परंतु केवळ लाड करूं नयेत ॥ २९१ ॥

जरी आठ वर्षांच्या वयापूर्वीं बालक बरोबर विद्याभ्यास करण्यास योग्य नाहीं, कारण त्याची बुद्धि इतक्या वयांत शिकविलेलें धारण करण्यास समर्थ होत नाहीं, त्यामुळें आठ वर्षांच्या वयापासून तों वीस वर्षांच्या वयापर्यंतचा बारा वर्षांचा काल विद्याभ्यास करण्याकरितां सांगितला आहे, तथापि बालकास

पांच वर्षांपासूनच समजूत येऊन तो घरामध्यें अनेक रीतीनें कज्जेकफावती करून, आई-बापांस त्रास देतो, त्यामुळें त्यावेळेपासूनहि त्यास थोडें थोडें शिकविण्यास सांगितलें आहे. महानिर्वाणतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**चतुर्वर्षावधिसुतान् लालयेत् पालयेत् पिता ।**
**ततः षोडशपर्यंतं गुणान् विद्यां च शिक्षयेत् ॥ २९२ ॥**

माता-पित्यांनीं पुत्रांचें चार वर्षांपर्यंत केवळ लालन आणि पालन करावें, व त्यानंतर सोळा वर्षांपर्यंत त्यांस गुण आणि विद्या शिकवावी ॥ २९२ ॥

**विंशत्यवधिकान् पुत्रान् प्रेरयेद् गृहकर्मसु ।**
**ततस्तांस्तुल्यभावेन मत्वा स्नेहं प्रदर्शयेत् ॥ २९३ ॥**

आणि ते वीस वर्षांचे होतील त्यावेळीं त्यांस गृहकार्यांमध्यें ह्मणजे उद्योग-धंद्यास लावावे; व नंतर आपल्या बरोबरीचे समजून स्नेह दाखवावा॥२९३॥

कारण शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**विद्यागमार्थं पुत्रस्य वृत्त्यर्थं यतते च यः ।**
**पुत्रं सदा साधु शास्ति प्रीतिकृत्स पिताऽनृणी ॥ २९४ ॥**

जो प्रीति करणारा पिता पुत्रास विद्याभ्यास करविण्यामध्यें आणि धंदा शिकविण्यामध्यें यत्न करील व नेहमीं चांगला उपदेश करील तो पुत्राच्या ऋणापासून मुक्त होतो ॥ २९४ ॥

नंतर पंचवीस वर्षांचें वय झालें असतां त्यास पसंत पडेल अशी रूप—गुण—संपन्न सोळा वर्षांची कन्या पाहून तिच्याशीं त्याचें लग्न करावें. वाग्भट्टानें सांगितलें आहे कीं,

**षोडशवर्षायाः पञ्चविंशतिवर्षः पुत्रार्थं यतेत ॥ २९५ ॥**

पंचवीस वर्षांच्या पुरुषानें सोळा वर्षांच्या स्त्रीपासून प्रजा उत्पन्न करण्याचा प्रयत्न करावा ॥ २९५ ॥

कारण पूर्ण यौवनावस्था इतक्या वयानेंच प्राप्त होते. वैद्यशास्त्राचा आचार्य जो धन्वंतरि त्याच्या उपदेशानें सुश्रुतानें आयुर्वेदाच्या सूत्रस्थानांतील ३५ साव्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

वयस्तु त्रिविधं बालं मध्यं वृद्धमिति । तत्रोनषोडशवर्षा बालास्तेऽपि त्रिविधाः क्षीरपाः क्षीरान्नादा अन्नादा इति । तेषु संवत्सरपराः क्षीरपाः द्विसंवत्सरपराः क्षीरान्नादाः परतोऽन्नादा इति । षोडशसप्तत्योरन्तरे मध्यं वयस्तस्य विकल्पो वृद्धिर्यौवनं संपूर्णता हानिरिति । तत्राविंशतेर्वृद्धिरात्रिंशतो यौवनमाचत्वारिंशतः सर्वधात्विन्द्रियबलवीर्यसंपूर्णता । अत ऊर्ध्वमीषत्परिहाणिर्यावत्सप्ततिरिति । सप्ततेरूर्ध्वं क्षीयमाणधात्विन्द्रियबलवीर्योत्साहमहन्यहनि वलीपलितखालित्यं जुष्टं कासश्वासप्रभृतिभिरुपद्रवैरभिभूयमानं सर्वक्रियास्वसमर्थं जीर्णागारमिवाभिवृष्टमवसीदन्तं वृद्धमाचक्षते ॥ २९६ ॥

बाल, मध्य आणि वृद्ध याप्रमाणें वय तीन प्रकारचें आहे, त्यांपैकीं सोळा-वर्षांचे आंतील बालक, तेहि केवळ दूध पिणारे, दूध आणि अन्न खाणारे, व केवळ अन्न खाणारे, याप्रमाणें तीन प्रकारचे आहेत; त्यांपैकीं दूध पिणारे एक वर्षापर्यंतचे, दूध आणि अन्न खाणारे दोन वर्षांपर्यंतचे, आणि केवळ अन्न खाणारे त्यानंतरचे असतात. सोळा वर्षांपासून आरंभ करून सत्तर वर्षांपर्यंत मध्य वय सांगितलें आहे, त्याचे वृद्धि, यौवन, संपूर्णता आणि हानि याप्रमाणें चार भेद आहेत. पैकीं वीस वर्षांपर्यंत, वृद्धि, तीस वर्षांपर्यंत यौवन, चाळीस वर्षांपर्यंत सर्व धातु, इंद्रियें, बल व वीर्य यांची संपूर्णता आणि त्यानंतर सत्तर वर्षांपर्यंत थोडीथोडी हानि होते; आणि सत्तर वर्षांनंतर क्षीण झाले आहेत धातु, इंद्रियें, बल, वीर्य आणि उत्साह ज्याचे, दिवसेंदिवस त्वचेच्या ठिकाणीं पडणारी सुरकुती, ज्याचे सफेत झालेले केंस आणि डोक्याच्या ठिकाणीं पडणारी टक्कल, कासश्वासादि उपद्रवेंकरून पराभव पावलेला आणि सर्व क्रिया करण्यामध्यें असमर्थ असा, जुन्या घराप्रमाणें चाऱ्ही बाजूंनीं टेंकीस आलेला, खेद पावणारा असा वृद्ध ह्मटला जातो ॥ २९६ ॥

तसेंच स्त्रीच्या वयाविषयींहि भावप्रकाशाच्या पूर्वखंडाच्या प्रथम भागांत सांगितलें आहे कीं,

बालेति गीयते नारी यावद्वर्षाणि षोडश ।
ततस्तु तरुणी ज्ञेया द्वात्रिंशद्वत्सरावधि ॥ २९७ ॥

स्त्री सोळा वर्षांच्या वयापर्यंत बाला ह्मटली जाते, व त्यानंतर बत्तीस-वर्षांच्या वयापर्यंत ती तरुणी जाणावी ॥ २९७ ॥

तदूर्ध्वमधिरूढा स्यात् पञ्चाशद्वत्सरावधि ।
वृद्धा तत्परतो ज्ञेया सुरतोत्सववर्जिता ॥ २९८ ॥

आणि त्यानंतर ती पन्नास वर्षांच्या वयापर्यंत प्रौढा ह्मटली जाते, व यानंतर विषयवासना जीची बंद होऊन गेली आहे, अशी जी असेल ती वृद्धा जाणावी ॥ २९८ ॥

आतां कन्येसहि पुत्राप्रमाणें स्त्रीस योग्य असें चांगलें शिक्षण द्यावें, इत्यादि विषयीं महानिर्वाणतंत्रांत सांगितलें आहे कीं,

कन्याप्येवं पालनीया शिक्षणीयाऽतियत्नतः ।
देया वराय विदुषे धनरत्नसमन्विता ॥ २९९ ॥

पुत्राप्रमाणें कन्येसहि अतियत्नानें पाळावी आणि चांगल्या रीतीनें शिकवावी, व तीस आपल्या शक्तीप्रमाणें धन आणि रत्नें देऊन चांगल्या विद्वान् वरास लग्न करून द्यावी ॥ २९९ ॥

वर कसा असावा याविषयीं पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

कुलं च शीलं च सनाथता च विद्या च वित्तं च वपुर्वयश्च ।
एतान् गुणान् सप्त विचिन्त्य देया कन्या बुधैः शेषमचिन्तनीयम् ३००

बुद्धिमान् पुरुषांनीं कुल, शील, आधार, विद्या, धन, शरीर आणि अवस्था हे वराचे सात गुण पाहून कन्या द्यावी, बाकी खात्यांत विचार करूं नये ॥ ३०० ॥

कारण मनुस्मृतीच्या ९ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

यादृग्गुणेन भर्त्रा स्त्री संयुज्येत यथाविधि ।
तादृग्गुणा सा भवति समुद्रेणेव निम्नगा ॥ ३०१ ॥

समुद्रास मिळालेल्या नदीप्रमाणें स्त्री ज[illegible] गुणवान् पतीशीं विधिपूर्वक योजिली जाईल तशा गुणाची होते ॥ ३०१ ॥

पुनः सांगितलें आहे कीं,

**स्त्रीणां हि साहचर्याद्भवन्ति चेतांसि भर्तृसदृशानि ।**
**मधुरापि हि मूर्च्छयते विषविटपिसमाश्रिता वल्ली ॥ ३०२ ॥**

जशी विष–वृक्षाचा आश्रय केलेली वल्ली मधुर असली तथापि विषरूप होते, तसेंच स्त्रियांचें चित्तहि पतीच्या सहवासानें त्याच्यासारखें होतें ॥ ३०२ ॥

करितां सांगितल्याप्रमाणें तपास करून उत्तम वरास कन्या द्यावी. परंतु कधींहि द्रव्याच्या लोभानें अज्ञातज्ञास देऊं नये. कारण मनुस्मृतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**न कन्यायाः पिता विद्वान् गृह्णीयाच्छुल्कमण्वपि ।**
**गृह्णंश्छुल्कं हि लोभेन स्यान्नरोऽपत्यविक्रयी ॥ ३०३ ॥**

समजूतदार पित्यानें कन्येबद्दल कांहींहि द्रव्य घेऊं नये; कारण लोभानें थोडेंहि द्रव्य घेतलें असतां मनुष्य मुलें विकणारा ठरतो ॥ ३०३ ॥

**मासि मासि रजः स्त्रीणां रसजं स्रवति त्र्यहम् ।**
**वत्सराद्द्वादशादूर्ध्वं याति पंचाशतः क्षयम् ॥ ३०४ ॥**

स्त्रियांस १२ वर्षांच्या वयानंतर रसापासून उत्पन्न झालेलें रज दर महिन्यास तीन दिवस स्रवतें; तें ५० वर्षांच्या वयानंतर क्षय पावतें ॥ ३०४ ॥

परंतु १६ वर्षें झालीं कीं स्त्री आणि २५ वर्षें झालीं कीं पुरुष पुष्ट वयांत आलीं असें ह्मटलें जातें, करितां पुत्रास जसा २० वर्षांपर्यंत तसा पुत्रीस १२ वर्षांपर्यंत विद्याभ्यास शिकवावा आणि त्यानंतर ५ वर्षें जसें पुत्रास द्रव्य मिळविण्यास शिकविणें तसें ३ वर्षेंपर्यंत मुलीस सर्व गृहकार्यांमध्यें कुशल रणें; व नंतर १६ वर्षांची झाली कीं, तीस पसंत पडेल अशा यथायोग्य वराशीं लग्न करून देणें योग्य आहे. कारण मनुस्मृतीच्या ९ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**काममामरणात्तिष्ठेद् गृहे कन्यर्तुमत्यपि ।**
**नचैवैनां प्रयच्छेत गुणहीनाय कर्हिचित् ॥ ३०५ ॥**

कन्येनें ऋतु प्राप्त झाला असतांहि खुशाल आजन्म माहेरीं रहावें, परंतु ती पित्यानें गुणहीन वरास कधींहि देऊं नये ॥ ३०५ ॥

पुनः अभिज्ञानशाकुंतलामध्यें कण्वमुनीनें ह्मटलें आहे कीं,

**यास्यत्यद्य शकुन्तलेति हृदयं संस्पृष्टमुत्कण्ठया**
**अन्तर्बाष्पभरोपरोधि गदितं चिन्ताजडं दर्शनम् ।**
**वैक्लव्यं मम तावदीदृशमिदं स्नेहादरण्यौकसः**
**पीड्यन्ते गृहिणः कथं न तनयाविश्लेषदुःखैर्नवैः ॥ ३०६ ॥**

आज शकुंतला सासरघरीं जाणार ह्मणून हृदयांत दुःख होत आहे. आंतील अश्रुभरानें कंठ दाटला आहे आणि चिंतेनें दृष्टि जड झाली आहे याप्रमाणें माझ्यासारखा वनवासी ही स्नेहानें विव्हल होतो, तर गृहस्थ पुत्रींच्या वियोगामुळें होणाऱ्या ताज्या दुःखानें कसे पीडित होणार नाहींत ? ॥ ३०६ ॥

**अर्थो हि कन्या परकीय एव तामद्य संप्रेष्य परिग्रहीतुः ।**
**जातोऽस्मि सद्यो विशदान्तरात्मा चिरस्य निक्षेपमिवार्पयित्वा ३०७**

परंतु कन्यारूपी धन परक्याचेंच आहे, करितां आज तीस मालकाच्या घरीं पाठवून, तत्काल पुष्कळ कालाची ठेवलेली ठेव परत दिल्याप्रमाणें मी निश्चिंत झालों ॥ ३०७ ॥

त्यामुळें कोणासहि कन्येचें लग्न केल्यावांचून सुटका नाहीं. याविषयीं श्रीमहाभारतांतील अनुशासनपर्वाच्या ४४ व्या अध्यायांत भीष्म पितामहानें युधिष्ठिर राजास सांगितलें आहे कीं,

**त्रीणि वर्षाण्युदीक्षेत कन्या ऋतुमती सती ।**
**चतुर्थे त्वथ संप्राप्ते स्वयं भर्तारमाव्रजेत् ॥ ३०८ ॥**

कन्येनें ऋतुमती झाल्यानंतर तीन वर्षेपर्यंत आपल्याहून अधिक गुणवान् वराची वाट पहावी, आणि तितक्या अवधींत तसा वर न मिळेल व चवथें वर्ष सुरू होईल तर आपल्यासारख्या गुणवान् पुरुषास स्वतः वरावा ॥ ३०८ ॥

**प्रजा न हीयते तस्या रतिश्च भरतर्षभ ।**
**अतोऽन्यथा वर्तमाना भवेद्वाच्या प्रजापतेः ॥ ३०९ ॥**

असें केल्यास तीची प्रजा आणि रति दोन्ही बुडत नाहींत, परंतु याहून उलट रीतीनें चालणारी अर्थात् त्यानंतरहिं विवाह न करून घेईल तर, कदाचित् प्रजापतीची कन्या असली तरी तीची निंदा होते ॥ ३०९ ॥

यद्यपि रजोदर्शन झाल्यापासूनच कन्या गर्भ धारण करण्यास योग्य होते, करितां त्यावेळींच तिचें लग्न करणें योग्य आहे, तथापि १६ वर्षांच्या आंतील वय वैद्यशास्त्राच्या मताप्रमाणें तसें अनुभवानें पाहिलें असतां अतिशयच अल्प वाटतें. त्यामुळें त्यावेळीं गर्भ राहिला असतां तो गर्भ धारण करणारी स्त्री व तीची प्रजा हीं दोन्ही अशक्त व अल्पायुषी होतात. करितां रजोदर्शन झालेल्या कन्येच्या मातापिता वगैरे वडिलांनीं तीचें १६ वर्षांचें वय होऊन लग्न करीपर्यंत चांगल्या रीतीनें रक्षण करावें; परंतु एकदम लहान वयांत तीस लग्न करून देणें योग्य नाहीं. महानिर्वाणतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**अज्ञातपतिमर्यादामज्ञातपतिसेवनाम् ।**
**नोद्वाहयेत् पिता बालामज्ञातधर्मशासनाम् ॥ ३१० ॥**

कन्या जोंपर्यंत पतीची मर्यादा, सेवा आणि धर्मशास्त्रांत सांगितलेले स्त्रीधर्म जाणत नसेल तोंपर्यंत तीचा पित्यानें विवाह करूं नये ॥ ३१० ॥

याप्रमाणें गृहस्थ स्त्री–पुरुषांनीं प्रजेचें पालन करून तीस शिक्षण द्यावें, त्यामुळें ती संसाराचा भार उचलण्यास समर्थ होईल; स्वार्थावांचून कोणी कोणाचा सोयरा होत नाहीं, त्यामुळें जर आपल्या प्रजेस गुणवान् केली नसेल तर तीची कोणी गोष्ट विचारीत नाहीं. सांगितलें आहे कीं,

**वृक्षं क्षीणफलं त्यजन्ति विहगाः शुष्कं सरः सारसाः**
**पुष्पं पर्युषितं त्यजन्ति मधुपा दग्धं वनान्तं मृगाः ।**
**निर्द्रव्यं पुरुषं त्यजन्ति गणिका भ्रष्टश्रियं मन्त्रिणः**
**सर्वः कार्यवशाज्जनोऽभिरमते कस्यास्ति को वल्लभः ॥ ३११ ॥**

फळें झडून गेलेल्या वृक्षास पक्षी, शुष्क झालेल्या सरोवरास सारस पक्षी, वासें झालेल्या पुष्पास भ्रमर, दग्ध झालेल्या अरण्यास मृग, द्रव्यहीन झालेल्या पुरुषास गणिका, आणि राजलक्ष्मीपासून भ्रष्ट झालेल्या राजास मंत्री सोडून

जातात; कारण प्राणिमात्र स्वार्थामुळें प्रीति करतो, नाहीं तर कोण कोणास प्रिय आहे ! ॥ ३११ ॥

पुनः आपले लोक व आपले संबंधी यांचें आपणाकडून होऊं शकेल त्याप्रकारें पालन करावें, कारण कुटुंबाचें पोषण करणें सर्वांस उचित आहे. श्रीमहाभारतांतील अनुशासनपर्वांत सांगितलें आहे कीं,

**मातरं पितरं पुत्रं दारानतिथिसोदरान् ।**
**हित्वा गृही न भुञ्जीयादेकाकी तु कदाचन ॥ ३१२ ॥**

गृहस्थानें, माता, पिता, पुत्र, स्त्री, अतिथी आणि बंधू यांस टाकून कधींहि एकट्यानें भोजन करूं नये ॥ ३१२ ॥

कारण सांगितलें आहे कीं,

**वञ्चयित्वा गुरून् बन्धून् यो भुंक्ते स्वोदरम्भरः ।**
**इहैव लोके गर्ह्योऽसौ सारमेय इवाधमः ॥ ३१३ ॥**

जो पुरुष वडिलांस व बांधवांस फसवून एकटा भोजन करतो, तो कुत्र्याप्रमाणें आपलपोट्या, नीच या लोकींच निंदेस पात्र होतो ॥ ३१३ ॥

तसेंच शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**कुटुम्बभरणार्थेषु यत्नवान्न भवेच्च यः ।**
**तस्य सर्वगुणैः किंतु जीवन्नेव मृतश्च सः ॥ ३१४ ॥**

जो पुरुष कुटुंबाच्या पोषणासाठीं यत्न करीत नाहीं, त्याचे ठिकाणीं इतर पुष्कळ गुण असले तरी त्यांनीं काय ? कारण तो जीवंत असून मृततुल्य आहे ॥ ३१४ ॥

यांशिवाय जे आपला निर्वाह चालविण्यास अशक्त असतील अशा अनाथ लोकांचेंहि शक्तिवान् गृहस्थांनीं आपल्याकडून शक्य त्याप्रकारें पालन करणें अवश्य आहे. कारण अनाथ लोकांच्या जीविताचा सर्व आधार समर्थ लोकांवर राहिला आहे, करितां जे सुखी असतील त्यांनीं आपल्या शक्तीप्रमाणें गरीब-दुबळ्यांचें दुःख दूर करण्यामध्यें नेहमीं तत्पर राहणें योग्य आहे. महानिर्वाण-तंत्रांत सांगितलें आहे कीं,

**देयं भेषजमार्तस्य परिश्रान्तस्य चासनम् ।**
**तृषितस्य च पानीयं क्षुधितस्य च भोजनम् ॥ ३१५ ॥**

रोग्यास औषध, थकलेल्यास आसन, तृषितास पाणी, आणि क्षुधितास अन्न द्यावें ॥ ३१५ ॥

**भूमिदानात् परं नास्ति विद्यादानं ततोऽधिकम् ।**
**औषधं पथ्यमाहारं स्नेहोऽभ्यङ्गं प्रतिश्रयम् ॥ ३१६ ॥**

सर्व दानामध्यें भूमिदान श्रेष्ठ आहे, परंतु विद्यादान हें त्याहूनहि अधिक श्रेष्ठ आहे; औषध, पथ्य, अन्न, अभ्यंगयोग्य घृततैलादि पदार्थ आणि आश्रयस्थान—॥ ३१६ ॥

**दानान्येतानि देयानि ह्यन्यानि च विशेषतः ।**
**दीनान्धकृपणादिभ्यः श्रेयस्कामेन धीमता ॥ ३१७ ॥**

हीं व विशेषेंकरून इतरहि दानें, कल्याणेच्छु बुद्धिमान् पुरुषानें गरीब अनाथ व अंध वगैरे दीनांस द्यावीं ॥ ३१७ ॥

तसेंच पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**जीविते यस्य जीवन्ति दीना मित्राणि बान्धवाः ।**
**सफलं जीवितं तस्य आत्मार्थे को नं जीवति ॥ ३१८ ॥**

ज्याचें जीवित असल्यानें दीन, मित्र व बांधव जीवन करतात, त्याचेंच जीवन सफल आहे, कारण स्वतःसाठीं कोण जगत नाहीं ? ॥ ३१८ ॥

आतां आपले माता-पितादि वडील व बंधु वगैरे लहान असतील त्यांच्याशीं कशा रीतीनें वागावें त्याविषयीं सांगण्यांत येत आहे. वयानें आपल्याहून जो मोठा असेल तो वडील व जो आपल्याहून कमी वयाचा असेल तो लहान ह्मटला जातो. सर्व स्त्रीपुरुषांस आपापले आई, बाप, सासू, सासरा, गुरु आणि गुरुपत्नी यांच्या पक्षाकडून वडील आणि लहान ६ प्रकारचे असतात. त्यामध्यें जे अतिशय जवळजवळचे असतील तेच मुख्य वडील व लहान ह्मटले जातात. आपल्या कोणत्याहि वडिलांजवळ आई-बापांप्रमाणें स्नेह ठेवावा, त्यांच्या आज्ञेमध्यें रहावें, त्यांचा कधींहि अपमान करूं नये, ते कांहीं

बोलले तरी सोसावें परंतु उलट जबाब देऊं नये. आणि नम्रतेनें योग्य तें उत्तर द्यावें. ते आले तर उठून उभें रहावें, व समोरून घेऊन जाऊन त्यांस सन्मान द्यावा, आणि ते बसल्यानंतर आपण बसावें. पुनः ते जातील त्यावेळींहि उठून उभें रहावें व त्यांस योग्यतेप्रमाणें बरोबर पोंचविण्यास जावें. त्यांच्याशीं कोणत्याहि प्रकारचा विचार करतेवेळीं प्रथम मत त्यांचें घ्यावें; कदाचित् आपलें मत त्यांच्या मताहून भिन्न असेल तर तें उपदेश केल्या-प्रमाणें अधिकारयुक्त वाणीनें सांगूं नये, तर विनंति करून समजावून सांगावें, त्यामुळें दोघांचें ऐकमत्य तेव्हांच होईल. ज्यास जितका अनुभव असेल त्याप्रमाणें तो मत देतो, सर्वज्ञ कोणीहि नाहीं. पुष्कळ वेळीं थोडें शिकलेला परंतु अनुभवी वृद्ध जो अभिप्राय देतो, तो तरुण विद्वानाच्या अभिप्रायाहून चढतो, व सर्वांस स्वीकारण्यास योग्य होतो. तर वृद्ध जर अनुभवी असून विद्वान् असेल, तर सर्व प्रकारच्या विचारामध्यें तो तरुण विद्वानाहून चढेल यांत कांहीं आश्चर्य नाहीं. कारण वृद्ध जसा शिकलेला तसा गणलेला असतो. व तरुण केवळ शिकलेला असतो. त्यामुळें वडिलांची सल्ला अधिक श्रेष्ठ समजली जाते. तसेंच आपल्या कोणत्याहि लहानाजवळ पुत्र व कन्येप्रमाणें स्नेह ठेवावा. त्याचा कधींहि तिरस्कार करूं नये, कारण तिरस्कारानें प्राणि-मात्रास क्रोध उत्पन्न होणें स्वाभाविक आहे. त्यामुळें त्याच्या बाजूनें सुलटें होण्याच्या ऐवजीं उलटें होतें, करितां तो कदाचित् कोणत्याहि प्रकारची चूक करील तर त्यास एकांतामध्यें ती समजावून देऊन पुनः न करण्याविषयीं सूचना द्यावी. परंतु प्रसिद्ध रीतीनें त्याची चूक दाखवूं नये, कारण त्यास वाईट वाटतें व त्या कारणास्तव त्याच्या मनाचा उत्साहभंग होऊन जातो. त्यामुळें पुनः कोणतेंहि कार्य करतेवेळीं त्यास बरोबर सुचत नाहीं व तो वारंवार चूक करतो. पुनः लहानहि आपल्या येथें आला तर त्याचा गोड वाणीनें सत्कार करावा व तो जाईल त्यावेळींहि तसेंच करावें. तो कोणत्याहि प्रकारची सल्ला विचारील तर त्याचें ज्यापासून कल्याण होईल, अशी त्यास सल्ला द्यावी, आणि निरंतर आपण त्याच्या कल्याणाविषयीं तत्पर रहावें.

याप्रमाणें आपल्या वडिलांजवळ व लहानांजवळ वर्तन करावें; तसेंच इतर वडिलांजवळ व लहानांजवळहि योग्य त्या मर्यादेनें वागावें. कृष्णयजुर्वेदाच्या तैत्तिरीयोपनिषदाच्या शिक्षावल्लींत सांगितलें आहे कीं,

**मातृदेवो भव । पितृदेवो भव ।**
**आचार्यदेवो भव । अतिथिदेवो भव ॥ ३१९ ॥**

माता, पिता, विद्यागुरु व अतिथि यांस देवाप्रमाणें मानणारा हो ॥ ३१९ ॥
तसेंच मनुस्मृतीच्या दुसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**यं मातापितरौ क्लेशं सहेते संभवे नृणाम् ।**
**न तस्य निष्कृतिः शक्या कर्तुं वर्षशतैरपि ॥ ३२० ॥**

मुलें जन्मल्यापासून त्यांचें पालन—पोषण करून त्यांस मोठीं करण्यामध्यें आई—बाप जें दुःख सहन करतात, त्याचा मोबदला शेंकडो वर्षें सेवा केल्यानेंहि पोंचणें शक्य नाहीं ॥ ३२० ॥

**तयोर्नित्यं प्रियं कुर्यादाचार्यस्य च सर्वदा ।**
**तेष्वेव त्रिषु तुष्टेषु तपः सर्वं समाप्यते ॥ ३२१ ॥**

करितां त्यांचें आणि तसेंच विद्यागुरूचेंहि नित्य प्रिय करावें, कारण ते तिघे संतुष्ट झाल्यानें सर्व तप संपूर्ण होतें ॥ ३२१ ॥

**शय्यासनेऽध्याचरिते श्रेयसा न समाविशेत् ।**
**शय्यासनस्थश्चैवैनं प्रत्युत्थायाभिवादयेत् ॥ ३२२ ॥**

ज्या शय्येवर किंवा आसनावर वडिल बसले असतील, त्यावर आपण बसूं नये, व स्वतः शय्येवर किंवा आसनावर बसला असेल तेथें वडील येतील, तर त्यांस समोर उभा राहून प्रणाम करावा ॥ ३२२ ॥

**परपत्नी तु या स्त्री स्यादसंबंधा च योनितः ।**
**तां ब्रूयाद्भवतीत्येवं सुभगे भगिनीति च ॥ ३२३ ॥**

जी संबंधाशिवायची परकी स्त्री असेल, तीस, हाक मारते वेळीं सत्कारानें बाई, वहिनी, ह्मणून हाक मारावी ॥ ३२३ ॥

**मातृष्वसा मातुलानी श्वश्रूरथ पितृष्वसा ।**
**संपूज्या गुरुपत्नीवत् समास्ता गुरुभार्यया ॥ ३२४ ॥**

मावशी, मामी, सासू व आते या वडिलांच्या स्त्रीसमान असल्यानें तीच्या-प्रमाणें पूजापात्र आहेत ॥ ३२४ ॥

पुनः याच स्मृतीच्या ९ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**पितेव पालयेत् पुत्राञ्ज्येष्ठो भ्रातॄन् यवीयसः ।**
**पुत्रवच्चापि वर्तेरन् ज्येष्ठे भ्रातरि धर्मतः ॥ ३२५ ॥**

मोठ्या भावानें लहान भावांचें, जसा पिता पुत्रांचें पालन करतो, तसें पालन करावें, तसें लहान भावानींहि मोठ्या भावाच्या ठिकाणीं धर्मानें पुत्राप्रमाणें वर्तन करावें ॥ ३२५ ॥

**भ्रातुर्ज्येष्ठस्य भार्या या गुरुपत्न्यनुजस्य या ।**
**यवीयसस्तु या भार्या स्नुषा ज्येष्ठस्य सा स्मृता ॥ ३२६ ॥**

मोठ्या भावाची जी स्त्री ती लहान भावास मातेसमान, आणि लहान भावाची जी स्त्री ती मोठ्या भावास सुनेसारखी सांगितली आहे ॥ ३२६ ॥

तसेंच श्रीमहाभारतांतर्गत अनुशासन पर्वाच्या १०५ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**ज्येष्ठा मातृसमा चापि भगिनी भरतर्षभ ।**
**भ्रातुर्भार्या च तद्वत्स्याद्यस्या बाल्ये स्तनं पिबेत् ॥ ३२७ ॥**

पुनः मोठी वहीण, मोठ्या भावाची स्त्री व बाळपणीं जीचें स्तनपान केलें असेल ती स्त्री या तिघीजणी मातृतुल्य जाणाव्या ॥ ३२७ ॥

तसेंच औशनसस्मृतीच्या प्रथमाध्यायांत सांगितलें आहे कीं,

**गुरून्दृष्ट्वा समुत्तिष्ठेदभिवाद्य कृताञ्जलिः ।**
**न तैरुपवसेत्सार्धं विवादेनार्थकारणात् ॥ ३२८ ॥**

वडिलांस पाहिल्यानंतर उभा राहून हात जोडून नमस्कार करावा, व त्यांच्याशीं कोणत्याहि कारणानें वाद करीत वसूं नये ॥ ३२८ ॥

**नास्ति मातृसमं दैवं नास्ति पितृसमो गुरुः ।**
**न ताभ्यामननुज्ञातो धर्ममेकं समाश्रयेत् ॥ ३२९ ॥**

पुनः मातेसारखा कोणी देव नाहीं, पित्यासारखा कोणी वडील नाहीं, करितां त्यांच्या आज्ञेवांचून कोणतेंहि कार्य करूं नये ॥ ३२९ ॥

महानिर्वाणतंत्रांतहि सांगितलें आहे कीं,

**मातरं पितरं चैव साक्षात् प्रत्यक्षदेवताम् ।**
**मत्वा गृही निषेवेत सदा सर्वप्रयत्नतः ॥ ३३० ॥**

गृहस्थानें आईबापास साक्षात् प्रत्यक्ष देवता मानून त्यांची नेहमीं सर्व प्रयत्नांनीं सेवा करावी ॥ ३३० ॥

**श्रावयेन्मृदुलां वाणीं सर्वदा प्रियमाचरेत् ।**
**पित्रोराज्ञानुसारी स्यात्सत्पुत्रः कुलपावनः ॥ ३३१ ॥**

आणि कुलास पावन करणाऱ्या सत्पुत्रानें त्यांस मृदु वाणी ऐकवावी, सर्व कालीं त्यांचें प्रिय करावें व त्यांच्या आज्ञेंत रहावें ॥ ३३१ ॥

कारण श्रीमहाभारताच्या आदिपर्वांत सांगितलें आहे कीं,

**मातापित्रोः प्रजायन्ते पुत्राः साधारणाः कवे ।**
**तेषां पिता यथा स्वामी तथा माता न संशयः ॥ ३३२ ॥**

हे पंडिता ! आई-बापांपासून पुत्र उत्पन्न होतात, करितां ते दोहोंचेहि साधारण आहेत; म्हणून त्यांचा जसा पिता स्वामी, तशी माताहि स्वामी आहे यांत संशय नाहीं ॥ ३३२ ॥

पुनः चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**जनिता च विनेता च यस्तु विद्यां प्रयच्छति ।**
**अन्नदाता भयत्राता पञ्चैते पितरः स्मृताः ॥ ३३३ ॥**

जन्म देणारा, नियमांत ठेवणारा, ( राजा ) विद्या देणारा, अन्न देणारा व भयापासून रक्षण करणारा हे पांच पिते सांगितले आहेत ॥ ३३३ ॥

**राजपत्नी गुरोः पत्नी मित्रपत्नी तथैव च ।**
**पत्नीमाता स्वमाता च पञ्चैता मातरः स्मृताः ॥ ३३४ ॥**

राजा, गुरु व मित्र यांची स्त्री आपल्या स्त्रीची माता व आपली माता या पांच माता सांगितल्या आहेत ॥ ३३४ ॥

**पिता गुरुस्तु पुत्राणां यूनां वृद्धो गुरुः स्मृतः ।**
**पतिरेको गुरुः स्त्रीणां सर्वस्याभ्यागतो गुरुः ॥ ३३५ ॥**

पुत्रांस पिता, तरुणांस वृद्ध, स्त्रियांस पति आणि सर्वांस अतिथि गुरु आहे ॥ ३३५ ॥

**ते पुत्रा ये पितुर्भक्ताः स पिता यस्तु पोषकः ।**
**तन्मित्रं यत्र विश्वासः सा भार्या यत्र निर्वृतिः ॥ ३३६ ॥**

जे पित्याचे ठिकाणीं भक्ति ठेवितात ते पुत्र, जो पोषण करतो तो पिता, ज्याच्यावर विश्वास असेल तो मित्र आणि जीच्यापासून समाधान होईल ती स्त्री जाणावी ॥ ३३६ ॥

**एकेनापि सुवृक्षेण पुष्पितेन सुगन्धिना ।**
**वासितं तद्वनं सर्वं सुपुत्रेण कुलं यथा ॥ ३३७ ॥**

पुनः पुष्पांनीं व सुगंधानें युक्त चांगल्या एकाहि वृक्षानें सर्व वन जसें सुगंधित होतें, तद्वत् सुपुत्रानें सर्व कुल प्रकाशमान होतें ॥ ३३७ ॥

**एकेन शुष्कवृक्षेण दह्यमानेन वन्हिना ।**
**दह्यते तद्वनं सर्वं कुपुत्रेण कुलं यथा ॥ ३३८ ॥**

परंतु जसें अग्नीनें जळणाऱ्या एकाहि शुष्क वृक्षानें सर्व वन जळतें, तद्वत् कुपुत्रानें सर्व कुल संताप पावतें ॥ ३३८ ॥

करितां शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**पित्रोराज्ञां पालयति सेवने च निरालसः ।**
**छायेव वर्तते नित्यं यतते चागमाय वै ॥ ३३९ ॥**

जो माता–पित्यांची आज्ञा पालन करतो, त्यांच्या सेवेमध्यें आळस करींत नाहीं, निरंतर त्यांस छायेप्रमाणें अनुसरतो, धन संपादन करण्याविषयीं यत्न करतो—॥ ३३९ ॥

**कुशलः सर्वविद्यासु स पुत्रः प्रीतिकारकः ।**
**दुःखदो विपरीतो यो दुर्गुणो धननाशकः ॥ ३४० ॥**

आणि सर्व विद्यांमध्यें कुशल असतो, तो पुत्र प्रीति उत्पन्न करणारा आहे; परंतु जो याहून उलट धननाश करणारा व दुर्गुणी असेल, तो दुःख देणारा होतो ॥ ३४० ॥

याप्रमाणें आई-बाप व आपले वडील व लहान यांच्या जवळ विवेकानें वागावें, कदाचित् विवेक विसरून जाऊन आडमार्गानें वर्तन होईल, तर आपल्या उपमेनें पहावें; अर्थात् आपल्याशीं आपल्याहून लहान किंवा मोठे विवेक सोडून वागत असतील तर आपणास जसें वाईट वाटतें, तसेंच आपण ज्यांच्याशीं विवेक सोडून वागूं त्यांस वाईट वाटेल, असा विचार करावा; त्यामुळें आपली चूक लगेच ध्यानांत येते, व पुनः विवेकानें वर्तन होतें. या रीतीनें सांगितल्याप्रमाणें सर्व स्त्री-पुरुषांनीं आपापले सामान्य धर्म व विशेष धर्म आचरण करावे. कारण चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**येषां न विद्या न तपो न दानं न चापि शीलं न गुणो न धर्मः ।**
**ते मर्त्यलोके भुवि भारभूता मनुष्यरूपेण मृगाश्चरन्ति ॥ ३४१ ॥**

ज्यांच्या ठिकाणीं विद्या, इंद्रियनिग्रह, परोपकार, चांगला स्वभाव, सद्गुण व सदाचरण नाहीं, ते मृत्युलोकीं पृथ्वीवर केवळ भारभूत होऊन मानवरूपानें पशूच फिरताहेत ॥ ३४१ ॥

करितां आचार्यानें धर्माचरणापासून प्रमाद न करण्याची आज्ञा केली आहे. या प्रकारें प्रमाणसहस्रीच्या आचारप्रकरणापैकीं धर्मप्रमादोपदेश समाप्त.

---

## ॥ कुशलान्न प्रमदितव्यम् ॥

सातवा उपदेश कुशलापासून प्रमाद न करण्याविषयीं आहे. कारण प्राणिमात्र आपापल्या कुशलामध्यें तत्पर असल्यानें सुखी होतो व आळशी असल्यानें दुःखी होतो. शारीरिक आणि व्यावहारिक असें कुशल दोन प्रकारचें आहे. पैकीं शारीरिक कुशल पहिलें होय, कारण शरीर जर निरोगी असेल, तरच इतर

कुशलाची प्राप्ति करून घेणें शक्य होतें. करितां जसें होईल तसें शरीराचें आरोग्य प्रथम मिळवावें. शुद्ध हवा, निर्मल पाणी, पथ्य भोजन, योग्य उष्णता, स्वच्छ वस्त्र, अनुकूल वासस्थान आणि मनाची स्थिरता हीं निरोगी राहण्याचीं मुख्य साधनें आहेत. कारण हवा घाणेरडी असेल तर फुप्फुसामध्यें जाऊन रक्ताशीं मिळून शरीरास हानि करते. मलिन पाणी प्यालें जाईल व जठराग्नीकडून पचन न होईल त्या रीतीनें भोजन केलें जाईल तर शरीरामध्यें त्यासंबंधीं रोग होतात. सहन न होईल त्या प्रकारची उष्णता शरीरास हानिकारक आहे. मलिन वस्त्रें धारण केल्यानें त्वचेसंबंधी रोग होण्याचा संभव आहे. योग्य प्रकाश व हवा नसलेलें ओलसर, आणि ज्याच्या आसपास घाण पडलेली असेल असें घर त्यांमध्यें राहणाऱ्यांस हटकून अनेक प्रकारांनीं रोगदायक होतें. मनाचा उद्वेगहि शरीरास हानि करणारा आहे, कारण मनाचा परिणाम शरीरावर व शरीराचा परिणाम मनावर झालेला दिसून येतो. करितां वर सांगितल्याप्रमाणें आरोग्य मिळविण्याचीं साधनें जशीं होतील तशीं प्रत्येक मनुष्यानें संपादन करण्याविषयीं तत्पर असावें. ज्यावेळीं कोणत्याहि प्रकारचा विकार शरीरामध्यें न दिसेल, त्यावेळीं तें निरोगी ह्मटलें जातें. भावमिश्र वैद्यानें रचलेल्या भावप्रकाशाच्या पूर्व खंडाच्या प्रथम भागांत सांगितलें आहे—

**समदोषः समाग्निश्च समधातुमलक्रियः ।**
**प्रसन्नात्मेन्द्रियमनाः स्वस्थ इत्यभिधीयते ॥ ३४२ ॥**

ज्याच्या शरीरामध्यें वातादि दोष, जठराग्नि, रसादि धातु, आणि मलमूत्रांची क्रिया समान असेल अर्थात् ते कोप पावले नसतील, आणि आत्मा इंद्रियें व मन ज्यांचीं प्रसन्न असतील ते निरोगी ह्मटले जातात ॥ ३४२ ॥

**दिनचर्यां निशाचर्यां ऋतुचर्यां यथोदिताम् ।**
**आचरन् पुरुषः स्वस्थः सदा तिष्ठति नान्यथा ॥ ३४३ ॥**

परंतु वैद्यशास्त्रामध्यें सांगितल्याप्रमाणें दिनचर्या, रात्रिचर्या व ऋतुचर्या आचरण केल्यानें मनुष्य सदोदित निरोगी राहतो, अन्यथा राहत नाहीं ॥ ३४३ ॥

प्रथम दिनचर्येच्या आरंभीं वैद्यशास्त्राचा आचार्य वाग्भट्ट यानें आपल्या अष्टांगहृदयांतील सूत्रस्थानाच्या दुसऱ्या अध्यायांत याप्रमाणें सांगितलें आहे कीं,

**ब्राह्मे मुहूर्त उत्तिष्ठेत्स्वस्थो रक्षार्थमायुषः ।**
**शरीरचिंतां निर्वर्त्य कृतशौचविधिस्ततः ।। ३४४ ।।**

नीरोगी मनुष्यानें आयुष्याच्या रक्षणार्थ शेवटच्या ४ घटिका रात्र असेल त्यावेळीं उठावें, व शरीरासंबंधी चिंता सोडून मलमूत्रांचा त्याग करावा ।।३४४।।

**प्रातर्भुक्त्वा च मृद्वग्रं कषायकटुतिक्तकम् ।**
**भक्षयेद्दन्तधवनं दन्तमांसान्यबाधयन् ।। ३४५ ।।**

नंतर प्रातःकाळीं तुरट, तिखट, कडवें व मृदु अग्रभाग असलेलें दांतवण घेऊन तें चावून, जशी दांतांच्या मांसास इजा न होईल त्या रीतीनें करावें ।। ३४५ ।।

सूर्योदयाच्या पूर्वी उठल्यानें शरीरामध्यें स्फूर्ति चांगली असते, व आळस येत नाहीं. चांगल्या स्फूर्तीनें शरीरांतील सर्व ज्ञानेंद्रियांस व कर्मेंद्रियांस आपापलीं कार्यें करण्यास विशेष सामर्थ्य येतें. विशेष सामर्थ्य आल्यानें मनामध्यें योजिलेलें कार्य चांगल्याप्रकारें सिद्ध करणें शक्य होतें. पुनः प्रभात समय शांत असल्यानें मनास प्रिय वाटतो, व त्याची शोभा रमणीय असते. शार्ङ्गधर-पद्धतींत सांगितलें आहे कीं,

**अभूत् प्राची पिङ्गा रसपतिरिव प्राप्य कनकं**
**गतच्छायश्चन्द्रो बुधजन इव ग्राम्यसदसि ।**
**क्षणात् क्षीणास्तारा नृपतय इवानुद्यमपरा**
**न दीपा राजन्ते द्रविणरहितानामिव गुणाः ।। ३४६ ।।**

प्रभातसमयीं क्षणोक्षणीं पूर्वदिशा सुवर्णास प्राप्त झालेल्या पाऱ्यासारखी पिंगट, चंद्रमा मूर्खांच्या सभेमध्यें विद्वानासारखा कांतिहीन व तारे निरुद्यमी राजांसारखे क्षीण होऊं लागले, आणि दीपक दरिद्र्यांच्या गुणांसारखे शोभत नाहींत ।। ३४६ ।।

पुनः सांगितलें आहे कीं,

**पुरुहूतदिगङ्गना प्रसूता रविमुद्दामसुतं चिरादुपेतम् ।**
**अलिनो नलिनीदलाद्विमुक्ता जनसंघाश्च निजोद्यमेषु लग्नाः ॥३४७॥**

पूर्वदिशारूप स्त्री पुष्कळ कालानें प्राप्त झालेला सूर्यरूप मोठा पुत्र प्रसवली ! भ्रमर कमलपत्रांतून मोकळे झाले ! आणि जनसमूह आपापल्या उद्योगास लागले ॥ ३४७ ॥

परंतु लवकर उठणें हें लवकर झोंपल्यावांचून होऊं शकत नाहीं, कारण थकलेल्या सर्व इंद्रियांस पूर्ण वेळ होईपर्यंत आराम देण्याची जरूर पडते. तो जर बरोबर न दिला जाईल, तर शरीरामध्यें त्यासंबंधी व्याधि उत्पन्न होऊन नुकसान होतें. मनुष्य जसजसा मोठा होत जातो, तसतशी त्याची झोंप कमी होत जाते; कारण जसजशीं इंद्रियें बळकट होत जातात, तसतसा त्यांस थकवा कमी येण्याचा स्वभाव आहे; तसेंच जसजसा वृद्ध होत जाईल, तसतशी मागाहून झोंप वाढत जाते, कारण इंद्रियें दुर्बल होत गेल्यानें लवकर थकून जातात. बालकास अतिशय झोंपण्याची जरूर पडते, कारण त्याचीं इंद्रियें कोमल असल्यामुळें वारंवार थकून जातात; त्यामुळें सहज धांवतां धांवतांहि तें झोंपीं जातें. पुनः बालकाची विचारवृत्ति अनेक संकल्प-विकल्पांनीं रहित असल्यानें साहजिक स्थिर असते, त्यामुळेंहि तें वारंवार झोंप घेतें. मोठ्या मनुष्याची विचारवृत्ति व्यावहारिक अनेक संकल्प-विकल्पांनीं युक्त असते, त्यामुळें सहज थोड्या वेळांत स्थिर होऊं शकत नाहीं; ह्मणून मोठ्या माणसास झोंप कमी येते. यावरून विचार-वृत्ति स्थिर राहणें हेंच झोंपेचें खरें कारण दिसून येतें, करितां झोंपतेवेळीं संकल्प—विकल्पांचा त्याग करून मन स्थिर करावें, त्यामुळें झोंप त्वरित येते. वयांत आलेल्या तरुण मनुष्यास शरीराचा थकवा कमी होण्यासाठीं कमींत कमी ७ तास व अधिकांत अधिक ८ तास झोंप घेण्याची अत्यंत जरूर दिसते. त्याहून कमी झोंप होईल तर शरीराचें आरोग्य संभा. ळवत नाहीं. करितां पूर्वरात्रीचे २ पासून ३ तास गेल्यानंतर अर्थात् ८ पासून ९ वाजतां झोंपणें, व उत्तर रात्रीचे १ पासून २ तास

राहिले असतां अर्थात् ४ पासून ५ वाजतां उठणें चांगलें आहे. पूर्वरात्रीच्या १ तासाची झोंप उत्तर रात्रीच्या २ तासांच्या झोंपेबरोबरची आहे. अर्थात् जितके श्रम उतरण्यास पूर्व रात्रीच्या एक तासाची झोंप समर्थ आहे तितकेच श्रम उतरण्यास उत्तर रात्रीच्या दोन तासांची झोंप समर्थ आहे. करितां मनुष्यानें पूर्व रात्रीस लवकर झोंपणें व उत्तर रात्रीस लवकर उठणें योग्य आहे. त्यामुळें शरीरानें नीरोगी राहून सुखी व विचारशक्तीनें बलवान् होऊन चतुर होतां येतें. लवकर उठल्यानंतर प्रथम मल—मूत्राचा त्याग करण्यास सांगितलें आहे, कारण जें खाणें—पिणें करण्यांत येतें त्याचें जठराग्नीकडून पचन होऊन त्यांतून जें उपयोगी रसरूप सार उत्पन्न होतें, तें शरीराच्या पोषणांत वापरलें जातें; आणि जें अनुपयोगी मलमूत्ररूप असार उत्पन्न होतें, त्याचा उठल्यानंतर लगेच बहुतकरून सर्वांचा त्याग करण्याची जरूर पडते. आणि जरूर पडली कीं, लगेच त्याचा त्याग करावा हा सृष्टिनियम आहे. या नियमाविरुद्ध रीतीनें चालल्यास शरीरामध्यें त्यासंबंधी व्याधि उत्पन्न होतात. कारण वैद्यशास्त्राच्या माधवनिदानग्रंथांत सांगितलें आहे कीं,

**सर्वेषामेव रोगाणां निदानं कुपिता मलाः ।**
**तत्प्रकोपस्य तु प्रोक्तं विविधाहितसेवनम् ॥ ३४८ ॥**

बहुतकरून सर्व रोगांचें कारण कोप पावलेले मळच आहेत; व त्यांच्या प्रकोपाचें कारण नानाप्रकारच्या अहित पदार्थांचें सेवन सांगितलें आहे ॥३४८॥

शरीरामध्यें उत्पन्न झालेल्या मलमूत्रादिकांच्या वेगांस प्रतिबंध न करण्याविषयीं चरकसंहितेच्या सूत्रस्थानाच्या ७ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**न वेगान्धारयेद्धीमाञ्जातान्मूत्रपुरीषयोः ।**
**न रेतसो न वातस्य न वम्याः क्षवथोर्नच ॥ ३४९ ॥**

समजूतदार माणसानें मूत्र, मल, वीर्य, अपानवायु, उलटी व शिंक यांच्या उत्पन्न झालेल्या वेगांस अडवून धरूं नये ॥ ३४९ ॥

**नोद्गारस्य न जृम्भाया न वेगान् क्षुत्पिपासयोः ।**
**न बाष्पस्य न निद्राया न श्वासस्य श्रमेण च ॥ ३५० ॥**

तसेंच ढेंकर, जांभई, भूक, तहान, अश्रु, झोंप व मेहनतीनें झालेला श्वास यांच्याहि वेगांस आंवरून धरूं नये ॥ ३५० ॥

**वेगनिग्रहजा रोगा ये ये च परिकीर्तिताः ।**
**इच्छंस्तेषामनुत्पत्तिं वेगानेतान्न धारयेत् ॥ ३५१ ॥**

कारण इतक्यांचा वेग आंवरून धरिल्यानें उत्पन्न होणारे रोग जे जे सांगितले आहेत ते न होण्याविषयीं इच्छिणाऱ्या मनुष्यानीं ते वेग आंवरूं नयेत ॥ ३५१ ॥

मल–मूत्राचा त्याग केल्यानंतर दंतधावन करण्यास सांगितलें आहे, परंतु जर उठल्यावरोवर केवळ मूत्रत्याग करण्याची जरूर पडली असेल, तर तें करून नंतर दंतधावन करावें, व जरूर लागली कीं, मलत्याग करावा. कारण ज्यावेळीं मलत्याग किंवा मूत्रत्याग करण्याची जरूर लागेल त्यावेळींच त्यांचा त्याग करावा, बलात्कारानें त्याग करण्याची खटपट करूं नये. कारण स्वाभाविक वेग उत्पन्न झाल्यावांचून त्यांचा त्याग बरोबर होऊं शकत नाहीं, त्यामुळें जोरानें त्याग करण्यास गेलें असतां शरीरामध्यें त्यासंबंधी पीडा होते. भावप्रकाशाच्या पूर्वखंडाच्या प्रथम भागांत सांगितलें आहे कीं,

**न वेगितोऽन्यकार्यः स्यान्न वेगानीरयेद्बलात् ।**
**कामशोकभयक्रोधान्मनोवेगान् विधारयेत् ॥ ३५२ ॥**

मल–मूत्रांचा ज्यास वेग लागला आहे अशा पुरुषानें त्यांचा त्याग करण्यापूर्वी दुसरें कांहीं काम करूं नये, अर्थात् त्यांस रोंकूं नये, तसेंच बलात्कारानें त्यांचा वेग उत्पन्न करूं नये; परंतु काम, शोक, भय व क्रोधरूप मनाचे वेग मात्र आंवरून धरावे ॥ ३५२ ॥

मलत्याग किंवा मूत्रत्याग केल्यानंतर त्या त्या इंद्रियांचीं द्वारें पाण्यानें स्वच्छ धुवून टाकावीं, त्यामुळें त्यासंबंधी ग्लानी उत्पन्न न होतां मन प्रसन्न राहतें, व शरीरामध्यें त्याच्या दुर्गंधीसंबंधीं कांहीं पीडा होण्याचा संभव असत नाहीं. भावप्रकाशाच्या पूर्वखंडाच्या प्रथम भागांत सांगितलें आहे कीं,

गुदादिमलमार्गाणां शौचं ख्यातं पवित्रकृत् ।
प्रक्षालनं मतं पाण्योः पादयोः शुद्धिकारकम् ।। ३५३ ।।

गुद वगैरे मलमार्गांस धुणें हें पवित्र करणारें सांगितलें आहे व हातपाय धुणें हें शुद्धिकारक मानलें आहे ॥ ३५३ ॥

आतां दंतधावन करण्याचें कारण असें आहे कीं, पूर्वींच्या दिवशीं व रात्रीं मिळून तोंडाच्या आंतील दांतांवर व जीभेवर जो मळ चढला असेल तो त्यानें काढून तोंड स्वच्छ करावें. तसें केलें नसेल तर तोंडास दुर्गंधि येते व त्यामध्यें दुर्गंधीसंबंधीं रोग होतात. करितां ते स्वच्छ ठेवण्याविषयीं भावप्रकाशाच्या याच खंडाच्या याच भागांत सांगितलें आहे कीं,

भक्षयेद्दन्तधवनं द्वादशाङ्गुलमायतम् ।
कनिष्ठिकाग्रवत् स्थूलमृज्वग्रन्थि तथाऽव्रणम् ।। ३५४ ।।

प्रथम १२ अंगुलें लांब कनिष्ठेच्या अग्रभागासारखें जाड, सरळ, गांठ व व्रण नसलेलें काष्ठ आणून चावावें ॥ ३५४ ॥

एकैकं घर्षयेद्दन्तं मृदुना कूर्चकेण वा ।
दन्तशोधनचूर्णेन दन्तमांसान्यबाधयन् ।। ३५५ ।।

नंतर त्याच्या चावलेल्या मृदु अग्रभागानें किंवा दांत स्वच्छ करण्याच्या चूर्णानें दांतांच्या मांसास इजा न होईल अशा रीतीनें एक एक दांत घांसावा ॥ ३५५ ॥

जिह्वानिर्लेखनं हैमं राजतं ताम्रजं च वा ।
पाटितं मृदु तत्काष्ठं तेन जिह्वां विलेखयेत् ।। ३५६ ।।

नंतर सोन्याची, रुप्याची किंवा तांब्याची जिभी किंवा तें कोमल दंतधावनाचें काष्ठ चिरून त्यानें इजा न होईल अशा रीतीनें जीभ घांसावी; कारण तें जिभेचा मल, विरसता, दुर्गंध आणि जडता यांचा नाश करणारें आहे ॥ ३५६ ॥

न खादेद्गलताल्वोष्ठजिह्वादन्तगदेषु च ।
मुखस्य पाके शोथे च दन्तकाष्ठं कदाचन ।। ३५७ ।।

परंतु कंठ, तालु, ओंठ, जीभ व दांत यांस रोग झाला असतां, तसेंच तोंड आलें असतां व तोंडास सूज आली असतां कधीं दंतधावन करूं नये ॥३५७॥

**गण्डूषमपि कुर्वीत शीतेन पयसा मुहुः ।**
**कफतृष्णामलहरं मुखान्तः शुद्धिकारकम् ॥ ३५८ ॥**

दंतधावन केल्यानंतर थंड पाण्यानें वारंवार चूळ भरून टाकावे; कारण ते कफ, तृष्णा व मल यांस हरण करणारे आणि मुखास आंतून शुद्ध करणारे आहेत ॥ ३५८ ॥

**सुखोष्णोदकगण्डूषः कफारुचिमलापहः ।**
**दन्तजाड्यहरश्चापि मुखलाघवकारकः ॥ ३५९ ॥**

तसेंच सोसेल इतक्या उष्णोदकाचे चूळ कफ, अरुचि, मल दांतांची जडता यांस हरण करणारे व मुखास हलके करणारे आहेत ॥ ३५९ ॥

याप्रमाणें चूळ भरून टाकल्यानंतर बाहेरून सर्व तोंड पाण्यानें चांगल्या रीतीनें धुवावें, व रात्रीस झोंपल्यानंतर, उठेपर्यंत डोळ्यांचे आंतील जो मल बाहेर निघून पापण्यांपुढें एकत्र होऊन चिकटून राहिला असेल तोहि धुवून टांकून डोळे एकदम स्वच्छ करावे. आणि त्यानंतर याच ग्रंथांत याच ठिकाणीं सांगितलें आहे कीं,

**सौवीरमञ्जनं नित्यं हितमक्ष्णोस्ततो भजेत् ।**
**लोचने भवतस्तेन मनोज्ञे सूक्ष्मदर्शने ॥ ३६० ॥**

डोळ्यांस नित्य सुरम्याचें अंजन हितकर आहे, कारण त्यानें ते सुंदर व सूक्ष्म पाहणारे होतात; करितां त्याचें अंजन करावें ॥ ३६० ॥

**पञ्चरात्रान्नखश्मश्रुकेशरोमाणि कर्तयेत् ।**
**केशश्मश्रुनखादीनां कर्तनं संप्रसाधनम् ॥ ३६१ ॥**

पुनः पांच पांच रात्री गेल्यानंतर नखें, दाढी मिशा, केश व लोम कातरवावे; कारण तसें करणें शोभावह आहे ॥ ३६१ ॥

**उत्पाटयेत्तु लोमानि नासाया न कदाचन ।**
**तदुत्पाटनतो दृष्टेर्दौर्बल्यं त्वरया भवेत् ॥ ३६२ ॥**

परंतु कधींच नाकांतील केश उपटवूं नयेत, कारण तसें केल्यानें दृष्टि त्वरित मंद होते ॥ ३६२ ॥

**केशपाशे प्रकुर्वीत प्रसाधन्या प्रसाधनम् ।**
**केशप्रसाधनं केश्यं रजोजन्तुमलापहम् ॥ ३६३ ॥**

पुनः नित्य तेल लावून फणीनें केश विंचरून साफ करावे, कारण तसें करणें केशांस हितावह आणि त्यांत असलेलें रज, जंतु व मल यांचा नाश करणारें आहे ॥ ३६३ ॥

त्यानंतर शरीर नेहमीं सुदृढ राहण्याकरितां सहन होऊं शकेल त्या प्रकारचा नित्य व्यायाम करावा. कारण अष्टांगहृदयाच्या दिनचर्याध्यायांत वाग्भट्टानें सांगितलें आहे कीं,

**लाघवं कर्मसामर्थ्यं दीप्तोऽग्निर्मेदसः क्षयः ।**
**विभक्तघनगात्रत्वं व्यायामादुपजायते ॥ ३६४ ॥**

व्यायाम केल्यामुळें शरीरामध्यें हलकेपणा, काम करण्याचें सामर्थ्य, जठराग्नीची वृद्धि, मेदाचा क्षय आणि शरीराचे विभाग वेगवेगळे दिसणें व मजबूत होणें इतक्या गोष्टी होतात ॥ ३६४ ॥

पुनः व्यायाम करणाऱ्यास होणाऱ्या लाभाविषयीं भावप्रकाशाच्या पूर्व-खंडाच्या प्रथम भागांत सांगितलें आहे कीं,

**विरुद्धं वा विदग्धं वा भुक्तं शीघ्रं विपच्यते ।**
**भवन्ति शीघ्रं नैतस्य देहे शिथिलतादयः ॥ ३६५ ॥**

मेहनत करणाराचें विरुद्ध किंवा कच्चें खाल्लेलेंहि अन्न जलद पचून जातें, व त्याच्या देहाच्या ठिकाणीं शिथिलतादि लवकर येत नाहींत ॥ ३६५ ॥

**नचैनं सहसाऽऽक्रम्य जरा समधिरोहति ।**
**नचास्ति सदृशं तेन किञ्चित्स्थौल्यापकर्षकम् ॥ ३६६ ॥**

पुनः त्यास एकाएकीं वार्धक्य येत नाहीं व व्यायामासारखें शरीराची स्थूलता घालविणारें दुसरें कांहीं नाहीं ॥ ३६६ ॥

भुक्तवान् कृतसंभोगः कासी श्वासी कृशः क्षयी ।
रक्तपित्ती क्षयी शोपी न तं कुर्यात् कदाचन ॥ ३६७ ॥

परंतु भोजन व स्त्रीसंभोग केल्यानंतर आणि कास, श्वास, क्षय, रक्तपित्त, उरःक्षत व शोथ हे रोग ज्यास आहेत त्यानें व्यायाम कधींहि करूं नये ॥ ३६७ ॥

तसेंच शरीराकडून सहन न होईल त्याप्रकारचा व अतिशय व्यायाम कधीं करूं नये, कारण वाग्भट्टानें अष्टांगहृदयाच्या दिनचर्याध्यायांत सांगितलें आहे कीं,

तृष्णाक्षयः प्रतमको रक्तपित्तं श्रमः क्लमः ।
अतिव्यायामतः कासो ज्वरश्छर्दिश्च जायते ॥ ३६८ ॥

अतिशय व्यायाम केल्यानें तृषा, क्षय, प्रतमक नामक श्वास, रक्तपित्त, थकवा, ग्लानि, खोकला, ज्वर व ओकारी होते ॥ ३६८ ॥

व्यायामजागराध्वस्त्रीहास्यभाष्यादि साहसम् ।
गजः सिंहमिवाकर्षन् भजन्नति विनश्यति ॥ ३६९ ॥

कारण व्यायाम, जागरण, स्त्रीसंग, हास्य आणि भाषण वगैरे साहसास अति सेवन करणारा मनुष्य सिंहास आकर्षण करणाऱ्या हत्तीप्रमाणें नाश पावतो ॥ ३६९ ॥

याप्रमाणें व्यायाम करून झाल्यानंतर भावप्रकाशाच्या पूर्वखंडाच्या प्रथम भागांत सांगितलें आहे कीं,

अभ्यङ्गं कारयेन्नित्यं सर्वेष्वङ्गेषु पुष्टिदम् ।
शिरःश्रवणपादेषु तं विशेषेण शीलयेत् ॥ ३७० ॥

नित्य सर्वांगास पुष्टि देणारा अभ्यंग करावा ह्मणजे तेल चोळावें, त्यांत मस्तक, कान, आणि पाय यांच्या ठिकाणीं विशेष वापरावें ॥ ३७० ॥

अभ्यङ्गो वातकफहृच्छ्रमशांतिं बलं सुखम् ।
निद्रावर्णमृदुत्वायुः कुरुते देहपुष्टिकृत् ॥ ३७१ ॥

कारण देहास पुष्टि करणारा अभ्यंग वात व कफ हरण करतो व श्रमाची शांति, बळ, सुख, निद्रा, वर्ण कोमलता आणि आयुष्य देतो ॥ ३७१ ॥

**अभ्यङ्गः शीलितो मूर्ध्नि सकलेन्द्रियतर्पकः ।**
**दृष्टिपुष्टिकरो हन्ति शिरोभूमिगतान् गदान् ॥ ३७२ ॥**

मस्तकाच्या ठिकाणीं केलेला तैलाभ्यंग सर्व ज्ञानेंद्रियांस तृप्त करणारा, दृष्टि वाढविणारा, आणि मस्तकांतील रोगांस दूर करणारा आहे ॥ ३७२ ॥

**केशानां बहुतां दार्ढ्यं मृदुतां दीर्घतां तथा ।**
**कृष्णतां कुरुते कुर्याच्छिरसः पूर्णतामपि ॥ ३७३ ॥**

पुनः केश पुष्कळ, दृढ, कोमल, लांब व काळे करतो आणि मस्तकाचीहि दृढता करतो ॥ ३७३ ॥

**न कर्णरोगा न मलो न च मन्याहनुग्रहः ।**
**नोच्चैःश्रुतिर्न बाधिर्यं स्यान्नित्यं कर्णपूरणात् ॥ ३७४ ॥**

तसेंच नित्य कानामध्यें तेल घातल्यानें कर्णरोग, मळ, आणि शिरा, हनुवटी जखडणें हीं होत नाहींत, हलका शब्द ऐकूं येतो, आणि बहिरेपणा होत नाहीं ॥ ३७४ ॥

**पादाभ्यङ्गश्च तत्स्थैर्यनिद्रादृष्टिप्रसादकृत् ।**
**पादसुप्तिश्रमस्तम्भसंकोचस्फुटनप्रणुत् ॥ ३७५ ॥**

तसाच पायांस केलेला तैलाभ्यंग पायांची स्थिरता, निद्रा व दृष्टि देणारा आहे, आणि पायामधील बहिरेपणा, श्रम, पाय जखडून जाणें, पाय संकुचित होणें आणि पाय फुटणें यांस दूर करतो ॥ ३७५ ॥

**लोमकूपशिराजालधमनीभिः कलेवरम् ।**
**तर्पयेद् बलमाधत्ते स्नेहयुक्तोऽवगाहने ॥ ३७६ ॥**

करितां मनुष्य स्नानाच्या वेळीं तेलानें रोमच्छिद्रें, नाडी आणि नसांच्या द्वारा शरीरास तृप्त व बलवान् करतो ॥ ३७६ ॥

**अद्भिः संसिक्तमूलानां तरूणां पल्लवादयः ।**
**वर्धन्ते हि तथा नृणां स्नेहसंसिक्तधातवः ॥ ३७७ ॥**

कारण पाण्यानें चांगल्याप्रकारें ज्यांचीं मूळें शिंपलीं गेलीं अशा वृक्षांचीं पानें वगैरे जशीं वृद्धि पावतात, तसेच मनुष्यांचे तेलानें सिंचन केलेले धातु वृद्धि पावतात ॥ ३७७ ॥

**नवज्वरी अजीर्णी च नाभ्यक्तव्यः कथंचन ।**
**तथा विरक्तो वान्तश्च निरूढो यश्च मानवः ॥ ३७८ ॥**

परंतु नुक्तच ताप आलेला, अजीर्ण झालेला, विरेचन घेतलेला, उलटी केलेला व बस्तिकर्म केलेला अशा मनुष्यानें कोणत्याहि रीतीनें अंगास तेल चोळूं नये ॥ ३७८ ॥

याप्रमाणें शरीरास तेलाचा अभ्यंग केल्यानंतर थोडावेळ तें तेल शरीरांत जिरूं देवून जीच्या योगें शरीरावरचा मळ व चिकटपणा दूर होईल, अशी सावण वगैरे वस्तु जलमिश्रित करून अंगास चोळावी व नंतर शरीरास सहन होईल अशा शीत किंवा उष्ण उदकानें स्नान करावें. वाग्भट्टानें अष्टांगहृदयाच्या दिनचर्याध्यायांत सांगितलें आहे कीं,

**उद्वर्तनं कफहरं मेदसः प्रविलापनम् ।**
**स्थिरीकरणमङ्गानां त्वक्प्रसादकरं परम् ॥ ३७९ ॥**

शरीर चोळून मळ काढणें हें कफहारक, मेदोनाशक, अवयवांस बळकट करणारें आणि त्वचेस अति स्वच्छ करणारें आहे ॥ ३७९ ॥

**दीपनं वृष्यमायुष्यं स्नानमूर्जाबलप्रदम् ।**
**कण्डूमलश्रमस्वेदतन्द्रातृड्दाहपाप्मजित् ॥ ३८० ॥**

आणि स्नान जठराग्नीस वाढविणारें, पुष्टि देणारें, आयुष्य वाढविणारें, उत्साह व बल देणारें आणि कंडू, मल, श्रम, स्वेद, सुस्ती, तृषा, दाह व मनोमालिन्य यांस दूर करणारें आहे ॥ ३८० ॥

**स्नानमर्दितनेत्रास्यकर्णरोगातिसारिषु ।**
**आध्मानपीनसाजीर्णभुक्तवत्सु च गर्हितम् ॥ ३८१ ॥**

परंतु अर्दित वायूचा रोगी, नेत्ररोगी, मुखरोगी, कर्णरोगी, अतिसारी, पोट फुगलेला, पीनस झालेला, अजीर्णी आणि भोजन केलेला यांस स्नान निंदित अर्थात् हानिकारक आहे ॥ ३८१ ॥

तसेंच भावप्रकाशाच्या पूर्वखंडाच्या प्रथम भागांत सांगितलें आहे कीं,

**शीतेन पयसा स्नानं रक्तपित्तप्रशान्तिकृत् ।**
**तदेवोष्णेन तोयेन बल्यं वातकफापहम् ॥ ३८२ ॥**

थंड पाण्याचें स्नान रक्तपित्तास शमविणारें आहे. व तेंच जर ऊन पाण्यानें केलें असेल, तर बल देणारें आणि वात व कफ यांस हरण करणारें आहे ॥३८२॥

**शिरःस्नानमचक्षुष्यमत्युष्णेनाम्बुना सदा ।**
**वातश्लेष्मप्रकोपे तु हितं तच्च प्रकीर्तितम् ॥ ३८३ ॥**

परंतु नेहमीं अति उष्ण पाण्यानें डोक्यावरून स्नान करणें हें नेत्रांच्या तेजास हानिकारक आहे; तरी तें वात व कफ कुपित झाले असतां हितकारक सांगितलें आहे ॥ ३८३ ॥

**स्नानस्यानन्तरं सम्यग्वस्त्रेणाङ्गस्य मार्जनम् ।**
**कान्तिप्रदं शरीरस्य कण्डूत्वग्दोषनाशनम् ॥ ३८४ ॥**

स्नान केल्यानंतर चांगल्याप्रकारें स्वच्छ वस्त्रानें शरीर पुसून टाकणें हें शरीरास कांति देणारें आणि त्वचेसंबंधीं कंडू वगैरे दोषांचा नाश करणारें आहे ॥ ३८४ ॥

याप्रमाणें स्नान करून झाल्यानंतर देशकालास अनुसरून योग्य, स्वच्छ आणि सुगंध लाविलेलीं वस्त्रें धारण करावीं. त्यामुळें मन प्रसन्न राहतें, व शरीरांत त्वचेसंबंधीं रोग होण्याचा संभव असत नाहीं. परंतु मलिन वस्त्रें धारण करूं नयेत, कारण भावमिश्रांनीं भावप्रकाशाच्या दिनचर्याध्यायांत सांगितलें आहे कीं,

**कदापि न जनैः सद्भिर्धार्यं मलिनमम्बरम् ।**
**तत्तु कण्डूकृमिकरं ग्लान्यलक्ष्मीकरं परम् ॥ ३८५ ॥**

समजदार मनुष्यानें कधींहि मलिन वस्त्र धारण करूं नये; कारण तें कंडू, ग्लानि आणि परम अशोभा करणारें आहे ॥ ३८५ ॥

त्यानंतर ज्यावेळीं जठराग्नि प्रदीप्त होईल, अर्थात् क्षुधा लागेल त्यावेळीं आहार करावा, कारण चांगल्या रीतीनें प्रदीप्त झालेल्या अग्नीमध्यें हवन केलेलें

घृत, जसें स्वतः जळून जाऊन अग्नीस उत्तेजित करतें, तसेंच चांगल्या प्रकारें क्षुधा लागली असतां केलेला आहार स्वतः पचन होऊन पुनः क्षुधेस ताजी करतो. परंतु जर बरोबर क्षुधा लागल्यावांचून खाल्लें असेल, तर तो केलेला आहार, जसें बरोबर प्रदीप्त न झालेल्या अग्नीमध्यें हवन केलेलें द्रव्य स्वतः जळून अग्नीस उत्तेजन देण्याच्या ऐवजीं अग्नीस विझवून टाकतें, तद्वत् स्वतः पचन होऊन क्षुधेस ताजी करण्याच्या ऐवजीं जठराग्नीमध्यें असलेल्या पाचन-शक्तीस मंद करून क्षुधेस मारून टाकतो. आणि शरीरामध्यें अजीर्णादि रोग उत्पन्न होण्यास कारण होतो. तसेंच बरोबर क्षुधा लागली असतां भोजन केलें नसेल तरी पण क्षुधा मरून जाते, व भूक मरून गेली असतां अकालीं केलेलें भोजन बरोबर पचत नाहीं. पुनः थोडें किंवा अधिक खाल्ल्यानेंहि नुकसान होतें. या सर्व बाबतींविषयीं सुश्रुतांतील सूत्रस्थानाच्या ४५ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**अप्राप्तकाले भुञ्जानः शरीरे ह्यलघौ नरः ।**
**तांस्तान् व्याधीनवाप्नोति मरणं वाऽधिगच्छति ॥ ३८६ ॥**

भूक लागल्यावांचून जेवणारा मनुष्य बळकट देहाचा असला तरी अनेक प्रकारच्या व्याधींस किंवा मरणास प्राप्त होतो ॥ ३८६ ॥

**अतीतकाले भुञ्जानो वायुनोपहतेऽनले ।**
**कृच्छ्राद्विपच्यते भुक्तं द्वितीयं च न काङ्क्षति ॥ ३८७ ॥**

तसेंच भूक मारून जेवणारा मनुष्य दुसऱ्या वेळीं जेवण्याची इच्छा करीत नाहीं; कारण वायूनें जठराग्नि उपहत झाला असतां खाल्लेलें अन्न कष्टानें पचतें ॥ ३८७ ॥

**हीनमात्रमसंतोषं करोति च बलक्षयम् ।**
**आलस्यगौरवाटोपसादांश्च कुरुतेऽधिकम् ॥ ३८८ ॥**

तसेंच रुचि असतां थोडें अन्न तृप्ति करत नाहीं व बलाचा क्षय करितें; आणि रुचीबाहेर केलेलें भोजन आळस, जाड्य, पोटांत गडगडाट आणि थकवा उत्पन्न करितें ॥ ३८८ ॥

**सौमनस्यं बलं पुष्टिमुत्साहं हर्षणं सुखम् ।**
**स्वादु संजनयत्यन्नमस्वादु च विपर्ययम् ॥ ३८९ ॥**

स्वादिष्ट अन्न संतोष, बल, पुष्टि, उत्साह, हर्ष आणि सुख उत्पन्न करितें, व बेचव अन्न याहून उलट करितें ॥ ३८९ ॥

**तस्मात्सुसंस्कृतं युक्त्या दोषैरेतैर्विवर्जितम् ।**
**यथोक्तगुणसंपन्नमुपसेवेत भोजनम् ॥ ३९० ॥**

करितां इतक्या दोषांनीं रहित, युक्तीनें चांगल्या प्रकारें रांधलेलें व उक्त गुणांनीं युक्त भोजन करावें ॥ ३९० ॥

तसेंच भावप्रकाशाच्या पूर्वखंडाच्या प्रथम भागांत सांगितलें आहे कीं,

**याममध्ये न भोक्तव्यं यामयुग्मं न लङ्घयेत् ।**
**याममध्ये रसोत्पत्तिर्यामयुग्माद् बलक्षयः ॥ ३९१ ॥**

एका प्रहरामध्यें भोजन करूं नये, तसेंच दोन प्रहरपर्यंत उपोषित राहूं नये; कारण एका प्रहरामध्यें रसाची उत्पत्ति होते व दोन प्रहरपर्यंत उपोषित राहिल्यानें बळाचा क्षय होतो ॥ ३९१ ॥

**क्षुत्संभवति पक्वेषु रसदोषमलेषु च ।**
**काले वा यदिवाऽकाले सोऽन्नकाल उदाहृतः ॥ ३९२ ॥**

परंतु रस, दोष व मल यांचा पाक झाल्यानें क्षुधा लागते ती वेळीं किंवा अवेळीं लागली असेल, तोच भोजनाचा काल सांगितला आहे. अर्थात् देश, काल व अवस्था यांस अनुसरून ज्यास जितक्या वेळ क्षुधा लागेल त्यानें तितक्या वेळ भोजन करावें ॥ ३९२ ॥

**उद्गारशुद्धिरुत्साहो वेगोत्सर्गो यथोचितः ।**
**लघुता क्षुत्पिपासा च जीर्णाहारस्य लक्षणम् ॥ ३९३ ॥**

शुद्ध ढेकर, उत्साह, मल—मूत्र साफ येणें, शरीरामध्यें हलकेपणा वाटणें, भूक व तहान लागणें हें पचलेल्या आहाराचें लक्षण आहे ॥ ३९३ ॥

**बुभुक्षितो न योऽश्नाति तस्याहारेन्धनक्षयात् ।**
**मन्दीभवति कायाग्निर्यथा चाग्निर्निरिन्धनः ॥ ३९४ ॥**

जो मनुष्य क्षुधा लागल्यावरोवर न जेवील, त्याचा जठराग्नि इंधनांशिवायच्या अग्नीप्रमाणें आहाररूप इंधनांच्या क्षयामुळें मंद होतो ॥ ३९४ ॥

**आहारं पचति शिखी दोषानाहारवर्जितः पचति ।**
**दोषक्षये च धातून् पचति च धातुक्षये प्राणान् ॥ ३९५ ॥**

जठराग्नि आहारास पचवितो, परंतु तो आहार वेळेवर न मिळेल तर कफादि दोषांस पचवितो; दोषांचा क्षय झाल्यानंतर प्राणांस पचवितो ॥३९५॥

**आहारः प्रीणनः सद्यो बलकृद्देहधारणः ।**
**स्मृत्यायुःशक्तिवर्णौजःसत्त्वशोभाविवर्धनः ॥ ३९६ ॥**

करितां आहार संतोष देणारा, तत्काल बल देणारा, देहास धारण करणारा आणि स्मृति, आयुष्य, शक्ति, वर्ण, तेज, सत्त्व व शोभा यांस वाढविणारा आहे ॥ ३९६ ॥

**अत्युष्णान्नं बलं हन्ति शीतं शुष्कं च दुर्जरम् ।**
**अतिक्लिन्नं ग्लानिकरं युक्तियुक्तं हि भोजनम् ॥ ३९७ ॥**

परंतु अतिशय उष्ण अन्न बलनाश करतें, थंड शुष्क अन्न सहज पचत नाहीं, अतिशय भिजलेलें अन्न सुस्ती करणारें आहे. करितां भोजन युक्तियुक्त केलें पाहिजे ॥ ३९७ ॥

**आहारनिर्हारविहारयोगाः सदैव सद्भिर्विजने विधेयाः ॥ ३९८ ॥**

परंतु आहार, मल—मूत्रांचा त्याग व विहार नेहमीं शहाण्या मनुष्यांनीं एकांतामध्यें करावे ॥ ३९८ ॥

कारण इतक्या गोष्टी उघड रीतीनें करूं गेलें असतां लज्जा उत्पन्न होते व लज्जेमुळें, त्यांचा जो स्वाभाविक वेग उत्पन्न झाला असेल, त्यास एकाएकीं हिसका लागून त्याच्या क्रियेमध्यें फरक पडतो, त्यामुळें त्यासंबंधीं शरीरामध्यें रोग होण्याचा संभव असतो. आतां आहार करण्याच्या वस्तू जरी अनेक आहेत, तरीहि वैद्यशास्त्रामध्यें त्या सर्वांचा ६ वर्गामध्यें समावेश केला आहे. याविषयीं वर सांगितलेल्या ग्रंथांत त्याच ठिकाणीं सांगितलें आहे कीं,

**आहारं षड्विधं चूष्यं पेयं लेह्यं तथैव च ।**
**भोज्यं भक्ष्यं तथा चर्व्यं गुरुं विद्याद्यथोत्तरम् ॥ ३९९ ॥**

चोखण्यास योग्य, पिण्यास योग्य, चाटण्यास योग्य, भोजन करण्यास योग्य, भक्षण करण्यास योग्य आणि चावण्यास योग्य असे सहा प्रकारचे आहार उत्तरोत्तर एक दुसऱ्याहून गरिष्ठ जाणावे ॥ ३९९ ॥

**भोज्यमोदनसूपादि भक्ष्यं मोदकमण्डकम् ।**
**चर्व्यं चिपिटधान्यादि रसालादि तु लेह्यते ॥**
**चोष्यमाम्रफलेक्ष्वादि पीयते पानकं पयः ॥ ४०० ॥**

त्यांपैकीं भात व डाळ वगैरे खाण्याचे पदार्थ भोज्य; लाडू व मांडे वगैरे भक्षण करण्याचीं पक्वान्नें भक्ष्य, पोहे, दाणे, डाळें वगैरे चावण्याचे पदार्थ चर्व्य; मेतकुट, रायतें, कढी वगैरे चाटण्याचे पदार्थ लेह्य; आंबे, ऊस वगैरे चोखण्याचे पदार्थ चोष्य आणि दूध, सरबत, पन्हें वगैरे पिण्याचे पदार्थ पेय ह्मटले जातात ॥ ४०० ॥

सृष्टीमध्यें कोणताहि पदार्थ असा नाहीं कीं, ज्यामध्यें कांहीं गुण नसेल. या नियमाप्रमाणें सर्व प्रकारच्या आहाराच्या वस्तूंमध्येंहि गुण राहिले आहेत. त्यामुळें कोणत्याहि प्रकारचा आहार केला असतां शरीरास लाभ व हानि होते. अनुकूल परिणामास लाभ व प्रतिकूल परिणामास हानि ह्मणतात. मुख्यत्वेंकरून या लाभ—हानि उत्पन्न करणाऱ्या पदार्थांमध्यें रस असतात, ते वैद्यशास्त्रामध्यें ६ प्रकारचे सांगितले आहेत. वाग्भट्टानें अष्टांगहृदयाच्या सूत्रस्थानांत सांगितलें आहे कीं,

**रसाः स्वाद्वम्ललवणतिक्तोषणकषायकाः ।**
**षड्द्रव्यमाश्रितास्ते तु यथापूर्वं बलावहाः ॥ ४०१ ॥**

मधुर, आंबट, खारट, कडवा, तिखट व तुरट हे ६ रस पदार्थांचा आश्रय करून राहिले आहेत, ते पूर्व पूर्व एक दुसऱ्याहून बलवान् आहेत ॥ ४०१ ॥

**रसानामिति रूपाणि कर्माणि मधुरो रसः ।**
**आजन्मसात्म्यात्कुरुते धातूनां प्रबलं बलम् ॥ ४०२ ॥**

याप्रमाणें रसांचीं रूपें आहेत. आतां त्यांचीं कर्में याप्रमाणें समजावीं:—मधुर रस जन्माच्या बरोबर दूध रूपानें उत्पन्न झाल्यानें धातूंच्या बलास वाढविणारा आहे ॥ ४०२ ॥

**प्रशस्तो बृंहणः कण्ठ्यः स्तन्यसन्धानकृद्गुरुः ।**
**आयुष्यो जीवनः स्निग्धः पित्तानिलविषापहः ॥ ४०३ ॥**

पुनः हितकर, वीर्यवर्धक, कंठशोधक, स्तन्यवर्धक, गुरु, आयुष्य देणारा, शक्ति देणारा, पौष्टिक आणि पित्त, वायु व विष यांस घालविणारा, ॥ ४०३ ॥

**कुरुतेऽत्युपयोगेन संमेदः कफजान् गदान् ।**
**स्थौल्याग्निसादसंन्यासमेहगंडार्बुदादिकान् ॥ ४०४ ॥**

परंतु तो जर अतिशयच उपयोगांत आणला असेल, तर मेद व कफ यांपासून उत्पन्न होणाऱ्या स्थूलता, अग्निमांद्य, मूर्छा, प्रमेह, गलगंड व अर्बुदादि रोगांस उत्पन्न करतो ॥ ४०४ ॥

**अम्लोऽग्निदीप्तिकृत्स्निग्धो हृद्यपाचनरोचनः ।**
**उष्णवीर्यो हिमस्पर्शः प्रीणनः क्लेदनो लघुः ॥ ४०५ ॥**

तसाच आंबट रस जठराग्नीस वाढविणारा, स्निग्ध, हृदयास प्रिय, खाल्लेलें पचविणारा, रुचिकारक, उष्णवीर्य, शीतस्पर्श, प्रसन्न करणारा, भिजविणारा व हलका आहे ॥ ४०५ ॥

**सोऽत्यभ्यस्तस्तनोः कुर्याच्छैथिल्यं तिमिरं भ्रमम् ।**
**कण्डुपाण्डुत्ववीसर्पशोथविस्फोटतृड्ज्वरान् ॥ ४०६ ॥**

परंतु तो अतिशय उपयोगांत आणला असेल, तर शरीरामध्यें शैथिल्य, डोळ्यांसमोर अंधार, भ्रम, कंडू, फिकेपणा, वीसर्परोग, सूज, विस्फोटक, तृषा आणि ज्वर यांस उत्पन्न करतो ॥ ४०६ ॥

**लवणः स्तम्भसंघातबन्धविध्मापनोऽग्निकृत् ।**
**स्नेहनः स्वेदनस्तीक्ष्णो रोचनश्छेदभेदकृत् ॥ ४०७ ॥**

क्षार रस स्तंभन, संघात व बंध यांचा नाश करणारा, अग्निवर्धक, स्निग्ध, घाम आणणारा, तीक्ष्ण, रुचिकर आणि मलाचा छेदक व भेदक आहे ॥ ४०७ ॥

सोऽतियुक्तोऽस्रपवनं खलतिं पलितं वलिम् ।
तृट्कुष्टविषवीसर्पाञ्जनयेत् क्षपयेद् बलम् ॥ ४०८ ॥

परंतु तो जर अतिशय उपयोगामध्यें आणला असेल, तर वातरक्त, डोक्यावर टक्कल, सफेत केंस, त्वचेच्या ठिकाणीं सुरकुती, तृषा, कोड, विष व विसर्परोग यांस उत्पन्न करतो आणि बलाचा नाश करतो ॥ ४०८ ॥

तिक्तः स्वयमरोचिष्णुररुचिं कृमितृड्विषम् ।
कुष्टमूर्च्छाज्वरोत्क्लेशदाहपित्तकफाञ्जयेत् ॥
क्लेदमेदोवसामज्जाशकृन्मूत्रोपशोषणः ॥ ४०९ ॥

तसाच कटु रस स्वभावतः पिण्यास अप्रिय वाटतो, परंतु अरुचि, कृमि, तृषा, विष, कुष्ट, मूर्च्छा, ज्वर, वांति, दाह, पित्त व कफ यांचा नाश करतो; आणि ओलेपणा, मेद, वसा, मज्जा, मल व मूत्र यांचें शोषण करणारा आहे ॥४०९॥

लघुर्मेध्यो हिमो रूक्षः स्तन्यकण्ठविशोधनः ।
धातुक्षयानिलव्याधीनतियोगात् करोति सः ॥ ४१० ॥

पुनः तो लघु, बुद्धिवर्धक, शीत, रूक्ष, स्तन्यवर्धक व कंठशोधक आहे; परंतु त्याचा अतिशय उपयोग केल्यानें शरीरांतील धातूंचा क्षय व वायूचा रोग होतो ॥ ४१० ॥

कटुर्गलामयोदर्दकुष्टालसकशोथजित् ।
व्रणावसादनः स्नेहमेदःक्लेदोपशोषणः ॥ ४११ ॥

तसा तिक्त रस गळ्याचे कफजन्य रोग, वीसर्प, कुष्ट, अजीर्ण व सूज यांस घालविणारा आहे; व व्रणास अंकुर आणणारा आणि स्निग्ध, मेद व आर्द्रता यांचें शोषण करणारा आहे ॥ ४११ ॥

दीपनः पाचनो रुच्यः शोधनोऽन्नस्य शोषणः ।
छिनत्ति बन्धान् स्रोतांसि विवृणोति कफापहः ॥ ४१२ ॥

पुनः तो अग्निदीपन, पाचन करणारा, रुचिकारक, शोधक व अन्नाचें शोषण करणारा आहे व मलादिकांचा बंध तोडतो, रक्तवाहिन्यांस फैलावतो व कफाचा नाश करतो ॥ ४१२ ॥

कुरुते सोऽतियोगेन तृष्णां शुक्रबलक्षयम् ।
मूर्च्छामाकुञ्चनं कम्पं कटिपृष्ठादिषु व्यथाम् ॥ ४१३ ॥

परंतु तो अतिशय उपयोग केल्यामुळें तृषा, वीर्य व बल यांचा क्षय, मूर्च्छा संकोच, कंप आणि कंबर, पाठ वगैरे अंगांमध्यें व्यथा उत्पन्न करतो ॥ ४१३ ॥

कषायः पित्तकफहा गुरू रक्तविशोधनः ।
पीडनो रोपणः शीतः क्लेदमेदोविशोषणः ॥
आमसंस्तम्भनो ग्राही रुक्षोऽतित्वक्प्रसादनः ॥ ४१४ ॥

तसाच तुरट रस, पित्त व कफ यांचा नाशक, भारी, रक्तशोधक, त्वचादिकांचा संकोच करणारा, व्रण रुजविणारा, आर्द्रता व मेद यांचें शोषण करणारा, स्तम्भन करणारा, मलग्राही, रुक्ष आणि त्वचेस अतिशय स्वच्छ करणारा आहे ॥ ४१४ ॥

करोति शीलितः सोऽतिविष्टम्भाध्मानहृद्रुजः ।
तृट्कार्श्यपौरुषभ्रंशस्रोतोरोधमलग्रहान् ॥ ४१५ ॥

परंतु तो अति उपयोग केल्यानें अवरोध, पोट चढून येणें, हृदयरोग, तृषा, शरीर सुकणें, अशक्तता, शिरारोध व मळग्रह करतो ॥ ४१५ ॥

याप्रमाणें सहा रसांचीं स्वरूपें व कर्में सांगितलीं आहेत, त्यांपैकीं ज्या पदार्थामध्यें ज्या ज्या रसाचा स्वाद असेल, तो पदार्थ बहुतकरून त्या त्या रसाच्या गुणांनीं युक्त असल्यानें शरीरामध्यें त्याच्या प्रमाणें गुण–अवगुण करतो. शिवाय भावप्रकाशाच्या पूर्वखंडांतील प्रथम भागांत सांगितलें आहे कीं,

द्रव्ये रसो गुणो वीर्यं विपाकः शक्तिरेव च ।
पदार्थाः पञ्च तिष्ठन्ति स्वं स्वं कुर्वन्ति कर्म च ॥ ४१६ ॥

कोणत्याहि वस्तूमध्यें रस, गुण, वीर्य, विपाक व शक्ति, हे पांच पदार्थ असतात; ते आपापलें काम करीत असतात ॥ ४१६ ॥

त्यामुळें पदार्थामध्यें रसांवांचून स्वभावतःच जे–वीर्यादि गुण राहिले आहेत, तेहि आपापल्या शक्तीप्रमाणें गुण–अवगुण उत्पन्न करितात. केवळ एका रसावरच आधार असत नाहीं. करितां ज्यांच्या शरीरास जे अनुकूल पडतील

त्या पदार्थांचा त्यांनीं आहार करावा, प्रतिकूल पदार्थांचा त्यांनीं आहार करूं नये. कारण वैद्यशास्त्राचा आचार्य धन्वंतरी याच्या उपदेशानें त्याचा शिष्य सुश्रुत यानें आपल्या नांवानें रचलेल्या ग्रंथांतील सूत्रस्थानाच्या २० व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**व्याधिमिन्द्रियदौर्बल्यं मरणं चाधिगच्छति ।**
**विरुद्धरसवीर्यादीन् भुञ्जानो नात्मवान्नरः ॥ ४१७ ॥**

स्वतःच्या प्रकृतीस ज्यांचे रस व वीर्य असह्य आहेत, अशा पदार्थांचें सेवन करणारा अजितेंद्रिय मनुष्य व्याधि, इंद्रियांचीं दुर्बलता व मरण यांस प्राप्त होतो ॥ ४१७ ॥

कारण शरीरामध्यें वात, पित्त आणि कफ असे तीन प्रकारचे दोष राहिले आहेत, ते जर तीनही नियमांत असतील तर आरोग्य राहतें, व त्यांपैकीं एकहि जर कोपेल, तर रोग उत्पन्न होतात. याविषयीं वाग्भट्टानें अष्टांग-हृदयांतील सूत्रस्थानाच्या प्रथमाध्यायांत सांगितलें आहे कीं,

**वायुः पित्तं कफश्चेति त्रयो दोषाः समासतः ।**
**विकृताविकृता देहं घ्नन्ति ते वर्तयन्ति च ॥ ४१८ ॥**

शरीरामध्यें वायु, पित्त व कफ असे तीन दोष संक्षेपानें सांगितले आहेत; ते विकार पावले असतां शरीराची हानि करतात आणि अविकृत असतां देहास धारण करतात ॥ ४१८ ॥

**तत्र रुक्षो लघुः शीतः खरः सूक्ष्मश्चलोऽनिलः ।**
**पित्तं सस्नेहतीक्ष्णोष्णं लघु विस्रं सरं द्रवम् ॥**
**स्निग्धः शीतो गुरुर्मन्दः श्लक्ष्णो मृत्स्नः स्थिरः कफः ॥४१९॥**

त्यापैकीं वात रुक्ष, हलका, शीत, कठिण, सूक्ष्म व चल आहे; व पित्त कांहीं स्निग्ध, तीक्ष्ण, उष्ण, लघु, दुर्गंधयुक्त सर्वत्र फिरणारें व प्रवाहि आहे; आणि कफ स्निग्ध, शीत, गरिष्ठ, जड, कोमल, चोळल्यानें चिकटणारा व स्थिर आहे ॥ ४१९ ॥

करितां या तिहींसहि नियमांत ठेवून चांगलें अनुकूल खाणें–पिणें व अनुकूल उष्णता यांची जरूर असते, ती ठेवण्यांत कोणत्याहि स्त्रीपुरुषानें अनादर करूं नये. यद्यपि बहुतकरून शरीरास जसा अभ्यास केला असेल तसें सहन होऊं शकतें, करितां लहानपणींच जठराग्नीस सर्व रस पचविण्यास योग्य करण्यासाठीं थोडे थोडे सर्व प्रकारच्या रसांचे पदार्थ खाण्याची संवय करणें चांगलें आहे; त्यामुळें कोणत्याहि जातीचा पदार्थ खाण्यांत आला तरीहि कांहीं अवगुण करीत नाहीं; त्याविषयीं भावप्रकाशाच्या पूर्वखंडांतील प्रथम भागांत सांगितलें आहे कीं,

**अश्नीयात्तन्मना भूत्वा पूर्वं तु मधुरं रसम् ।**
**मध्येऽम्ललवणौ पश्चात् कटुतिक्तकषायकान् ॥ ४२० ॥**

भोजन करतेवेळीं स्वस्थ होऊन आरंभीं गोड, मध्यें आंबट व खारट, आणि शेवटीं तिखट कडवा व तुरट रस खावा ॥ ४२० ॥

तथापि कांहीं कारणानें ज्याच्या शरीरास जें सहन होत नाहीं तें त्यानें खाऊं नये. कारण त्यामुळें शरीरामध्यें व्याधि होतात, त्यांस शमविण्यास अतिशय मेहनत पडते. श्रीविदुरनीतींत सांगितलें आहे कीं,

**यच्छक्यं ग्रसितुं ग्रस्यं ग्रस्तं परिणमेच्च यत् ।**
**हितं च परिणामे यत्तदद्यं भूतिमिच्छता ॥ ४२१ ॥**

स्वतःचें कल्याण इच्छिणाऱ्या मनुष्यानें जे खाण्यास योग्य पदार्थ खाणें शक्य असतील, खाल्ल्यानंतर पाचन होण्यासारखे असतील व परिणामीं हितावह होतील ते खावे ॥ ४२१ ॥

आतां खाण्याप्रमाणें पाणी पिण्याचीहि जरूर लागते, तहान लागतांच पाणी प्यावें, कारण तहान लागल्यानंतर पाणी जर न प्यालें जाईल, तर रक्ताचें शोषण होतें. भावप्रकाशाच्या पूर्वखंडांतील प्रथम भागांत सांगितलें आहे कीं,

**भुक्तस्यादौ जलं पीतं कार्श्यमन्दाग्निदोषकृत् ।**
**मध्येऽग्निदीपनं श्रेष्ठमन्ते स्थौल्यकफप्रदम् ॥ ४२२ ॥**

भोजनाचे पूर्वी प्यालेलें पाणी शरीरामध्यें कृशता व अग्निमांद्य करणारें, मध्यें प्यालेलें पाणी उत्तम प्रकारें अग्नि प्रदीप्त करणारें व शेवटीं प्यालेलें पाणी स्थूलता व कफ करणारें आहे ॥ ४२२ ॥

**तृषितस्तु नचाश्नीयात् क्षुधितो न पिबेज्जलम् ।**
**तृषितस्तु भवेद्गुल्मी क्षुधितस्तु जलोदरी ॥ ४२३ ॥**

तृषितानें कांहीं खाऊं नये, क्षुधितानें पाणी पिऊं नये; कारण तहान लागली असतां कांहीं खाल्लें तर गुल्मरोग होतो व क्षुधा लागली असतां पाणी प्यालें तर जलोदर रोग होतो ॥ ४२३ ॥

परंतु तें पाणी कसें असावें याविषयीं सुश्रुतांतील सूत्रस्थानाच्या ४५ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**निर्गन्धमव्यक्तरसं तृष्णाघ्नं शुचि शीतलम् ।**
**अच्छं लघु च हृद्यं च तोयं गुणवदुच्यते ॥ ४२४ ॥**

दुर्गंधाशिवायचें, व्यक्त न होणाऱ्या रसाचें, तृषेस शमविणारें, गाळून शुद्ध केलेलें, शीतल, निर्मल, हलकें व हृदयास आल्हाद देणारें पाणी गुणवत् सांगितलें आहे ॥ ४२४ ॥

कारण पाण्यांतील जीवजंतू किंवा कचरा पोटामध्यें गेल्यानें आरोग्यास हानि होऊन त्यासंबंधीं रोग होतात. आतां भोजन करून उठल्यानंतर प्रथम चूळ भरून तोंड स्वच्छ करण्याविषयीं भावप्रकाशाच्या पूर्वखंडांतील प्रथम भागांत सांगितलें आहे कीं,

**भोजने दन्तलग्नानि निर्हृत्याचमनं चरेत् ।**
**कुर्यादनिर्हृतं तद्धि मुखस्यानिष्टगन्धताम् ॥ ४२५ ॥**

भोजन करतेवेळीं दांतांमध्यें जें अन्न भरून राहिलें असेल तें काढून टाकून चूळ भरावी, कारण दांतांमधील अन्न न काढलें तर तें तोंडामध्यें दुर्गंध उत्पन्न करतें ॥ ४२५ ॥

पुनः याप्रमाणें तोंड स्वच्छ केलें नसेल व दांतांमध्यें अन्नाचीं शितें राहून जातील तर दांत सडतात व त्यामुळें तोंडामध्यें कृमि उत्पन्न होतात. त्यानंतर सुश्रुतांतील सूत्रस्थानाच्या ४५ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

भुक्त्वा राजवदासीत यावदन्नक्लमो गतः ।
जीर्णेऽन्ने वर्धते वायुर्विदग्धे पित्तमेव तु ॥ ४२६ ॥

भोजन केल्यानंतर भोजनाचे श्रम कमी होईतोंपर्यंत राजासारखें स्वस्थ बसावें; अन्न जीर्ण झाल्यानें वायु व दग्ध झाल्यानें पित्त-॥ ४२६ ॥

भुक्तमात्रे कफश्चापि, तस्माद् भुक्ते हरेत् कफम् ।
धूमेनापोह्य हृद्यैर्वा कषायकटुतिक्तकैः ॥ ४२७ ॥

व खाल्ल्यानें कफ वाढतो. करितां भोजनानंतर पुनः कफ काढून टाकावा; यासाठीं धूम्रपान किंवा हृदयास सुपारी वगैरे तुरट, तिखट, कडु—॥४२७॥

ताम्बूलपत्रसहितैर्मुखवैशुध्द्यकारकैः ।
ततः पदशतं गत्वा वामपार्श्वे तु संविशेत् ॥ ४२८॥

व मुखास शुद्ध करणारे पदार्थ तांबूलपत्रांसह खावून, कफ काढून टाकल्यानंतर १०० पावलें चालून डाव्या बाजूनें पडावें ॥ ४२८ ॥

कारण भावप्रकाशाच्या पूर्वखंडाच्या प्रथम भागांत सांगितलें आहे कीं,

भुक्त्वोपविशतस्तन्द्रा शयानस्य तु पुष्टता ।
आयुश्चङ्क्रममाणस्य मृत्युर्धावति धावतः ॥ ४२९ ॥

भोजन केल्यानंतर बसून राहणारास सुस्ती येते, झोंप घेणारास पुष्टि मिळते व धडपड करणारास आयुष्य मिळतें; परंतु धांवपळ करणाराच्या मागाहून मृत्यु धांवतो ॥ ४२९ ॥

दिवा स्वापं न कुर्वीत यतोऽसौ स्यात् कफावहः ।
ग्रीष्मवर्ज्येषु कालेषु दिवा स्वप्नो निषिध्यते ॥ ४३० ॥

परंतु दिवसास झोंप घेऊं नये, कारण ती कफास वाढविणारी आहे; करितां ग्रीष्मऋतूवांचून इतर ऋतूंमध्यें दिवास्वापाचा निषेध केला आहे ॥ ४३० ॥

व्यायामप्रमदाध्ववाहनरतान् क्लान्तानतीसारिणः
शूलश्वासवतस्तृषापरिगतान् हिक्कामरुत्पीडितान् ।
क्षीणान् क्षीणकफान् शिशून् मदहतान् वृद्धांस्तथाऽजीर्णिनो
रात्रौ जागरितान्नरान्निरशनान् कामं दिवा स्वापयेत् ॥ ४३१ ॥

परंतु अतिशय व्यायाम, स्त्रीसेवन, मार्गक्रमण व वाहन यांमध्यें आसक्त, व थकलेला, अतीसारी, शूल, श्वास व तृषा या रोगांनीं पीडित, उचकी व वायु यांनीं पीडित, दुर्बल, कृश, कफयुक्त, बालक, कैफ करणारा, वृद्ध, अजीर्णी, रात्रीं जागलेला आणि उपोषित यांस इच्छेप्रमाणें दिवसाहि झोपूं द्यावें ॥४३१॥

परंतु भोजन केल्यानंतर दिवसास झोंप घेण्याचें जें सांगितलें आहे तें सहज थोडया वेळाकरितां आहे; सर्व दिवसभर झोंपून घोरत पडण्याकरितां नव्हे. कारण बहुतकरून दिवसाचा वेळ सर्वांस निर्वाहार्थ उद्योग करण्याकरितां आहे; व रात्रीचा वेळ उद्योगानें झालेले श्रम उतरण्याकरितां आराम घेण्याचा आहे. करितां दिवसास झोंपूं नये व रात्रीं जागूं नये. परंतु ज्यांचा उद्योग रात्रीस असेल, त्यांनीं दिवसास सुखानें झोंपावें, व रात्रीस जागावें. आतां जशी दिवसास झोंप घेवूं नये तसें स्त्रीसेवनहि करूं नये. कारण स्त्रीसेवनानें वीर्याचा पात झाला असतां स्वभावतः तत्काल बलाची हानि होण्याचा संभव आहे; आणि तसें झालें असतां शैथिल्य स्वतः होऊन प्राप्त होतें. तें घालविण्यासाठीं आराम घेण्याची जरूर पडते. परंतु तो दिवसास इतर व्यवसाय असल्याकारणानें घेणें शक्य होत नाहीं. त्यामुळें शरीरामध्यें दोन प्रकारांनीं बलाची हानि होते. एक तर वीर्याच्या पातानें व दुसरी दिवसाच्या व्यवसायानें. पुनः दिवसास सूर्याची उष्णता असल्यामुळें शरीरामध्यें पित्ताचा जोर वाढतो, अशावेळीं त्यास थंड ठेवण्यासाठीं वीर्यरूप कफाचें रक्षण करण्याच्या ऐवजीं जर त्याचा पात करणें सुरू केलें असेल, तर दिवसेंदिवस पित्ताचा जोर वाढून शरीराचा नाश करून टाकतें. यासाठींच भावप्रकाशाच्या पूर्वखंडांतील प्रथम भागांत सांगितलें आहे कीं,

**आयुःक्षयभयाद्विद्वान्नाह्नि सेवेत कामिनीम् ॥ ४३२ ॥**

शहाण्या पुरुषानें आयुष्य क्षीण होण्याच्या भयानें दिवसास स्त्रीसेवन करूं नये ॥ ४३२ ॥

आतां व्यवसायार्थ किंवा बाहेरची स्वच्छ हवा घेण्याकरितां घराकडून बाहेर जावें लागतें, त्यावेळीं देश-कालास अनुसरून धारण केलेल्या स्वच्छ

वस्त्रांशिवाय शरीराच्या रक्षणासाठीं डोक्यास पगडी, पायांत जोडा आणि हातांत काठी व छत्री ग्रहण करावी. यात्रिषयीं याच ग्रंथांत याच ठिकाणीं सांगितलें आहे कीं,

**उष्णीषं कान्तिकृत्केश्यं रजोवातकफापहम् ।**
**लघु तच्छस्यते यस्माद्गुरु पित्ताक्षिरोगकृत् ॥ ४३३ ॥**

पगडी कांतिवर्धक, केशांस हितकर आणि धूळी, वायु व सरदी यांचा प्रतिबंध करणारी आहे; परंतु ती हलकी असली पाहिजे, कारण ती जड असेल तर पित्त व नेत्ररोग उत्पन्न करिते ॥ ४३३ ॥

**उपानद्धारणं नेत्र्यमायुष्यं पादरोगहृत् ।**
**सुखप्रचारमोजस्यं वृष्यं च परिकीर्तितम् ॥ ४३४ ॥**

जोडा वापरणें नेत्रांस हितकारक, आयुर्वर्धक, पादरोगांचें नाशक, सुखानें चालण्याचें साधन, बलदायी व धातुवर्धक आहे ॥ ४३४ ॥

**सत्त्वोत्साहबलस्थैर्यधैर्यतेजोविवर्धनम् ।**
**अवष्टम्भकरं चापि भयघ्नं दण्डधारणम् ॥ ४३५ ॥**

हातांत काठी ठेवणें. हें सत्त्व, उत्साह, बल स्थिरता, धैर्य व तेज यांस वाढविणारें, आधार देणारें आणि भय दूर करणारें आहे ॥ ४३५ ॥

**छत्रस्य धारणं वर्षातपवातरजोपहम् ।**
**हिमघ्नं हितमक्ष्णोश्च माङ्गल्यमपि कीर्तितम् ॥ ४३६ ॥**

छत्री धारण करणें हें पाऊस, ऊन, वारा, धूळ व हिम यांचें निवारण करणारें, नेत्रांस हितकारक आणि मांगलिक सांगितलें आहे ॥ ४३६ ॥

परंतु दोन प्रहरच्या वेळचें ऊन्ह उष्ण देशामध्यें अतिशय भयंकर असतें, तें प्राण्यांकडून सहन होऊं शकत नाहीं, करितां अशा देशांमध्यें दुपारचा वेळ काढून दोन घटका विश्रांति घेण्याची जरूर आहे. दुपारच्या वेळाविषयीं जानकीपरिणयांत सांगितलें आहे कीं,

**छाया संश्रयते तलं विटपिनां श्रान्तेव पान्थैः समं**
**मूलं याति सरोजलस्य जडता ग्लानेव मीनैः सह ।**

**आचामत्यहिमांशुदीधितिरपस्तप्तेव लोकैः समं**
**निद्रा गर्भगृहं सह प्रविशति क्लान्तेव कान्ताजनैः ॥ ४३७ ॥**

मध्यान्ह समयीं वृक्षांची छाया जणूं थकून गेल्यामुळेंच कीं काय प्रवासी लोकांसह त्यांच्या तलाचा आश्रय करिते, सरोवरांच्या पाण्याची जडता जणूं पीडित झाल्यामुळेंच कीं काय मत्स्यांसह त्यांच्या तळास जाऊन वसते, सूर्यकिरण जणूं तप्त झाल्यामुळेंच कीं काय लोकांसह जलाचें आचमन करीत आहेत आणि निद्रा जणूं थकून गेल्यामुळेंच कीं काय स्त्रीजनांसह माजघरांत प्रवेश करिते ॥ ४३७ ॥

तसेंच सायंकालच्या अंधाराच्या समयाविषयीं भोजप्रबंधांत सांगितलें आहे कीं,

**व्यसनिन इव विद्या क्षीयते पङ्कजश्रीर्**
**गुणिन इव कुदेशे दैन्यमायान्ति भृङ्गाः ।**
**कुनृपतिरिव लोकं पीडयत्यन्धकारो**
**धनमिव कृपणस्य व्यर्थतामेति चक्षुः ॥ ४३८ ॥**

सायंकाळीं कमलांची शोभा व्यसनी पुरुषाच्या विद्येसारखी क्षीण होत चालली आहे, भ्रमर कुदेशांतील गुणी जनांसारखे दीनता पावत आहेत, अंधकार दुष्ट राजासारखा लोकांस पीडा देत आहे, आणि नेत्र कृपणाच्या धनासारखे व्यर्थतेस प्राप्त होत अहेत ॥ ४३८ ॥

पुनः माघ कवीनें शिशुपालवधांत सांगितलें आहें कीं,

**अनुरागवन्तमपि लोचनयोर्दधतं वपुः सुखमतापकरम् ।**
**निरकासयद्रविमपेतवसुं वियदालयादपरदिग्गणिका ॥ ४३९ ॥**

सायंकालचा सूर्य यद्यपि अनुरागयुक्त, नेत्रांस सुखावह व ताप न करणाऱ्या शरीरास धारण करणारा आहे, तथापि तें किरणरूपी धन नष्ट झाल्यानें त्यास पश्चिमदिशारूपी गणिकेनें आकाशरूपी घरांतून बाहेर हांकून लावला ॥ ४३९ ॥

तसेंच शार्ङ्गधरपद्धतींत सांगितलें आहे कीं,

**चिरम तिमिर साहसादमुष्माद्यदि रविरस्तमितः स्वतस्ततः किम् ।**
**कलयसि न पुरो महामहोभिर्द्युतिनिधिरभ्युदयत्ययं शशाङ्कः ॥४४०॥**

हे अंधकारा! तूं उतावीळ होऊं नकोस. थांब. सूर्य कदाचित् आपण होऊन अस्तास गेला म्हणून काय झालें? कारण कांतीचें भांडार असा हा चंद्रमा तेजःपुंजांसहवर्तमान पुरोभागीं उदय पावत आहे, तो तुला दिसत नाहीं? ॥ ४४० ॥

**परिपतति पयोनिधौ पतङ्गः सरसिरुहामुदरेषु मत्तभृङ्गः ।**
**उपवनतरुकोटरे विहङ्गो निजसदनेषु समस्तलोकसंघः ॥४४१॥**

सायंकाळीं जणूं सूर्य समुद्रामध्यें पडत आहे, मदोन्मत्त भ्रमर कमलांच्या मध्यभागीं प्रवेश करीत आहेत, पक्षी उपवनांतील वृक्षांच्या ढोलींमध्यें शिरत आहेत आणि समस्त लोकसमुदाय आपापल्या घरामध्यें प्राप्त होत आहे ॥४४१॥

आतां शरीराच्या कुशलासाठीं दिवसाप्रमाणें रात्रीसहि नियमानें वागलें पाहिजे. सृष्टीमध्यें पाहिलें असतां असें दिसून येतें कीं, बहुतकरून प्राण्यांस आराम घेण्याकरितांच रात्र निर्माण झाली आहे. करितां मनुष्यानें आपल्या धंद्यासंबंधीं जें कांहीं कार्य असेल तें दिवसास करावें व रात्रीस आराम घ्यावा. प्रवृत्तिपासून निवृत्ति व निवृत्तिपासून प्रवृत्ति होणें हा सृष्टीचा नियम आहे. दिवसास प्रवृत्तिमध्यें असलेला मनुष्य थकून जाऊन रात्रीं निवृत्ति पावतो, व रात्रीं निवृत्तिमध्यें असलेला मनुष्य पुनः हुशार होऊन दिवसास प्रवृत्तिमध्यें लागतो. ज्यास कांहीं काम करावयाचें असत नाहीं, त्यास काम करण्याची व ज्यानें काम केलें असेल त्यास एकांतीं बसण्याची इच्छा होणें स्वाभाविक आहे. करितां मनुष्यानें प्रवृत्ति व निवृत्ति दोहींमध्येंहि रहावें, एकीसच चिकटून बसूं नये, कारण त्यामुळें जलद हानि होते. रात्रीसंबंधीं नियम पाळण्याविषयीं भावप्रकाशाच्या पूर्वखंडांतील प्रथम भागांत सांगितलें आहे कीं,

**रात्रौ च भोजनं कुर्यात् प्रथमप्रहरान्तरे ।**
**किञ्चिदूनं समश्नीयाद्दुर्जरं तत्र वर्जयेत् ॥ ४४२ ॥**

---

१ हा सायंकालच्या वर्णनाचा दंडीप्रभृति चार कवींनीं केला असून याचा शेवटचा चरण "युवतिजनेषु शनैः शनैरनङ्गः" असा कालिदासाचा म्हणून प्रसिद्ध आहे.

रात्रीं पहिल्या प्रहराच्या आंत भोजन करावें, परंतु किंचित् कमी जेवावें व पचण्यास जड जाईल असें खाऊं नये ॥ ४४२ ॥

**त्रिभिस्त्रिभिरहोभिर्हि समेयात्प्रमदां नरः ।**
**अन्येष्वृतुषु घर्मे तु पक्षात् पक्षाद्व्रजेद्बुधः ॥ ४४३ ॥**

आणि समजूतदार पुरुषानें उन्हाळ्याशिवाय इतर ऋतूंमध्यें तीन तीन दिवसांनीं व उन्हाळ्यामध्यें पंधरा पंधरा दिवसांनीं स्त्रीसंभोग करावा ॥४४३॥

**उपेयात्पुरुषो नारीं संध्ययोर्न च पर्वसु ।**
**गोसर्गे चार्धरात्रे च तथा मध्यदिनेऽपि च ॥ ४४४ ॥**

त्यांतहि प्रातःकाल, सायंकाल, पौर्णिमा, अमावास्या, प्रभातकाल, मध्यरात्र, मध्याह्न इतक्या वेळीं स्त्रीसंभोग करूं नये ॥ ४४४ ॥

**रजस्वलामकामां च गर्भिणीं व्याधिपीडिताम् ।**
**नाभिगच्छेत् पुमान्नारीं योनिरोगसमन्विताम् ॥ ४४५ ॥**

पुनः रजस्वला, कामनारहित, गर्भिणी, व्याधिग्रस्त, जननेंद्रियाचा रोग असलेली अशा स्त्रीशीं संभोग करूं नये ॥ ४४५ ॥

**रजस्वलां गतवतो नरस्यासंयतात्मनः ।**
**दृष्ट्यायुस्तेजसां हानिरधर्मश्च ततो भवेत् ॥ ४४६ ॥**

कारण मनास स्वाधीन न ठेवतां रजस्वला स्त्रीशीं संभोग करणाऱ्या पुरुषाची दृष्टि, आयुष्य व तेज यांची हानि आणि अधर्माची प्राप्ति होते॥४४६॥

**पर्वाहे सन्ध्ययोश्चापि गच्छतो जीवनक्षयः ।**
**गर्भिण्यां गर्भपीडा स्याद्रोगिण्यां रोगसंभवः ॥ ४४७ ॥**

तसेंच पौर्णिमा, अमावास्या, व सकाळ संध्याकाळ या कालीं विषय-सेवन करणाऱ्या पुरुषाच्या जीविताचा क्षय होतो, आणि गर्भिणी स्त्रीशीं संभोग केला असतां गर्भास पीडा होते व रोगिणी स्त्रीशीं संभोग केला असतां रोग होण्याचा संभव असतो ॥ ४४७ ॥

**गोसर्गे चार्धरात्रे च वातपित्ते प्रकुप्यतः ।**
**अत्याशितोऽधृतिः क्षुद्वान् सव्यथाङ्गः पिपासितः ॥ ४४८ ॥**

तसेंच प्रभातकालीं व मध्यरात्रीस स्त्रीसेवन केल्यानें वात आणि पित्त यांचा प्रकोप होतो; पुनः अतिशय भोजन केलेला, अस्वस्थ चित्त असलेला, भुकेलेला, ज्याचें अंग दुखत आहे असा, तहानेला—॥ ४४८ ॥

**बालो वृद्धोऽन्यवेगार्तो रोगी च न व्रजेत् स्त्रियम् ।**
**क्षुधितः क्षुब्धचित्तश्च मध्यान्हे तृषितोऽबलः ॥ ४४९ ॥**

१६ वर्षांच्या आंतील बालक, ७० वर्षें होऊन गेलेला वृद्ध, मलमूत्रादिकांच्या वेगानें पीडित व रोगी इतक्या पुरुषांनीं स्त्रीसेवन करूं नये; कारण भुकेलेला, अस्वस्थचित्त, मध्याह्नकालीं, तृषित आणि बलहीन—॥ ४४९ ॥

**स्थितस्य हानिं शुक्रस्य वायोः कोपं च विन्दति ।**
**व्याधितस्य रुजा प्लीहा मूर्च्छा मृत्युश्च जायते ॥ ४५० ॥**

असा पुरुष स्त्रीसेवन करील तर शरीरामध्यें असलेल्या शुक्राच्या हानीस व वायूच्या प्रकोपास पावतो; आणि रोग्यास पीडा, पोटांत कौळ्ची गांठ, मूर्च्छा व मृत्यु येतो ॥ ४५० ॥

पुनः स्त्री ऋतुमती असेल त्या वेळींच तिचें सेवन करणें उचित आहे. कारण याच ग्रंथांत याच ठिकाणीं सांगितलें आहे कीं,

**आर्तवस्रावदिवसादृतुः षोडश रात्रयः ।**
**गर्भग्रहणयोग्यस्तु स एव समयः स्मृतः ॥ ४५१ ॥**

रजाचा स्राव होईल त्या दिवसापासून १६ रात्रींपर्यंत ऋतु ह्मटला जातो, व स्त्रीस गर्भधारणास योग्य समयहि तोच आहे ॥ ४५१ ॥

**आयुःक्षयभयाद्भर्ता प्रथमे दिवसे स्त्रियम् ।**
**द्वितीयेऽपि न वै रत्यै व्रजेदृतुमतीं तथा ॥ ४५२ ॥**

पुरुषानें आयुष्य क्षीण होईल या भीतीनें ऋतुमती स्त्रीजवळ संभोगाकरितां पहिले व दुसरे दिवशीं जाऊं नये ॥ ४५२ ॥

**तत्र यश्चाहितो गर्भो जायमानो न जीवति ।**
**आहितो यस्तृतीयेऽन्हि स्वल्पायुर्विकृताङ्गकः ॥ ४५३ ॥**

पुन: या दोन्ही दिवशीं जो गर्भ राहील, तो जन्मल्यानंतर जगत नाहीं; तसेंच जर तिसऱ्या दिवशीं गर्भ राहील, तर तो अल्पायुषी व अंध-पंगु होईल; ह्मणून त्या दिवशींहि स्त्रीसेवन करूं नये ॥ ४५३ ॥

**अतश्चतुर्थी षष्ठी स्यादष्टमी दशमी तथा ।**
**द्वादशी वापि या रात्रिस्तस्यां तां वनितां भजेत् ॥ ४५४ ॥**

करितां रजोदर्शनापासून १६ रात्रीपर्यंत जी चवथी, सहावी, आठवी, दहावी आणि बारावी वगैरे रात्र असेल त्या रात्रींमध्यें ऋतुमती स्त्रीचें सेवन करावें ॥ ४५४ ॥

**अत्रोत्तरोत्तरं विन्द्यादायुरारोग्यमेव च ।**
**प्रजासौभाग्यमैश्वर्यं बलं चाभिगमात् फलम् ॥ ४५५ ॥**

त्यांतहि उत्तरोत्तर रात्रीच्या ठिकाणीं गमन केल्यानें आयुष्य, आरोग्य, सत्प्रजा, शरीरसामर्थ्य व इंद्रियबलरूप फल प्राप्त होतें ॥ ४५५ ॥

याप्रमाणें नियमित स्त्रीसेवन करण्यास सांगितलें आहे, त्यामध्यें अमावास्या व पौर्णिमा हे दिवसहि स्त्रीसेवनास निषिद्ध मानले आहेत, त्याचें कारण असें आहे कीं, या दोन्ही दिवशीं पृथ्वीवर सूर्य व चंद्र यांचें आकर्षण एकत्र झाल्यानें तें नेहमींहून विशेष असतें. कारण अमावास्येस चंद्र व सूर्य दोन्ही सरळ रेषेमध्यें पृथ्वीच्या एका बाजूनें असतात. आणि पौर्णिमेस पृथ्वीच्या एका बाजूनें चंद्र व दुसऱ्या बाजूनें सूर्य सरळ रेषेमध्यें असतात. आणि असा नियम आहे कीं, कोणत्याही पदार्थावर एकाहून अधिक वस्तूंचें आकर्षण जर सरळ रेषेमध्यें होत असेल तर तें विशेष परिणाम करतें. ह्मणून अमावास्येस व पौर्णिमेस सूर्य व चंद्र यांच्या एकत्र जमलेल्या आकर्षणाचा पृथ्वीवरील वातावरण, पाणी व स्थावर-जंगम प्राणी यांच्यावर विशेष परिणाम होतो; तें स्थूल दृष्टीनें समजण्यांत येत नाहीं, परंतु विचार दृष्टीनें पाहिलें असतां प्रसिद्धपणें समजून येतें कीं, या दोन्ही दिवशीं समुद्रामध्यें विशेष भरती व रोग्यास विशेष पीडा झालेली पाहण्यांत येते, त्यांतहि श्वासरोग्यास होणाऱ्या पीडेमध्यें अधिक प्रसिद्धपणें समजून येतें. याचप्रमाणें इतर ग्रहहि ज्यावेळीं

पृथ्वीच्या कोणत्याहि बाजूस सरळ रेषेमध्यें एकाहून अधिक येतात, त्यावेळीं त्यांचें एकत्र मिळालेलें आकर्षणहि पृथ्वीवरील वातावरण, पाणी व स्थावर जंगमप्राणी यांवर परिणाम करतें, परंतु तें सूर्य-चंद्राच्या आकर्षणा-इतकें करूं शकत नाहीं. कारण सूर्य पृथ्वीहून अतिशय मोठा आहे व अतिशय जवळ आहे. आणि इतर ग्रह अतिशय दूर व आकारानें फार लहान आहेत. याप्रमाणें अमावास्येस व पौर्णिमेस सूर्य-चंद्राचें एकत्र मिळालेलें आकर्षण पृथ्वीवरील प्राण्यांच्या शरीरावर वाईट परिणाम करीत असल्यानें या दोन्ही दिवशीं स्त्रीसेवन करूं नये. कारण स्त्रीसेवनानें बल कमी होतें, व बल कमी झाल्यानें कोणत्याहि प्रकारचा परिणाम शरीरावर तावडतोब होतो. आणि त्यामध्यें झालेली प्रजाहिं अशक्त होईल यांत आश्चर्य नाहीं. पुनः जर मल-मूत्र त्यागाचा वेग उत्पन्न झाला असेल, तर त्याचा रोध करून स्त्रीसेवन करूं नये, तर त्याग केल्यानंतर करावें. कारण थांबविलेल्या मल—मूत्राचा स्त्रीसेवन केल्यानंतर त्याग करण्यास गेलें असतां तो बरोबर होऊं शकत नाहीं व नंतर त्यासंबंधीं शरीरामध्यें रोग उत्पन्न होतात. तसेंच पाणीहि पहिल्यानें पिऊन घ्यावें, कारण मागाहून थकवा आला असतां पाणी पिणें हानिकारक आहे. परंतु जर सोसेल तर साखर घालून दूध पिणें हितावह आहे. याप्रमाणें नियम पाळून स्त्रीसेवन केल्यानें शरीरामध्यें कोणत्याहि प्रकारची हानि न होतां उलट लाभ होतो. याविषयीं भावप्रकाशाच्या पूर्वखंडांतील प्रथम भागांत सांगितलें आहे कीं,

आयुष्मन्तो मन्दजरा वपुर्वर्णबलान्विताः ।
स्थिरोपचितमांसाश्च भवन्ति स्त्रीषु संयताः ॥ ४५६ ॥

स्त्रियांचे ठिकाणीं नियमित पणानें वर्तन करणारे पुरुष दीर्घायुषी, मंदवार्धक्य, शरीर, वर्ण व बल यांनीं युक्त आणि स्थिर व पुष्ट मांसयुक्त होतात ॥ ४५६ ॥

शूलकासज्वरश्वासकार्श्यपाण्ड्वामयक्षयाः ।
अतिव्यवायाज्जायन्ते रोगाश्चाक्षेपकादयः ॥ ४५७ ॥

परंतु स्त्रीसेवन अतिशय केल्यानें शूल, कास, जरा, श्वास, कृशता, पांडुरोग, क्षय व उचकी इत्यादि वातरोग होतात ॥ ४५७ ॥

आतां नियमितपणानें स्त्रीसेवन केल्यानंतर ऋतुमानानें थंड किंवा उन्ह पाण्यानें मलिन झालेलें अंग धुवून स्वच्छ करावें, कारण तसें केल्यानें त्या संबंधीं रोग होण्याची भीति राहत नाहीं. नंतर चूळ भरून टाकून तोंड आंतून स्वच्छ करावें, कारण रात्रीस खाल्लेल्या तांबूलादिकांचा अंश जर तोंडाच्या आंतील दांत, जिह्वा, तालु वगैरे कोणत्याहि भागामध्यें भरून राहील, तर त्या भागावर चांदी पडून पाक होऊन येतो अर्थात् तोंड फुटून येतें. नंतर हात पाय धुवून, मन शांत करून स्वच्छ अंथरुणावर शयन करावें. तेथें कोणत्याहि प्रकारचा संकल्प—विकल्प करूं नये. संकल्प—विकल्प केल्यानें मन स्थिर होत नाहीं व मन स्थिर झाल्यावांचून झोंप येण्याचा स्वभाव नाहीं. आणि झोंप न येईल तर शरीरामध्यें त्यासंबंधीं रोग होतात. करितां रात्रीस सर्व संकल्प—विकल्पांचा त्याग करून स्वस्थ सुखानें झोंपण्यामुळें होणाऱ्या लाभाविषयीं भावप्रकाशाच्या पूर्वखंडांतील प्रथमभागांत सांगितलें आहे कीं,

**निद्रा तु सेविता काले धातुसाम्यमतन्द्रिताम् ।**
**पुष्टिवर्णबलोत्साहं वह्निदीप्तिं करोति हि ॥ ४५८ ॥**

वेळेवर सेवन केलेली निद्रा रसादि धातूंची समता, निरालस्य, पुष्टि, कांति, बल, उत्साह व जठराग्नीचें दीपन करिते ॥ ४५८ ॥

परंतु जर सर्प वगैरे विषारी प्राण्यांचा दंश होईल, तर रात्रीस जागरण हितकर सांगितलें आहे; याच ग्रंथांत याच ठिकाणीं सांगितलें आहे कीं,

**रात्रौ जागरणं रूक्षं कफदोषविषार्तिजित् ॥ ४५९ ॥**

रात्रीस केलेलें जागरण कफदोष व विष यांच्या पीडेस घालविणारें आहे ॥ ४५९ ॥

आतां कुशलाकरितां दिवस व रात्रीप्रमाणें प्रत्येक ऋतूमध्येंहि नियमितपणानें वर्तन केलें पाहिजे. याच ग्रंथाच्या ऋतुचर्याध्यायांत सांगितलें आहे कीं,

शिशिरः शीतलोऽतीव रूक्षो वाताग्निवर्धनः ।
वसन्तो मधुरः स्निग्धः श्लेष्मवृद्धिकरश्च सः ॥ ४६० ॥

शिशिर ऋतु अति शीतल, रुक्ष आणि वात व अग्नि यांस वाढविणारा आहे; वसंतऋतु मधुर, स्निग्ध व श्लेष्माची वृद्धी करणारा आहे ॥ ४६० ॥

ग्रीष्मो रूक्षोऽतिकटुकः पित्तकृत्कफनाशनः ।
वर्षाः शीता विदाहिन्यो वह्निमान्द्यानिलप्रदाः ॥ ४६१ ॥

ग्रीष्म ऋतु रूक्ष, अति कटु, पित्त वाढविणारा व कफनाशक आहे; वर्षा ऋतु शीत, शरीर ऊबदार ठेवणारा, जठराग्नीस मंद करणारा व वायूस वाढविणारा आहे ॥ ४६१ ॥

शरदुष्णा पित्तकर्त्री नृणां मध्यबलावहा ।
हेमन्तः शीतलः स्निग्धः स्वादुर्जठरवह्निकृत् ॥ ४६२ ॥

शरद् ऋतु उष्ण, पित्त वाढविणारा व मनुष्यास मध्यम बल देणारा आहे, आणि हेमंत ऋतु शीतल, स्निग्ध, स्वादु व जठराग्नीस वाढविणारा आहे ॥ ४६२ ॥

करितां प्रत्येक ऋतूस अनुसरून वस्त्रें धारण करावीं, जसें कीं शीतकालीं जाडीं व उष्णकालीं पातळ. पुनः आहार ह्मणजे खाणें-पिणें व विहार ह्मणजे हिंडणें-फिरणें, हींहि प्रत्येक ऋतूमध्यें अनुकूल होतील अशा रीतीनें आचरावीं; आणि राहण्याचें घरहि सर्व ऋतूंमध्यें अनुकूल होईल अशीं त्यांत साधनें ठेवावीं, तसें करण्यानें शरीर निरोगी राहतें. पुनः हे ऋतू ओळखतां येण्यासाठीं आयुर्वेदांतील सूत्रस्थानाच्या ६ व्या अध्यायांत सागितलें आहे कीं,

शिशिरे शीतमधिकं वातवृष्ट्याकुला दिशः ।
शेषं हेमन्तवत्सर्वं विज्ञेयं लक्षणं बुधैः ॥ ४६३ ॥

शिशिर ऋतूमध्यें पुष्कळ थंडी तुषारयुक्त वायु व वृष्टि यांनीं सर्व दिशा वेष्टित होतात, व त्याचीं बाकीचीं सर्व लक्षणें बुद्धिमंतांनीं हेमंतऋतूसारखीं जाणावीं ॥ ४६३ ॥

दिशो वसन्ते विमलाः काननैरुपशोभिताः ।
रसालाम्भोजबकुलपर्णाशोकादिपुष्पितैः ॥ ४६४ ॥

वसंतऋतूमध्यें सर्व दिशा निर्मळ, आंबे, कमलें व बकुल, पळस व अशोकादि वृक्षांच्या पुष्पयुक्त वनांनीं शोभित—॥ ४६४ ॥

कोकिलाषट्पदगणैरुपगीता मनोहराः ।
दक्षिणानिलसंवीताः सुमुखाः पल्लवोज्ज्वलाः ॥ ४६५ ॥

कोकिलकुलांच्या कलकूजितानें व भ्रमरगणांच्या मंजुळ गुंजारवानें निनादित, अतएव मनोहर, दक्षिण दिशेच्या वायूनें वेष्टित, सुंदर देखाव्यांनीं युक्त आणि नवपल्लवांनीं उज्ज्वल अशा होतात ॥ ४६५ ॥

ग्रीष्मे तीक्ष्णांशुरादित्यो मारुतो नैर्ऋतोऽसुखः ।
भूस्तप्ता सरितस्तन्व्यो दिशः प्रज्वलिता इव ॥ ४६६ ॥

ग्रीष्मऋतूमध्यें सूर्य तीक्ष्ण किरणांचा, नैर्ऋत्य कोणाच्या बाजूचा दुःखद वायु, भूमी संतप्त, नद्या पाणी आटून गेलेल्या आणि दिशा जणूं प्रज्वलित झालेल्या,—॥ ४६६ ॥

भ्रान्तचक्राह्वयुगलाः पयःपानाकुला मृगाः ।
ध्वस्तवीरुत्तृणलता विपर्णाङ्कितपादपाः ॥ ४६७ ॥

भ्रांत झालेल्या चक्रवाक पक्ष्यांचीं जोडपीं फिरतात, पाणी पिण्यासाठीं मृग व्याकुल होतात, वेल, तृणें व लता सुकून जातात आणि वृक्ष पुष्कळ पानांनीं युक्त होतात ॥ ४६७ ॥

प्रावृष्यम्बरमानद्धं पश्चिमानिलकर्षितैः ।
अम्बुदैर्विद्युदुद्योतप्रसृतैस्तुमुलस्वनैः ॥ ४६८ ॥

वर्षाऋतूमध्यें पश्चिम वायूनें आकर्षित झालेले, विजेच्या प्रकाशानें पसरलेले व मोठ्या गर्जनेनें युक्त अशा मेघांनीं आकाश आच्छादून जातें ॥ ४६८ ॥

कोमलश्यामशष्पाढ्या शक्रगोपोज्ज्वला मही ।
कदम्बनीपकुटजसर्जकेतकिभूषिता ॥ ४६९ ॥

आणि पृथ्वी कोमल व श्यामवर्ण तृणांनीं युक्त, इंद्रगोप नांवाच्या लाल जंतूंनीं सुंदर दिसणारी आणि कदंब, अशोक, इंद्रजव, साग व केतकी या वृक्षांनीं सुशोभित असते ॥ ४६९ ॥

तत्र वर्षासु नद्योऽम्भःपूरोद्भग्नतटद्रुमाः ।
वाप्यः प्रोत्फुल्लकुमुदनीलोत्पलविराजिताः ॥ ४७० ॥

पुनः वर्षाऋतूमध्यें नद्यांस पाण्याचा पूर येऊन तीरें व तीरावरील वृक्ष भग्न होऊन जातात. बांधलेले जलाशय प्रफुल्लित झालेल्या श्वेतकमलांनीं व नीलकमलांनीं सुशोभित होतात ॥ ४७० ॥

भूरव्यक्तस्थलश्वभ्रा बहुसस्योपशोभिता ।
नातिगर्जत्स्रवन्मेघनिरुद्धार्कग्रहं नभः ॥ ४७१ ॥

पृथ्वीवरील नीचोच्च भाग अदृश्य होतात व ती पुष्कळ धान्यांनीं शोभूं लागते. आणि आकाश अति गर्जना केल्यावांचून वृष्टि करणाऱ्या मेघांनीं सूर्य व इतर ग्रह यांस आच्छादून टाकतें ॥ ४७१ ॥

बभ्रुरुष्णः शरद्यर्कः श्वेताभ्रविमलं नभः ।
तथा सरांस्यम्बुरुहैर्भान्ति हंसांसघट्टितैः ॥ ४७२ ॥

शरद् ऋतूमध्यें सूर्य पिंवळा व उष्ण असतो, आकाश सफेद अभ्रांनीं निर्मल असतें आणि सरोवरें हंसांच्या स्कंधमिश्रित कमलांनीं शोभतात ॥ ४७२ ॥

पङ्कशुष्कद्रुमाकीर्णा निम्नोन्नतसमेषु भूः ।
बाणसप्ताह्वबन्धूककाशासनविराजिता ॥ ४७३ ॥

पुनः पृथ्वी नीच उच्च व समान स्थलांमधील ज्यांच्या आसपासचा कर्दम सुकून जातो अशा वृक्षांनीं व्याप्त होते, आणि झिंटी, सप्ताह्व, दुपारी, कांस व असन या नांवाच्या लहान लहान झाडांनीं सुशोभित होते ॥ ४७३ ॥

वायुर्वात्युत्तरः शीतो रजोधूमाकुला दिशः ।
छन्नस्तुषारैः सविता हिमानद्धा जलाशयाः ॥ ४७४ ॥

आणि हेमंत ऋतूमध्यें उत्तर दिशेचा थंड वायु वाहतो, दिशा रजोरूप धूमानें आकुल होतात, सूर्य हिमानें आच्छादित होतो व जलाशय दंहिवरानें व्याप्त होतात ॥ ४७४ ॥

**दर्पिता ध्वाङ्क्षखड्गाह्वमहिषोरभ्रकुञ्जराः ।**
**रोध्रप्रियङ्गुपुन्नागाः पुष्पिता हिमसाह्वये ॥ ४७५ ॥**

पुनः कावळे, गेंडे, रेडे, मेंढे व हत्ती गर्विष्ठ होतात, आणि लोध्र, वाघेटी, सुरंगी वेल, हेमंत ऋतूमध्यें पुष्पित होतात ॥ ४७५ ॥

आतां पुरुष जातीप्रमाणें स्त्रीजातीनेंहि आपल्या शरीराचें आरोग्य सांभाळलें जाईल अशा रीतीनें वागावें, त्याच्या उलट वागूं नये. कारण शरीर निरोगी असेल तरच व्यावहारिक सर्व प्रकारची कुशलता मिळविणें शक्य होतें. करितां पुरुषांप्रमाणें स्त्रियांनींहि दिवसास रात्रीं व प्रत्येक ऋतूमध्यें सांगितल्याप्रमाणें वागावें. फरक तो इतकाच आहे कीं, स्त्रियांस गर्भाशय असतो, करितां पुरुषांपेक्षां त्यांस त्यासंबंधीं विशेष नियम पाळण्याची जरूर असते, त्याविषयीं पूर्वीं सांगण्यांत आलें आहे. पुनः आयुर्वेदाच्या सुश्रुत ग्रंथांतील शारीरस्थानांत सांगितलें आहे कीं,

**शङ्खनाभ्याकृतिर्योनिस्त्र्यावर्ता सा प्रकीर्तिता ।**
**तस्यास्तृतीये त्वावर्ते गर्भशय्या प्रतिष्ठिता ॥ ४७६ ॥**

शंखाच्या नाभीसारख्या आकृतीचें, तीन आवर्तांनीं युक्त, स्त्रीचें जननेंद्रिय आहे, त्याच्या तिसऱ्या आवर्तामध्यें गर्भशय्या अर्थात् गर्भाशय राहिला आहे ॥ ४७६ ॥

**यथा रोहितमत्स्यस्य मुखं भवति रूपतः ।**
**तत्संस्थानां तथारूपां गर्भशय्यां विदुर्बुधाः ॥ ४७७ ॥**

जशा आकाराचें रोहित मत्स्याचें मुख असतें, तशा आकाराचें जननेंद्रियामध्यें गर्भस्थान असलेलें बुद्धिमान् जाणतात ॥ ४७७ ॥

**नियतं दिवसेऽतीते संकुचत्यम्बुजं यथा ।**
**ऋतौ व्यतीते नार्यास्तु सैव संव्रियते तथा ॥ ४७८ ॥**

दिवस गेल्यानंतर कमल जसें नियमानें संकोच पावतें, तसा तो गर्भाशय स्त्रीचा ऋतु गेल्यानंतर संकोच पावतो, अर्थात् गर्भ ग्रहण करण्यास समर्थ असत नाहीं ॥ ४७८ ॥

तसेंच भावप्रकाशाच्या पूर्वखंडांतील प्रथम भागांत सांगितलें आहे कीं,

**शुक्रार्तवसमाश्लेषो यदैव खलु जायते।**
**जीवस्तदैव विशति युक्तः शुक्रार्तवान्तरः ॥ ४७९ ॥**

ज्यावेळीं शुद्ध शुक्र व शुद्ध आर्तव हीं दोन्ही एकत्र होतील, त्यावेळींच त्या दोहोंमध्यें युक्त असलेला जीव प्रवेश करतो ॥ ४७९ ॥

**सूर्यांशोः सूर्यमणितो ह्युभयस्माद्युताद्यथा ।**
**वह्निः संजायते जीवस्तथा शुक्रार्तवान्तरः ॥ ४८० ॥**

जसा सूर्यकिरण व सूर्यकांतमणि या दोहोंच्या योगानें अग्नि उत्पन्न होतो, तसा शुद्ध शुक्र व शुद्ध आर्तव यांच्या योगानें जीव उत्पन्न होतो ॥ ४८० ॥

**बीजेऽन्तर्वायुना भिन्ने द्वौ जीवौ कुक्षिमागतौ ।**
**आधिक्ये रेतसः पुत्रः कन्या स्यादार्तवेऽधिके ॥ ४८१ ॥**

आणि गर्भाशयाच्या वायूनें बीजाचे दोन भाग होतील तर त्यामध्यें दोन जीव होतात; आणि रेत अधिक असेल तर पुत्र होतो व आर्तव अधिक असेल तर कन्या होते ॥ ४८१ ॥

**गुर्विणी न तु कुर्वीत यानस्यारोहणं तथा ।**
**व्यवायं च न सेवेत न कुर्यादतितर्पणम् ॥ ४८२ ॥**

आतां गर्भिणीनें वाहनावर बसूं नये, पुरुषाचा संग करूं नये व अतिशय भोजन करूं नये ॥ ४८२ ॥

**भोज्यं तु मधुरप्रायं स्निग्धं हृद्यं द्रवं लघु ।**
**संस्कृतं दीपनीयं तु नित्यमेवोपयोजयेत् ॥ ४८३ ॥**

आणि नित्य प्रायः मधुर, स्निग्ध, प्रिय, मृदु, हलका, चांगल्या प्रकारें रांधून तयार केलेला आणि अग्नीचें दीपन करणारा आहार करावा ॥ ४८३ ॥

**नोच्चैर्ब्रूयान्न तत्कुर्याद्येन गर्भो विनश्यति ।**
**तैलाभ्यङ्गोद्वर्तनं च नात्यर्थं कारयेदपि ॥ ४८४ ॥**

पुनः मोठ्या आवाजानें बोलूं नये व जेणेंकरून गर्भ नाश पावेल असें आचरण करूं नये; तसेंच अतिशय तेलाचा अभ्यंग व शरीर चोळणें करूं नये ॥ ४८४ ॥

**दोषाभिघातैर्गर्भिण्या यो यो भागः प्रपीड्यते ।**
**स स भागः शिशोस्तस्या गर्भस्थस्य प्रपीड्यते ॥ ४८५ ॥**

कारण दोषाच्या अभिघातानें गर्भिणीचा जो जो भाग पीडित होतो तो तो तिच्या गर्भामध्यें असलेल्या बालकाचाहि भाग पीडित होतो ॥४८५॥

**प्रसूता हितमाहारं विहारं च समाचरेत् ।**
**व्यायामं मैथुनं क्रोधं शीतसेवां विवर्जयेत् ॥ ४८६ ॥**

आतां प्रसूत झालेल्या स्त्रीनें हितकर आहार व विहार करावा, आणि मेहनत, मैथुन, क्रोध, थंड पदार्थ व थंडी यांचा त्याग करावा ॥ ४८६ ॥

**मिथ्याचारात्सूतिकाया यो व्याधिरुपजायते ।**
**स कृच्छ्रसाध्योऽसाध्यो वा भवेत्तत्पथ्यमाचरेत् ॥ ४८७ ॥**

कारण सूतिकेस अहित आहार व विहार यांपासून जो व्याधि उत्पन्न होतो तो कष्टसाध्य किंवा असाध्य होतो; करितां तीनें पथ्य पाळावें ॥४८७॥

**व्युपद्रवां विशुद्धां च विज्ञाय वरवर्णिनीम् ।**
**ऊर्ध्वं चतुर्भ्यो मासेभ्यो नियमं परिहारयेत् ॥ ४८८ ॥**

चार महिने झाल्यानंतर तीस उपद्रवरहित, शुद्ध व चांगली झालेली जाणून बाळंतिणीचे नियम तिच्याकडून सोडवावे ॥ ४८८ ॥

आतां पुरुषजातीप्रमाणें स्त्रीजातीनेंहि आपल्या शरीराचें आरोग्य संभाळण्यांत नेहमीं तत्पर राहणें योग्य आहे, तसेंच आपल्या बालकाचें शरीरहि निरोगी राखण्यांत लेशमात्र अनादर करणें योग्य नाहीं. कारण बालक अज्ञान व निर्बळ असल्याकारणानें आपल्या शरीराचें कुशल समजण्यास व राखण्यास समर्थ नाहीं, त्यामुळें तो आपलें पालन–पोषण करणाऱ्याच्या स्वाधीन असतो

आणि त्यानें ठेविलेल्या व्यवस्थेप्रमाणें शरीरानें सुखी किंवा दुःखी होतो. सर्व स्थावर–जंगमात्मक प्राण्यांच्या आयुष्याचा प्रथम भाग बाल्यावस्था आहे, त्या अवस्थेमध्यें जर त्यांचें पालन–पोषण करणारा त्यांस चांगली जोपासना करून सुदृढ करील, तर चांगल्या पायावर रचलेल्या इमारतीप्रमाणें ते आपलें पूर्ण आयुष्य, जर कांहीं दैवी आपत्ति न येईल, तर भोगूं शकतील. पुनः जर बालक असेल तरच मोठा होऊन मनुष्य होतो, करितां त्याची जतन मोठ्याहून कमीपणानें न ठेवितां विशेष ठेवणें योग्य आहे. या विषयीं भाव-प्रकाशाच्या पूर्वखंडांतील प्रथम भागांत सांगितलें आहे कीं,

**मिथ्याहारविहारिण्या दुष्टा वातादयः स्त्रियाः ।**
**दूषयन्ति पयस्तेन शरीरे व्याधयः शिशोः ॥ ४८९ ॥**

अहित आहार व विहार करणाऱ्या स्त्रीच्या दुधास दुष्ट झालेले वातादि दोष दूषित करतात; त्यामुळें बालकाच्या शरीरामध्यें रोग होतात ॥ ४८९ ॥

**नीरे स्तन्यं यदेकीस्यादविवर्णमतन्तुमत् ।**
**पाण्डुरं तनु शीतं च तद्दुग्धं शुद्धमादिशेत् ॥ ४९० ॥**

जें दूध पाण्यामध्यें मिश्र केलें असतां एक होऊन जाईल, खराब रंग नसलेलें, तंतूंशिवायचें, सफेद, पातळ व थंड असेल तें दूध शुद्ध जाणावें ॥४९०॥

**पीताय यदि बालस्य विदध्यादुपमातरम् ।**
**सुविचार्य गुणान्दोषान् कुर्याद्धात्रीं तदेदृशीम् ॥ ४९१ ॥**

कदाचित् बालकास दूध पाजविण्यासाठीं दायी ठेवणें असेल, तर तिच्या गुण–दोषांचा चांगल्याप्रकारें विचार करून अशी ठेवावी–॥ ४९१ ॥

**सुवर्णां मध्यवयसं सच्छीलां मुदितां सदा ।**
**शुद्धदुग्धां बहुक्षीरां कुलीनामतिवत्सलाम् ॥**
**स्वाधीनामल्पसंतुष्टां निजपुत्रदृशं शिशौ ॥ ४९२ ॥**

चांगल्या वर्णाची, मध्यम वयाची, सुशील, नेहमीं प्रसन्न राहणारी, शुद्ध व पुष्कळ दूध असलेली, कुलीन, बालकावर अतिशय ममता करणारी, स्वाधीन, थोडक्यांत संतुष्ट, आणि बालकास आपल्या पुत्राप्रमाणें समजणारी ॥ ४९२ ॥

**शोकाकुला गर्भिणी च कृशा व्याधिमती सदा ।**
**अत्युच्चा नितरां नीचा स्थूला पथ्यविवर्जिता ॥**
**एतासां स्तन्यपानेन शिशुर्भवति सामयः ॥ ४९३ ॥**

परंतु निरंतर शोक करणारी, गर्भिणी, अशक्त, सदा रोगिणी, अतिशय उंच अतिशय ठेंगणी, पुष्कळ स्थूल आणि पथ्य न पाळणारी दायी ठेवूं नये. कारण यांच्या स्तनपानेंकरून बालक रोगी होतो ॥ ४९३ ॥

**क्षीरसात्म्यतया क्षीरमाजगव्यमथापि वा ।**
**दद्यादास्तन्यपर्याप्तेर्बालेभ्यो वीक्ष्य मात्रया ॥ ४९४ ॥**

आणि माता किंवा दायीहि नसल्यास, दुधाची बालकावरोबरच उत्पत्ती झाली असल्यामुळें त्यास जेथपर्यंत तें दूध पिणें योग्य असेल, तेथपर्यंत बकरीचें किंवा गाईचें दूध विचारानें थोडें सोसेल तसें पाजावें ॥ ४९४ ॥

**यथोक्तविधिना बालं मासि षष्ठेऽष्टमेऽपि च ।**
**अन्नं संप्राशयेत्किञ्चित्ततस्तद्वर्धयन् क्रमात् ॥ ४९५ ॥**

नंतर बालकास सहाव्या किंवा आठव्या महिन्यामध्यें योग्य त्या रीतीनें किंचित् अन्न चाटवावें आणि नंतर तें क्रमानें वाढवून भरवीत जावें ॥ ४९५ ॥

**नाकृष्य स्थापयेत्क्रोडे न क्षिप्रं शयने क्षिपेत् ।**
**रोदयेन्न क्वचित्कार्ये विधिमावश्यकं विना ॥ ४९६ ॥**

पुनः बालकास ओढून उराशीं घेऊं नये, गडबडीनें अंथरुणावर टाकून देऊं नये, आणि औषध पाजणें, तेल चोळणें व काजळ घालणें इत्यादि आवश्यक विधीवांचून इतर कार्यामध्यें कधींहि रडवूं नये ॥ ४९६ ॥

**बालमङ्के सुखं दध्यान्नचैनं तर्जयेत् क्वचित् ।**
**सहसा बोधयेन्नैव नायोग्यमुपवेशयेत् ॥ ४९७ ॥**

त्यास सुख होईल त्या रीतीनें मांडीवर घ्यावें, कधींहि दटावूं नये, एकाएकीं जागृत करूं नये आणि अयोग्य ठिकाणीं बसवूं नये ॥ ४९७ ॥

**तच्चित्तमनुवर्तेत तं सदैवानुमोदयेत् ।**
**निम्नोच्चस्थानतश्चापि रक्षेद्बालं प्रयत्नतः ॥ ४९८ ॥**

त्याच्या चित्ताचें अनुसरण करावें, त्यास नेहमीं खुष ठेवावें आणि उंच सखल ठिकाणापासून त्याचें यत्नानें रक्षण करावें ॥ ४९८ ॥

**अभ्यङ्गोद्वर्तनं स्नानं नेत्रयोरञ्जनं तथा ।**
**वसनं मृदु यत्तच्च पथ्यान्येतानि सर्वथा ॥ ४९९ ॥**

पुनः त्याच्या अंगास तेल चोळावें, शरीर चोळून स्नान घालावें, डोळ्यांमध्यें काजळ घालावें आणि जें कोमल वस्त्र असेल तें ऋतूस अनुसरून अंगांत घालावें. हीं बहुतकरून बालकास पथ्यें सांगितलीं आहेत ॥ ४९९ ॥

पुनः सुश्रुतांतील शारीरस्थानाच्या १० व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**नाशुचौ विसृजेद्बालं नाकाशे विषमे न च ।**
**नोष्ममारुतवर्षेषु रजोधूमोदकेषु च ॥ ५०० ॥**

बालकास गलिच्छ जागेमध्यें राहूं देवूं नये, उंचावर उडवूं नये, विषम जागेमध्यें बसवूं नये, तसेंच ऊन्ह, वारा, पाऊस, धूळ, धूर, आणि पाणी यांमध्यें राहूं देवूं नये ॥ ५०० ॥

याप्रमाणें स्त्रीपुरुषांनीं आपलीं व आपल्या प्रजेचीं शरीरें कुशल ठेवण्यामध्यें निरंतर तत्पर राहवें. तसें राहत असतां कदाचित् मनुष्य सर्वज्ञ नसल्यामुळें अजाणपणें सृष्टिनियमाचें उल्लंघन करील, तर रोग होण्याचा संभव आहे, आणि तो होईल तर त्यास घालविण्याकरितां औषधाची जरूर लागते. सृष्टीमध्यें असा कोणताहि पदार्थ नाहीं कीं, ज्यामध्यें गुणदोष नसतील, या नियमानें सर्व प्रकारच्या पदार्थांमध्यें काहींना कांहीं गुणदोष राहिले आहेत, आणि ते येथपर्यंत कीं, कित्येक दृष्टांतांनीं जणूं चांगले रोग घालविण्यासाठीं चांगले पदार्थ सर्व शक्तिमान् दयाळू परमेश्वरानें निर्माण केले आहेत, परंतु तितक्या सर्व पदार्थांचें गुणदोषादि सर्व ज्ञान मिळविण्यास मनुष्यप्राणी अल्पायुषी असल्यामुळें आपल्या हयातींत समर्थ होत नाहीं; ह्मणून फार पुरातन कालापासून या भूगोलावर निरनिराळ्या देशामध्यें झालेले विद्वान् आपल्या आयुष्यामध्यें जितक्या जितक्या पदार्थांस अजमावून त्यांचे गुणदोष जाणूं शकले, त्या सर्वांची नोंद करण्यांत आली आहे. असें असतां

जरी अजूनपर्यंत सृष्टींतील समग्र वस्तूंचे गुणदोष समजले नाहींत, आणि जाणणें शक्य होईल असेंहि नाहीं, तथापि बहुत कालापूर्वी अनेक वस्तूंचे गुणदोष जाणण्यांत आल्यामुळें रोगनाशक व आयुर्वर्धक वैद्यशास्त्र उभारलें गेलें आहे. या भरतखंडांत हें शास्त्र फार प्राचीन कालापासून उत्पन्न झालेलें आहे, आणि याच्या ग्रंथांचीं भाषांतरें अन्य देशवासी लोकांनीं पूर्वीं आपापल्या स्वभाषेमध्यें करून घेतलेलीं समजण्यांत आलीं आहेत. अर्वाचीन पश्चिम खंडवासी विद्वानांनीं या शास्त्रामध्यें पुष्कळ सुधारणा केलेली दिसून येते, आणि या खात्यामध्यें प्रयत्न जारी ठेवला असल्यामुळें कांहीं काल गेल्यानंतर आणखी पुष्कळ सुधारणा होण्याची आशा आहे. याकरितां स्त्रीस, पुरुषास किंवा बालकास कोणत्याहि प्रकारचा रोग झाला असतां त्यास घालविण्याकरितां, जो कोणी गुरुद्वारा हें शास्त्र संपूर्ण रीतीनें अधीत असेल, आणि ज्यानें यामध्यें पुष्कळ कालाचा अनुभव मिळविला असेल, अशा वैद्याचें औषध घ्यावें. आयुर्वेदांतील सूत्रस्थानाच्या ५ व्या अध्यायांत सुश्रुतानें सांगितलें आहे कीं,

**शास्त्रं गुरुमुखोद्गीर्णमादायोपास्य चासकृत् ।**
**यः कर्म कुरुते वैद्यः स वैद्योऽन्ये तु तस्कराः ॥ ५०१ ॥**

जो गुरूची वारंवार उपासना करून त्याच्या मुखांतून निघालेलें शास्त्र शिकून वैद्यकी करतो तोच वैद्य, इतर चोर समजावे ॥ ५०१ ॥

तसेंच चरकसंहितेंतील सूत्रस्थानाच्या पहिल्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**तदेव युक्तं भैषज्यं यदारोग्याय कल्पते ।**
**स चैव भिषजां श्रेष्ठो रोगेभ्यो यः प्रमोचयेत् ॥ ५०२ ॥**

जें आरोग्य देण्यास समर्थ होईल तेंच योग्य औषध जाणावें, आणि जो रोगांपासून मुक्त करील, तोच श्रेष्ठ वैद्य जाणावा ॥ ५०२ ॥

पुनः भावप्रकाशाच्या पूर्वखंडांतील प्रथम भागांत सांगितलें आहे कीं,

**प्रत्युत्पन्नमतिर्धीमान् व्यवसायी प्रियंवदः ।**
**सत्यधर्मपरो यश्च वैद्य ईदृक् प्रशस्यते ॥ ५०३ ॥**

वेळेवर ज्यास रोग समजतात व त्यांवरील उपाय सुचतात, जो बुद्धिमान्, उद्योगी, मधुर भाषण करणारा आणि सदाचरणामध्यें तत्पर असेल असा वैद्य प्रशंसा करण्यास योग्य आहे ॥ ५०३ ॥

**व्याधेस्तत्त्वपरिज्ञानं वेदनायाश्च निग्रहः ।**
**एतद्वैद्यस्य वैद्यत्वं न वैद्यः प्रभुरायुषः ॥ ५०४ ॥**

व्याधीचें स्वरूप जाणणें व वेदनांचा निग्रह करणें हें वैद्याचें वैद्यपण आहे, पण वैद्य कांहीं आयुष्याचा प्रभु नाहीं ॥ ५०४ ॥

तसेंच लोलिंबराजानें वैद्यजीवनांत सांगितलें आहे कीं,

**गुरोरधीताखिलवैद्यविद्यः पीयूषपाणिः कुशलः क्रियासु ।**
**गतस्पृहो धैर्यधरः कृपालुः शुद्धोऽधिकारी भिषगीदृशः स्यात्॥५०५॥**

जो गुरूपासून समग्र वैद्यविद्या शिकलेला, यशस्वी, क्रियांमध्यें कुशल, निःस्पृह, धैर्यवान्, दयाळु आणि शुद्ध अंतःकरणाचा असेल तो वैद्य औषध देण्याविषयीं अधिकारी आहे ॥ ५०५ ॥

आतां कोणताहि रोग झाला असतां त्याची उपेक्षा करूं नये, कारण कालेंकरून तो वृद्धीस पावून शरीराचा नाश करतो. करितां भावप्रकाशाच्या पूर्वखंडांतील प्रथम भागांत सांगितलें आहे कीं,

**जातमात्रश्चिकित्स्यः स्यान्नोपेक्ष्योऽल्पतया गदः ।**
**वन्हिशत्रुविषैस्तुल्यः स्वल्पोऽपि विकरोत्यसौ ॥ ५०६ ॥**

रोग उत्पन्न होतांच त्याचा उपाय करावा, परंतु अल्प समजून त्याची उपेक्षा करूं नये; कारण तो अग्नि, शत्रु आणि विष यांच्या समान असल्यामुळें यःकश्चित् दिसला तरीहि विकार करतो ॥ ५०६ ॥

**ऋणशेषोऽग्निशेषश्च व्याधिशेषस्तथैव च ।**
**पुनश्च वर्धते यस्मात्तस्माच्छेषं न कारयेत् ॥ ५०७ ॥**

ऋण, अग्नि व रोग यांचा शेष राहिलेला भागहि पुनः वृद्धि पावतो, करितां तो राहूं देऊं नये ॥ ५०७ ॥

पुनः औषध घेणाऱ्या रोग्यानें वैद्याच्या सांगण्याप्रमाणें पथ्य पाळावें, त्याच्या उलट वागून कुपथ्य करूं नये. वैद्यजीवनांत सांगितलें आहे कीं,

**पथ्येऽसति गदार्तस्य किमौषधनिषेवणम् ॥ ५०८ ॥**

रोगी पथ्य न पाळील तर त्यास औषध सेवन केल्यानें काय फायदा ? अर्थात् तें निष्फळ जातें ॥ ५०८ ॥

करितां वाग्भट्टानें सांगितलें आहे कीं,

**आयुः कामयमानेन धर्मार्थसुखसाधनम् ।**
**आयुर्वेदोपदेशेषु विधेयः परमादरः ॥ ५०९ ॥**

धर्म, अर्थ व सुख यांचें साधनरूप जें आयुष्य त्याची इच्छा ठेवणाऱ्या पुरुषानें वैद्यशास्त्रामध्यें सांगितल्याप्रमाणें चालावें ॥ ५०९ ॥

पुनः कोणताहि रोग झाला असतां प्रथम त्यास औषधांनीं घालविण्याचा यत्न करावा. शस्त्रक्रियेनें घालविण्याच्या लोभांत सहसा पडूं नये. कारण औषधांच्या उपचारानें मनांस शांति असते, आणि शस्त्रोपचारानें मनास त्रास उत्पन्न होतो; आणि कदाचित् एखाद्या मर्मस्थानास जखम होऊन जाईल किंवा अतिशय रक्त वाहून जाईल तर शरीरास मोठी हानी पोहोंचते. करितां जर रोग औषधानें नच हटेल तरच त्यावर शस्त्रक्रिया करवावी. तरीहि ज्यास शरीराच्या अंतर्भागाचें व या क्रियेचें संपूर्ण ज्ञान असेल आणि ज्याचा ही क्रिया करण्यामध्यें हात बसला असेल अशा अनुभवी वैद्याकडून करवावी. धन्वंतरीचा शिष्य सुश्रुत यानें आयुर्वेदाचें सूत्रस्थान व शरीरस्थान यांमध्यें सांगितलें आहे कीं,

**शौर्यमाशुक्रिया शस्त्रतैक्ष्ण्यमस्वेदवेपथुः ।**
**असंमोहश्च वैद्यस्य शस्त्रकर्मणि शस्यते ॥ ५१० ॥**

शस्त्रक्रिया करण्यामध्यें शौर्य, शीघ्र क्रिया, तीक्ष्ण शस्त्र, घाम न येणें, कंप न होणें, आणि मोह न पावणें इतके वैद्याचे गुण वाखाणिले आहेत ॥५१०॥

**मर्मसु प्रायशः पुंसां भूतात्मा चावतिष्ठते ।**
**मर्मस्वभिहतास्तस्मान्न जीवन्ति शरीरिणः ॥ ५११ ॥**

---

१ या श्लोकाचें उत्तरार्धहि असेंच आहे. पथ्यानें वागलें असतां औषधाचें प्रयोजन काय ? असा त्याचा अर्थ आहे.

बहुतकरून प्राण्यांच्या मर्मस्थानीं जीवात्मा राहतो, करितां त्या ठिकाणीं घाय केल्यानें प्राणी जीवंत राहत नाहींत ॥ ५११ ॥

**रसाद्रक्तं ततो मांसं मांसान्मेदः प्रजायते ।**
**मेदसोऽस्थि ततो मज्जा मज्ज्ञः शुक्रस्य संभवः ॥ ५१२ ॥**

अन्नाच्या रसापासून रक्त, रक्तापासून मांस, मांसापासून मेद, मेदापासून अस्थि, अस्थिपासून मज्जा आणि मज्जेपासून शुक्र उत्पन्न होतें ॥ ५१२ ॥

**देहस्य रुधिरं मूलं रुधिरेणैव धार्यते ।**
**तस्माद्यत्नेन संरक्ष्यं रक्तं जीव इति स्थितिः ॥ ५१३ ॥**

देहाचें मूळ रक्त आहे, आणि रक्तानेंच देह धारण केला जातो, करितां यत्नेंकरून त्याचें रक्षण करावें; कारण रक्तच जीव म्हटला जातो ॥ ५१३ ॥

**धातूनां पूरणं वर्णं स्पर्शज्ञानमसंशयम् ।**
**स्वशिरासु चरद्रक्तं कुर्याच्चान्यान् गुणानपि ॥ ५१४ ॥**

आपल्या नाड्यांमधून फिरणारें रुधिर धातूंस पुष्टि, शरीरास वर्ण, स्पर्शज्ञान आणि इतरहि गुण उत्पन्न करतें, यांत कांहीं संशय नाहीं ॥ ५१४ ॥

तसेंच भावप्रकाशाच्या पूर्वखंडांतील प्रथम भागांत सांगितलें आहे कीं,

**जीवो वसति सर्वस्मिन् देहे तत्र विशेषतः ।**
**वीर्ये रक्ते मले, यस्मिन् क्षीणे याति क्षयं क्षणात् ॥ ५१५॥**

जीव सर्व शरीरामध्यें राहतो, त्यांतहि वीर्य, रुधिर, आणि मळ यांमध्यें विशेषपणानें राहतो; कारण त्यांच्या क्षीण होण्यामुळें तो त्वरित क्षय पावतो ॥ ५१५ ॥

याप्रमाणें सद्वैद्याकडून रोग घालविण्यास उपाय करवून निरोगी व्हावें. परंतु मनुष्य प्राणी सर्वज्ञ नसल्यामुळें एखादे वेळीं रोगी किंवा सद्वैद्यहि गाफिलपणा करतात; त्यामुळें अकस्मात् रोगी मरण पावण्याचा संभव असतो. पुनः जर मनुष्यानें बनविलेलें यंत्र असेल, आणि तें जर बिघडेल, तर मनुष्य त्यास चांगल्या प्रकारें सुधारूं शकतो. कारण तें प्रत्यक्ष पाहण्यांत येतें, आणि स्वतःचें बनविलें असल्यामुळें मनुष्य त्यामध्यें संपूर्ण रीतीनें

माहितगार असतो. परंतु मनुष्यशरीररूपी यंत्र तर सर्व शक्तिमान् परमेश्वराकडून निर्माण झालेलें आहे, त्यामुळें वाटेल तेवढा कुशल वैद्य असला तथापि त्याची संपूर्णतेनें त्यामध्यें दृष्टि पोंचत नाहीं. केवळ आपल्या ज्ञानास अनुसरून तो अनुमानानें उपचार करतो, कांहीं प्रत्यक्ष पाहूं शकत नाहीं. करितां कदाचित् सद्वैद्य रोगास उद्देशून यथार्थ उपचार करीत असला, तरीहि रोग्याच्या शरीराची प्रकृति आणि ज्यास निसर्ग, सृष्टिनियम, भवितव्य, अदृष्ट, दैव, यदृच्छा अथवा विधि ह्मणतात, अशी रोग्याच्या कर्मास अनुसरून फल देणारी ईश्वरेच्छा जर अनुकूल नसेल तर रोगी चांगला होत नाहीं. जसे बीज रोपणारे गांवढळ रोपांस वाढविण्याचा अतिशय प्रयत्न ठेवतात, तरीहि ज्यांस निसर्ग अनुकूल नसेल तीं रोपें वाढत नाहींत, तसें मनुष्य शरीर वाढवून मोठें करण्याविषयीं अतिशय प्रयत्न ठेवीत असला तरीहि ज्यास निसर्ग अनुकूल नसेल तें वाढून मोठें होत नाहीं, कारण जसा निसर्गाच्या प्रतिकूलतेमुळें वेली व वृक्ष यांस लागलेलीं सर्व फलें परिपाकदशेस प्राप्त होण्याचा स्वभाव नाहीं, तसा जन्मलेल्या सर्व मनुष्यशरीरांस निसर्गाच्या प्रतिकूलतेमुळें वाढून मोठीं होण्याचा स्वभाव नाहीं. परंतु त्यांपैकीं ज्यांस निसर्ग अनुकूल असतो अशीं कितीएक शरीरें वेलींच्या आणि वृक्षांच्या फलांप्रमाणें परिपाकदशेस प्राप्त होतात. त्यावरून पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**अरक्षितं तिष्ठति दैवरक्षितं सुरक्षितं दैवहतं विनश्यति ।**
**जीवत्यनाथोऽपि वने विसर्जितःकृतप्रयत्नोऽपि गृहे विनश्यति।५१६।।**

ईश्वरेच्छा ज्यास अनुकूल असेल तो अरक्षित असला तरीहि सुरक्षित होतो, आणि ज्यास ती अनुकूल नाहीं तो सुरक्षित असूनहि नाश पावतो, कारण एखादेवेळीं अरण्यामध्यें टाकलेला अनाथहि वांचतो, आणि घरामध्यें ठेवून प्रयत्न केला असतांहि जगत नाहीं ।। ५१६ ।।

**रङ्कं करोति राजानं राजानं रङ्कमेव च ।**
**धनिनं निर्धनं चैव निर्धनं धनिनं विधिः ।। ५१७ ।।**

ईश्वरेच्छा रंकास राजा करिते, राजास रंक करिते, धनिकास निर्धन करिते आणि निर्धनास धनिक बनविते ॥ ५१७ ॥

पुनः सांगितलें आहे कीं,

**अनुकूलतामुपगते हि विधौ सफलत्वमेति बहुसाधनता ।**
**प्रतिकूलतामुपगते हि विधौ विफलत्वमेति बहुसाधनता ॥ ५१८ ॥**

ईश्वरेच्छा अनुकूल असेल, तर स्वल्प साधनेंहि सफल होतात, परंतु ती जर प्रतिकूल असेल, तर बहुत साधनें असूनहि व्यर्थ होतात ॥ ५१८ ॥

**कान्तं वक्ति कपोतिकाऽऽकुलतया नाथान्तकालोऽधुना**
**व्याधोऽधोधृतचापसज्जितशरः श्येनः परिभ्राम्यति ।**
**इत्थं सत्यहिना स दष्ट इषुणा श्येनोऽपि तेनाहत-**
**स्तूर्णं तौ तु यमालयं प्रति गतौ दैवी विचित्रा गतिः ॥५१९॥**

एक कपोतिका व्याकुळ होऊन आपल्या पतीस ह्मणते कीं, "हे नाथ! आतां अंतकाल समीप आला आहे, कारण बाण लावून सज्ज केलेलें धनुष्य हातांत घेऊन खालीं पारधी उभा आहे, आणि वर ससाणा फिरत आहे" असें सांगते इतक्यांत खालीं पारध्यास सर्पानें दंश केला, आणि त्याचा धनुष्यापासून निशाण चुकून निसटलेल्या बाणानें वर ससाणा मारला गेला, याप्रमाणें ते दोघेहि तत्काल मरण पावले आणि पोरांसह कपोत–कपोतिका वांचलीं! अहाहा!!! ईश्वरेच्छा विचित्र आहे ॥ ५१९ ॥

**रात्रिर्गमिष्यति भविष्यति सुप्रभातं**
**भास्वानुदेष्यति हसिष्यति पङ्कजश्रीः ।**

---

१ हा श्लोक माघकवीचा असून याचा उत्तरार्ध असा आहे--

**'अवलम्बनाय दिनभर्तुरभून्न पतिष्यतः करसहस्रमपि ।'**

हें सूर्यास्ताचें वर्णन आहे. "सूर्य खालीं पडत असतां त्यास हजारो हात असूनहि संभाळून धरण्यास उपयोगी पडले नाहींत, कारण दैव विपरीत असतां कितीहि साधनें असलीं तरी फुकट." असा याचा भावार्थ आहे.

**इत्थं विचिन्तयति कोषगते द्विरेफे**
**हां मूलतः कमलिनीं गज उज्जहार ॥ ५२० ॥**

पुनः "आतां रात्र निघून जाईल, सुंदर प्रभातकाल होईल, सूर्य उदय पावेल, आणि कमलें प्रफुल्लित होतील, ह्मणजे मी निघून जाईन" याप्रमाणें सायंकाळीं मुकुलित झालेल्या कमलामध्यें अडकून गेलेला भ्रमर विचार करीत आहे इतक्यांत अहा! त्या कमलिनीस मूळांतून उपटून हत्ती हरण करून गेला ॥ ५२० ॥

परंतु ईश्वरेच्छा कशी आहे तें कांहीं पूर्वीं समजण्यांत येत नाहीं, करितां अखेरपर्यंत प्रयत्न चालू ठेवावा. अष्टविधपरीक्षा ग्रंथांत सांगितलें आहे कीं,

**तावत्प्रतिक्रिया कार्या यावच्छ्वसति मानवः ।**
**कदाचिद्दैवयोगेन दृष्टारिष्टोऽपि जीवति ॥ ५२१ ॥**

जेथपर्यंत श्वासोच्छ्वास चालू आहे, तेथपर्यंत उपाय जारी ठेवावे; कारण कदाचित् मृत्यूचें चिन्ह दिसून येत असतांहि ईश्वरेच्छा अनुकूल असल्यास जगतो ॥ ५२१ ॥

करितां चित्त स्थिर करून सद्वैद्यद्वारा उपचार केले जावे. जरी ममत्व ज्यांविषयीं लागलें असेल, असा कोणीहि एखादा आपला निकटचा अथवा दूरचा संबंधी किंवा स्नेही रोगी असेल किंवा परदेशामध्यें गेला असेल किंवा बाहेरून येण्यास त्यास अवकाश लागेल, तर त्याच्या कुशलतेविषयीं काळजी वाटणें स्वाभाविक आहे, तथापि तशी काळजी केल्यानें कांहीं वळत नाहीं, उलट नुकसान होतें, कारण एकसारखें त्यामध्येंच लक्ष लाविल्यामुळें इतर कांहीं सुचत नाहीं, त्यामुळें सहजच्या गोष्टींत गाफिलपणा होतो. सांगितलें आहे कीं,

**चिंतातुराणां न सुखं न निद्रा अर्थातुराणां न पिता न बंधुः ।**
**कामातुराणां न भयं न लज्जा क्षुधातुराणां न बलं न तेजः ॥५२२॥**

---

१ "हा हन्त हन्त नलिनीम्" असा प्रसिद्ध पाठ आहे.

२ 'क्षुधातुराणां न रुचिर्न पक्वम्' असा प्रसिद्ध पाठ आहे. भुकेलेले रुचि किंवा शिजलेलें आहे इकडे लक्ष देत नाहींत.

चिंतातुरांस सुख व निद्रा मिळत नाहीं, अर्थातुरांस पिता व बंधु यांचें नातें लागू नाहीं, कामातुरांस भय व लज्जा असत नाहीं, आणि क्षुधातुरांस बल व तेज असत नाहीं ॥ ५२२ ॥

**रूपं जरा सर्वसुखानि तृष्णा खलेषु सेवा पुरुषाभिमानम् ।**
**याच्ञा गुरुत्वं गुणमात्मपूजा चिन्ता बलं हन्त्यदया च धर्मम् ॥५२३॥**

जरा रूपास, अतितृष्णा सर्व सुखांस, खलसेवा पुरुषाच्या अभिमानास, याचना मोठेपणास, आत्मश्लाघा गुणास, चिंता बलास आणि निर्दयता धर्मास ठार मारून टाकते ॥ ५२३ ॥

करितां विद्यारण्यमहामुनींनीं सांगितलें आहे कीं,

**यदभावि न तद्भावि भावि चेन्न तदन्यथा ।**
**इति चिन्ताविषघ्नोऽयं बोधो भ्रमनिवर्तकः ॥ ५२४ ॥**

जें न होणारें तें होत नाहीं, आणि जें होणारें तें मिथ्या होत नाहीं, या प्रकारचा चिंतारूपी विषाचा नाश करणारा बोध भ्रमाची निवृत्ति करणारा आहे ॥ ५२४ ॥

करितां चिंतेचा त्याग करून शेवटपर्यंत उपाय करीत असतांहि जर तो व्यर्थ जाईल, तर मागून विचार करून मन शांत ठेवावें. पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**जलमग्निं विषं शस्त्रं क्षुद्व्याधी पतनं तथा ।**
**निमित्तं किंचिदासाद्य देही प्राणैर्वियुज्यते ॥ ५२५ ॥**

पाणी, अग्नि, विष, शस्त्र, क्षुधा, व्याधि आणि पतन, यांपैकीं एखादें निमित्त होऊन देहधारी प्राणाशीं वियोग पावतो ॥ ५२५ ॥

**प्रतिक्षणमयं कायः क्षीयमाणो न लक्ष्यते ।**
**आमकुम्भ इवाम्भःस्थो विशीर्णः सन् विभाव्यते ॥ ५२६ ॥**

पाण्यामध्यें असलेल्या कच्च्या घड्याप्रमाणें प्रतिक्षणीं क्षीण होत असलेलें हें शरीर समजण्यांत येत नाहीं; परंतु ज्यावेळीं गळून जाईल त्यावेळीं ध्यानांत येतें ॥ ५२६ ॥

**यथा हि पथिकः कश्चिच्छायामाश्रित्य तिष्ठति ।**
**विश्रम्य च पुनर्गच्छेत्तद्वद्भूतसमागमः ॥ ५२७ ॥**

जसा एखादा पांथस्थ छायेचा आश्रय करून बसतो, आणि विश्रांति घेऊन पुनः जातो, तसा प्राण्यांचा समागम जाणावा ॥ ५२७ ॥

**पञ्चभिर्निर्मिते देहे पञ्चत्वं च पुनर्गते ।**
**स्वां स्वां योनिमनुप्राप्ते तत्र का परिदेवना ॥ ५२८ ॥**

पंचमहाभूतांच्या योगेंकरून निर्माण झालेलें शरीर पुनः पंचत्वास पावतें. याप्रमाणें प्रत्येक महाभूत आपापल्या कारणामध्यें लीन झाल्यास त्याविषयीं खेद कसला ? ॥ ५२८ ॥

**मृत्युर्जन्मवतां वीर देहेन सह जायते ।**
**अद्य वाऽब्दशतान्ते वा मृत्युर्वै प्राणिनां ध्रुवः ॥ ५२९ ॥**

हे वीर ! जन्मलेल्यांचा देहाबरोबरच मृत्यु उत्पन्न होतो. करितां प्राण्यांस आज किंवा १०० वर्षें होऊन गेल्यानंतरहि मृत्यु निश्चयानें प्राप्त व्हावयाचाच ॥ ५२९ ॥

तसेंच श्रीमद्भगवद्गीतेच्या दुसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ।**
**अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥ ५३० ॥**

प्राणी आरंभीं न भासणारे, मध्यें भासणारे, आणि पुनः अंतीं न भासणारे आहेत, याकरितां त्याविषयीं खेद कसला ? ॥ ५३० ॥

पुनः चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**कालः पचति भूतानि कालः संहरते तथा ।**
**कालः सुप्तेषु जागर्ति कालो हि दुरतिक्रमः ॥ ५३१ ॥**

कारण काल प्राण्यांस मोठे करतो, काल त्यांचा संहार करतो, आणि काल प्राणी झोपीं गेले असले तरीहि जागृत राहतो, करितां कालाचें कोणाकडूनहि उल्लंघन करणें शक्य नाहीं ॥ ५३१ ॥

याप्रमाणें शारीरिक कुशलाविषयीं तत्पर राहण्यास सांगितलें, आतां व्यावहारिक कुशलाविषयीं सावध राहण्यास सांगण्यांत येणार आहे. व्यवहारांत राज्यनियमांच्या विरुद्ध कधींहि वागूं नये. कारण राज्यनियमांस अनुसरून व्यवहार चालविणारा मनुष्य सुखी होतो. वर्तमान कालीं पृथ्वीवर तीन प्रकारचें राज्य दिसतें. राजसत्ताक, राजप्रजासत्ताक, आणि प्रजासत्ताक, यांपैकीं ज्या प्रकारच्या सत्तेखालीं आपण राहत असूं त्याच्या नियमांस अनुसरून नेहमीं चालावें. राजसत्ताक राज्यामध्यें केवळ राजाचीच सत्ता असते, त्यांत प्रजेसाठीं जे जे नियम बांधण्यांत येतात ते सर्व राजाच्या स्वतंत्र इच्छेप्रमाणें बांधिले जातात. केवळ त्यांत सल्लागार मुख्य प्रधान वगैरे असतात, प्रजेची सल्ला मुळींच घेण्यांत येत नाहीं. त्यामुळें पुष्कळ वेळ प्रजा नाखुष होईल असे नियम बांधिले जातात, आणि त्याचा परिणाम असा होतो कीं, एखादे वेळीं प्रजा राजाविरुद्ध झाली असतां तेथें क्लेश उत्पन्न होऊन, राज्याच्या चालू व्यवस्थेंत मोड पडतो. राजप्रजासत्ताक राज्यामध्यें सर्व नियम राजा व प्रजा यांच्या तर्फेनें नेमलेले अधिकारी परस्पर विचार करून बहुमतानें बांधितात. त्यांस राजा आपली मंजुरी देतो. अशा नियमांनीं प्रजा नाखुष होण्याचें कांहीं कारण राहत नाहीं. कारण त्यामध्यें प्रजा आपल्या अधिकाऱ्यांच्या द्वारा सामील असते. त्यामुळें कांहींहि क्लेश उत्पन्न न होतां राज्याची व्यवस्था सुदृढ होते. प्रजासत्ताक राज्यामध्यें प्रजा स्वतः अधिकारी नेमून त्यांच्या द्वारा नियम बांधून बहुमतानें राज्य चालविते; त्यांत कधींहि क्लेश उत्पन्न होण्याचें कारण सांपडत नाहीं. परंतु प्रजासत्ताक राज्य जर सर्व प्रजा सुशिक्षित असेल तरच चालूं शकतें, कारण सुशिक्षित प्रजेमध्यें सर्व प्रजेचा सामान्य लाभ व अलाभ समजण्याची शक्ति असल्यामुळें ती एकी करून राहते. आणि समग्र राज्य आपलें आहे, अशी त्यांची ममता बांधिली जाते; त्यामुळें राज्याची व्यवस्था ती ठीक राखूं शकते. राजप्रजासत्ताक राज्य, राजा व प्रजा दोन्ही सुशिक्षित, समजदार व उदार मनाचे असतील तरच स्थापणें शक्य होतें. कारण राज्याच्या व्यवस्थेंत प्रजेस मत देण्याचा हक्क द्यावा,

हें समजदार व उदार राजाच्या ध्यानांत उतरतें, आणि स्वतः मत देतेवेळीं विवेक न सोडतां राज्यभक्ति कायम ठेवावी, हें समजदार व उदार प्रजेवांचून बनूं शकत नाहीं. पुनः राज्यामध्यें राजा व प्रजा या दोघांसहि राज्य आपलें आहे, अशी ममता असल्यामुळें राज्याची व्यवस्था चांगल्या रीतीनें ठेवणें शक्य होतें. ज्या देशामध्यें प्रजा विद्वान् आणि राज्य राजाचें असेल, तेथें असें राज्य सुव्यवस्थित चालतें. राजसत्ताक राज्य जेथें प्रजा अज्ञानी असेल तेथेंच बरोबर चालतें; कारण अज्ञानी प्रजेमध्यें सामान्य लाभ व अलाभ समजण्याची शक्ति नसल्यामुळें सर्व आपापला लाभ व अलाभ पाहतात, आणि राज्य आपलें आहे अशी ममता असत नाहीं. आणि ममता बांधल्यावांचून कोणत्याहि कार्याची सिद्धि बरोबर होऊं शकत नाहीं. करितां तशा प्रजेस राजसत्ताक राज्य योग्य आहे, कारण राजास राज्य आपलें आहे अशी ममता असते, त्यामुळें राजाची बरोबर व्यवस्था ठेवण्यामध्यें तो अनादर करीत नाहीं. परंतु प्रजेस ज्ञानी करणें हें राजाच्या हातांत असतें, कारण त्याच्याजवळ प्रजेस शिकविण्याचीं सर्व प्रकारचीं साधनें असतात. करितां त्यानें अनेक प्रकारच्या पाठशाला स्थापून त्यांच्या द्वारा प्रजेस ज्ञान द्यावें, आणि तीस राज्यव्यवस्थेमध्यें मत देण्याचा हक्क द्यावा. त्यामुळें तीच्या बाजूनें कोणत्याहि प्रकारची हानि होण्याचें आपणास भय राहत नाहीं. थोड्या वर्षांपूर्वीं विष्णुबावा ब्रह्मचारी नामक एक महासत्पुरुष होऊन गेला. त्यानें 'सुखदायक राज्य नीति' नांवाचा एक लहानसा निबंध लिहिला आहे. त्यामध्यें राजा आणि प्रजा दोन्ही सुखी होतील अशा रीतीनें राज्य चालविण्याचीं मूलतत्त्वें दाखविलीं आहेत. हा निबंध त्यानें ब्रजभाषेमध्यें रचलेल्या वेदोक्त धर्मप्रकाश नांवाच्या मोठ्या ग्रंथांत दाखल केला आहे. त्यामध्यें सांगितल्याप्रमाणें राज्यनीति जर पृथ्वीवरच्या राज्यांमध्यें चालेल, तर राजा आणि प्रजा या दोघांपैकीं कोणीहि असंतोष पावून दुःखी होणार नाहीं; याविषयीं दयाळू विष्णुबावा ब्रह्मचाऱ्यानें जें सांगितलें आहे तें या ठिकाणीं संक्षेपानें सांगण्यांत येत आहेः—"या भूगोलावर अनेक राज्यें आहेत, त्यांमध्यें जितक्या प्रदेशाचा जो राजा असेल, त्यानें तितक्या प्रदेशास आपला एक

वगीचा, त्यामध्यें राहणाऱ्या प्रजेस आपलें एक कुटुंब व आपणास त्याचा मालक समजावें. आणि आपल्या या प्रजारूप कुटुंबाचा निर्वाह आपल्या देशांतील जमीनरूप वगीच्यामध्यें उत्तम प्रकारें होईल आणि सर्व प्रजा सर्वकाळ सुखी राहील या प्रकारची तजवीज अवश्य केली पाहिजे, असा विचार करावा; तसेंच प्रजेनेंहि आपल्या सुखासाठीं उद्योग करणारा आपल्या पितृतुल्य राजा आज्ञा करील, त्याप्रमाणें वागण्यास तत्पर रहावें. नंतर राजानें शेतकी समजणाऱ्या प्रजेच्याद्वारा सर्व जमीनीची लागवड करावी आणि ज्या ठिकाणीं जी चांगली पिकेल त्या ठिकाणीं त्या वनस्पतीचें उत्पन्न करावें. शिल्पशास्त्र जाणणाऱ्या वरच्यांच्या हाताखालीं मेहनतू प्रजेच्या द्वारा नद्यांचे बांध व मोठे तलाव वांधवून, त्यांमध्यें सर्व जमिनीस बारा मास पुरें पडेल आणि दुष्काळाच्या वेळींहि तूट पडणार नाहीं अशा रीतीनें पाण्याचा सांठा करावा; आणि याप्रमाणें पाण्याची व्यवस्था झाल्यामुळें वर्षामध्यें एकाहून अधिक जितकीं पिकें देशांतील वेगवेगळ्या जमिनी देऊं शकतील, तिकक्कीं उत्पन्न करावीं. याप्रमाणें अनेक प्रकारचीं फळें, कंद, शाक, भाजी, अन्न, लांकूड व गायी, ह्मशी, वकरे, घोडे, गाढव, खेचर, उंट आणि हत्ती इत्यादि जीवमात्राच्या निर्वाहार्थ गवत खपावाहेर शिलकेंत राहील अशा रीतीनें उत्पन्न करावें. व गांवोगांवच्या खजिन्यामध्यें भरून ठेवावें. त्यामधून गांवांतील लोकांनीं आपापल्या पोटासाठीं जितकें अन्न वगैरे व जनावरांसाठीं गवत पाहिजे तितकें घेवून जावें. पुनः लोंकर, सण, रेशीम कापूस वगैरे वस्तू विणण्याचे कारखाने तयार करवून त्यामध्यें विणकर प्रजेच्या द्वारा सर्वांस पुरे होऊन त्याशिवाय शिलकेंत राहतील त्या रीतीनें नानाप्रकारचे कपडे विणवावे आणि ते शिंपी प्रजेच्याद्वारा शिववून गांवोगांवच्या खजिन्यामध्यें भरून ठेवावे, त्यांतून ज्यांस जे कपडे पाहिजेत, त्यांनीं ते घ्यावे, आणि फाटून जातील त्यावेळीं ते परत देवून त्यांच्याऐवजीं नवीन घेवून जावे. पुनः सर्व प्रजेस पुरे होतील, आणि त्यावाहेर शिलकेंत राहतील त्याप्रकारचे सोनें, रुपें, मोतीं, हिरे यांनीं जडलेले अलंकारहि सुवर्णकार प्रजेच्याद्वारा तयार करवून गांवोगांवच्या खजिन्यामध्यें

ठेवावे. त्यांतून ज्यांस जे धारण करण्यास पाहिजेत, त्यांनीं ते धारण करण्यास घ्यावे, आणि मोडले–तुटले कीं परत खजिन्यामध्यें देऊन नवे घेवून जावे. तसेंच राजानें यंत्रकला जाणणाऱ्या प्रजेच्याद्वारा सर्व प्रकारचीं यंत्रें आणि शस्त्रें तयार करवून गांवोगांव ठेवावीं. पुनः वाफ किंवा विद्युत् यांनीं चालणाऱ्या गाड्या, दूरश्रवण व संकेतादि तारायंत्रें व यंत्रांनीं अनेक प्रकारची गंमत दाखविणारे खेळ लोकांच्या उपयोगाकरितां गांवोगांव ठेवावे. आणि आठवड्यांतून एक दिवस विश्रांति घेण्याचा ठरवावा. आणि तो दिवस सर्व लोकांनीं खुषीप्रमाणें खेळगंमत करण्यांत घालवावा. सर्व प्रकारचे कारखाने चालविणारे, शेतकी करणारे आणि राजा यांनीं एकसारखें हिंसावर्ण अन्न खावें, आणि त्या राजाच्या खजिन्यांतून पाहिजे तें घेऊन जावें. तारुण्यावस्थेस प्राप्त झालेल्या सर्व स्त्री-पुरुषांचा राजानें विवाह करविणाऱ्या खात्याच्या द्वारें पसंत पडणारा विवाह करून द्यावा. कदाचित् विवाह केल्यानंतर कोणत्याहि स्त्री–पुरुषांत बेवनाव होईल तर त्या स्त्रीस त्याच खात्याच्याद्वारा दुसरा पसंत पडणारा पुरुष व त्या पुरुषास दुसरी पसंत पडणारी स्त्री मिळवून द्यावी. सर्व प्रजेनें आपलीं मुलें ७–८ वर्षांचीं झालीं कीं, राजाच्या स्वाधीन करावीं, त्यांच्या चपलतेप्रमाणें राजानें प्रथम अवस्थेपर्यंत त्यांच्याकडून वेगवेगळ्या धंद्याचा अभ्यास करवावा, आणि नंतर जें काम ते शिकलेले असतील त्यांस त्या कामाच्या खात्यांमध्यें जोडून द्यावें. तेथें कामधंदा करतां करतां ज्या वेळीं ते वृद्ध होतील, त्या वेळीं त्यांचे जवळून काम करविणें बंद करून त्यांस पेनशनदाखल सर्व उपभोग भोगण्यास द्यावे, आणि ज्या ज्या खात्यामध्यें त्यांनीं जवानीमध्यें काम केलें असेल, त्या त्या खात्याच्या राज्यसभेचे त्यांस सभासद नेमावे. तेथें त्यानें जशी जरूर पडेल तसे नियम त्या राज्यसभेच्या मुख्यास बांधून द्यावे; आणि जगत्प्रकाश निराकार परमेश्वराच्या उपकाराचें स्मरण करीत रहावें. पुनः मरण पावलेल्या सर्व शरीरांचें पृथक्करण त्वरित झालें पाहिजे, करितां राजानें तशा एका खात्याच्या द्वारा आपल्या प्रजेपैकीं जो कोणी मरेल त्याचें शरीर तत्काळ जाळून टाकावें. याप्रमाणें सर्व प्रजा एक कुटुंब व तेंच

एक राज्य, अशी राजनीति सृष्टीच्या आरंभकाळीं होती, ती आतांहि झाली पाहिजे. यापासून चोरी, मारामारी, तकरारी, खून वगैरे गुन्हे कशास ह्मणावे याचें भानच राहणार नाहीं. असें होण्याचें कारण सर्वांची इच्छा पूर्ण झाली असतां गुन्हा होण्याचा संभवच नाहीं. पूर्वीं या भूगोलावर सर्व धंद्यांचीं खातीं होतीं, आणि प्रत्येक खात्यांमध्यें काम करणाऱ्या मनुष्यांच्या ७–८ वर्षांच्या वयाच्या मुला–मुलींस राजे आपल्या ताब्यांत घेत होते; आणि त्यांस त्यांच्या हुषारीप्रमाणें वेगवेगळे धंदे शिकविण्याच्या खात्यांत पाठवीत होते. ते जसजसे वयांत येत तसतसे त्यांस जें जें काम शिकविलें असेल, त्या त्या कामामध्यें ते परस्पर मदतगार होऊन उपयोगीं पडत. त्या प्रकारच्या नियमानें, राजे त्यांचा विवाह करविणाऱ्या खात्याच्या द्वारा विवाह करवीत, आणि त्यांस जें काम येत असेल, त्या कामाच्या खात्याची व्यवस्था करणाऱ्या मुख्याजवळ पाठवून देत होते; ते त्यांच्या राहण्याची व्यवस्था करीत होते. याप्रमाणें बहुत कालपर्यंत चालल्यानंतर राजे दुष्टबुद्धि झाल्यामुळें लोकांनीं आपापल्या मुलांस राजाच्या स्वाधीन करण्याचें सोडून दिलें; आणि आपणास जी विद्या येत होती तीच विद्या त्यांस शिकविणें व वृद्ध झाल्यानंतर त्यांच्या ताब्यांतच राहणें त्यांनीं पसंत केलें. याप्रमाणें झाल्यानें धंद्यांचीं जितकीं खातीं होतीं तितक्या जाती बनल्या व कालांतरानें त्या त्या जातीचा अभिमान दृढ झाला, आणि पूर्व स्थितीचें विस्मरण होऊन गेलें. नंतर राजे लुटारू होऊन प्रजेस पीडूं लागले व तांबें, रुपें, सोनें वगैरे धातूंचे शिक्के बनवून "आह्मांस प्रजेनें इतका कर द्यावा" अशी नीति ठरवून त्याप्रमाणें प्रजेस वागवूं लागले. नंतर प्रजाहि लुटारू होऊं लागली, त्यावेळीं मनु नामक जो राजा झाला त्यानें कायदा बांधला. याच बिघडलेल्या धोरणावर हल्लींहि भूगोलावर अनेक राज्यांची अनेक प्रकारची राजनीति चालू आहे. परंतु सर्व प्रजा एक कुटुंब, सर्व जमीन एक बाग आणि तींतून जें जें उत्पन्न होईल त्या सर्वांची एक सामान्य पैदास; या प्रकारची राज्यव्यवस्था असेल, तर सर्वांस खाणें–पिणें, वस्त्र–भूषण व खेळ–गंमत यांची प्राप्ति होईल. पुनः

पालखी, रथ, घोडे व हत्ती वगैरे वाहनें सर्वांस वृद्धावस्थेंत राजसभेमध्यें सभासद झाल्यानंतर बसण्यास मिळतात. त्यामुळें कोणास कांहीं मिळालें नाहीं असें होत नाहीं; त्यामुळें सर्व लोक पूर्णकाम होतात. इच्छा अपूर्ण राहिल्यानें क्रोध येतो, तो येथें शिल्केंत बाकी राहत नाहीं. क्रोध न येतां गुन्हा करावा किंवा ईर्षा ठेवावी, याचा लेशहि राहत नाहीं. त्यामुळें ही राज्यनीति ही प्रजा आणि राजा यांचा खरा खरा संबंध आहे; व यामुळेंच राजा जो आपल्या प्रजेचा पिता ह्मटला जातो तें सत्य ठरतें. आतां कितीएकांस अशी शंका येईल कीं, जर अशी राज्यव्यवस्था होईल तर संडास कोण स्वच्छ करील? रस्ता कोण झाडील? पालखी कोण उचलील? तंबाकू कोण भरून देईल? पिकदाणी कोण साफ करून आणील? चंपी कोण करील? आणि हातांत जोडा घेऊन कोण उभा राहील? पुन: घोड्याची चाकरी कोण करील? आणि घोड्यावरून उतरतेवेळीं हातांत घोडा कोण धरून ठेवील? तर ती शंका करणाऱ्यानें असें समजावें कीं, सर्व मनुष्यांची अक्कल कांहीं एकसारखी असत नाहीं. त्यामुळें ७–८ वर्षांचीं मुलें ज्यावेळीं राजाच्या ताब्यांत येतील, त्यावेळींच त्यानें त्यांच्या बुद्धीची परीक्षा करून ज्यास जो धंदा शिकविणें योग्य आहे त्यास तो धंदा शिकवावा. त्यांत कित्येक मुलांमुलींस संडास झाडणें वगैरे हलकीं कामें करण्याची विद्या शिकवावी व तितकें काम त्यांनीं जवानींत बरोबर करावें, कीं त्यांस अन्न, वस्त्र, औषध, घर, दागिने आणि पुरुषास स्त्री व स्त्रीस पुरुष याप्रमाणें सर्व सुख भोगण्याचे पदार्थ मिळतील, या लालुचीनें तसें हलकें काम ते चांगल्या रीतीनें करतील. आणि पुन: त्यांचीं जीं मुलें होतील त्यांच्या बुद्धीप्रमाणें राजा त्यांस धंदे शिकवील व जवानींत ते ते धंदे करतील, याप्रमाणें व्यवस्था झाल्यानें सर्व काम चालेल व पिकदाणी धुवून आणणें, हुक्का भरून देणें, चंपी करणें व संडास साफ करणें इत्यादि कामें हलकीं आहेत, असें तें काम शिकलेले स्त्रीपुरुष समजणार नाहींत. कारण इतरांप्रमाणें त्यांसहि काम करण्यानें अन्न वस्त्र इत्यादि सर्व भोग मिळतात, करितां दु:खावांचून चांगल्या रीतीनें शिकलेलें काम करावें हेंच ते

समजतील. आणि ते स्त्रीपुरुष राजानें ठरविलेल्या गांवामध्यें ठरावाप्रमाणें शिल्पी प्रजेच्या द्वारा बांधविलेल्या एका एका घरांत एकेक जोडपें या रीतीनें राहतील व त्या ठिकाणीं त्यांस त्यांच्या कामाबद्दल सर्व खाणें-पिणें, भूषणें-वस्त्रें, व मौज-शोक यांची प्राप्ति होईल, तर सर्व कामें ते बरोबर करतील व कांहीं अडचण पडणार नाहीं. राजानें अनेक धंद्यांची खातीं काढावीं, त्यांत त्या त्या धंद्यामध्यें हुषार अशा वरच्यांची नेमणूक करून त्यांच्या हाताखालीं ते ते धंदे शिकलेले मनुष्य द्यावे. त्यांनीं आपल्यावरचे सांगतील त्या प्रमाणें बरोबर काम बजवावें. शेती विद्येंत कुशल अशा कितीएक मनुष्यांस ठिकठिकाणीं ठेवावे व त्यांच्या सांगण्याप्रमाणें काम करणाऱ्या कितीएक लोकांची त्यांच्या हाताखालीं नेमणूक करावी. कितीएक पिकलेल्या धान्याची कापणी करून त्यास मळणी देणारे ठरवावे. कितीएक खजिन्यांत सर्व पैदास संभाळून ठेवणारे ठरवावे. कितीएकांची ज्या ठिकाणीं जितका माल पाहिजे त्या ठिकाणीं तितका पोंचविण्याकरितां नेमणूक करावी. पुनः कितीएक वस्त्रें विणून तयार करणारे, कितीएक कपडे शिवणारे, कितीएक लोखंडाचें काम करणारे, कितीएक सोनें, रुपें, तांबें वगैरे धातूंचें काम करणारे, कितीएक लांकडें, माती, दगड व कांच यांचीं कामें करणारे, कितीएक चामड्याचें काम करणारे, कितीएक खाणींतून पदार्थ काढणारे, कितीएक विद्या शिकणारे, कितीएक होड्या चालविणारे, कितीएक घरें व गलबतें बांधणारे, कितीएक औषधें देणारे, कितीएक ज्यास जे पाहिजेत ते कपडे व दागिने वगैरे देणारे, आणि जुने झालेले पदार्थ परत घेऊन त्यांच्या ऐवजीं नवे देवून जुने मूळच्या कारखान्यांत पाठविणारे, आणि कितीएक खुराक वांटणारे व भाजी, तेल, तूप, गूळ वगैरे वस्तू देणारे इत्यादि सर्वांस सर्व प्रकारच्या सर्व ठिकाणीं नेमून सर्वांचा बंदोबस्त ठेवणें हेंच खरें खरें राजाचें काम आहे. याप्रमाणें राज्यव्यवहार असेल तर चोरी केलेला माल काय कामाचा? व्यापार करून ईर्षा कोणाची करावयाची? आणि पैशाची जरूरच पडली नाहीं तर तो छपवून त्याचा काय उपयोग करावयाचा? आणि

दुसऱ्यास मारून काय मिळवावयाचें ? असा विचार उत्पन्न होतो. त्यामुळें वाईट काम सर्व व्यर्थ आहे असें वाटून मन स्वस्थ असतें; आणि परमेश्वराच्या उपकाराचें स्मरण करून स्थिरतेस पावून आनंदाचा अनुभव करतें. करितां प्रजेमध्यें राज्यकारभार याच प्रकारच्या पद्धतीचा पाहिजे. अशी राज्यव्यवस्था १०० वर्षे चालेल तर दुसऱ्या शतकांतील प्रजा हल्लींच्या राजांस व न्यायाधीशांस ते मनुष्य नव्हते तर जनावरें होतीं असें ह्मणेल ! या राजनीतीच्या पद्धतीनें जगताचा व्यवहार याप्रमाणें चालला पाहिजे कीं, प्रत्येक खात्यांतील जे वृद्ध असतील, ते त्या त्या खात्याच्या राजसभेचे सभासद होतील व राजास पाहिजेत ते नियम बहुमतानें बांधून देतील. पुनः राजाचे प्रधान वगैरेहि सर्व वृद्ध असले पाहिजेत. आणि जे तरुण असतील ते स्वतः जो जो धंदा शिकले असतील, त्या त्या धंद्याच्या खात्यांत दाखल होऊन त्यांनीं काम केलें पाहिजे. उदाहरणार्थ जे सोन्यारुप्याचें काम शिकले असतील, त्यांनीं काम करण्याकरितां एक उत्कृष्ट हवेचें स्थान पसंत करावें. तेथें त्यांनीं सुतारखात्यातर्फे बांधलेल्या घरांत राहून, विणकरखात्यातर्फे विणलेले कपडे शहरच्या खजिन्यांतून आणून वापरावे, शिंपीखात्यातर्फे शिवलेले कपडे धारण करावे, मोची अर्थात् चांभारखात्यातर्फे तयार झालेले जोडे, धमण वगैरे पाहिजे तें खजिन्यांतून आणून वापरावें. शेतीखात्याकडून तयार झालेलें अन्न पाहिजे त्याप्रमाणें खजिन्यांतून आणून खावें, आपल्या खात्यातर्फे तयार होऊन खजिन्यांत गेलेल्या दागिन्यांतून आपणास जे पाहिजेत ते दागिने आणून वापरावे, रोग झाला असतां औषधखात्याकडून पाहिजे तें औषध घ्यावें. आणि घरोघर हातवडा वगैरे घाट घडविण्याचें सामान कांहीं न ठेवतां १० वाजतां सोन्या-रुप्याच्या कारखान्यांत जाऊन ४ वाजेपर्यंत काम करून आपापल्या घरीं जावें व आपल्या स्त्रीबरोबर सुखानें रहावें. आणि प्रजा झाली तर ७–८ वर्षेपर्यंत तिचा संभाळ करून नंतर राजानें नेमिलेल्या शिक्षणखात्याच्या ताब्यांत द्यावी. नंतर राजानें त्या खात्याकडून त्यांच्या हुषारीप्रमाणें वेगवेगळ्या शाळेंत वेगवेगळे धंदे शिकवावे, आणि युवावस्थेस प्राप्त झाले कीं,

त्यांस विवाह करविणाऱ्या खात्याच्याद्वारा पसंत पडेल त्याप्रमाणें लग्न करून, जे जे धंदे ते शिकले असतील, त्या त्या धंद्याच्या खात्यांत काम करण्याकरितां जोडून द्यावे. याप्रमाणें प्रत्येक धंद्याच्या खात्याची व्यवस्था झाली पाहिजे. असें होईल तर प्रजेमध्यें परस्पर विश्वासघात, मारामारी व एकानें दुसऱ्याचा प्राण घेणें वगैरे अपराध होण्याचा संभव राहणार नाहीं. चावी कुलूप ठेवण्याची जरूर पडणार नाहीं. आणि सर्वांस भरपूर खाणें, पिणें, भूषण, वस्त्र व औषध सुखानें मिळूं शकेल. वर्तमानकालीं जीस आम्ही नीति ह्मणतों ती नीति नव्हे तर अनीति ठरेल. मनुष्यप्राणी दुःख, इच्छा आणि चिंता यांनीं रहित होईल व सर्व आपणांस राजाप्रमाणें समजेल. कारण राजा आणि प्रजा यांच्या सुखामध्यें कांहीं अंतर राहणार नाहीं. काळजी मूळांतूनच नाहींशी होईल व अनाथांचें रक्षणहि त्यांच्याकरितां नेमलेल्या खात्यातर्फे होईल. त्यामुळें भिकारी तो कसला ? हें कोणाच्या समजण्यांतहि येणार नाहीं ! क्रयविक्रय न होतां सर्वांस सर्व वस्तू मिळतील, त्यामुळें चोरी कशास ह्मणावी, याची कोणास खबर राहणार नाहीं ! अशी ही अत्युत्तम राजनीति अनुपम आहे, अर्थात् हिच्यासारखी सुखदायक राजनीति पृथ्वीवर भूतकालांत मनुप्रभृति कोणत्याहि राजाची झाली नाहीं. व वर्तमानकालीं कोठेंहि पाहण्यांत येत नाहीं." याप्रमाणें परमदयाळु विष्णुबुवा ब्रह्मचाऱ्यानें सांगितलेल्या राजनीतीचें सार आहे. वर्तमानकालच्या प्रजेमध्यें ही राजनीति दाखल करणें अशक्य झाल्यामुळें त्याचा असा हेतु होता कीं, पुढील प्रजेमध्यें या राजनीतीचा पाठशाळांतून अभ्यास करवावा, तो पुष्कळ पिढ्यांपर्यंत चालला असतां सर्व प्रजा एकमतानें हीच राजनीति पसंत करतील. या सत्पुरुषाच्या सांगण्याप्रमाणें प्राचीनकाळीं अशाच प्रकारची राजनीति होती, त्यामुळें धंद्याप्रमाणें जाती झाल्या आहेत. परंतु तशी नोंद कोठेंच इतिहासांत दिसून येत नाहीं. तथापि या राजनीतीस किंचित् लागू पडणारें वाक्य श्रीमहाभारतांतर्गत शांतिपर्वाच्या ५९ व्या अध्यायांत भीष्मपितामहानें युधिष्ठिर राजास सांगितलें आहे कीं,

न वै राज्यं न राजाऽऽसीन्न दण्डो न च दाण्डिकः ।
धर्मेण वै प्रजाः सर्वा रक्षन्ति स्म परस्परम् ॥ ५३२ ॥

पूर्वी कोणतेंहि राज्य, राजा, दंड व दंडकर्ता हे कांहींहि नव्हतें, तर सर्व लोक धर्मानेंच परस्परांचें रक्षण करीत असत ॥ ५३२ ॥

परंतु अशी सुखदायक राजनीति चालत असेल, तर प्रजेची वृद्धि होण्यास वेळ लागणार नाहीं, त्यामुळें असाहि वेळ येईल, कीं, अति वृद्धि झाली असतां त्यांचें पोषणहि पुरें होणें मुष्कील होईल. त्यामुळें आपसांत मारामाऱ्या उत्पन्न होऊन या राजनीतीचा नाश होण्याचा संभव आहे. अशी शंका येईल तर समजावें कीं, सृष्टीमध्यें समतोलपणा राहण्याकरितां ज्याची वृद्धि होईल त्याचा क्षय, आणि ज्याचा क्षय होईल त्याची वृद्धि कालांतरानें आपण होऊन होण्याचा स्वभाव आहे; या नियमाप्रमाणें प्रजेची वृद्धि अतिशय झाली असतां रोग वगैरे कोणत्याहि कारणानें तिचा क्षय होतो. परंतु जेथपर्यंत या ब्रह्मचारीबावाची सुखदायक राजनीति पृथ्वीवर चालू झाली नाहीं, तेथपर्यंत तर मनुप्रभृति राजांच्या विघडलेल्या धोरणानें चालणाऱ्या राजनीतीवरच विचार केला पाहिजे. आतां राजसत्ताक आणि राजप्रजासत्ताक राज्यांत तर राजा प्रत्यक्ष असतो, परंतु प्रजासत्ताक राज्यांत राजा दिसत नाहीं. परंतु विचार करून पाहिलें असतां त्यांतहि राजा असावा असें वाटतें. कारण राज्य चालविण्याकरितां प्रजेनें ठरविलेल्या राजसभेमध्यें एक मुख्य करावा लागतो. तो त्या ठिकाणीं राजासारखा ठरतो. कारण त्याची सत्ता इतर सर्व सभासदांहून विशेष असते. त्यास बहुतकरून राजासारखा मान मिळतो, व सर्व राज्यनियम त्याच्या सहीनें चालतात. करितां तीनहि प्रकारचीं राज्यें राजाकडूनच चालतात असें जाणावें. आतां राजानें प्रथम विद्याभ्यास करून सर्व प्रकारच्या राजनीतीमध्यें कुशल झालें पाहिजे. कारण त्याच्यावर बहुत मनुष्यांचा संभाळ करण्याची जोखीम असते, ती सर्व बाबतींत कुशल झाल्यावांचून निभावणें शक्य होत नाहीं. शुक्रनीतीच्या पहिल्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**सर्वलोकव्यवहारस्थितिर्नीत्या विना न हि ।**
**यथाऽशनैर्विना देहस्थितिर्न स्याद्धि देहिनाम् ॥ ५३३ ॥**

जशी अन्नोदकावांचून प्राण्यांच्या देहाची स्थिति होऊं शकत नाहीं, तशीच सर्व लोकांच्या व्यवहाराची स्थिति नीतीवांचून होऊं शकत नाहीं ॥ ५३३ ॥

**अतः सदा नीतिशास्त्रमभ्यसेद्यत्नतो नृपः ।**
**यद्विज्ञानान्नृपाद्याश्च शत्रुजिल्लोकरञ्जकाः ॥ ५३४ ॥**

करितां राजानें नेहमीं यत्नानें नीतिशास्त्राचा अभ्यास करावा, कारण ज्याच्या ज्ञानानें नृपादि सर्व शत्रूंस जिंकणारे व लोकांचें रंजन करणारे होतात ॥ ५३४ ॥

**नृपस्य परमो धर्मः प्रजानां परिपालनम् ।**
**दुष्टनिग्रहणं नित्यं न नीत्या ते विना ह्युभे ॥ ५३५ ॥**

निरंतर प्रजेचें पालन करणें व दुष्टांस दंड करणें, हा राजाचा परम धर्म आहे, परंतु तीं दोन्हीं कार्यें नीतीशिवाय होऊं शकत नाहींत ॥ ५३५ ॥

जसें कुटुंबांतील वडिलांचें मुख्य काम कुटुंबाचें भरण–पोषण करण्याचें आहे, तसेंच राजाचें मुख्य काम आपल्या प्रजेचें चांगल्या प्रकारें रक्षण करण्याचें आहे. कुटुंबाशिवाय जसा वडील नाहीं, तसा प्रजेवांचून राजा नाहीं. आणि वडिलांशिवाय जसें कुटुंब नाहीं, तशी राजावांचून प्रजा नाहीं. याच ग्रंथकारानें याच ठिकाणीं सांगितलें आहे कीं,

**यदि न स्यान्नरपतिः सम्यङ्नेता ततः प्रजा ।**
**अकर्णधारा जलधौ विप्लवेतेह नौरिव ॥ ५३६ ॥**

जर या लोकांत चांगल्या प्रकारें नियमांत ठेवणारा राजा नसेल, तर प्रजा, नावाडी नसलेल्या नौकेसारखी नाश पावेल ॥ ५३६ ॥

**न तिष्ठन्ति स्वस्वधर्मे विना पालेन वै प्रजाः ।**
**प्रजया तु विना स्वामी पृथिव्यां नैव शोभते ॥ ५३७ ॥**

पुनः रक्षण करणारा असल्याशिवाय प्रजा आपापलें कर्तव्य बजावीत नाहीं व प्रजेशिवायचा राजा पृथ्वीवर शोभत नाहीं ॥ ५३७ ॥

तसेंच पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**तस्करेभ्यो नियुक्तेभ्यः शत्रुभ्यो नृपवल्लभात् ।**
**नृपतिर्निजलोभाच्च प्रजा रक्षेत् पितेव हि ॥ ५३८ ॥**

राजानें चोर, नोकर, शत्रु, हुजरे व स्वतःचा लोभ यांपासून प्रजेचें पित्याप्रमाणें रक्षण करावें ॥ ५३८ ॥

**राजा बन्धुरबन्धूनां राजा चक्षुरचक्षुषाम् ।**
**राजा पिता च माता च सर्वेषां न्यायवर्तिनाम् ॥ ५३९ ॥**

कारण राजा ज्यांस बंधु नाहीं त्यांचा बंधु, अंधांचा नेत्र, आणि न्याय-मार्गानें वर्तन करणाऱ्या सर्वांचा माय-बाप आहे ॥ ५३९ ॥

परंतु याप्रमाणें प्रजेचें रक्षण करण्यामध्यें राजास मोठा खर्च ठेवावा लागतो तो प्रजेनें दिला पाहिजे. कारण ती जर न देईल तर राजा आणील कोठून ? करितां प्रजेनें खर्चाची मदत करावी व स्वतः त्याच्याकडून सुरक्षित रहावें. राजानें आपल्या ताब्यांतील जितकी जमीन असेल तिची लागवड करावी, तिच्यापैकीं जी शेतीकरितां प्रजा उपयोगांत आणील तिच्यावर कर ठेवावा. पुनः पाषाण, धातु, रत्नें व क्षार वगैरे खनिज पदार्थ खणून काढण्यासाठीं जी जमीन प्रजा अडवील तिच्यावरहि कर ठेवावा. तसेंच जंगलाची जी पैदास होईल तिच्यावर व आपल्या ताब्यांतील समुद्राच्या उत्पन्नावर कर ठेवावा. याप्रमाणें कच्च्या वस्तूंवर कर घ्यावा, परंतु त्यांची जी कांहीं वस्तु आपल्या देशामध्यें तयार होईल तिच्यावर कर घेऊं नये. कारण तो घेतल्यामुळें एकाच वस्तूवर दुप्पट कर होतो, त्यामुळें तिच्या किंमतीमध्यें वाढ होऊन ती महाग पडते. पुनः आपल्या देशांतील कच्ची किंवा बनविलेली जी वस्तु परदेशांत जाईल तिच्यावर कर घेऊं नये. कारण ती वस्तु जशी होईल तशी दुसऱ्या देशांत खपेल आणि आपल्या देशाचा व्यापार वाढेल असें करावें. त्यामुळें आपली प्रजा त्यावर चांगल्या प्रकारें निर्वाह चालवूं शकेल. दुसऱ्या देशांतील कच्ची किंवा पक्की जी वस्तू आपल्या देशामध्यें येईल तीवर तो कर ठेवावा. पुनः कच्ची वस्तू पैदा करणाऱ्यां-शिवाय जी प्रजा इतर धंद्यांत लागली असेल तीच्या जवळून तीच्या आवकेच्या

प्रमाणांत कर घ्यावा. कारण कच्ची वस्तु पैदा करणारे शेतकरीवगैरे जसा आपला निर्वाह चालविण्यास सरकारी जमीन वापरतात, तसे इतर मनुष्यहि अनेक प्रकारच्या धंद्यांनीं आपला निर्वाह चालविण्यांत पर्यायानें सरकारी जमिनीचाच उपयोग करतात. कारण त्यांच्या धंद्याकरितां मालाची ने–आण होण्यामध्यें जी जमीन वापरली जाते ती सरकारीच असते. तसेंच सर्व प्रजा सरकारी जमीन वापरल्यावांचून कोठेंच आवजाव करूं शकत नाहीं. पुनः सर्व प्रकारच्या धंद्यांचा सर्व आधार शेती वगैरेपासून उत्पन्न होणाऱ्या कच्च्या वस्तूंवर असल्यामुळें ती पैदा करणारा शेतकरीवगैरे वर्ग कराच्या बोजांत कचरून जाईल तर बरोबर निपज होणार नाहीं, करितां इतर धंद्यांच्यायोगें निर्वाह चालविणाऱ्या सर्व मनुष्यांनीं, आपापल्या आवकेच्या प्रमाणांत सरकारास कर देऊन शेतकरीवगैरे गरीब वर्गाचा बचाव करणें हें त्यांचें कर्तव्य होय. परंतु राजानें हे सगळे नानाप्रकारचे कर अशा रीतीचे हलके ठेवावे कीं, प्रजेस देण्यास जड जाऊं नयेत. कोणीहि आपला निर्वाह चांगल्या प्रकारें चालवून सुखानें राहूं शकेल असें करावें किंवा जमिनींतून आणि पाण्यांतून कच्ची वस्तू पैदा करणाऱ्या शेतकरीवगैरे वर्गाकडून ते खासगी किंवा सरकारी नौकर, कारागीर, ओझें वाहणारे, संघशः व्यापारी व पृथक् व्यापारी वगैरे कोणत्याहि प्रकारचा धंदा करणाऱ्या तमाम लोकांपर्यंत कोणाजवळूनहि उघडा कर घेऊं नये. परंतु सर्व प्रकारचा लागणारा व त्याच्या खुराकासाठीं पोशाकासाठीं, उत्तम मध्यम व कनिष्ठ प्रकारचा ठरविलेला वाजवी खर्च वाद करून जी ज्याची चोखी आवक असेल तींतून देशाचें उत्पन्न व खर्च यांचा हिशोब तपासून, त्यांत नफा होईल तर कमी व खोट होईल तर अधिक जितका घेणें योग्य होईल तितका कर आपल्या राजसभेच्या द्वारा ठरवून घ्यावा. नंतर वाटेल तर तो श्रीमंत असो किंवा गरीब असो. जरी अशा प्रकारचा कर श्रीमंतास देणें आवडणार नाहीं, तथापि न्यायाच्या पद्धतीनें सर्व प्रजेस एकसारख्या रीतीनें आवकेच्या प्रमाणांत कर देणारी करण्यामध्यें ही पद्धति सर्वोत्कृष्ट आहे. करितां सर्व प्रजेनें एकमत होऊन हा एकाच जातीचा कर राजास आपल्या

रक्षणाच्या मोबदल्यांत खुषीनें द्यावा. त्यामुळें सर्व प्रजा एककुटुंबरूप होऊन एकमेकांच्या सुखदुःखांमध्यें भाग घेणारी होईल. प्रजेंतील कोणतेहि लोक हल्लींच्या शेतकरी वगैरे गरीब लोकांप्रमाणें दुःखी होणार नाहींत. 'एकाच्या घरांत खावयास मिळत नाहीं व सरकारी कर देण्यासाठीं त्याची घर वखार विकली जाते आणि दुसरा सुखानें खाऊन-पिऊन मौज-मजेमध्यें राहतो.' अशी कर घेण्याची पक्षपाती धिक्कारण्यास योग्य आणि अतिशयच गैरवाजवी पद्धत बंद होईल, गरीब मारिला जाणार नाहीं, जुलूम झटला जाणार नाहीं, आणि राजासहि पुष्कळ आवक होऊं लागेल. परंतु इतकी खबरदारी ठेवावी कीं, कोणासहि कोणत्याहि प्रकारें दुप्पट कर द्यावा लागूं नये. या प्रकारचा कर प्रजेनें देणें व तिच्याजवळून राजानें वसूल करणें प्रथम अतिशय अवघड दिसेल, कारण सर्वांची आवक नक्की करणें अतिशय कठिण आहे. परंतु जसा अभ्यास पडत जाईल तसा प्रजा आपला दरवर्षाचा हिशोब तयार ठेवील, त्यावरून राजा व प्रजा दोहोंसहि कर वसूल करण्यास व देण्यास कोणतीहि हरकत येणार नाहीं. पुनः राजानें स्वतः व त्याच्या तमाम नोकरांनींहि आपण होऊन लवाजम्यांतून स्वतःस लागणारा खर्च वाद करून, जी चांगली आवक असेल तींतून प्रजेप्रमाणें राज्यांत कर भरावा; त्यामुळें कोणत्याहिं प्रकारचा पक्षपात न राहिल्याकारणानें प्रजा तसा कर खुषीनें देईल यांत संशय नाहीं. परंतु राजानें प्रजेच्या ठेवलेल्या हिशोबावर विश्वास ठेवून कर घ्यावा, व कर वसूल करणारातर्फे प्रजेवर कोणत्याहि प्रकारचा जुलूम होऊं देऊं नये; आणि अशी ताकीद करावी कीं, कोणाचाहि हिशोब प्रसिद्धींत येवूं नये व कोणीहि खोटा हिशोब दाखवूं नये. या एका कराशिवाय प्रजेपासून राजानें तिच्या पालनानिमित्त इतर कोणत्याहि प्रकारचा कर घेऊं नये, कारण प्रजेस पिळून काढिल्यानें राजाचें मोठें नुकसान होतें. श्रीमहाभारतांतर्गत उद्योगपर्वाच्या ३४ व्या अध्यायांत विदुरानें धृतराष्ट्रास सांगितलें आहे कीं,

**यथा मधु समादत्ते रक्षन् पुष्पाणि षट्पदः ।**
**तद्वदर्थान् मनुष्येभ्य आदद्यादविहिंसया ॥ ५४० ॥**

जसा भ्रमर पुष्पांस वचावून त्यांतून रस ग्रहण करतो, तसा राजानें मनुष्यांस पिळून काढिल्यावांचून त्यांच्याजवळून कर घ्यावा ॥ ५४० ॥

**पुष्पं पुष्पं विचिन्वीत मूलच्छेदं न कारयेत् ।**
**मालाकार इवारामे न यथाऽङ्गारकारकः ॥ ५४१ ॥**

बगीच्याच्या माळ्याप्रमाणें वृक्षांपासून पुष्पें घ्यावीं, परंतु कोळसा करणाराप्रमाणें वृक्षांस मुळांतून कापून टाकूं नये ॥ ५४१ ॥

**यस्मात्त्रस्यन्ति भूतानि मृगव्याधान्मृगा इव ।**
**सागरान्तामपि महीं लब्ध्वा स परिहीयते ॥ ५४२ ॥**

कारण ज्या राजापासून, पारध्यांपासून हरिणांप्रमाणें, प्रजा त्रास पावते, तो राजा समुद्रवलयांकित पृथ्वी मिळविली असतांहि नाश पावतो ॥ ५४२ ॥

मनुस्मृतीच्या ७ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**यथा फलेन युज्येत राजा कर्ता च कर्मणाम् ।**
**तथाऽवेक्ष्य नृपो राष्ट्रे कल्पयेत्सततं करान् ॥ ५४३ ॥**

राजानें ज्याप्रमाणें आपणांस आणि धंदे करणाऱ्या सर्व प्रजेस लाभ होईल त्याप्रमाणें विचार करून राज्यांत नेहमीं कर ठेवावे ॥ ५४३ ॥

**सांवत्सरिकमाप्तैश्च राष्ट्रादाहारयेद्बलिम् ।**
**स्याच्चाम्नायपरो लोके वर्तेत पितृवन्नृषु ॥ ५४४ ॥**

आणि लोकांमध्यें धर्मनिष्ठ होऊन दर वर्षाचा कर कारभारीद्वारा वसूल करावा, आणि प्रजेच्या ठिकाणीं पित्याप्रमाणें वागावें. ॥ ५४४ ॥

**मोहाद्राजा स्वराष्ट्रं यः कर्षयत्यनवेक्षया ।**
**सोऽचिराद्भ्रश्यते राज्याज्जीविताच्च सबान्धवः ॥ ५४५ ॥**

कारण जो राजा मोहानें विचार केल्यावांचून आपल्या देशास पीडतो, तो बांधवांसहवर्तमान राज्य व जीवित यांपासून थोड्याच कालांत भ्रष्ट होतो॥५४५॥

याप्रमाणें प्रजेजवळून कर घ्यावा व त्याच्याबद्दल राजानें कोणत्याहि परदेशच्या राजाकडून होणाऱ्या हल्लयापासून आपल्या देशाचें व प्रजेचें संरक्षण करावें. परस्पर प्रजेची सल्ला एकी करवावी आणि प्रजेच्या संरक्षणासाठीं चोर

लुटारू व बंडखोर लोकांस शासन करण्यापुरतें सैन्य ठेवावें; तें जमीन व समुद्र दोन्ही ठिकाणीं उपयोगी पडेल अशी व्यवस्था ठेवावी. समुद्रामध्यें लुटारू लोकांकडून व युद्धसमयीं परदेशी राजांकडून आपल्या प्रजेचा जीव व धन बचाविण्यासाठीं वर्तमानकालास अनुसरून उत्तम प्रकारची अग्नीनें किंवा विजेनें चालणारी युद्धास योग्य मजबूत नौका बनवावी. तीमध्यें आपल्या वर्तमान समयाप्रमाणें युद्ध करण्याची सर्व प्रकारची सामग्री व सैन्य ठेवावें. सर्व सैन्यास त्याचा प्रत्येक विभाग ओळखिला जाईल अशा रीतीनें निरनिराळ्या रंगाचे एकसारखे कपडे द्यावे, राहण्यासाठीं देशांतील निरनिराळ्या ठिकाणीं चांगल्या हवाशीर जागेमध्यें छावण्या बांधून द्याव्या. युद्धामध्यें लढण्यासाठीं आपल्या वर्तमान परिस्थित्यनुरूप उत्तम प्रकारचीं शस्त्रास्त्रें द्यावीं व तीं वापरणें वगैरे सर्व प्रकारची युद्धकला व चोर लुटारूंस शोधून काढण्याचें चातुर्य शिकवावें. पुनः त्यांतून प्रत्येक शहरांत, प्रत्येक गांवांत व प्रत्येक मार्गांत सल्ला संप ठेवावे आणि चोर लुटारूंपासून प्रजेचें संरक्षण करण्यापुरते रक्षक ठेवावे. या सर्व सैन्याचा मासिक लवाजमा चढेल तितका चढूं देत जावें, आणि तें नेहमीं युद्धाकरितां तयार राहील त्याप्रमाणें व्यवस्था ठेवावी. कारण एकाएकीं तसें काम येऊन पडतें. मनुस्मृतीच्या ७ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**नित्यमुद्यतदण्डः स्यान्नित्यं विवृतपौरुषः ।**
**नित्यं संवृतसर्वार्थो नित्यं छिद्रानुसार्यरेः ॥ ५४६ ॥**

राजानें नित्य आपल्या सैन्यास कवायत शिकवून तयार ठेवावें, नित्य पराक्रम दाखवीत असावें, आपला सर्व मतलब नित्य गुप्त ठेवावा, आणि नित्य शत्रूचीं छिद्रें पहात असावें ॥ ५४६ ॥

**द्वयोस्त्रयाणां पञ्चानां मध्ये गुल्ममधिष्ठितम् ।**
**तथा ग्रामशतानां च कुर्याद्राष्ट्रस्य संग्रहम् ॥ ५४७ ॥**

आणि देशाच्या रक्षणाकरितां दोन, तीन किंवा पांच गांवांच्या अंतरावर लहान आणि शंभर शंभर गांवांच्या अंतरावर मोठी एक एक नायकाच्या हाताखालीं सैन्याची तुकडी ठेवावी ॥ ५४७ ॥

तसेंच शुक्रनीतीच्या पहिल्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**कार्यस्थानानि सर्वाणि यामिकैरभितो दिशम् ।**
**चतुर्भिः पञ्चभिर्वापि षड्भिर्वा गोपयेत्सदा ॥**
**दिने दिने यामिकानां प्रकुर्यात् परिवर्तनम् ॥ ५४८ ॥**

राजानें निरंतर सर्व कार्य करण्याच्या स्थानांचें चारहि बाजूंनीं चार, पांच किंवा सहा प्रहर भरणाऱ्या अर्थात् पहारेकरी शिपायांकडून रक्षण करावें आणि प्रत्येक दिवशीं त्यांची बदली करावी ॥ ५४८ ॥

**वीथिवीथिषु यामार्द्धे निशि पर्यटनं सदा ।**
**कर्तव्यं यामिकैरेव चौरजारनिवृत्तये ॥ ५४९ ॥**

पुनः रात्रीच्या वेळीं चौकीदारांनीं चोर व जार यांच्या बंदोबस्ताकरितां गल्लोगल्ल्यांनीं प्रत्येक प्रहरांत दोन वेळ फिरावें ॥ ५४९ ॥

**मार्गसंरक्षणं कुर्यान्नृपः पान्थसुखाय च ।**
**पान्थप्रपीडका ये ये हन्तव्यास्ते प्रयत्नतः ॥ ५५० ॥**

पुनः राजानें वाटसरूंच्या सुखाकरितां मार्गाचें संरक्षण करावें, आणि त्यांस पीडा करीत असतील त्यांस प्रयत्नानें मारावे ॥ ५५० ॥

**गजाश्वरथयानं तु प्रातः सायं सदाऽभ्यसेत् ।**
**व्यूहाभ्यासं सैनिकानां स्वयं शिक्षेच्च शिक्षयेत् ॥ ५५१ ॥**

पुनः निरंतर सकाळ संध्याकाळ हत्ती, घोडे व रथ यांच्यावर बसण्याचा अभ्यास करावा आणि कवायत शिकावी व सैनिकांसहि शिकवावी ॥५५१॥

**गजाश्वरथपश्वादीन् भृत्यान्दासांस्तथैव च ।**
**संभारान्सैनिकान् कार्याक्षमाञ्ज्ञात्वा दिने दिने ।**
**संरक्षयेत्प्रयत्नेन सुजीर्णान् संत्यजेत्सुधीः ॥ ५५२ ॥**

पुनः बुद्धिमान् राजानें दररोज हत्ती, घोडे, रथ, पशु, पोष्य वर्ग, नोकर व लढाईची सामग्री हे लष्कराच्या कार्याविषयीं असमर्थ झालेले जाणून पुनः समर्थ होतील त्याप्रकारें त्यांचें रक्षण करावें; व त्यांतून जे अतिजीर्ण झाले असतील त्यांचा कार्यामध्यें उपयोग करूं नये ॥ ५५२ ॥

पुनः परक्यांच्या हल्ल्यापासून देशाचें रक्षण करण्यासाठीं सरहद्दीवर व आंतील भागांत जेथें योग्य वाटेल तेथें शिल्पशास्त्र व युद्धविद्या यांमध्यें निपुण असलेल्या पुरुषांच्या देखरेखीखालीं शत्रूंकडून जिंकणें अशक्य असा मजबूत किल्ला बांधावा. कारण बलिष्ठ शत्रूच्या समोर लढतेसमयीं किल्ला बहुत उपयोगीं पडतो. त्यामध्यें सर्व प्रकारच्या युद्ध करण्याच्या साहित्यासह सैन्य सज्ज ठेवावें व त्याच्याकरितां कित्येक वर्षें पुरेल इतका खुराकीचा व पोशाकीचा संग्रह ठेवावा. मनुस्मृतीच्या ७ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**एकः शतं योधयति प्राकारस्थो धनुर्धरः।**
**शतं दशसहस्राणि तस्माद्दुर्गं विधीयते ॥ ५५३ ॥**

किल्ल्याच्या आंत असलेला एक शस्त्रधारी बाहेर असलेल्या १०० योध्यांशीं युद्धांत टक्कर देऊं शकतो आणि किल्ल्यांतील १०० शस्त्रधारी बाहेर असलेल्या १०००० योध्यांशीं युद्ध करूं शकतात, करितां राजानें किल्ला अवश्य बांधावा ॥ ५५३ ॥

तसेंच शुक्रनीतीच्या प्रथमाध्यायांत सांगितलें आहे कीं,

**उच्छ्रितस्तु तथा कार्यो दस्युभिर्न विलङ्घ्यते।**
**यामिकै रक्षितो नित्यं नालिकास्त्रैश्च संयुतः ॥ ५५४ ॥**

राजानें शत्रूंकडून उल्लंघन करतां येण्यास अशक्य होईल इतका उंच, नेहमीं पहारेवाल्यांनीं सुरक्षित व ज्यामध्यें तोफा, बंदुका वगैरे नालिकास्त्रें ठेवलीं आहेत असा किल्ला करावा ॥ ५५४ ॥

**परिखा च ततः कार्या खाताद्द्विगुणविस्तरा।**
**नातिसमीपप्राकारा ह्यगाधसलिला शुभा ॥ ५५५ ॥**

आणि किल्ल्याभोंवतीं थोडया लांबीवर बहुतकरून उंचीहून दुप्पट विस्ताराची व जींत अगाध पाणी आहे अशी सुंदर परिखा तयार करावी ॥ ५५५ ॥

**विस्तीर्णताऽतिवैषम्यं रसधान्येध्मसंग्रहः।**
**प्रवेशश्चात्तसारश्च सप्तैता दुर्गसंपदः ॥ ५५६ ॥**

मंदिराचा विस्तार, अति काठिण्य, उदकादि रस, धान्यें व लांकडें यांचा सांठा आणि आवजाव करण्याचा गुप्त मार्ग या सात दुर्गसंपत्ती सांगितल्या आहेत ॥ ५५६ ॥

पुनः सल्ला संप राखण्यासाठीं राजानें आपल्या प्रजेनें निवडून काढलेले पुढारी आणि आपले प्रधान यांच्याबरोबर मसलत करून बहुमतानें देशकालास अनुसरून जशी जरूर पडेल तसा कायदा बांधावा व त्याप्रमाणें स्वतः चालून आपल्या प्रजेस चालवावी, आणि त्यांच्यांत जे परस्परांचे अपराध होतील ते व देवघेवीचेसंबंधीं जो बांधा पडेल, त्याचा निवाडा करून देण्यासाठीं प्रत्येक शहरांत व योग्य अशा गावांत न्यायमंदिरें स्थापावीं आणि त्यांत पंच व न्यायाधीश यांच्याकडून कोणाचा पक्षपात केल्यावांचून जो कायद्याप्रमाणें वाजवी न्याय असेल तो द्यावा. मनुस्मृतीच्या ८ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**जातिजानपदान् धर्माञ्छ्रेणीधर्मांश्च धर्मवित् ।**
**समीक्ष्य कुलधर्मांश्च स्वधर्मं प्रतिपादयेत् ॥ ५५७ ॥**

धर्मशास्त्र जाणणाऱ्या राजानें जाति, देश, समाज व कुल यांच्या रीती असतील त्या तपासून न्याय करण्याकरितां कायदा बांधावा ॥ ५५७ ॥

**धर्मासनमधिष्ठाय संवीताङ्गः समाहितः ।**
**प्रणम्य लोकपालाय कार्यदर्शनमारभेत् ॥ ५५८ ॥**

आणि न्यायाधीशानें न्यायासनावर बसून, वस्त्रांनीं शरीर आच्छादून सावधान होऊन व जगत्पालक परमेश्वरास नमस्कार करून न्याय करण्यास आरंभ करावा ॥ ५५८ ॥

**नोत्पादयेत्स्वयं कार्यं राजा वाप्यस्य पूरुषः ।**
**न च प्रापितमन्येन ग्रसेदर्थं कदा च न ॥ ५५९ ॥**

परंतु तो न्याय करणारा, राजा किंवा राजानें नेमिलेला पुरुष यांनीं स्वतः पक्षपातानें वादी-प्रतिवाद्यांचा कज्जा वाढवूं नये व कोणी दाखल केलेला कज्जा ऐकण्यामध्यें कोणत्याहि प्रकारें दुर्लक्ष करूं नये ॥ ५५९ ॥

सत्यमर्थं च संपश्येदात्मानमथ साक्षिणः ।
देशं रूपं च कालं च व्यवहारविधौ स्थितः ॥ ५६० ॥

आणि कायद्याच्या नियमामध्यें राहून, सत्य काय आहे, कज्जा कसा आहे, आपण काय करावयास बसलों आहों, साक्षी कसे आहेत आणि देश-काल व व्यवहार यांची रीत–भात कशी आहे हें सर्व तपासावें ॥ ५६० ॥

अनेन विधिना राजा मिथो विवदतां नृणाम् ।
साक्षिप्रत्ययसिद्धानि कार्याणि समतां नयेत् ॥ ५६१ ॥

याप्रमाणें न्यायाधीशानें परस्परांमधील वांध्याबद्दल वादी–प्रतिवादीच्या साक्षी वगैरे प्रमाणांवरील विश्वासानें सिद्ध झालेल्या कार्याचा खुलासा द्यावा ॥५६१॥

यस्त्वधर्मेण कार्याणि मोहात्कुर्यान्नराधिपः ।
अचिरात्तं दुरात्मानं वशे कुर्वन्ति शत्रवः ॥ ५६२ ॥

परंतु जो राजा मोहानें प्रजेस वाजवी इनसाफ देत नाहीं, त्या दुरात्म्यास त्याची प्रजा व कार्यभारी विरुद्ध झाल्यानें थोडक्याच काळांत वश करतात ॥ ५६२ ॥

कामक्रोधौ तु संयम्य योऽर्थान् धर्मेण पश्यति ।
प्रजास्तमनुवर्तन्ते समुद्रमिव सिन्धवः ॥ ५६३ ॥

जो राजा काम–क्रोधांस नियमांत ठेवून प्रजेस वाजवी न्याय देतो त्यास, समुद्रास जशा नद्या तशा, सर्व प्रजा अनुसरतात ॥ ५६३ ॥

तसेंच शुक्रनीतीच्या चवथ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

नैकः पश्येच्च कार्याणि वादिनोः शृणुयाद्वचः ।
रहसि च नृपः प्राज्ञः सभ्याश्चैव कदाचन ॥ ५६४ ॥

बुद्धिमान् राजा, न्यायाधीश किंवा सभासद, यांपैकीं कोणीहि एकट्यानें कधींच एकांतामध्यें वादी–प्रतिवादीचें कार्य तपासूं नये, तसेंच त्यांची तत्संबंधी गोष्टहि ऐकूं नये ॥ ५६४ ॥

व्यवहारविदः प्राज्ञाः पुत्रशीलगुणान्विताः ।
रिपौ मित्रे समा ये च धर्मज्ञाः सत्यवादिनः ॥ ५६५ ॥

पुनः राजा किंवा न्यायाधीश यांनीं प्रत्येक जातींतील जे व्यवहार जाणणारे, बुद्धिमान्, सदाचरणी व सच्छील, शत्रु–मित्रास समान पाहणारे, धर्मज्ञ, सत्यवादी,——॥ ५६५ ॥

निरालसा जितक्रोधकामलोभाः प्रियंवदाः ।
राज्ञा नियोजितव्यास्ते सभ्याः सर्वासु जातिषु ॥ ५६६ ॥

आळसरहित, काम, क्रोध व लोभ ज्यांनीं जिंकले असे, आणि प्रियभाषण करणारे असतील, त्यांस सभासद करावे ॥ ५६६ ॥

एकद्वित्रिचतुर्वारं व्यवहारानुचिन्तनम् ।
कार्यं पृथक् पृथक् सभ्यै राज्ञा श्रेष्ठोत्तरैः सह ॥ ५६७ ॥

आणि त्या उत्तरोत्तर श्रेष्ठ सभासदांबरोबर पृथक् पृथक् एक दोन तीन किंवा चार वेळ विचार करून, वादी–प्रतिवादींच्या वांध्यांचा निर्णय करावा ॥ ५६७ ॥

पुनः राजानें आपल्या प्रजेचें रोगांपासून रक्षण होण्याकरितां प्रांतांनिहाय व गांवांनिहाय औषधालयें स्थापावीं. व तेथें वैद्यशास्त्रामध्यें निष्णात असलेले पुरुष ठेवून त्यांच्याकडून प्रजेमध्यें जे जे रोगी असतील त्यांस औषध द्यावें. शहरोशहरीं व गांवोगांवीं दररोजची घाण साफ करवावी, व जेथें मनुष्याची रहदारी नसेल त्या ठिकाणीं शेतीवाडीच्या खताकरितां ती एकत्र करवावी; कारण घाणीमुळें खराब झालेली हवा मनुष्याच्या श्वासद्वारा शरीरांत जावून रोग उत्पन्न करिते, परंतु तीमध्यें वनस्पतींस पोषण मिळविण्याचीं तत्त्वें असल्यानें ती खतांत अत्यंत उपयोगी आहे. पुनः ज्याप्रमाणें विषूचिका ह्मणजे वमन, विरेचन, देवी व हुरहुरें वगैरे उडते रोग बंद होतील, असे उपाय राजानें करावे. त्यांत देवी बंद करण्याकरितां गोस्तनाची लस टांकून देवी काढविण्याचा उपाय प्रसिद्ध आहे, करितां तशा कामामध्यें कुशल असलेल्या पुरुषांच्या द्वारा, आपल्या प्रजेमध्यें उत्पन्न झालेल्या सर्व मुलांस देवी काढ-वीत जावें. तसेंच प्रजेमध्यें जन्म व मृत्यु होतील त्यांची नोंद करवीत जावें. त्यांत मृत्यूंची नोंद कारणांसहित करवावी, आणि दर महिन्यास त्याचें पत्रक

तपासून जर रोगांपासून मृत्युसंख्या अधिक होत असेल, तर रोग प्रजेमधून कमी करण्याचा व इतर रोगहि जसे कमी होतील तसें करण्याचा प्रयत्न करवावा. पुनः सिंह व्याघ्र वगैरे क्रूर जनावरेंहि मनुष्याची हिंसा करतात, करितां तशा घातकी जनावरांचा शिकारी पुरुषांस कांहीं मोबदला देवून त्यांच्याजवळून नाश करवावा, त्यामुळें प्रजा निर्भय होऊन सुखानें राहूं शकेल. तसेंच आग व पाणी यांच्या धोक्यामुळें ज्या रीतीनें प्रजेच्या प्राणांचें व मालाचें नुकसान न होईल त्या प्रकारची व्यवस्था करावी, आणि आपल्या प्रजेमध्यें वाढ होते कीं ऱ्हास होतो तो समजण्याकरितां प्रत्येक १० वर्षांनीं एकंदर वस्ती किती आहे, व तीमध्यें पुरुष, स्त्रिया, आणि बालक त्यांचें वय आणि धंद्याचे विभाग यांसह किती आहेत त्याचें वसतिपत्रक अर्थात् खानेसुमारीपत्रक तयार करावें; आणि त्यांत प्रजेची वाढ दिसून आल्यास तीचें रक्षण—पोषण वगैरे कल्याण उत्तम प्रकारें होतें कीं नाहीं तो खात्यानें विचार करावा, व होत नसेल तर त्याचा उपाय शोधून काढून प्रजेस दाखवावा आणि ऱ्हास दिसून आल्यास त्याचें कारण शोधून काढून कांहीं चूक असेल ती सुधारून नंतर प्रजेमध्यें जशी वाढ होत जाईल असें करावें. कारण प्रजा घटल्यामुळें उत्पन्न कमी होतें व उत्पन्न कमी झाल्यामुळें राजा निर्बली होतो. श्रीमहाभारतांतर्गत सभापर्वाच्या पांचव्या अध्यायांत नारदमुनीनें युधिष्ठिरास प्रश्न केला आहे कीं,

**कच्चिदग्निभयाच्चैव सर्वं व्यालभयात्तथा ।**
**रोगरक्षोभयाच्चैव राष्ट्रं स्वं परिरक्षसि ॥ ५६८ ॥**

काय तूं तुझ्या सर्व प्रजेचें अग्नि, सिंह, व्याघ्र व सर्प वगैरे क्रूर प्राणी आणि रोग व राक्षस यांच्या भयापासून रक्षण करतोस काय ? ॥ ५६८ ॥

तसेंच पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**यथा बीजाङ्कुरः सूक्ष्मः प्रयत्नेनाभिरक्षितः ।**
**फलप्रदो भवेत् काले तद्वल्लोकः सुरक्षितः ॥ ५६९ ॥**

जसा प्रयत्नानें रक्षण केलेला सूक्ष्म बीजाचा अंकुर कांहीं कालानें फल देतो, तशी चांगल्या रीतीनें रक्षण केलेली प्रजाहि फल देणारी जाणावी ॥५६९॥

**लोकानुग्रहकर्त्तारः प्रवर्धन्ते नरेश्वराः ।**
**लोकानां संक्षयाच्चैव क्षयं यान्ति न संशयः ॥ ५७० ॥**

प्रजेवर दया ठेवणारे राजे वृद्धि पावतात, व प्रजेच्या क्षयापासून क्षय पावतात यांत संशय नाहीं ॥ ५७० ॥

**गोपालेन प्रजाधेनोर्वित्तदुग्धं शनैः शनैः ।**
**पालनात्पोषणाद्ग्राह्यं न्याय्यां वृत्तिं समाचरेत् ॥ ५७१ ॥**

करितां राजारूप गवळ्यानें प्रजारूपी गाईचें पालन आणि पोषण करून धनरूप दूध हळू हळू ग्रहण करावें, व न्याय्य मार्गानें चालावें ॥ ५७१ ॥

**हिरण्यधान्यरत्नानि यानानि विविधानि च ।**
**तथाऽन्यदपि यत्किञ्चित्प्रजाभ्यः स्यान्महीपतेः ॥ ५७२ ॥**

कारण राजाजवळ जें धन, धान्य, रत्नें, विविध प्रकारचीं वाहनें व इतरहि जें कांहीं वैभव असतें तें सर्व प्रजेपासूनच मिळालेलें असतें ॥ ५७२ ॥

पुनः राजानें आपल्या प्रजेस विद्याभ्यास शिकवावा, सर्व प्रकारच्या कलाकौशल्यांत व धंदा करण्याच्या रीतीभातींत सुधार करावी. कारण सर्व प्रकारें प्रजा कुशल असेल तर ती आपला निर्वाह चांगल्या रीतीनें चालवून राजाच्या उत्पन्नामध्यें वाढ करून देते. प्रजेस विद्या व कलाकौशल्य शिकविण्याकरितां स्त्री व पुरुष दोन्ही जातींसाठीं पृथक् पृथक् पाठशाळा स्थापाव्या. त्यांतून स्त्रियांस स्त्रीविद्यागुरुद्वारा आणि पुरुषांस पुरुषविद्यागुरुद्वारा शिक्षण देण्यांत यावें. शुक्रनीतीच्या पहिल्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**विद्याकलानां वृद्धिः स्यात्तथा कुर्यान्नृपः सदा ।**
**विद्याकलोत्तमान्दृष्ट्वा वत्सरे पूजयेच्च तान् ॥ ५७३ ॥**

राजानें नेहमीं विद्यांची व कलांची जशी वृद्धि होईल तसें करावें, व प्रतिवर्षीं जे विद्या व कला यांमध्यें उत्तम निष्णात पाहण्यांत येतील त्यांचा योग्य सत्कार करावा ॥ ५७३ ॥

पुनः राजानें प्रत्येक शहरीं व गांवीं आणि जितक्या प्रदेशांमध्यें अग्नि किंवा विद्युत् यांच्या साहाय्यानें चालणाऱ्या रथांची व्यवस्था करणें शक्य नाहीं तेथें रस्ते, त्यांच्या आसपास छायेकरितां वृक्ष लावून व त्यांवरून रात्रीस प्रजेस रहदारी करण्यास अडचण पडूं नये ह्मणून खांब घालून त्यांवर प्रकाशाकरितां कंदील ठेवून दिवे करावे. सर्व लहान–मोठ्या नद्यांवरून प्रजेची सर्व प्रकारची आवजाव येण्याजाण्याची व्यवस्था सहज होण्याकरितां पूल बांधवावे. प्रजेच्या उपयोगाकरितां गांवोगांवीं व शहरोशहरीं तसेंच प्रत्येक जंगलांत जेथें जसे योग्य तेथें तसे वृक्ष लावावे. आणि कालांतरानें खूट न पडावी ह्मणून त्यांतून जितके वापरले जातील तितके पुनः लावण्याचा नियम ठेवावा. तसेंच पावसाच्या जोरांत शेतीवाडीचा बचाव करण्याकरितां मोठ्या नद्यांतून लहान लहान पाट खोदून त्यांचें पाणी मोठ्या विस्ताराच्या देशांमध्यें पुरें पडूं शकेल अशी योजना करावी. आणि जेथें मोठ्या नद्या नसतील तेथें लहान नद्या, बांध व मोठे तलाव वगैरे जलाशय बांधवून शेतीवाडीचा बचाव होईल त्या रीतीनें त्यामध्यें पाण्याचा सांठा करून ठेवावा. तसेंच सर्व प्रजेस पिण्याचें पाणी मिळूं शकेल त्या रीतीनें ठिकठिकाणीं टांकीं, कुवे, हौद, विहिरी, तलाव वगैरे जलस्थानकें बांधवावीं. तसेंच एखाद्या ठिकाणीं पाणी दूर असेल तर भूमार्गानें तें आणून प्रजेस पुरें पाडावें. पुनः प्रत्येक नगरीं प्रत्येक गांवीं व प्रत्येक मार्गामध्यें मुक्कामांमुक्कामांनीं प्रवास करण्यास निघालेल्या प्रजेच्या सोयीसाठीं धर्मशाळा बांधवाव्या. शुक्रनीतीच्या पहिल्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**पुरं दृष्ट्वा राजमार्गान् सुबहून्कल्पयेन्नृपः ।**
**उत्तमो राजमार्गस्तु त्रिंशद्धस्तमितो भवेत् ।। ५७४ ।।**

राजानें शहरापासून त्याच्या आकाराप्रमाणें अनेक राजमार्ग तयार करावे, त्यांत उत्तम राजमार्ग ३० हात रुंदीचा करावा ।। ५७४ ।।

**कूर्मपृष्ठा मार्गभूमिः कार्या ग्राम्यैः सुसेतुका ।**
**कुर्यान्मार्गान् पार्श्वखातान्निर्गमार्थं जलस्य च ।। ५७५ ।।**

आणि रस्त्याची भूमि ग्राम्य जनांकडून कांसवाच्या पाठीप्रमाणें मध्यें उंच व दोन्ही बाजूंनीं नमती करवावी आणि जेथें जरूर पडेल तेथें चांगले पूल बांधवावे व पाणी जाण्याकरितां मार्गांच्या दोन्ही बाजूंस गटार तयार करवावे ॥ ५७५ ॥

ग्रामद्वयान्तरे चैव पान्थशालां प्रकल्पयेत् ।
नित्यं संमार्जितां चैव ग्रामपैश्च सुगोपिताम् ॥ ५७६ ॥

पुनः दोन गांवांच्या अंतरामध्यें किंवा गांवोगांव वाटसरूंस उतरण्यासाठीं धर्मशाळा करवाव्या व त्या नित्य झाडून झुडून साफ ठेवाव्या आणि गांवाच्या चौकीदारांकडून त्यांचें चांगल्या रीतीनें रक्षण करावें ॥ ५७६ ॥

पुनः याच ग्रंथाच्या चवथ्या अध्यायाच्या चवथ्या प्रकरणांत सांगितलें आहे कीं,

ग्रामे ग्राम्यान् वने वन्यान् वृक्षान्संरोपयेन्नृपः ।
कूपवापीपुष्करिण्यस्तडागाः सुगमास्तथा ॥
यथा तथा ह्यनेकाश्च राष्ट्रे स्याद्विपुलं जलम् ॥ ५७७ ॥

राजानें गांवामध्यें लावण्यास योग्य कांट्यांशिवायचे वृक्ष गांवाजवळ व अरण्यामध्यें लावण्यास योग्य कांट्यांचे वृक्ष अरण्यांत लावावे; तसेंच प्राण्यांच्या व शेतीच्या बचावाकरितां देशांत पुष्कळ पाणी राहील त्या रीतीनें, सुखानें उतरतां येईल असे अनेक कुवे, विहिरी, तलाव व सरोवरें करवावीं ॥ ५७७ ॥

नदीनां सेतवः कार्या विबन्धाश्च मनोहराः ।
नौकादिजलयानानि पारगानि नदीषु च ॥ ५७८ ॥

पुनः नद्यांचे मनोहर पूल व बांध बांधवावे, आणि जेथें पूल नसेल तेथें नदीचा पार उतरण्यासाठीं नौका वगैरे जलवाहनें ठेवावीं ॥ ५७८ ॥

पुनः राजानें आपल्या प्रजेमध्यें ज्यांचा कोणी रक्षण करणारा नसेल अशीं मुलें व स्त्री—पुरुष तसेंच युद्ध करीत असतां जे योद्धे मरण पावले असतील त्यांचीं मुलें बाळें यांचें भरण—पोषण करावें आणि कदाचित् त्यांचे जवळ द्रव्य असेल तर त्याचें रक्षण करून त्यांचा निर्वाह चालेल असा प्रबंध

करावा. श्रीमहाभारतांतर्गत सभापर्वाच्या पांचव्या अध्यायांत नारदमुनीनें युधिष्ठिरास प्रश्न केला आहे कीं,

**कच्चिदन्धांश्च मूकांश्च पङ्गून्व्यङ्गानबान्धवान् ।**
**पितेव पासि धर्मज्ञ तथा प्रव्रजितानपि ॥ ५७९ ॥**

हे धर्मज्ञ ! काय तूं आंधळे, मुके, पांगळे, थोंटे, हातांपायांनीं लुले, अनाथ व दीन जन यांचें पित्याप्रमाणें पोषण करतोस ना ? ॥ ५७९ ॥

**कच्चिद्दारान्मनुष्याणां तवार्थे मृत्युमीयुषाम् ।**
**व्यसनं चाभ्युपेतानां बिभर्षि भरतर्षभ ॥ ५८० ॥**

हे भरतकुलश्रेष्ठा ! तुझ्यासाठीं मृत्यु पावलेल्या व दुःखी झालेल्या पुरुषांच्या बायका–मुलांचें तूं पोषण करतोस ना ? ॥ ५८० ॥

याप्रकारचें प्रजेचें रक्षण राजानें प्रजेपासून कर घेण्याच्या मोबदल्यामध्यें अवश्य केलें पाहिजे आणि प्रजेनेंहि आपापल्या खऱ्या आवकेप्रमाणें, राजा आपल्या राजसभेच्या द्वारा देशाच्या आवक–खर्चाचा दर वर्षाचा हिशोब करून जो कर घेण्याचा ठराव करील तो मोठ्या संतोषानें दिला पाहिजे. कारण परदेशांतील राजाच्या हल्ल्यापासून चोर, लुटारू व बंडखोर लोक यांपासून, आपसांतील क्लेशापासून, रोगांपासून, घाणीपासून, सिंह व्याघ्र वगैरे क्रूर जनावरांपासून, आगीपासून आणि पाण्याच्या पूरापासून जें रक्षण होणें तें सर्व प्रजेचें सामान्य आहे. श्रीमंतांस स्वतःच्या आवकेच्या प्रमाणांत गरिबांहून विशेष कर द्यावा लागतो; तशी त्याच्या मोबदल्यामध्यें त्यांची माल–मिळकतहि पुष्कळ असल्यामुळें तीच्या प्रमाणांत तीचें रक्षणहि राजास पुष्कळ खर्चाचें असतें. पुनः शिक्षण, रस्ते, लाईट, वृक्ष, छाया, नद्यांचे पूल, जलाशय आणि धर्मशाळा हीं सार्वजनिक उपयोगासाठीं आहेत. आतां इतक्या सर्व प्रकारांनीं प्रजेचें रक्षण एकट्याकडून होऊं शकणार नाहीं, करितां राजानें कामाप्रमाणें खातीं उभारून त्यांमध्यें योग्य अधिकाऱ्यांच्या नेमणुका कराव्या आणि त्यांच्या द्वारें प्रजेचें चांगल्या रीतीनें रक्षण करावें, त्या खात्यांमधून जी

व्यवस्था करावी लागेल ती सर्व लेखी करावी, तोंडीं करूं नये. मनुस्मृतीच्या सातव्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**अपि यत्सुकरं कर्म तदप्येकेन दुष्करम् ।**
**विशेषतोऽसहायेन किं नु राज्यं महोदयम् ॥ ५८१ ॥**

जें कार्य सुखानें करणें शक्य असेल, तेंहि एकट्यास करणें कठिण आहे. तर विशेषेंकरून राज्यरूप मोठें कार्य मदतगारांवांचून एकट्यानें करणें कसें शक्य होईल? ॥ ५८१ ॥

**मौलाञ्छास्त्रविदः शूरान् लब्धलक्षान् कुलोद्गतान् ।**
**सचिवान्सप्त चाष्टौ वा प्रकुर्वीत परीक्षितान् ॥ ५८२ ॥**

करितां राजानें परीक्षा करून मूळापासूनच राज्यपद्धति जाणणारे, शास्त्रामध्यें निपुण, शूर—वीर, युद्धविद्येमध्यें हुषार व कुलीन असे सात किंवा आठ प्रधान करावे ॥ ५८२ ॥

ते येणेंप्रमाणें कीं, १ महसूल तपासणारा, २ लष्करावर देखरेख ठेवणारा, ३ परराष्ट्रांशीं चाललेला व्यवहार संभाळणारा, ४ न्यायखातें तपासणारा, ५ खजिनेदार, ६ जाहीर बांधकाम, शिक्षण व अनाथांचें पालन—पोषण यांची चौकशी ठेवणारा, ७ आपल्या खाजगी खुराकी—पोशाकीचा हिशोब ठेवणारा आणि ८ त्या सर्वांवरील मुख्य प्रधान.

**तैः सार्धं चिन्तयेन्नित्यं सामान्यं संधिविग्रहम् ।**
**स्थानं समुदयं गुप्तिलब्धप्रशमनानि च ॥ ५८३ ॥**

त्यांच्याशीं नित्य संधि, विग्रह, सैन्य, उत्पन्न, देशसंरक्षण आणि उत्पन्नांतून योग्य खर्च यांसंबंधीं खलबत करावें ॥ ५८३ ॥

**तेषां स्वं स्वमभिप्रायमुपलभ्य पृथक् पृथक् ।**
**समस्तानां च कार्येषु विदध्याद्धितमात्मनः ॥ ५८४ ॥**

आणि त्या प्रत्येकांचा निरनिराळा व त्या सर्व एकत्र मिळालेल्यांचा अभिप्राय घेवून ज्यापासून आपलें हित होईल तें कार्य करावें ॥ ५८४ ॥

निवर्तेतास्य यावद्भिरितिकर्तव्यता नृभिः ।
तावतोऽतन्द्रितान् दक्षान् प्रकुर्वीत विचक्षणान् ॥ ५८५ ॥

पुनः आपला राज्यकारभार चालविण्यामध्यें जितक्यांची जरूर पडेल, तितके आळसरहित, शहाणे, शास्त्र जाणणारे मनुष्य ठेवावे ॥ ५८५ ॥

दूतं चैव प्रकुर्वीत सर्वशास्त्रविशारदम् ।
इङ्गिताकारचेष्टज्ञं शुचिं दक्षं कुलोद्गतम् ॥ ५८६ ॥

पुनः जो सर्व शास्त्रांमध्यें निपुण, आकार व चेष्टा यांच्या योगें दुसऱ्याच्या मनांतील अभिप्राय जाणणारा, शुद्ध अंतःकरणाचा, चतुर व कुलीन असेल त्यास वकील करावा ॥ ५८६ ॥

ग्रामस्याधिपतिं कुर्याद्दशग्रामपतिं तथा ।
विंशतीशं शतेशं च सहस्रपतिमेव च ॥ ५८७ ॥

पुनः प्रत्येक गांवाचा वेगवेगळा अधिपति करावा, त्याच्यावर १० गांवांचा अधिपतिं, त्याच्यावर २० गांवांचा अधिपति, त्याच्यावर १०० गांवांचा अधिपति आणि त्याच्यावर १००० गांवांचा अधिपति करावा ॥ ५८७ ॥

ग्रामदोषान्समुत्पन्नान्ग्रामिकैः शनकैः स्वयम् ।
शंसेद्ग्रामदशेशाय दशेशो विंशतीशिनम् ॥ ५८८ ॥

ग्रामाधिपतीनें गांवांत कांहीं चोरादिकांसंबंधीं दंगा—फितुरी होईल व त्याचा आपल्याकडून बंदोबस्त होऊं न शकेल, तर गुपचूप दशग्रामाधिपास कळवावें, त्याचप्रमाणें दशग्रामाधिपानें विंशतीशास कळवावें ॥ ५८८ ॥

विंशतीशस्तु तत्सर्वं शतेशाय निवेदयेत् ।
शंसेद्ग्रामशतेशस्तु सहस्रपतये स्वयम् ॥ ५८९ ॥

तें सर्व वृत्त विंशतीशानें शतेशास कळवावें, शतेशानें सहस्रपतीस जाहीर करावें ॥ ५८९ ॥

तेषां ग्राम्याणि कार्याणि पृथक्कार्याणि चैव हि ।
राज्ञोऽन्यः सचिवः स्निग्धस्तानि पश्येदतन्द्रितः ॥ ५९० ॥

आणि त्या सर्वांचीं गांवांसंबंधीं समस्त व पृथक् पृथक् कार्यें राजाच्या स्नेही व निरलस अशा प्रधानांनीं तपासावीं ॥ ५९० ॥

तसेंच शुक्रनीतीच्या दुसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**सर्वविद्यासु कुशलो नृपो ह्यपि सुमन्त्रवित् ।**
**मन्त्रिभिस्तु विना मन्त्रं नैकोऽर्थं चिन्तयेत् क्वचित् ॥५९१॥**

जरी राजा सर्व विद्यांमध्यें कुशल व उत्तम विचारी असला, तथापि मंत्र्यांशिवाय त्यानें एकट्यानें कधींहि कोणत्याहि कार्याचा विचार करूं नये ॥५९१॥

**पुरुषे पुरुषे भिन्नं दृश्यते बुद्धिवैभवम् ।**
**आप्तवाक्यैरनुभवैरागमैरनुमानतः ॥ ५९२ ॥**

कारण यथार्थ वक्त्यांचीं वचनें, अनुभव, शास्त्र आणि अनुमान यांच्या योगें प्रत्येक पुरुषामध्यें बुद्धीचें वैभव वेगवेगळें दिसतें ॥ ५९२ ॥

**भृत्यं परीक्षयेन्नित्यं विश्वास्यं विश्वसेत्तदा ।**
**नैव जातिर्न च कुलं केवलं लक्षयेदपि ॥ ५९३ ॥**

पुनः राजानें नेहमीं भृत्यांची परीक्षा करीत रहावें, त्यांमध्यें जो ठेवण्यास योग्य असेल त्याच्यावर विश्वास ठेवावा, परंतु केवळ जाति व कुल यांवर दृष्टि ठेवूं नये ॥ ५९३ ॥

**कर्मशीलगुणाः पूज्यास्तथा जातिकुले न हि ।**
**न जात्या न कुलेनैव श्रेष्ठत्वं प्रतिपद्यते ॥ ५९४ ॥**

कारण मनुष्याचे कर्म, शील व गुणच पूजा करविण्यास योग्य आहेत, जाति व कुल नाहीं. कारण केवळ जाति व कुल या दोहोंमुळेंच कांहीं श्रेष्ठता प्राप्त होत नाहीं ॥ ५९४ ॥

**अधिकारक्षमं दृष्ट्वाह्यधिकारे नियोजयेत् ।**
**नाधिकारं चिरं दद्याद्यस्मै कस्मै सदा नृपः ॥ ५९५ ॥**

करितां राजानें नेहमीं कोणतेंहि कार्य करण्यामध्यें समर्थ पाहूनच अधिकारी करावा, परंतु कोणाजवळहि दीर्घकालपर्यंत एकच अधिकार सोंपवूं नये ॥ ५९५ ॥

अधिकारमदं पीत्वा को न मुह्येत्पुनश्चिरम् ।
अतः कार्यक्षमं दृष्ट्वा कार्येऽन्यस्मिन्नियोजयेत् ॥ ५९६ ॥

कारण पुष्कळ काळपर्यंत एक अधिकाररूप मदिरेचें पान करून कोण मोह पावत नाहीं ? करितां कोणत्याहि अधिकाऱ्यास ठराविक वेळापर्यंत सोंपविलेल्या कार्यामध्यें समर्थ पाहून दुसऱ्या कार्यामध्यें जोडावा ॥ ५९६ ॥

तत्कार्ये कुशलं चान्यं तत्पदानुगतं खलु ।
नियोजयेद्वर्तने तु तदभावे तथाऽपरम् ॥ ५९७ ॥

व त्याच्या स्थानीं त्याच्या हाताखालच्या हुशार माणसास ठेवावा, परंतु तो जर तें काम संभाळण्यास योग्य नसेल, तर दुसऱ्या एखाद्या हुषार मनुष्यास ठेवावा ॥ ५९७ ॥

यथा यथा श्रेष्ठपदे ह्यधिकारी यदा भवेत् ।
अनुक्रमेण संयोज्यो ह्यन्ते तं प्रकृतिं नयेत् ॥ ५९८ ॥

या प्रमाणें जसजसा श्रेष्ठपदाचा अधिकारी होत जाईल, तसतसा त्यास वर चढवीत न्यावा व शेवट ज्यावेळीं योग्य वाटेल, त्यावेळीं त्यास प्रधानाची पदवी द्यावी ॥ ५९८ ॥

नाऽऽज्ञापयेल्लेखनेन विनाऽल्पं वा महन्नृपः ।
भ्रान्तेः पुरुषधर्मत्वाल्लेख्यं निर्णायकं परम् ॥ ५९९ ॥

पुनः लहान व मोठ्या कोणत्याहि कार्याकरितां लिहिल्यावांचून तोंडानें आज्ञा देऊं नये; कारण विस्मृति होणें हा पुरुषाचा धर्म आहे, ह्मणून लेखच परप्रमाणरूप आहे ॥ ५९९ ॥

दैनिकं मासिकं वृत्तं वार्षिकं बहुवार्षिकम् ।
तत्कार्यजातं लेख्यं तु राज्ञे सम्यङ् निवेदयेत् ॥ ६०० ॥

तसेंच भृत्यांनाहि आपापल्या कार्यासंबंधी दैनिक, मासिक, वार्षिक व बहुवार्षिक अशीं वृत्तांताचीं लेखी पत्रकें तयार करून राजास निवेदन करावीं ॥ ६०० ॥

पुनः प्रधानादिकांविषयीं पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

नरपतिहितकर्ता द्वेष्यतां याति लोके
जनपदहितकर्ता त्यज्यते पार्थिवेन्द्रैः ।
इति महति विरोधे वर्तमानेऽसमाने
नृपतिजनपदानां दुर्लभः कार्यकर्ता ॥ ६०१ ॥

केवळ राजाच्या हिताविषयीं तत्पर असणारा प्रधान प्रजेस अप्रिय होतो, व केवळ प्रजेचें हित साधणाऱ्या मंत्र्याचा राजा त्याग करतो; असा मोठा विचित्र विरोध असतां राजा व प्रजा या दोहोंचेंहि हित होईल अशा रीतीनें कार्य करणारा प्रधान दुर्लभ आहे ॥ ६०१ ॥

मन्त्रिणां भिन्नसंधाने भिषजां सान्निपातिके ।
कर्मणि व्यज्यते प्रज्ञा स्वस्थे को वा न पण्डितः ॥ ६०२ ॥

भेद पावलेलें कार्य सांधण्यामध्यें मंत्र्यांची व संनिपात रोगाच्या वेळीं वैद्यांची बुद्धि समजून येते, स्वस्थतेच्या वेळीं कोण पंडित असत नाहीं ? ॥ ६०२ ॥

नराधिपा नीचजनानुवर्तिनो, बुधोपदिष्टेन पथा न यान्ति ये ।
विशन्त्यतो दुर्गममार्गनिर्गमं, समस्तसंबाधमनर्थपञ्जरम् ॥ ६०३ ॥

जे नीच जनांस अनुसरणारे राजे, शहाण्या माणसांनीं उपदेश केलेल्या मार्गानें चालत नाहींत, ते दुःखानेंहि ज्यांतून निसटणें शक्य नाहीं अशा चाऱ्ही बाजूंनीं बंधन असलेल्या अनर्थरूप पिंजऱ्यामध्यें सांपडतात ॥ ६०३ ॥

एकं भूमिपतिः करोति सचिवं राज्ये प्रमाणं यदा
तं मोहाच्छ्रयते मदः स च मदाद्दास्येन निर्विद्यते ।
निर्विण्णस्य पदं करोति हृदये तस्य स्वतन्त्रस्पृहा
स्वातन्त्र्यस्पृहया ततः स नृपतेः प्राणेष्वभिद्रुह्यते ॥ ६०४ ॥

ज्यावेळीं राजा राज्यामध्यें एकट्या प्रधानासच प्रमाण समजतो, त्यावेळीं त्या प्रधानास मोहामुळें मद उत्पन्न होतो व मदामुळें दास्य आवडत नाहींसें होतें, त्यामुळें त्याच्या हृदयांत स्वतंत्र होण्याची इच्छा उत्पन्न होते, नंतर स्वातंत्र्याच्या इच्छेनें, तो राजाच्या प्राणांचा द्रोह करूं लागतो ॥ ६०४ ॥

**सन्मन्त्रिणां वर्धयते नृपाणां लक्ष्मीमहीधर्मयशस्समूहः ।**
**दुर्मन्त्रिणां नाशयते तथैव एवं पुरावृत्तविदो वदन्ति ॥ ६०५ ॥**

चांगल्या मंत्र्याच्या योगेंकरून राजांची लक्ष्मी, पृथ्वी, धर्म आणि यश उत्तम प्रकारें वृद्धि पावतात, व तींच दुष्ट मंत्र्याच्या योगेंकरून नाश पावतात, असें इतिहास जाणणारे सांगतात ॥ ६०५ ॥

**स किं सखा साधु न शास्ति योऽधिपं हितान्न यः संशृणुते स किं प्रभुः ।**
**सदाऽनुकूलेषु हि कुर्वते रतिं नृपेष्वमात्येषु च सर्वसंपदः ॥ ६०६ ॥**

जो राजास चांगला उपदेश न करील तो त्याचा मित्र कसला? आणि जो आप्तापासून उपदेश न ऐकेल तो राजा कसला ? कारण नेहमीं परस्पर राजे व प्रधान एक विचारानें चालणारे असतील तर त्यांचे ठिकाणीं सर्व प्रकारच्या संपत्ति प्रीति करतात ॥ ६०६ ॥

**नियुक्तहस्तार्पितराज्यभारास्तिष्ठन्ति ये सौधविहारसाराः ।**
**विडालवृन्दार्पितदुग्धपूराः स्वपन्ति ते मूढधियः क्षितीन्द्राः ॥६०७॥**

जे मूढ राजे प्रधानांच्या हातांत राज्यकारभार देऊन केवळ महालांमध्यें मौज करतात, ते दुधाचें भांडें मांजरांच्या स्वाधीन करून झोंपून राहतात असें समजावें ॥ ६०७ ॥

आतां राज्यामध्यें नेमलेला कोणताहि अधिकारी आपल्या अधिकाराच्या जोरावर प्रजेपैकीं कोणाजवळहि वेठ करणें किंवा प्रजेजवळून लांच खाणें वगैरे कोणत्याहि प्रकारचा जुलूम करतो असें ऐकण्यांत येईल, तर त्याचा राजानें तपास करावा व खरें असेल तर त्यास सक्त शिक्षा करून तशा जुलुमाच एकदम प्रतिबंध करावा; कारण राजानें प्रजेस आपलें कुटुंब समजून तीचें सर्व प्रकारें रक्षण करणें योग्य आहे, याविषयीं मनुस्मृतीच्या सातव्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**नगरे नगरे चैकं कुर्यात्सर्वार्थचिन्तकम् ।**
**उच्चैःस्थानं घोररूपं नक्षत्राणामिव ग्रहम् ॥ ६०८ ॥**

राजानें प्रत्येक शहरीं सर्व कार्यांची चवकशी ठेवण्याकरितां कुल व गुण यांनीं श्रेष्ठ, सैनिकांनीं भयंकर, आणि नक्षत्रांच्यामध्यें ग्रहाप्रमाणें तेजस्वी एक एक उच्च स्थान ठेवावें ॥ ६०८ ॥

**स तानुनुपरिक्रामेत्सर्वानेव सदा स्वयम् ।**
**तेषां वृत्तं परिणयेत्सम्यग्राष्ट्रेषु तच्चरैः ॥ ६०९ ॥**

राजानें निरंतर आपल्या ताब्यांतील गांवापासून तों शहरापर्यंत सर्वत्र फिरावें, व अधिकारिवर्गाची वागणूक प्रजेजवळ कशी होते तें गुपचूप जासुदांकडून जाणावें ॥ ६०९ ॥

**राज्ञो हि रक्षाधिकृताः परस्वादायिनः शठाः ।**
**भृत्या भवन्ति प्रायेण तेभ्यो रक्षेदिमाः प्रजाः ॥ ६१० ॥**

कारण राज्यामध्यें असलेले अधिकारी बहुत करून दुसऱ्याचें द्रव्य हरण करणारे व लबाड होऊन जातात, यासाठीं राजानें त्यांच्यापासून आपल्या प्रजेचें रक्षण अवश्य करावें ॥ ६१० ॥

**ये कार्यिकेभ्योऽर्थमेव गृह्णीयुः पापचेतसः ।**
**तेषां सर्वस्वमादाय राजा कुर्यात् प्रवासनम् ॥ ६११ ॥**

आणि जे पापबुद्धियुक्त अधिकारी कार्यासाठीं आलेल्या आपल्या प्रजेपासून लांच खातात, त्यांची सर्व जिंदगी जप्त करून त्यांस आपल्या देशांतून हांकलून घालवून लावावे ॥ ६११ ॥

तसेंच शुक्रनीतीच्या पहिल्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**ग्रामान् पुराणि देशांश्च स्वयं संवीक्ष्य वत्सरे ।**
**अधिकारिगणैः काश्च रञ्जिताः काश्च कर्षिताः ॥ ६१२ ॥**

राजानें स्वतः दरवर्षी गावांत शहरांत व देशांत फिरून अधिकाऱ्यांनीं कोणत्या प्रजेस खूष ठेविलें आहे, व कोणत्या प्रजेस पीडित केलें आहे ॥६१२॥

**प्रजास्ताः साधुवृत्तेन व्यवहारं विचिन्तयेत् ।**
**न भृत्यपक्षपाती स्यात्प्रजापक्षं समाश्रयेत् ॥ ६१३ ॥**

—त्याचा तपास करून यथार्थपणानें कार्याचा निश्चय करावा, आणि बहुतकरून अधिकाऱ्यास खुष न ठेवतां प्रजेसच खुष ठेवावी ॥ ६१३ ॥

**प्रजाशतेन संद्विष्टं संत्यजेदधिकारिणम् ।**
**अमात्यमपि संवीक्ष्य सकृदन्यायगामिनम् ॥ ६१४ ॥**

पुनः शेंकडो प्रजांनीं द्वेष केलेल्या अधिकाऱ्यास रजा द्यावी, आणि एकवार अन्याय करणारा आहे, असें समजण्यांत आल्यास–॥ ६१४ ॥

**एकान्ते दण्डयेत् स्पष्टमभ्यासापकृतं त्यजेत् ।**
**अन्यायवर्तिनां राज्ये सर्वस्वं च हरेन्नृपः ॥ ६१५ ॥**

त्यास एकांतीं दंड करावा, आणि जर वारंवार अन्याय करील, तर नंतर प्रसिद्ध रीतीनें दंड करावा, तसेंच राज्यामध्यें निरंतर अन्यायानें वर्तन करणारांचें सर्वस्व जप्त करावें ॥ ६१५ ॥

परंतु राजानें प्रथम आपली वर्तणूक चांगली ठेविली पाहिजे, कारण तो जर स्वतः न्यायानें वागत असेल, तरच त्याचे कारभारी व प्रजा त्याचें भय ठेवून न्यायानें वागतील. परंतु जर तो स्वतः अन्यायी असेल, तर त्याचे कारभारी व प्रजा दोन्ही अन्यायी होतील यांत आश्चर्य नाहीं. कारण श्रीमद्भगवद्गीतेमध्यें तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ।**
**स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥ ६१६ ॥**

श्रेष्ठ पुरुष जें जें आचरण करतो, तें तें साधारण लोकहि आचरण करतात, व तो ज्यास प्रमाण मानतो, त्यास इतर लोकहि प्रमाण मानितात ॥ ६१६ ॥

तसेंच शुक्रनीतीच्या चवथ्या अध्यायाच्या प्रथम प्रकरणांत सांगितलें आहे कीं,

**युगप्रवर्तको राजा धर्माधर्मप्रशिक्षणात् ।**
**युगानां न प्रजानां च दोषः किंतु नृपस्य हि ॥ ६१७ ॥**

प्रजेस धर्माधर्माचा विवेक शिकविल्यामुळें राजा चांगल्या नवीन युगाचा प्रवर्तक होतो, करितां दुष्ट समय होण्यामध्यें युगाचा व प्रजेचा दोष नाहीं, तर केवळ राजाचाच दोष आहे ॥ ६१७ ॥

**प्रसन्नो येन नृपतिस्तदाचरति वै जनः ।**
**लोभाद्भयाच्च किं तेन शिक्षितं नाचरेत्कथम् ॥ ६१८ ॥**

कारण जेणेंकरून राजा प्रसन्न होईल तेंच कर्म, लोभानें किंवा भयानें प्रजा आचरण करिते; तर त्यानें चांगल्या रीतीनें उपदेश केलेलें कोणतेंहि कर्म कसें न आचरण करील ? ॥ ६१८ ॥

कारण चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**राज्ञि धर्मिणि धर्मिष्ठाः पापे पापाः समे समाः ।**
**राजानमनुवर्तन्ते यथा राजा तथा प्रजाः ॥ ६१९ ॥**

राजा सदाचरणी असेल तर प्रजा सदाचरणसंपन्न होते, राजा पापी असेल तर प्रजा पाप करणारी होते, व राजा पापपुण्य दोहोंमध्यें समान असेल तर प्रजाहि तशीच होते; कारण प्रजा राजाचेंच अनुसरण करते, करितां जसा राजा असतो तशी प्रजा होते ॥ ६१९ ॥

पुनः सांगितलें आहे कीं,

**जनं सर्वजना नित्यं मन्यन्ते महदर्चितम् ।**
**महतावमतो यस्तु स सर्वैरवमन्यते ॥ ६२० ॥**

निरंतर मोठ्यांनीं मानलेल्या जनास सर्व लोक पूज्य मानतात, आणि ज्याचा मोठे तिरस्कार करतात, त्याचा सर्व लोक तिरस्कार करतात ॥ ६२० ॥

**एकस्य कर्म संवीक्ष्य प्रायोऽन्योऽपि करोति तत् ।**
**गतानुगतिको लोको न लोकः पारमार्थिकः ॥ ६२१ ॥**

बहुतकरून एकाचें कर्म पाहून दुसराहि तसेंच करतो; कारण लोक बहुधा गतानुगतिक आहे, विचार करणारा नाहीं ॥ ६२१ ॥

**इन्द्रियाणां जये योगं समातिष्ठेद्दिवानिशम् ।**
**जितेन्द्रियो हि शक्नोति वशे स्थापयितुं प्रजाः ॥ ६२२ ॥**

राजानें अहर्निश इंद्रियांस जिंकण्याचा यत्न करावा, कारण तो जितेंद्रिय असेल तरच प्रजेस वश ठेवण्यास समर्थ होतो ॥ ६२२ ॥

मृगयाऽक्षा दिवा स्वप्नः परीवादः स्त्रियो मदः ।
तौर्यत्रिकं वृथाऽट्या च कामजो दशको गणः ॥ ६२३ ॥

मृगया, जुगार, दिवसास निद्रा, परनिंदा, बहुत स्त्रिया करणें, मद्यपान, गायन, नृत्य व वादित्र आणि व्यर्थ भटकणें हीं सुखाच्या इच्छेपासून उत्पन्न होणारीं दहा— ॥ ६२३ ॥

पैशुन्यं साहसं द्रोह ईर्ष्याऽसूयाऽर्थदूषणम् ।
वाग्दण्डजं च पारुष्यं क्रोधजोऽपि गणोऽष्टकः ॥
व्यसनानि दुरन्तानि प्रयत्नेन विवर्जयेत् ॥ ६२४ ॥

आणि चहाडी, साहस, कपटानें मारणें, मत्सर, मिथ्या आरोप ठेवणें, परधन हरण करणें किंवा मागणारास न देणें, शिव्या देणें आणि मारण्यास धांवणें हीं क्रोधापासून उत्पन्न होणारीं आठ, मिळून परिणामीं दुःखरूप अशीं अठरा व्यसनें राजानें प्रयत्नानें वर्ज करावीं ॥ ६२४ ॥

पुनः शुक्रनीतीच्या पहिल्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

व्याघ्रादिभिर्वनचरैर्मयूराद्यैश्च पक्षिभिः ।
क्रीडयेन्मृगयां कुर्याद्दुष्टसत्त्वान्निपातयन् ॥ ६२५ ॥

राजानें पिंजऱ्यामध्यें ठेवून पाळलेले वनचर—व्याघ्रादि पशु व मयूरादि पक्षी यांच्याशीं क्रीडा करावी, आणि जंगलांतील सिंह, व्याघ्र वगैरे क्रूर जनावरांची नाशरूप मृगया करावी ॥ ६२५ ॥

शौर्यं प्रवर्धते नित्यं लक्ष्यसंधानसाधनम् ।
अकातरत्वं शस्त्रास्त्रशीघ्रपातनकारिता ॥ ६२६ ॥

कारण मृगयेमुळें नित्य शौर्य, निशाण साधण्यामध्यें कौशल्य, निर्भयता आणि शस्त्रास्त्र जलद सोडण्याचा अभ्यास वाढतो ॥ ६२६ ॥

पुनः याच ग्रंथाच्या याच अध्यायांत सांगितलें आहे कीं,

सर्वस्मादधिको दाता शूरस्त्वमसि धार्मिकः ।
इति वाचं न शृणुयाच्छ्रावका वञ्चकास्तु ते ॥ ६२७ ॥

राजानें "आपण सर्वांहून श्रेष्ठ, दाते, शूरवीर व धार्मिक आहां" अशीं वचनें ऐकूं नयेत, कारण तसें ऐकविणारे लोक ठक असतात ॥ ६२७ ॥

**आत्मानं प्रथमं राजा विनयेनोपपादयेत् ।**
**ततः पुत्रांस्ततोऽमात्यांस्ततो भृत्यांस्ततः प्रजाम् ॥ ६२८ ॥**

पुनः राजानें स्वतः विवेकी व्हावें आणि नंतर पुत्र, प्रधान, नोकर व प्रजा यांस क्रमाक्रमानें विवेकी करावें ॥ ६२८ ॥

**यौवनं जीवितं चित्तं छाया लक्ष्मीश्च स्वामिता ।**
**चंचलानि षडेतानि ज्ञात्वा धर्मरतो भवेत् ॥ ६२९ ॥**

आणि यौवन, जीवित, चित्त, छाया, लक्ष्मी व प्रभुत्व हे सहा पदार्थ अस्थिर जाणून सदाचरणी व्हावें ॥ ६२९ ॥

**सुजनैः संगतं कुर्याद्धर्माय च सुखाय च ।**
**सेव्यमानस्तु सुजनैर्महानतिविराजते ॥ ६३० ॥**

आणि धर्म व सुख यांच्या प्राप्तीसाठीं सज्जनांची संगति करावी, कारण सज्जनांनीं सेविलेला राजा अतिशय शोभतो ॥ ६३० ॥

**नित्यं मनोऽपहारिण्या वाचा प्रल्हादयेज्जगत् ।**
**उद्वेजयति भूतानि क्रूरवाग् धनदोऽपि सन् ॥ ६३१ ॥**

पुनः निरंतर मनोहर वाणीनें प्रजेस संतुष्ट ठेवावें, कारण धन देणारा असूनहि जर कठोर बोलणारा असेल, तर प्राण्यास उद्वेग उत्पन्न करतो ॥ ६३१ ॥

याप्रमाणें स्वतः न्यायानें वागून आपल्या सर्व नोकरांसहि त्याप्रमाणें वागण्यास लावावें, त्याचा दृष्टांत घेऊन प्रजा न्यायानें वागेल. परंतु जसें एका कुटुंबाच्या वडीलास त्याच्या कुटुंबांतील सर्वांस नियमानें वागविण्यासाठीं कडक रहावें लागतें, तसें राजानेंहि अनेक कुटुंबें मिळून झालेल्या एका प्रजारूप महाकुटुंबास नियमामध्यें ठेवण्याकरितां स्वतःस कडक ठेविलें पाहिजे. करितां त्यानें आपली राजधानी उत्तम प्रकारची आणि महाल व राजसभा सुशोभित करावी, चांगल्याबरोबर फिरावें, अंगरक्षक ( बॉडीगार्ड ) ठेवावा. भावांस वृत्ति नेमून द्यावी, आपण व प्रजेनें निवडून काढिलेल्या

अधिकाऱ्यांची राजसभा करून तीमध्यें बहुमतें काम करावें, आणि व्यर्थ वेळ घालवूं नये. शुक्रनीतीच्या पहिल्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

नानावृक्षलताकीर्णे पशुपक्षिगणावृते ।
सुबहूदकधान्ये च तृणकाष्ठसुखे सदा ॥ ६३२ ॥

राजानें नानाप्रकारचे वृक्ष व लतायुक्त, पशुपक्षिगणांनीं वेष्टित, पुष्कळ पाणी व धान्य यांनीं संपन्न, नेहमीं गवत, चारा व जळाऊ लांकडें ज्यामध्यें मिळूं शकतील अशा,—॥ ६३२ ॥

सुरम्यसमभूदेशे नातिदूरमहीधरे ।
अर्धचन्द्रां वर्तुलां वा चतुरस्रां सुशोभनाम् ॥ ६३३ ॥

आणि किंचित् दूर आहे पर्वत ज्याच्या, अशा सपाट भूमीच्या मनोहर प्रदेशांत सुशोभित, अर्धचंद्राकार, वर्तुल किंवा चतुष्कोणी,—॥ ६३३ ॥

चतुर्दिक्षु चतुर्द्वारां सुमार्गारामवीथिकाम् ।
सप्राकारां सपरिखां राजधानीं प्रकल्पयेत् ॥ ६३४ ॥

चार दिशांस चार दरवाजे असलेली, उत्तम प्रकारचे मार्ग व उपवनांच्या श्रेणी यांनीं युक्त व खातासहित असलेल्या किल्ल्यानें युक्त राजधानी करावी ॥ ६३४ ॥

राजगृहं सभामध्यं गवाश्वगजशालिकम् ।
प्रशस्तवापीकूपादिजलयन्त्रैः सुशोभितम् ॥ ६३५ ॥

तीमध्यें मध्यभागीं सभायुक्त, आपले खासगी बैल, गाई, घोडे व हत्ती यांस बांधण्याच्या वेगवेगळ्या शालांनीं युक्त, सुंदर विहिरी, हौद इत्यादिकांच्या जलसंबंधी यंत्रांनीं सुशोभित—॥ ६३५ ॥

शस्त्रास्त्रधारिसंयुक्तप्राकारं सुष्ठुयन्त्रकम् ।
दिवारात्रौ सशस्त्रास्त्रैः प्रतिकक्षासुगोपितम् ॥ ६३६ ॥

शस्त्रास्त्र धारण करणारे पहारेकरी ज्यामध्यें फिरत आहेत अशा किल्ल्यानें युक्त, नानाप्रकारचीं कार्यें तयार करण्याच्या सुंदर यंत्रांनीं युक्त

आणि शस्त्रास्त्रयुक्त चौकीदारांनीं दिवसरात्रीच्या प्रत्येक विभागांमध्यें आळीपाळीनें रक्षण केलेलें राजगृह करावें ॥ ६३६ ॥

राज्ञा राजसभा कार्या सुगुप्ता सुमनोरमा ।
जलोर्ध्वपातियन्त्रैश्च युता सुस्वरयन्त्रकैः ॥ ६३७ ॥

आणि राज्याचें काम तपासण्यासाठीं राजगृहाच्या बाहेर उत्तम प्रकारें रक्षण केलेली, अत्यंत मनोहर, पाणी उडविण्याचे फवारे, कारंजीं व मधुर स्वरयुक्त यंत्रें यांनीं सुशोभित,—॥ ६३७ ॥

वातप्रेरकयन्त्रैश्च यन्त्रैः कालप्रबोधकैः ।
प्रतिष्ठिता च स्वादर्शैस्तथा च प्रतिरूपकैः ॥ ६३८ ॥

वायुसंचारक व समयदर्शक यंत्रांनीं युक्त, सुंदर आरसे व छायाचित्रें यांनीं भूषित, अशी राजसभा करावी ॥ ६३८ ॥

तथाविधामात्यलेख्यसभ्याधिकृतशालिकाः ।
कर्तव्याश्च पृथक्त्वेतास्तदर्थाश्च पृथक् पृथक् ॥ ६३९ ॥

त्याचप्रमाणें प्रधान, दफ्तरी, सभासद व इतर अधिकारी यांच्या, तींतीं आपापलीं कामें करण्याकरितां वेगवेगळ्या कचेऱ्या कराव्या ॥ ६३९ ॥

ततः परं चतुर्दिक्षु प्रजानां निलयानि च ।
सेनाधिपाः पदातीनां गणः सादिगणस्ततः ॥ ६४० ॥

त्यानंतर चारही दिशांस प्रजांचीं घरें करावीं, नंतर सेनापति, पायदळ, घोडेस्वार,—॥ ६४० ॥

बृहन्नालिकयन्त्राणि गजपालगणस्ततः ।
क्रमादेषां गृहाणि स्युः शोभनानि पुरे सदा ॥ ६४१ ॥

तोफखाना आणि हस्तिदळ यांचीं अनुक्रमें पुरामध्यें नेहमीं सुंदर घरें बांधावीं ॥ ६४१ ॥

राजमार्गमुखानि स्युर्गृहाणि सकलान्यपि ।
गृहपृष्ठे सदा वीथीं मलनिर्हरणस्थलम् ॥ ६४२ ॥

परंतु त्या सर्व गृहांचीं मुखें राजमार्गाकडे ठेवावीं आणि प्रत्येक घराच्या मागें नेहमीं मल घेऊन जाण्यासाठीं गल्ली ठेवावी ॥ ६४२ ॥

**राजमार्गास्तु कर्तव्याश्चतुर्दिक्षु नृपगृहात् ।**
**पण्यमार्गास्तथा चैव पुरग्रामादिषु स्थिताः ॥ ६४३ ॥**

आणि पुरामध्यें किंवा गांवामध्यें राजगृहापासून चारहि दिशांस राजमार्ग व बाजाराचे मार्ग करावे ॥ ६४३ ॥

**मार्गान्सुधाशर्करैर्वा घटितान्प्रतिवत्सरम् ।**
**एवं हि पत्तनं कुर्याद् ग्रामं चैव नराधिपः ॥ ६४४ ॥**

व ते मार्ग दरवर्षीं दगडी चूर व रेती पसरून सारखे करावे. याप्रमाणें राजानें नगर व गांव रचावे ॥ ६४४ ॥

**पुरेषु बान्धवैर्मित्रैः स्वसाम्यप्रापितैर्गुणैः ।**
**प्रकृतिभिर्नृपो गच्छेन्न नीचैस्तु कदाचन ॥ ६४५ ॥**

पुनः त्यानें आपल्यासारखे गुणी आपले बांधव, मित्र व प्रधान यांचे बरोबर शहरांत फिरावें, परंतु कधींच नीचांबरोबर फिरूं नये ॥ ६४५ ॥

**पृष्ठाग्रगान् क्रूरवेषान्नतिनीतिविशारदान् ।**
**सिद्धास्त्रनग्नशस्त्रांश्च भट्टानारान्नियोजयेत् ॥ ६४६ ॥**

फिरावयास निघतेसमयीं आपल्याजवळ पुढें व मागें भयंकर वेष धारण केलेले, नम्रता व नीति यामध्यें चतुर, हत्यारें वापरण्यास जाणणारे, नागव्या तरवारी घेतलेले शूर वीर ठेवावे ॥ ६४६ ॥

**दायादानामैकमत्यं राज्ञः श्रेयस्करं परम् ।**
**अतः स्वभोगसदृशान् दायादान् कारयेन्नृपः ॥ ६४७ ॥**

पुनः आपल्या बांधवांचें ऐकमत्य असणें राजास अत्यंत श्रेयस्कर आहे, करितां त्यानें राज्याचे विभाग केल्यावांचून त्यांस स्वतःसारखे भोग भोगणारे करावे ॥ ६४७ ॥

**राज्यविभजनाच्छ्रेयो न भूतानां भवेत् खलु ।**
**अल्पीकृतं विभागेन राज्यं शत्रुर्जिघृक्षति ॥ ६४८ ॥**

कारण राज्याचे भाग पाडिल्यानें राजाचें खरोखर कल्याण होत नाहीं. कारण विभागांनीं अल्प केलेल्या राज्यास शत्रू जिंकून ग्रहण करण्याची इच्छा करतात ॥ ६४८ ॥

**सुहृद्भिर्भ्रातृभिः सार्धं सभायां पुत्रबान्धवैः ।**
**राजकृत्यं सेनपैश्च सभ्याद्यैश्चिन्तयेत्सदा ॥ ६४९ ॥**

पुनः राजानें नित्य सभेमध्यें मित्र, बंधु, पुत्र, संबंधी, सेनापति आणि सभासद यांसह कार्यांचा विचार करावा ॥ ६४९ ॥

**पृथक् पृथङ् मतं तेषां लेखयित्वा ससाधनम् ।**
**विमृशेत्स्वमतेनैव यत्कुर्याद्बहुसम्मतम् ॥ ६५० ॥**

व त्या प्रत्येकाचें युक्तिसह वेगवेगळें मत लिहवून आपल्या मतें विचार करावा, आणि जें बहुसंमत असेल तें करावें ॥ ६५० ॥

**नयेत् कालं वृथा नैव सदा स्त्रीमद्यसेवनैः ।**
**यत्काले ह्युचितं कर्तुं तत्कार्यं द्रागशङ्कितम् ॥ ६५१ ॥**

परंतु नेहमीं स्त्रीसेवन व मद्यपान यांहींकरून व्यर्थ कालक्षेप करूं नये; व जें कार्य ज्यावेळीं करणें योग्य असेल त्यावेळीं तें निःशंकपणें त्वरित करावें ॥ ६५१ ॥

पुनः राजानें आपल्या आसपासच्या व दूरच्या राजांशीं आपल्या व त्यांच्या प्रजेमध्यें परस्पर व्यापार वाढेल त्या रीतीची आपल्या वकीलाकडून समजूत करावी, आणि त्यांची निष्ठा आपल्या राज्यखात्याविषयीं कशी आहे त्याचा पूर्ण तपास ठेवावा. ते जर आपल्याहून बलवान् असतील तर त्यांच्याशीं विग्रह करूं नये, तर नेहमीं स्नेह ठेवावा. आणि त्यांच्याजवळ जर कला, कौशल्य अधिक असेल तर ग्रहण करून स्वतःहि बलवान् व्हावें. कदाचित् कांहीं निमित्त काढून आपल्याहून बलवान् शत्रु चढाई करून येईल तर त्यावेळीं नम्र होऊन आपला बचाव करून घ्यावा. कारण समयाप्रमाणें वागण्यामध्यें फायदा आहे. तसेंच एखादे वेळीं आपणास एखाद्या राजावर कोणत्याहि जरूरीच्या कारणास्तव चढाई करून जावें लागेल, तर प्रथम आपली चालू

स्थिति तपासून आपल्या ठिकाणीं पूर्णता भासेल व तो राजा समजुतीवर न येईल तर चढाई करावी; आणि जिंकल्यानंतर त्याचा मुलूख जोडून घेऊं नये, तर त्यास आपला तावेदार राजा करावा. मनुस्मृतीच्या सातव्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**मध्यमस्य प्रचारं च विजिगीषोश्च चेष्टितम् ।**
**उदासीनप्रचारं च शत्रोश्चैव प्रयत्नतः ॥ ६५२ ॥**

राजानें दुसऱ्या मध्यम सत्तेच्या, मुलूख जिंकण्याची इच्छा करणाऱ्या, कोणाचीहि पर्वा न ठेवणाऱ्या आणि शत्रुता करणाऱ्या राजाची हालचाल प्रयत्नानें पाहत रहावें ॥ ६५२ ॥

**तान्सर्वानभिसंदध्यात्सामादिभिरुपक्रमैः ।**
**व्यस्तैश्चैव समस्तैश्च पौरुषेण नयेन च ॥ ६५३ ॥**

व त्या सर्वांस साम, दान भेद आणि दंड यांपैकीं एकेका उपायानें किंवा त्या समस्त उपायांनीं, किंवा केवळ साम व दंडानें वश ठेवावे ॥ ६५३ ॥

**सर्वेषां तु विदित्वैषां समासेन चिकीर्षितम् ।**
**स्थापयेत्तत्र तद्वश्यं कुर्याच्च स समक्रियाम् ॥ ६५४ ॥**

आणि जिंकलेल्या सर्व प्रजेचा अभिप्राय संक्षेपानें जाणून त्या देशामध्यें तेथल्याच राजवंशीयास गादीवर बसवावा व त्यानें आपणास राजगादी देणाराच्या ताब्यांत राहून न्यायानें राज्य चालवावें ॥ ६५४ ॥

तसेंच शुक्रनीतीच्या पहिल्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**जितानां विषये स्थाप्यं धर्माधिकरणं सदा ।**
**भृतिं दद्यान्निर्जितानां तच्चरित्रानुरूपतः ॥ ६५५ ॥**

जिंकून ताब्यांत घेतलेल्या राजाच्या देशामध्यें त्याच्या वर्तणुकीची देखरेख ठेवण्यासाठीं नेहमीं छावणीसहित मंत्री ठेवावे; व कांहीं मोठ्या अपराधास्तव ज्याचा देश आपल्या राज्याशीं जोडून घेतला असेल तर तशा राजास त्याच्या योग्यतेप्रमाणें ठराविक वेतन बांधून द्यावें ॥ ६५५ ॥

**पितृपैतामहं स्थानं यो यस्यात्र जिगीषते ।**
**स तस्य सहजः शत्रुरुच्छेद्योऽपि प्रिये स्थितः ॥ ६५६ ॥**

जो ज्याच्या बापदादानें मिळविलेल्या स्थानास जिंकण्याची इच्छा करील तो त्याचा सहज शत्रु आहे, करितां तो त्याचें प्रिय करीत असला तरीहि त्यानें मारण्यास योग्य आहे ॥ ६५६ ॥

**सामादिदण्डपर्यन्तो नयः प्रोक्तः स्वयंभुवा ।**
**तेषां दण्डस्तु पापीयांस्तं पश्चाद्विनियोजयेत् ॥ ६५७ ॥**

प्रजापतीनें सामापासून दंडापर्यंत नीति सांगितली आहे, त्यामध्यें दंडनीति पापिष्ठ आहे, करितां तीची शेवटीं योजना करावी ॥ ६५७ ॥

**उत्तिष्ठमानस्तु परो नोपेक्ष्यः पथ्यमिच्छता ।**
**समौ हि शिष्टैराम्नातौ वर्त्स्यन्तावामयः स च ॥ ६५८ ॥**

आपलें हित इच्छिणाऱ्या राजानें उत्पन्न होत असलेल्या शत्रूची उपेक्षा करूं नये, कारण शिष्ट पुरुषांनीं भविष्यत् कालीं वाढणारे रोग व शत्रू समानच सांगितले आहेत ॥ ६५८ ॥

**मित्रोऽमात्यसुहृद्वर्गा यदा स्युर्दृढभक्तयः ।**
**शत्रूणां विपरीताश्च कर्तव्यो विग्रहस्तदा ॥ ६५९ ॥**

ज्यावेळीं आपले मित्र, अमात्य व सुहृद्वर्ग आपल्या ठिकाणीं दृढ भक्ति करणारे असतील व शत्रूस त्याहून विपरीत ह्मणजे विरुद्ध असतील त्यावेळीं युद्ध करावें ॥ ६५९ ॥

पुनः आपत्कालीं राजानें आपलें काम काढून घेण्याविषयीं श्रीमहाभारतांतर्गत शांतिपर्वाच्या आपद्धर्मांत सांगितलें आहे कीं,

**वहेदमित्रं स्कन्धेन यावत्कालविपर्ययः ।**
**स्वानुकूले तु तत्प्राप्ते भिन्द्याद्घटमिवाश्मनि ॥ ६६० ॥**

वेळ प्रतिकूल असेतोंपर्यंत शत्रूस खांद्यावर बसवून फिरवावा, परंतु ज्यावेळीं आपला अनुकूल वेळ येईल त्यावेळीं दगडावर मातीच्या घड्याप्रमाणें खालीं आपटून फोडावा ॥ ६६० ॥

पुनः पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**अनुलोमेन बलिनं प्रतिलोमेन दुर्बलम् ।**
**आत्मतुल्यबलं शत्रुं विनयेन बलेन वा ॥ ६६१ ॥**

राजानें आपल्याहून बलवान् शत्रूस अनुकूलतेनें, दुर्बल शत्रूस प्रतिकूलतेनें च आपल्यासारख्या बलवान् शत्रूस विनयानें व बलानें वश करावा ॥ ६६१ ॥

**कौर्मं संकोचमास्थाय प्रहारानपि मर्शयेत् ।**
**काले काले च मतिमानुत्तिष्ठेत्कृष्णसर्पवत् ॥ ६६२ ॥**

बुद्धिमान् राजानें वेळेस अनुसरून कांसवाप्रमाणें संकोच पावून शत्रूचे प्रहार सहन करावे, परंतु वेळ आल्यानंतर कृष्ण सर्पाप्रमाणें फुसकारे मारून उभें राहावें ॥ ६६२ ॥

**संधिः कार्योऽप्यनार्येण विज्ञाय प्राणसंशयम् ।**
**प्राणैः संरक्षितैः सर्वं यतो भवति रक्षितम् ॥ ६६३ ॥**

प्राण राहण्याविषयीं शंका वाटत असल्यास अनार्याशींहि संधि करावा, कारण प्राणांचें रक्षण केल्यामुळें सर्व रक्षित होतें ॥ ६६३ ॥

**सुमन्त्रितं सुविक्रान्तं सुयुद्धं सुपलायितम् ।**
**कार्यकाले यथाशक्ति कुर्यान्नतु विचारयेत् ॥ ६६४ ॥**

राजानें चांगल्या रीतीनें मसलत करणें, पराक्रम करणें, युद्ध करणें किंवा पलायन करणें यांपैकीं ज्या प्रसंगीं जें योग्य वाटेल तें यथाशक्ति करावें, त्यांत विचार करीत राहूं नये ॥ ६६४ ॥

पुनः चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**त्यजेदेकं कुलस्यार्थे ग्रामस्यार्थे कुलं त्यजेत् ।**
**ग्रामं जनपदस्यार्थे आत्मार्थे पृथिवीं त्यजेत् ॥ ६६५ ॥**

कुटुंबाचा बचाव होण्यासाठीं एका मनुष्याचा, गांवाच्या बचावासाठीं एका कुलाचा, देशाच्या बचावासाठीं एका गांवाचा आणि आपल्या बचावासाठीं जरूर पडल्यास पृथ्वीचा त्याग करावा ॥ ६६५ ॥

पुनर्वित्तं पुनर्मित्रं पुनर्भार्या पुनर्मही ।
एतत्सर्वं पुनर्लभ्यं न शरीरं पुनः पुनः ॥ ६६६ ॥

कारण धन, मित्र, भार्या व पृथ्वी हीं सर्व पुनः मिळूं शकतात, परंतु शरीर वारंवार मिळत नाहीं ॥ ६६६ ॥

परंतु ज्यावेळीं एखाद्याशीं युद्ध करावें लागतें, त्यावेळीं देशामध्यें, निरनिराळ्या ठिकाणीं पसरून गेलेलें सैन्य जलद एकत्र करण्याची, त्यास त्वरेनें युद्धांत पाठविण्याची, युद्धाच्या जागेवर आपल्या देशांतील तमाम लष्करी स्थानिक खात्यानें लगेच समाचार पाठविण्याची व तेथून मागविण्याची, तसेंच लष्कराकरितां खोराकी, पोशाकी व लढण्यासाठीं लढाईची सामग्री जलद एकत्र करून त्यास पोंचविण्याची वगैरे अतिशयच जरूर पडते. अशा वेळीं जलद लावलेजाव करणारीं, त्वरित संदेश पोंचविणारीं, आणि विगतवार समाचार घेऊन जाणारीं साधनें अतिशय उपयोगी होतात. करितां राजानें आपल्या देशामध्यें अग्नीनें किंवा विद्युत्शक्तीनें जलद चालणारे रथ आणि समुद्रामध्यें नौका, त्वरित संदेश पोंचविणारीं विद्युद्यंत्रें, विगतवार समाचार घेऊन जाणारीं टपालरूप साधनें दाखल करावीं. तीं प्रजेस उत्तेजन देऊन तीच्याकडून एका जातीच्या धंद्याच्या रीतीनें दाखल करवावीं किंवा स्वतः त्या प्रत्येकाचीं वेगवेगळीं खातीं उभारावीं, व त्याच्यासाठीं जें खर्च करण्यास द्रव्य पाहिजे, तें राज्याची जामिनगिरी देवून प्रजेजवळून व्याजानें राजी-खुषीनें काढावें. अर्थात् जो खुषीनें नाणें ठेवण्यास इच्छील त्याचेजवळून घ्यावें. त्याचें चढलेलें व्याज दर सहामाहीनें देत जावें, त्यामुळें प्रजेमध्यें विश्वास वाढतो व पुनः काम पडलें असतां जितकें नाणें पाहिजे तितकें ते खुषीनें देतात. याप्रमाणें प्रजेजवळून नाणें काढवून स्थापिलेल्या त्या तिन्ही खात्यांची व्यवस्था वेगवेगळी ठेवावी. प्रत्येक खात्यांत जी ठेव अडविलेली असेल, तीचें व्याज देऊन मुदलांतून प्रतिवर्षी थोडें देणें फिटेल, व त्या खात्याचा चालू व मरामतीकरतांचा खर्च निघेल त्या रीतीनें, त्या खात्यामध्यें स्वतः शिकलेला जो कोणी ज्याप्रकारचा जितका उपयोग करील त्याचेजवळून

त्या प्रकारचा तितका पैसा ध्यावा. त्यामुळें कोणास त्या खात्याचा उपयोग जड जाणार नाहीं. हीं तीन्ही खातीं जशीं राजास लढाईच्या वेळीं अत्युपयोगी आहेत, तशींच आपल्या देशामध्यें प्रजेस आपसांत सोईनें व्यवस्था करण्यामध्यें, व्यापार वाढविण्यामध्यें, दुष्काळाच्या वेळीं प्रजेस उपासमारीपासून बचावण्यामध्यें, समाधानी राखण्यामध्यें आणि त्यामुळें देशास समृद्ध करण्यामध्यें अतिशय उपयोगी आहेत. करितां तीं राजानें आपल्या देशामध्यें अवश्य चालू करण्यास योग्य आहेत. या रीतीनें सांगितल्याप्रमाणें आपल्या प्रजेचें सर्व प्रकारें रक्षण करण्यास राजा बांधला गेला आहे, कारण प्रजा हें त्याचें महाकुटुंब व राजा स्वतः त्याचा वडील आहे, तरी त्यानें कुटुंबाचें वडिलांप्रमाणें आपल्या प्रजेचें सर्व प्रकारें रक्षण केलें पाहिजे. मनुस्मृतीच्या सातव्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**एवं सर्वं विधायेदमितिकर्तव्यमात्मनः ।**
**युक्तश्चैवाप्रमत्तश्च परिरक्षेदिमाः प्रजाः ॥ ६६७ ॥**

याप्रमाणें राजानें आपलें जें कांहीं कर्तव्य असेल तें सर्व करून उद्योगी व सावधान राहून आपल्या प्रजेचें रक्षण करावें ॥ ६६७ ॥

**क्षत्रियस्य परो धर्मः प्रजानां परिपालनम् ।**
**निर्दिष्टफलभोक्ता हि राजा धर्मेण युज्यते ॥ ६६८ ॥**

कारण प्रजेचें पालन करणें हाच क्षत्रियाचा परम धर्म आहे, आणि अशा धर्मानेंच राजा सांगितलेलें करादि फल भोगण्यास योग्य होतो ॥ ६६८ ॥

**विक्रोशन्त्यो यस्य राष्ट्राध्द्रियन्ते दस्युभिः प्रजाः ।**
**संपश्यतः सभृत्यस्य मृतः स न तु जीवति ॥ ६६९ ॥**

आणि चाकरांसह जो राजा पाहत असतां प्रजा चोरांकडून लुटिली जाईल व ओरडत राहील, तो राजा जीवंतपणींच मृत समजावा ॥ ६६९ ॥

**उत्खातान्प्रतिरोपयन्कुसुमितांश्चिन्वंल्लघून्वर्धयन्**
**अत्युच्चान्नमयन्नतान्समुदयन्विश्लेषयन्संहतान् ।**

क्रूरान्कण्टकिनो बहिर्निरसयन्म्लानान्पुनः सेचयन्
मालाकार इव प्रपंचचतुरो राजा चिरं नन्दति ॥ ६७० ॥

उखडून गेलेल्यांस (माळी वृक्षांस व राजा प्रजाजनांस) पुनः लावणाऱ्या, पुष्पित झालेल्यांपासून फुलें घेणारा, लहान असलेल्यांस वाढविणारा, अतिशय वाढलेल्यांस वांकविणारा, वांकलेल्यांस सारखे करणारा, एकत्र मिळालेल्यांस वेगळे करणारा, क्रूर व कंटक युक्त असतील त्यांस बाहेर काढणारा, आणि म्लान झालेल्यांस पुनः सिंचन करणारा, या प्रकारच्या माळ्याप्रमाणें प्रपंचामध्यें चतुर असलेला राजा बहुकालपर्यंत सुख भोगतो ॥ ६७० ॥

याप्रमाणें राजास वागण्यास सांगितलें आहे. त्याशिवाय त्याच्या वर्तमान समयीं जर त्याच्या स्वतःच्या प्रजेहून दुसऱ्या राज्यांतील प्रजा कलाकौशल्यामध्यें अधिक सुधारलेल्या व बलवान् दिसतील, तर त्या त्या प्रजेमध्यें जो कांहीं विशेष गुण असेल, तो आपल्या प्रजेमध्यें पाठशालाद्वारा दाखल करवून तीस त्यांच्यासारखी सुधारलेली व बलवान् करावी. त्यामुळें ती दुसऱ्याकडून पराभव पावूं शकणार नाहीं. पुनः आपल्या राज्य करण्याच्या पद्धतीहून जर दुसऱ्या राज्याची पद्धति चांगली असेल, तर त्यानें ती आपल्या राज्यामध्यें दाखल करावी, व येनकेन प्रकारेण प्रजेचें व आपलें ऐक्य वाढेल अशा रीतीनें राज्य चालवावें. अर्थात् राज्याच्या एकंदर खात्यांमध्यें त्यानें सुधारलेल्या राज्यांची राज्यपद्धति दाखल करून आपल्या प्रजेचें प्रेम संपादन करून राज्यास अशा रीतीनें दृढ करावें कीं, तें आपल्याहून बलवान् शत्रूंकडूनहि जिंकलें जाणार नाहीं. याप्रमाणें राज्य चालविणारा राजा प्रजेचा पिता ह्मटला जातो. त्याच्याजवळ प्रजेनें आपल्या वडिलाप्रमाणें भाव ठेवावा, व त्यानें बांधिलेल्या नियमांचें उल्लंघन कधींहि करूं नये. कारण प्रजेच्या अनुकूलतेनेंच राजाचें राज्य सुदृढ होतें, व राजानें बांधलेल्या नियमांनीं प्रजा सुरक्षित राहते. आणि त्या नियमांस अनुसरून चालल्यानें राज्याच्या बाजूनें नेहमीं कुशल राहतें. तसेंच जनसमुदायामध्येंहि नेहमीं कुशल राहण्याविषयीं कधीं गाफिल राहूं नये. जसें राज्याच्या बाजूनें कुशल राहण्यामध्यें राजनिय-

मांस अनुसरून चालावें लागतें, तसें लोकांकडून कुशल राहण्यांत व्यावहारिक नीतिरीतीनें वागावें लागतें. प्रथम लोकांमध्यें जाण्यायेण्याच्या वेळीं स्वच्छता वगैरे ठेवण्याविषयीं शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**नीचरोमनखश्मश्रुः सुवेषोऽनुल्बणोज्ज्वलः ।**
**सातपत्रपदत्राणो विचरेद्युगमात्रदृक् ॥ ६७१ ॥**

लोम, नखें व दाढीमिशांचीं टोकें कातरवून वारीक करून, उज्ज्वल होऊन, स्वच्छ वस्त्रें धारण करून, हातांत छत्री घेऊन, पायांत जोडा घालून, आणि उद्धटपणा सोडून पुढें चार हातपर्यंत दृष्टि ठेऊन, जेथें जाणें असेल तेथें जावें ॥ ६७१ ॥

कारण स्वच्छ होऊन स्वच्छ वस्त्रें धारण केलेला मनुष्य लोकांमध्यें जेथें जाईल तेथें सन्मान पावतो. कदाचित् एखाद्या अनोळख्याचे घरीं गेला असेल तरीहि त्यास त्या घराचा धनी एकाएकीं तिरस्कार करूं शकत नाहीं, तर त्यास सन्मानपूर्वक येण्याचें कारण विचारतो. परंतु तोच माणूस जर घाणेरडीं व मलिन वस्त्रें धारण केलेला असेल, तर त्यास प्रथम कोणी घरांत प्रवेशच करूं देत नाहीं. पुनः बरोबर छत्री असेल तर तीनें सूर्याचे किरण, उडणारी धूळ, वारा आणि पाऊस यांपासून आणि पशु वगैरे जनावरांपासून आपल्या-शरीराचें रक्षण करतां येतें. आणि आपल्यापासून चार हातांच्या अंतरावर खालीं दृष्टि करून चालल्यानें ठेंच लागण्याची, खड्ड्यांत पाय पडून तो मुरगळण्याची किंवा पडून जाण्याची, सर्प वगैरे विषारी प्राणी पायांस अडकून दंश करण्याची आणि निरपराधी जंतू पायांखालीं चिरडून गेल्यामुळें विनाकारण त्यांची हिंसा होण्याची भीति राहत नाहीं. चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**दृष्टिपूतं न्यसेत्पादं वस्त्रपूतं पिबेज्जलम् ।**
**शास्त्रपूतं वदेद्वाक्यं मनःपूतं समाचरेत् ॥ ६७२ ॥**

दृष्टीनें पाहून पाऊल टाकावें, वस्त्रानें गाळून पाणी प्यावें, शास्त्रास अनुसरून वाक्य बोलावें आणि मनानें विचार करून निर्दोष असेल तेंच आचरण करावें ॥ ६७२ ॥

परंतु जेथें पुढें मागें किंवा बाजूनें कोणत्याहि प्रकारचें शरीरास भय वाटत असल्यास, तेथें एकाच रीतीनें नजर ठेवून चालण्याच्या ऐवजीं चारहि बाजूंस नजर ठेवून चालावें. आतां "कोणतीहि वस्तु स्थिर नाहीं," या सृष्टिनियमाप्रमाणें स्थावरजंगमात्मक सर्व प्राण्यांच्या शरीरांमध्यें नित्य ठराविक क्रिया होऊन कितीएक तत्त्वें कमी होतात, तीं खाण्यापिण्यानें जर भरून न काढण्यांत येतील, तर शरीराचा त्वरित नाश होतो. स्थावर प्राणी पृथ्वींतून मूळानें व वायूंतून पानांनीं आपणास योग्य आहार नित्य ग्रहण करतात; आणि जंगम प्राणीहि आपला योग्य आहार नित्य शोधून घेतात. कारण ज्यावेळीं क्षुधा लागते, त्यावेळीं अन्नावांचून इतर कांहींहि आवडत नाहीं. सांगितलें आहे कीं,

**शय्या वस्त्रं चंदनं चारु हास्यं वीणा वाणी वाहनं भूषणं च ।**
**नो रोचन्ते क्षुत्पिपासातुराणां सर्वारम्भास्तन्दुलप्रस्थमूलाः ॥६७३॥**

क्षुधेनें व तृषेनें पीडित झालेल्यांस शय्या, वस्त्र, चंदन, सुंदर हास्य, वीणा, वाणी, वाहनें आणि भूषणें कांहींहि आवडत नाहीं. कारण सर्व आरंभ शेरभर तांदूळ असतील तर तन्मूलक आहेत ॥ ६७३ ॥

करितां मनुष्यानें आपल्या निर्वाहासाठीं आळस सोडून कोणत्याहि प्रकारच्या धंद्यास लागलें पाहिजे. कारण धंद्याशिवाय मनुष्य रिकामा राहतो, आणि धनाची प्राप्ति होत नाहीं. आणि धनावांचून कोणतीहि वस्तु मिळत नाहीं. तसाच कोणी स्नेहीहि होत नाहीं. जरी सर्व आवश्यक वस्तूंस धन ह्मणतात, तथापि त्या सर्व एकाच माणसानें पैदा करणें मुष्कील असल्यानें पूर्वीं मनुष्यांमध्यें त्यांची तीळ द्यावे व उडीद घ्यावे याप्रकारची देवघेव करण्याची चाल होती, त्यांत अतिशय अडचण पडते असें भासल्यामुळें शहाण्या मनुष्यांनीं विचार करून धातूंचे शिक्के साक्षीदाखल चालवून त्या त्या वस्तूची

किंमत ठरविण्याची चाल पाडिली आहे. त्यामुळें धन शब्दानें आतां धातूंचा शिक्का ओळखिला जातो. कारण त्यानें सर्व वस्तू मिळूं शकतात. करितां शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**संसृतौ व्यवहाराय सारभूतं धनं स्मृतम् ।**
**अतो यतेत तत्प्राप्त्यै नरः सूपायसाहसैः ॥ ६७४ ॥**

संसारांत व्यवहारासाठीं धन सारभूत ह्मटलें आहे, करितां तें मिळविण्यास मनुष्यानें सदुपायरूप साहसानें यत्न करावा ॥ ६७४ ॥

तसेंच पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**दंष्ट्राविरहितः सर्पो मदहीनो यथा गजः ।**
**तथाऽर्थेन विहीनोऽत्र पुरुषो नामधारकः ॥ ६७५ ॥**

या लोकांत जसा दांत पाडलेला सर्प व मदशून्य हत्ती, तसाच निर्धन पुरुष केवल नामधारक ह्मणजे पुरुषार्थशून्य आहे ॥ ६७५ ॥

**अर्थेन च विहीनस्य पुरुषस्याल्पमेधसः ।**
**उच्छिद्यन्ते क्रियाः सर्वा ग्रीष्मे कुसरितो यथा ॥ ६७६ ॥**

कारण निर्धन व अल्पबुद्धि पुरुषाच्या सर्व क्रिया, ग्रीष्म ऋतूंतील लहान नद्यांप्रमाणें नाश पावतात ॥ २७६ ॥

**शीलं शौचं क्षान्तिर्दाक्षिण्यं मधुरता कुले जन्म ।**
**न विराजन्ति हि सर्वे वित्तविहीनस्य पुरुषस्य ॥ ६७७ ॥**

धनहीन पुरुषाचें सद्वर्तन, पवित्रता, क्षमा, शहाणपणा, मधुरता आणि कुलीनपणा हे सर्व गुण असले तरी शोभत नाहींत ॥ ६७७ ॥

**गतवयसामपि पुंसां येषामर्था भवन्ति ते तरुणाः ।**
**अर्थेन तु ये हीना वृद्धास्ते यौवनेऽपि स्युः ॥ ६७८ ॥**

वृद्ध पुरुषांसहि जर धन मिळेल तर ते तरुणासारखे होतात व जर धन जात राहील तर तारुण्यमध्येंहि वृद्धाप्रमाणें होतात ॥ ६७८ ॥

करितां धंद्यास लागून धन मिळवावें, परंतु लोकांमध्यें अनोळख्याचा कोणी विश्वास करीत नाहींत ह्मणून प्रथम ओळख करून घेण्याची जरूर

पडते; व नंतर तशा ओळखीच्या परिचयानें कोणत्याहि प्रकारच्या धंद्यास लागतां येतें. तरी श्रीमहाभारतांतर्गत शांतिपर्वाच्या आपद्धर्मांत सांगितलें आहे कीं,

**विद्या शौर्यं च दाक्ष्यं च बलं धैर्यं च पञ्चमम् ।**
**मित्राणि सहजान्याहुर्वर्तयन्ति हि तैर्बुधाः ॥ ६७९ ॥**

विद्या, शौर्य, दक्षता बल आणि पांचवें धैर्य इतक्या गुणांस सहज मित्र म्हणतात, करितां बुद्धिमान् पुरुष तितक्या गुणांनीं युक्त होऊन वर्तन करतात ॥ ६७९ ॥

तथापि जसा "झाडाशिवाय वेल नाहीं" तसा आश्रयावांचून मनुष्यहि वाढूं शकत नाहीं. करितां व्यवहारामध्यें आपणास सहायता करतील असे मित्र अवश्य करावे. कारण चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**गुणैः सर्वज्ञतुल्योऽपि सीदत्येको निराश्रयः ।**
**अनर्घ्यमपि माणिक्यं हेमाश्रयमपेक्षते ॥ ६८० ॥**

गुणांनीं सर्वज्ञतुल्य असला तरीहि आश्रयाशिवाय एकटा खेद पावतो, कारण अमूल्य माणिकासहि सुवर्णाच्या आश्रयाची जरूर आहे ॥ ६८० ॥

तसेंच शार्ङ्गधर पद्धतींत सांगितलें आहे कीं,

**उत्तुङ्गशैलशिखरे स्थितपादपस्य**
**काकः कृशोऽपि फलमालभते सपक्षः ।**
**सिंहो बली गजविदारणदारुणोऽपि**
**सीदत्यहो तरुतले खलु पक्षहीनः ॥ ६८१ ॥**

कावळा दुर्बळ असूहि पक्षसहित असल्यामुळें उंच पर्वताच्या शिखरावर असलेल्या वृक्षाचीं फळें खातो, परंतु हत्तीस मारण्यामध्यें क्रूर सिंह बलवान् असूनहि पक्षहीन असल्यामुळें आहा! वृक्षाच्या खालींच खेद पावतो ॥ ६८१ ॥

पुनः पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**असहायः समर्थोऽपि तेजस्वी किं करिष्यति ।**
**निर्वाते ज्वलितो वह्निः स्वयमेवोपशाम्यति ॥ ६८२ ॥**

तेजस्वी पुरुष समर्थ असूनहि सहायावांचून काय करूं शकणार ? कारण वायूशिवायच्या स्थानांत प्रदीप्त केलेला अग्नि आपण होऊन विझून जातो ॥ ६८२ ॥

**अपि संपूर्णतायुक्तैः कर्तव्याः सुहृदो बुधैः ।**
**नदीशः परिपूर्णोऽपि चन्द्रोदयमपेक्षते ॥ ६८३ ॥**

बुद्धिमान् मनुष्यांनीं स्वतः संपूर्ण असतांहि मित्र करावे, कारण समुद्र परिपूर्ण आहे, तथापि चंद्राच्या उदयाची वाट पाहत असतो ॥ ६८३ ॥

**मित्रवान्साधयत्यर्थान्दुःसाध्यानपि वै यतः ।**
**तस्मान्मित्राणि कुर्वीत समानान्येव चात्मनः ॥ ६८४ ॥**

पुनः मित्रयुक्त मनुष्य असाध्य कार्यहि सिद्ध करूं शकतो, करितां स्वभावादि गुणांनीं आपल्या बरोबरीचे मित्र करावे ॥ ६८४ ॥

परंतु संगतीसारखी बुद्धि व परिणाम होतो, करितां मित्रता सज्जनांशींच करावी, दुर्जनांशीं करूं नये. कारण सज्जनांची मैत्री लाभकारक व दुर्जनांची मैत्री हानिकारक आहे. पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**हीयते हि मतिस्तात हीनैः सह समागमात् ।**
**समैश्च समतामेति विशिष्टैश्च विशिष्टताम् ॥ ६८५ ॥**

हे तात ! आपल्याहून हलक्या पुरुषांची संगति केल्यानें मति हीन होते, आपल्यासारख्या पुरुषांची संगति केल्यानें समान राहते व आपल्याहून श्रेष्ठ पुरुषांची संगति केल्यानें श्रेष्ठ होते ॥ ६८५ ॥

**कीटोऽपि सुमनःसङ्गादारोहति सतां शिरः ।**
**अश्माऽपि याति देवत्वं महद्भिः सुप्रतिष्ठितः ॥ ६८६ ॥**

कीटहि पुष्पांच्या संगानें सत्पुरुषांच्या मस्तकावर चढून बसतो व मोठ्यांनीं उत्तम प्रकारें प्रतिष्ठा केलेला पाषाणहि देवकलेस पोंचतो ॥ ६८६ ॥

**काचः काञ्चनसंसर्गाद्धत्ते मारकतीं द्युतिम् ।**
**तथा सत्सन्निधानेन मूर्खो याति प्रवीणताम् ॥ ६८७ ॥**

जशी कांच कांचनाच्या संसर्गानें मरकतमण्याच्या कांतीस धारण करिते, तद्वत् मूर्खहि सत्पुरुषांच्या जवळ राहिल्यानें शहाणा होतो ॥ ६८७ ॥

न स्थातव्यं न गन्तव्यं क्षणमप्यधमैः सह ।
पयोऽपि शौण्डिकीहस्ते मदिरां मन्यते जनः ॥ ६८८ ॥

क्षणमात्रहि नीचांबरोबर उभें राहूं नये, किंवा जाऊं नये, कारण दारू विकणाऱ्या स्त्रीच्या हातांत दूध असलें तरीहि त्यास लोक मदिरा समजतात ॥६८८॥

लोकयात्रा भयं लज्जा दाक्षिण्यं त्यागशीलता ।
पञ्च यत्र न विद्यन्ते न कुर्यात्तत्र संगतिम् ॥ ६८९ ॥

लोकांमध्यें जाणेंयेणें, भय, लज्जा, दक्षता व उदारता हे पांच गुण ज्यांचे ठिकाणीं नसतील त्यांची संगति करूं नये ॥ ६८९ ॥

दुर्जनेन समं सख्यं प्रीतिं चापि न कारयेत् ।
उष्णो दहति चाङ्गारः शीतः कृष्णायते करम् ॥ ६९० ॥

दुर्जनाशीं मैत्री किंवा सहज प्रीतिहि करूं नये, कारण पेटल्या निखाऱ्यास स्पर्श केला असतां हात जळतो व विझल्यानंतर कोळशास स्पर्श केला असतां हात काळा होतो ॥ ६९० ॥

संसारतापदग्धानां त्रयो विश्रान्तिहेतवः ।
अपत्यं च कलत्रं च सतां संगतिरेव च ॥ ६९१ ॥

परंतु संसाराच्या तापानें दग्ध झालेल्या पुरुषांस पुत्र, स्त्री व सत्संगति हीं तीन विश्रांति मिळण्याचीं साधनें आहेत ॥ ६९१ ॥

तसेंच भर्तृहरीनें सांगितलें आहे कीं,

जाड्यं धियो हरति सिञ्चति वाचि सत्यं
मानोन्नतिं दिशति पापमपाकरोति ।
चेतः प्रसादयति दिक्षु तनोति कीर्तिं
सत्संगतिः कथय किं न करोति पुंसाम् ॥ ६९२ ॥

सत्पुरुषांची संगति बुद्धीच्या जडतेस हरण करिते, वाणीच्या ठिकाणीं सत्याचें सिंचन करिते, मान वाढविते, पाप घालविते, चित्तास प्रसन्न करते

आणि दिगंतरीं कीर्ति पसरविते, सांग बरें! पुरुषांस सत्संगतीपासून काय काय लाभ होत नाहीं? ॥ ६९२ ॥

पुनः सांगितलें आहे कीं,

**संसर्गजा दोषगुणा भवन्ति ॥ ६९३ ॥**

मनुष्यामध्यें संगतीमुळेंच दोष किंवा गुण येतात ॥ ६९३ ॥

चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**कुलीनैः सह संपर्कं पण्डितैः सह मित्रताम् ।**
**ज्ञातिभिश्च समं मेलं कुर्वाणो नावसीदति ॥ ६९४ ॥**

कुलीन मनुष्यांशीं संगति, पंडित जनांशीं मैत्री, व ज्ञातिवर्गाशीं ऐक्य ठेवणारा पुरुष नाश पावत नाहीं ॥ ६९४ ॥

**यथा चतुर्भिः कनकं परीक्ष्यते निघर्षणच्छेदनतापताडनैः ।**
**तथा चतुर्भिः पुरुषः परीक्ष्यते श्रुतेन शीलेन गुणेन कर्मणा ॥ ६९५ ॥**

जशी घर्षण, छेदन, तापन व ताडन या चतुर्विध क्रियांनीं सुवर्णाची परीक्षा होते, तशी अध्ययन, स्वभाव, गुण आणि कर्म या चार प्रकारांनीं पुरुषाची परीक्षा केली जाते ॥ ६९५ ॥

परंतु प्रीति संपादिल्यावांचून मित्रता होत नाहीं, अनुकूलतेनें वागल्याशिवाय प्रीति होत नाहीं, शरीरधारी प्राणिमात्रास प्रेम वहाल आहे, करितां व्यवहारामध्यें मन, वाणी आणि कर्म यांहींकरून अशा रीतीनें वागावें कीं, ज्यामुळें सर्वांचें प्रेम संपादन होऊन मित्र होतां येईल. मनुस्मृतीच्या चवथ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**सत्यं ब्रूयात्प्रियं ब्रूयान्न ब्रूयात्सत्यमप्रियम् ।**
**प्रियं च नानृतं ब्रूयादेष धर्मः सनातनः ॥ ६९६ ॥**

सत्य आणि प्रिय बोलावें, परंतु खरें असतांहि अप्रिय बोलूं नये व प्रिय असतांहि खोटें बोलूं नये, अर्थात् अप्रिय व असत्य तर कधींच बोलूं नये, हा अति प्राचीन धर्म आहे ॥ ६९६ ॥

तसेंच शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

जनस्याशयमालक्ष्य यो यथा परितुष्यति ।
तं तथैवानुवर्तेत पराराधनपण्डितः ॥ ६९७ ॥

दुसऱ्यास संतुष्ट ठेवण्यामध्यें चतुर असलेल्या पुरुषानें मनुष्याचा अभिप्राय जाणून जो ज्या रीतीनें संतोष पावेल त्या रीतीनें त्याचें अनुसरण करावें ॥ ६९७॥

आचार्यः सर्वचेष्टासु लोक एव हि धीमतः ।
अनुकुर्यात्तमेवातो लौकिकार्थे परीक्षकः ॥ ६९८ ॥

बुद्धिमान् पुरुषांस सर्व क्रियांमध्यें लोकच गुरु आहे, करितां परीक्षकानें व्यवहारामध्यें लोकांचेंच अनुकरण करावें ॥ ६९८ ॥

राजदेशकुलज्ञातिसद्धर्मान्नैव दूषयेत् ।
शक्तोऽपि लौकिकाचारं मनसाऽपि न लङ्घयेत् ॥ ६९९ ॥

समर्थानेंहि राजा, देश, कुल, ज्ञाति व सद्धर्म यांस दूषण देवूं नये आणि लौकिक व्यवहाराचें मनानेंहि उल्लंघन करूं नये ॥ ६९९ ॥

दीनान्धपङ्गुबधिरा नोपहास्याः कदाचन ।
नानिष्टं प्रवदेत् कस्मिन् प्रलापं न च कारयेत् ॥ ७०० ॥

पुनः गरीब, आंधळे, पांगळे व बहिरे यांचा उपहास कधींहि करूं नये, कोणाविषयींहि अप्रिय बोलूं नये व व्यर्थ बडबड करूं नये ॥ ७०० ॥

तथा न क्रीडयेत्कश्चित्कलहाय भवेद्यथा ।
अपशब्दाश्च नो वाच्या मित्रभावाच्च केष्वपि ॥ ७०१ ॥

तसेंच कोणाशींहि कलह होईल अशा रीतीनें क्रीडा करूं नये व कोणासहि मित्रभावानें अपशब्द बोलूं नये ॥ ७०१ ॥

पुनः चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

लुब्धमर्थेन गृह्णीयात्स्तब्धमञ्जलिकर्मणा ।
मूर्खं छन्दानुवृत्त्या च तत्त्वार्थेन च पण्डितम् ॥ ७०२

लोभ्यास धन देऊन, रागावल्यास हात जोडून, मूर्खास त्याच्या कलानें चालून व पंडितास यथार्थ कथन करून वश करावा ॥ ७०२ ॥

**प्रस्तावसदृशं वाक्यं स्वभावसदृशं प्रियम् ।**
**आत्मशक्तिसमं कोपं यो जानाति स पण्डितः ॥ ७०३ ॥**

प्रसंगानुरूप वाक्य बोलणें, स्वभावानुरूप प्रिय करणें व आपल्या सामर्थ्यानुरूप क्रोध करणें जो जाणील तो पंडित ह्मटला आहे ॥ ७०३ ॥

**प्रियवाक्यप्रदानेन सर्वे तुष्यन्ति जन्तवः ।**
**तस्मात्तदेव वक्तव्यं वचने किं दरिद्रता ॥ ७०४ ॥**

प्रियवाक्य बोलल्यानें सर्व प्राणी संतुष्ट होतात, करितां तेंच बोलावें, कारण सद्वचनास कुठें तोटा आहे ? ॥ ७०४ ॥

**परदारान् परद्रव्यं परीवादं परस्य च ।**
**परीहासं गुरोः स्थाने विवादं च विवर्जयेत् ॥ ७०५ ॥**

परस्त्री, परधन, परनिंदा व वडिलांच्या जवळ हास्य आणि विवाद इतक्या गोष्टींचा त्याग करावा ॥ ७०५ ॥

तसेंच पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**यस्य यस्य हि यो भावस्तेन तेन हि तं नरः ।**
**अनुप्रविश्य मेधावी क्षिप्रमात्मवशं नयेत् ॥ ७०६ ॥**

बुद्धिमान् मनुष्यानें ज्याचा जसा भाव असेल त्या त्या भावानें त्यास मिळून जाऊन त्वरित आपल्या वश करावा ॥ ७०६ ॥

पुनः सांगितलें आहे कीं,

**दारेषु किंचित्स्वजनेषु किंचिद्गोप्यं वयस्येषु सुतेषु किंचित् ।**
**युक्तं न वा युक्तमिदं विचिन्त्य वदेद्विपश्चिन्न यथा विरोधः ॥७०७॥**

शहाण्या माणसानें स्त्री, स्वजन, मित्र, आणि पुत्र यांच्या जवळहि कांहीं गोष्टी गुप्त ठेवावयाच्या असतात, ह्मणून युक्तायुक्ततेचा विचार करून ज्या रीतीनें अनर्थ न ओढवेल त्या रीतीनें बोलावें ॥ ७०७ ॥

**कोऽन्धो योऽकार्यरतः को बधिरो यः शृणोति न हितानि ।**
**को मूको यः काले प्रियाणि वक्तुं न जानाति ॥ ७०८ ॥**

नेत्र असून आंधळा कोण ? तर जो अयोग्य कर्मामध्यें प्रीति ठेवतो, ऐकूं येत असून बहिरा कोण ? तर जो हितकर वाक्य ऐकत नाहीं, आणि बोलतां येत असतां मुका कोण ? तर जो वेळेवर प्रिय बोलणें जाणत नाहीं ॥ ७०८ ॥

या प्रकारें व्यवहारामध्यें वागून जसे होतील तसे पुष्कळ स्नेही करावे, व आपणहि त्यांच्यावर स्नेह ठेवावा. पशुपक्ष्यांमध्येंहि जर एकमेकांचे सोबती दिसून येतात ? तर मनुष्यांमध्यें असलेच पाहिजेत. बैरागी देखील आपल्याबरोबर कोणी नाहीं तर शेवट पशु किंवा पक्षी बाळगून त्यांच्या सहवासानें कालक्रमण करितात, परंतु त्यांच्यानें एकटें राहवत नाहीं. कारण सृष्टीमध्यें असा स्वभाव आहे कीं, कोणासहि एकटें असणें आवडत नाहीं. बृहदारण्यकांत सांगितलें आहे कीं,

**एकाकी न रमते । एकाकी बिभेति ॥ ७०९ ॥**

एकट्यास चैन पडत नाहीं व एकट्यास भीति वाटते ॥ ७०९ ॥

पुनः जोंपर्यंत आपल्या सुख—दुःखाची गोष्ट एखाद्या खऱ्या मित्राजवळ केली नाहीं तोंपर्यंत दुधास येणाऱ्या उकळ्यांप्रमाणें मनांत त्यासंबंधीं उकळ्या येऊं लागतात. परंतु पाण्याचा तुषाररूप मित्र मिळाल्यानें जशी दुधाची उकळी बसून जाते, तशी मित्राजवळ गोष्ट केल्यानें मन शांत होतें. करितां आपत्कालीं जशी आपल्या मित्राजवळ सुख-दुःखाची गोष्ट करून संतोष व सहायता मिळविणें, तशी त्यासहि जरूरीच्या वेळीं आपल्याकडून होईल त्या रीतीची सहायता करणें हा स्नेह्यांचा परस्पर धर्म आहे. भर्तृहरीनें सांगितलें आहे कीं,

**पापान्निवारयति योजयते हिताय**
**गुह्यानि गूहति गुणान् प्रकटीकरोति ।**
**आपद्गतं च न जहाति ददाति काले**
**सन्मित्रलक्षणमिदं प्रवदन्ति सन्तः ॥ ७१० ॥**

पापकर्मापासून निवृत्त करतो, हितांत योजितो, गुप्त गोष्ट झांकून ठेवतो, गुण प्रकट करतो, आपत्कालीं सोडीत नाहीं व योग्य वेळीं मदत करतो, हीं सत्पुरुषांनीं सन्मित्राचीं लक्षणें सांगितलीं आहेत ॥ ७१० ॥

क्षीरेणात्मगतोदकाय हि गुणा दत्ताः पुरा तेऽखिलाः
क्षीरे तापमवेक्ष्य तेन पयसा ह्यात्मा कृशानौ हुतः ।
गन्तुं पावकमुन्मनस्तदभवद्दृष्ट्वा तु मित्रापदं
युक्तं तेन जलेन शाम्यति सतां मैत्री पुनस्त्वीदृशी ॥७११॥

दुधानें स्वतःमध्यें मिळालेल्या पाण्यास आपले सर्व गुण अर्पण केले, त्यामुळें त्या पाण्यानें दुधामध्यें उष्णता झालेली पाहून आपला आत्मा अग्नीमध्यें हुत केला, अर्थात् स्वतः आटूं लागलें; त्यावेळीं त्या दुधानें मित्राची आपत्ति पाहून अग्नींत उडी टाकण्याचा विचार केला; अर्थात् दूध ओतूं जाऊं लागलें; परंतु पुनः जलरूप मित्र भेटल्यामुळें अर्थात् दुधांत पाणी टाकल्यानें तें दूध शांत होतें, याप्रमाणें सत्पुरुषांची मैत्री असते ॥ ७११ ॥

पुनः पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

अप्रियाण्यपि पथ्यानि ये वदन्ति नृणामिह ।
त एव सुहृदः प्रोक्ता अन्ये स्युर्नामधारकाः ॥ ७१२ ॥

मनुष्यांस जे वरून अप्रिय परंतु अंतीं हितकारक उपदेश करितात तेच मित्र ह्मटले जातात; इतर मित्र नामधारक समजावे ॥ ७१२ ॥

सुहृदां हितकामानां यः शृणोति न भाषितम् ।
विपत्सन्निहिता तस्य स नरः शत्रुनन्दनः ॥ ७१३ ॥

जो हित इच्छिणाऱ्या मित्रांचें सांगितलेलें ऐकत नाहीं, त्याच्याजवळ विपत्ति ठेपलेली असते व त्याचे शत्रु संतुष्ट असतात ॥ ७१३ ॥

प्रियं वा यदि वा द्वेष्यं शुभं वा यदि वाऽशुभम् ।
अपृष्टोऽपि हितं वक्ष्येत् यस्य नेच्छेत्पराभवम् ॥ ७१४ ॥

जो ज्याचा पराभव इच्छित नसेल, त्यानें त्यास प्रिय किंवा अप्रिय, चांगलें किंवा वाईट वाटलें तरी विचारल्यावांचूनहि हितवाक्य सांगावें ॥ ७१४ ॥

नाविदग्धः प्रियं ब्रूयात्स्पष्टवक्ता न वञ्चकः ॥ ७१५ ॥

कारण मूर्ख असेल तो प्रिय बोलणार नाहीं व स्पष्टवक्ता असेल तो लबाड असत नाहीं ॥ ७१५ ॥

अशृण्वन्नपि बोद्धव्यं मित्रं मित्रेण सर्वदा।
यथा स्वदोषनाशाय विदुरेणाम्बिकासुतः॥ ७१६ ॥

जसा आपल्यावरचा दोष घालविण्याकरितां विदुरानें धृतराष्ट्रास बोध केला, तसा मित्रानें नेहमीं मित्रास तो ऐकत नसला तरीहि बोध करावा ॥ ७१६ ॥

ददाति प्रतिगृह्णाति गुह्यमाख्याति पृच्छति।
भुङ्क्ते भोजयते चैव षड्विधं प्रीतिलक्षणम् ॥ ७१७ ॥

वेळीं मदत देतो व घेतो, गुप्त गोष्ट सांगतो व विचारतो आणि जेवतो व वाढतो, हीं सहा प्रीतीचीं लक्षणें आहेत ॥ ७१७ ॥

शुचित्वं त्यागिता शौर्यं सामान्यं सुखदुःखयोः।
दाक्षिण्यं चानुरक्तिश्च सत्यता च सुहृद्गुणाः॥ ७१८ ॥

पवित्रता, उदारता, शौर्य, सुखदुःखांत समानत्व, दक्षता, प्रीति आणि सत्यता हे सात मित्राचे गुण सांगितले आहेत ॥ ७१८ ॥

तसेंच सांगितलें आहे कीं,

हितोपदेशं शृणुयात्कुर्वीत च यथोचितम्।
विदुरोक्तमकृत्वाऽभूत्कौरवः शोकशल्यभाक् ॥ ७१९ ॥

हिताचा उपदेश ऐकावा व त्याप्रमाणें करावें, कारण विदुराचें हितकारक वचन न केल्यामुळें धृतराष्ट्रराजास शोकरूप शल्य वहावें लागलें ॥ ७१९ ॥

पुनः शुक्रनीतींत सांगितलें आहे कीं,

असत्कार्यनियोक्तारं गुरुं वाऽपि प्रबोधयेत्।
नातिक्रामेदपि लघुं क्वचित्सत्कार्यबोधकम् ॥ ७२० ॥

असत्कार्यामध्यें प्रवृत्त करणाऱ्या वडील माणसासहि बोध करावा, व सत्कार्याचा बोध करणाऱ्या लहान मुलाचेंहि अतिक्रमण करूं नये ॥ ७२० ॥

परंतु जो स्नेही झाला असेल तो वरून स्नेह दाखविणारा आहे किंवा आंतून प्रीति करणारा आहे तें प्रसंग आला असतां समजून येतें. चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

जानीयात्प्रेषणे भृत्यान् बान्धवान् व्यसनागमे।
मित्रं चापत्तिकालेषु भार्यां च विभवक्षये ॥ ७२१ ॥

कोठेंहि पाठवितेवेळीं चाकरास, दुःखाच्या वेळीं बांधवांस, आपत्कालीं मित्रांस, आणि वैभवाच्या क्षयाच्या वेळीं स्त्रीस हे कसे आहेत ते ओळखून ठेवावे ॥ ७२१ ॥

**आतुरे व्यसने प्राप्ते दुर्भिक्षे शत्रुसंकटे ।**
**राजद्वारे श्मशाने च यस्तिष्ठति स बान्धवः ॥ ७२२ ॥**

रोगाचे वेळीं, दुःखाचे वेळीं, दुष्काळांत, शत्रूपासून संकट प्राप्त झालें असतां, राजाच्या दरबारीं व स्मशानांत जो येऊन उभा राहतो तो बांधव जाणावा ॥ ७२२ ॥

संसारांत स्नेही तर पुष्कळ असतात. परंतु खरा स्नेह, ज्याच्याशीं मन मिळेल त्याच्याशींच होतो, इतरांशीं होत नाहीं. सृष्टिनियमाप्रमाणें कोणतीहि वस्तु द्वंद्वाशिवाय असत नाहीं. जशीं राग-द्वेष, लाभ-हानि, शुभ-अशुभरूप द्वंद्वें आहेत तशीं पदार्थमात्रांत बरें-वाईटरूप द्वंद्व असतें. त्यामुळें मनुष्यहि चांगलेवाईट असतात. करितां कामाच्या वेळीं जे स्नेही अहित करणारे दिसून येतील व दुर्जन आहेत असें वाटेल त्यांचा दुरूनच त्याग करावा. पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**मृगा मृगैः संगमनुव्रजन्ति गावश्च गोभिस्तुरगास्तुरङ्गैः ।**
**मूर्खाश्च मूर्खैः सुधियः सुधीभिः समानशीलव्यसनेषु सख्यम् ॥७२३॥**

मृग मृगांशीं, गाई गाईंशीं, घोडे घोड्यांशीं, मूर्ख मूर्खांशीं व पंडित पंडितांशीं संगति करितात. कारण ज्यांचे स्वभाव व व्यसनें समान असतात, अशांची परस्पर मैत्री जुळते ॥ ७२३ ॥

**गुणिनि गुणज्ञो रमते नागुणशीलस्य गुणिनि परितोषः ।**
**अलिरेति वनात्पद्मं न दर्दुरस्त्वेकवासोऽपि ॥ ७२४ ॥**

गुणज्ञ गुणिजनांच्या ठिकाणीं प्रीति करतो, परंतु गुणहीनास गुणिजनाच्या ठिकाणीं संतोष होत नाहीं, कारण भ्रमर वनांतून कमलाकडे येतो व बेडूक कमलाच्या सहवासास असूनहि त्याजवळ जात नाहीं ॥ ७२४ ॥

स्तब्धस्य नश्यति यशो विषमस्य मैत्री
नष्टेन्द्रियस्य कुलमर्थपरस्य धर्मः ।
विद्याफलं व्यसनिनः कृपणस्य सौख्यं
राज्यं प्रमत्तसचिवस्य नराधिपस्य ॥ ७२५ ॥

गर्विष्ठाचें यश, विषम ज्याचा स्वभाव अशाची मैत्री, ज्याचीं इंद्रियें नाहींत त्याचें कुल, केवल द्रव्यपरायणाचा धर्म, व्यसनी मनुष्याचें विद्या कृपणाचें सौख्य आणि ज्याचा प्रधान प्रमादी अशा राजाचें राज्य पावतें ॥ ७२५ ॥

मृद्घटवत्सुखभेद्यो दुःसंधानश्च दुर्जनो भवति ।
सुजनस्तु कनकघटवद्दुर्भेद्यश्चाशुसंधेयः ॥ ७२६ ॥

दुर्जन मित्र मातीच्या घड्याप्रमाणें सहज भेद पावतो व दुःख सांधितां येत नाहीं, परंतु सुजन मित्र तर सुवर्णाच्या कलशाप्रमाणें भेद पावत नाहीं व कदाचित् भेद पावलाच तर तत्काल सांधितां ये आणि

इक्षोरग्रात्क्रमशः पर्वणि पर्वणि यथा रसविशेषः ।
तद्वत्सज्जनमैत्री विपरीतानां तु विपरीता ॥ ७२७ ॥

जसा उंसाच्या अग्रापासून आरंभ करून क्रमानें प्रत्येक पेरास धिक रस मधुर असतो, तशी सज्जनांची मैत्री जाणावी व दुर्जनांची भिन्न जाणावी ॥ ७२७ ॥

आरंभगुर्वी क्षयिणी क्रमेण लघ्वी पुरा वृद्धिमती च पश्चात् ।
दिनस्य पूर्वार्धपरार्धभिन्ना छायेव मैत्री खलसज्जनानाम् ॥ ७२८ ॥

दिवसाच्या पूर्वार्धाच्या छायेप्रमाणें खलाची मैत्री आरंभीं मोठी व मागाहून क्रमानें कमी होत जाते, आणि दिवसाच्या उत्तरार्धाच्या छायेप्रमाणें सज्जनांची मैत्री आरंभीं लहान व मागाहून क्रमानें वाढत जाते ॥ ७२८ ॥

मनस्यन्यद्वचस्यन्यत्कार्यमन्यद्दुरात्मनाम् ।
मनस्येकं वचस्येकं कर्मण्येकं महात्मनाम् ॥ ७२९ ॥

पुनः दुर्जनांच्या मनांमध्यें एक बोलण्यामध्यें कांहीं दुसरें व करण्यामध्यें कांहीं भलतेंच असतें; परंतु सज्जनांच्या जें मनामध्यें तेंच वाणीमध्यें व क्रियेमध्येंहि तें एकच असतें ॥ ७२९ ॥

नारिकेलसमाकारा दृश्यन्तेऽपि हि सज्जनाः ।
अन्ये बदरिकाकारा बहिरेव मनोहराः ॥ ७३० ॥

सज्जन नारळाप्रमाणें आंतून कोमल असून वरून कठोर दिसतात व दुर्जन बोरासारखे आंतून कठोर असून वरून कोमल भासतात ॥ ७३० ॥

पुनः सांगितलें आहे कीं,

पात्रमपात्रीकुरुते दहति गुणं स्नेहमाशु नाशयति ।
अमले मलं नियच्छति दीपज्वालेव खलमैत्री ॥ ७३१ ॥

खलाची मैत्री दिव्याच्या ज्वालेप्रमाणें पात्रास अपात्र करिते, गुणास जाळून टाकते, स्नेहाचा त्वरित नाश करिते आणि निर्मलास मलिन करिते ॥ ७३१ ॥

एते स्निग्धतमा इति मा मा क्षुद्रेषु यात विश्वासम् ।
सिद्धार्थानामेषां स्नेहोऽप्यश्रूणि पातयति ॥ ७३२ ॥

अतिशय स्नेही आहेत, असें समजून नीच मनुष्यांचा विश्वास करूं नये, यांचें काम सिद्ध झाल्यानंतर यांचा स्नेहहि रडवितो ॥ ७३२ ॥

करितां चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

परोक्षे कार्यहन्तारं प्रत्यक्षे प्रियवादिनम् ।
वर्जयेत्तादृशं मित्रं विषकुम्भं पयोमुखम् ॥ ७३३ ॥

तोंडानें गोड बोलणारा व मागाहून कार्य बिघडविणारा, अशा मित्राचा, मुखांत दूध असलेल्या विषाच्या घड्याप्रमाणें त्याग करावा ॥ ७३३ ॥

दुर्जनः परिहर्तव्यो विद्ययाऽलंकृतोऽपि सन् ।
मणिना भूषितः सर्पः किमसौ न भयङ्करः ॥ ७३४ ॥

पुनः विद्येनें शोभत असलेल्याहि दुर्जनाचा त्याग करावा, कारण सर्प मण्यानें भूषित असला तरी भयंकर नाहीं काय? ॥ ७३४ ॥

या रीतीनें व्यवहारामध्यें सर्वांस वश करून सर्व माणसांशीं मित्रता ठेवावी, व जशी ती निरंतर चालेल असें वागावें; एखादे वेळीं मित्राचा परदेशीं वास असला तरीहि त्यास विसरूं नये. सांगितलें आहे कीं,

**मनोभूमौ जाता प्रकृतिपयसा वै विधिवशात्**
**सखे संभर्तव्या प्रचुरगुणपुष्पप्रसविनी ।**
**यथा नेयं ग्लानिं व्रजति मधुरा स्नेहलतिका**
**तथा संसेक्तव्या स्मरणसलिलेनानुदिवसम् ॥७३५॥**

हे मित्रा ! ईश्वरेच्छेनें मनोरूप जमिनींत स्वभावरूप पाण्यानें उत्पन्न झालेली आणि अनेक गुणरूप पुष्पांस प्रसविणारी, ही मधुर स्नेहरूप लता जशी म्लान होऊन न जाईल, तशी स्मरणरूप जलानें प्रत्यहीं शिंपून वाढवावी ॥ ७३५ ॥

**दूरस्थोऽपि न दूरस्थो यो यस्य मनसि स्थितः ।**
**यो यस्य हृदये नास्ति समीपस्थोऽपि दूरतः ॥ ७३६ ॥**

जो ज्याच्या मनांत आहे, तो दूर असला तरी जवळच आहे, व जो ज्याच्या मनांत नाहीं, तो जवळ असला तरी दूर आहे ॥ ७३६ ॥

**नहि भवति वियोगः स्नेहविच्छेदहेतु-**
**र्जगति गुणनिधीनां सज्जनानां कदाचित् ।**
**घनतिमिरनिबद्धो दूरसंस्थोऽपि चन्द्रः**
**किमु कुमुदवनानां प्रेमभङ्गं करोति ॥ ७३७ ॥**

जगतांत गुणांचें भांडाररूप सज्जनांस कधींहि वियोग स्नेह तोडण्यास हेतु होत नाहीं; कारण मेघाच्या अंधकारानें आच्छादिलेला व दूर असलेला चंद्रहि कुमुदवनाच्या स्नेहाचा भंग करतो काय ? ॥ ७३७ ॥

याप्रमाणें पुष्कळांशीं स्नेह ठेवून आपला निर्वाह चालविण्याकरितां कोणत्याहि प्रकारच्या धंद्यास लागावें. सांगितलें आहे कीं,

**तिले तैलं गवि क्षीरं काष्ठे पावकमन्ततः ।**
**धिया धीरो विजानीयादुपायं जीवनस्य च ॥ ७३८ ॥**

धीर पुरुषानें बुद्धीच्या योगें तिलामध्यें तेल, गाईमध्यें दूध, व काष्टांमध्यें अग्नि, यांप्रमाणें शेवटीं आपल्या जीवनाचा उपाय शोधून काढावा ॥ ७३८ ॥

परंतु कधींच भिक्षा मागूं नये, कारण भिक्षा मागण्याचे अधिकारी तर जे मिळविण्यास असमर्थ असतील असेच अनाथ लोक आहेत; त्यांस दिलेलें कांहीं व्यर्थ नाहीं, कारण त्यांचा निर्वाह चालविणें समर्थ लोकांचें कर्तव्य आहे, ह्मणून तशा लोकांवर उपकार करण्यांत कांहीं अप्रीति होत नाहीं. परंतु जे उद्योग करून मिळविण्यास समर्थ आहेत अशा लोकांस फुकट देणें कोणासहि आवडत नाहीं, ह्मणून तसे लोक जर कोणाजवळ फुकट मागतील तर तिरस्कारास प्राप्त होऊन मनामध्यें क्लेशित होतील. सांगितलें आहे कीं,

**तावत्सर्वगुणालयः पटुमतिः साधुः सतां वल्लभः**
**शूरः सच्चरितः कलङ्करहितो मानी कृतज्ञः कविः ।**
**दक्षो धर्मरतः सुशीलगुणवांस्तावत्प्रतिष्ठान्वितो**
**यावन्निष्ठुरवज्रपातसदृशं देहीति नो भाषते ॥ ७३९ ॥**

जेथपर्यंत कठोर वज्रपातासारखें "द्या" असें वचन जो बोलत नाहीं, तेथपर्यंतच तो सर्व गुणांचें स्थान, चतुर, बुद्धिवान्, सज्जन, सत्पुरुषांस प्रिय, शूर, वीर, सदाचरणी, कलंकरहित, मानी, केलेल्या उपकारास स्मरणारा, पंडित, शहाणा, धार्मिक, सुशील, गुणवान् व प्रतिष्ठायुक्त असतो ॥ ७३९ ॥

परंतु कोणत्याहि वेळीं कोणाजवळूनहि धंद्याकरितां आश्रय मागणें ही भिक्षा ह्मटली जात नाहीं. याशिवाय व्यवहारामध्यें सुखी होण्याकरितां इतर अनेक चालीरीतीप्रमाणें वागावें लागतें. शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**नोपेक्षेत स्त्रियं बालं रोगं भृत्यं पशुं धनम् ।**
**विद्याभ्यासं क्षणमपि सत्सेवां बुद्धिमान्नरः ॥ ७४० ॥**

बुद्धिमान् मनुष्यानें स्त्री, बालक, रोग, नोकर, पशु, धन, विद्याभ्यास व सत्सेवा यांची क्षणमात्रहि उपेक्षा करूं नये ॥ ७४० ॥

कारण स्त्री व बालक यांची उपेक्षा केल्यानें ते आडमार्गानें उतरून जातात. जरी त्यांस प्रसन्न ठेवणें हा पुरुषाचा धर्म आहे, तथापि, ते जर आडमार्गानें वागूं लागतील तर त्यांस प्रतिबंध करावा. तसें केल्यामुळें ते कदाचित् नाखुष होतील तर होऊं द्यावे, परंतु त्यांचा हितशत्रु होऊं नये. ज्याचा परिणाम वाईट आहे अशा आचरणाविषयीं जो स्नेही खरें खरें सांगत नाहीं तो हितशत्रु जाणावा. करितां स्त्री व बालक यांच्याशीं जसें त्यांचें कल्याण होईल अशा योग्य रीतीनें वागावें. याच ग्रंथाच्या याच अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**न बालं न स्त्रियं चातिलालयेत्ताडयेन्न च ।**
**विद्याभ्यासे गृहकृत्ये तावुभौ योजयेत्क्रमात् ॥ ७४१ ॥**

बालक व स्त्री यांचें अतिशय लालन व ताडन करूं नये, तर त्या दोघांसहि क्रमानें विद्याभ्यासांत व गृहकार्यांत लावावीं ॥ ७४१ ॥

**षोडशाब्दात् परं पुत्रं द्वादशाब्दात् परं स्त्रियम् ।**
**न ताडयेद्दुष्टवाक्यैः पीडयेन्न स्नुषादिकम् ॥ ७४२ ॥**

पुनः १६ वर्षांनंतर पुत्रास व १२ वर्षांनंतर स्त्रीजातीस दुष्ट वाक्यांनीं टोंचूं नये व सुना वगैरेंस त्रास देऊं नये ॥ ७४२ ॥

पुनः रोगाची उपेक्षा केल्यानें शरीरास हानि होण्याचें भय राहतें. जरी शरीरास सोसेल त्याप्रमाणें आहारविहार करण्यांत येत असल्यास रोग होण्याचा संभव कमी असतो, तथापि मनुष्य सर्वज्ञ नसल्यामुळें त्याचेकडून नकळत सृष्टिनियमाचें उल्लंघन होऊन त्यास रोग होतो. असें असतांहि मनुष्यानें आहार-विहार नियमित ठेवून येन केन प्रकारेण आरोग्य राहील अशा प्रकारचा यत्न करावा. कारण पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**उपेक्षितः क्षीणबलोऽपि रोगः प्रमाददोषान्मनुजैर्मदान्धैः ।**
**साध्योऽपि भूत्वा प्रथमं ततोऽसावसाध्यतां शत्रुरिव प्रयाति ॥७४३॥**

मदांध मनुष्यांनीं गैरसावधपणाच्या दोषानें उपेक्षा केलेला क्षीण बलाचा रोगहि शत्रूप्रमाणें प्रथम साध्य असूनहि नंतर असाध्य होतो ॥ ७४३ ॥

तसेंच नोकरांची उपेक्षा केल्यानें त्यांच्यांतील काम करण्याचा उत्साह कमी होतो, व त्यांच्या दानतीमध्यें फरक पडून जाण्याचा संभव असतो. करितां मालकानें त्यांच्या कामाचा नेहमीं तपास ठेवावा व त्यांच्या मेहनती-प्रमाणें त्यांस योग्य मोबदला द्यावा. पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**कृतकृत्यस्य भृत्यस्य कृतं नैव प्रणाशयेत् ।**
**फलेन मनसा वाचा दृष्ट्या चैव प्रहर्षयेत् ॥ ७४४ ॥**

केलें आहे कर्तव्य ज्यानें अशा नोकराचें काम मालकानें व्यर्थ जाऊं देऊं नये, तर त्यास मन, वाणी, दृष्टि आणि फल यांनीं संतुष्ट करावा ॥७४४॥

**निर्विशेषं यदा स्वामी समं भृत्येषु वर्तते ।**
**तत्रोद्यमसमर्थानामुत्साहः परिहीयते ॥ ७४५ ॥**

कारण जर मालक नोकरांजवळ कामाप्रमाणें मोबदला न देतां एक-सारख्या रीतीनें वागेल, तर उद्योग करण्यामध्यें समर्थ अशा नोकरांचा उत्साह कमी होऊन जाईल ॥ ७४५ ॥

**स्वामी तुष्टो हि भृत्यानामर्थमात्रं प्रयच्छति ।**
**ते तु संमानमात्रेण प्राणैरप्युपकुर्वते ॥ ७४६ ॥**

मालक संतुष्ट झाला तर नोकरांस केवळ द्रव्य देतो, परंतु ते तर केवळ सन्मानानें वेळ आल्यास प्राण देऊनहि स्वामीचा प्रत्युपकार फेडितात॥७४६॥

**भक्तं शक्तं कुलीनं च न भृत्यमवमानयेत् ।**
**पुत्रवत्पालयेन्नित्यं य इच्छेच्छ्रेय आत्मनः ॥ ७४७ ॥**

करितां जो आपलें कल्याण इच्छितो, त्यानें आपल्या ठिकाणीं भक्ति ठेव-णारा, काम करण्याविषयीं समर्थ व कुलीन अशा नोकरास पुत्राप्रमाणें पाळावा व त्याचा अपमान कधीं करूं नये ॥ ७४७ ॥

कारण विदुरनीतींत सांगितलें आहे कीं,

**यस्तात न क्रुध्यति सर्वकालं भृत्यस्य भक्तस्य हिते रतस्य ।**
**तस्मिन्भृत्या भर्तरि विश्वसन्ति न चैनमापत्सु परित्यजन्ति ॥७४८॥**

हे तात ! जो स्वामी भक्ति आणि हित करणाऱ्या भृत्यावर नेहमीं रागावत नाहीं, त्याच्यावर नोकर विश्वास ठेवितात व आपत्कालींहि त्यास सोडीत नाहींत ॥ ७४८ ॥

**अभिप्रायं यो विदित्वा तु भर्तुः सर्वाणि कार्याणि करोत्यतन्द्री ।**
**वक्ता हितानामनुरक्त आर्यः शक्तिज्ञ आत्मेव हि सोऽनुकम्प्यः ७४९**

जो हित सांगणारा, प्रीति ठेवणारा, आणि शक्ति जाणणारा श्रेष्ठ भृत्य स्वामीचा अभिप्राय जाणून, आळस सोडून सर्व कार्य करील, तो आपल्या आत्म्याप्रमाणें स्वामीनें दया करण्यास योग्य आहे ॥ ७४९ ॥

परंतु सृष्टीमध्यें कांहीं सर्व मनुष्य एकसारखे असत नाहींत, करितां माकडाला लाकडाचा ज्याप्रमाणें कांहीं उपयोग नाहीं त्याप्रमाणें वाटेल तें काम वाटेल त्याच्यावर सोंपून देऊं नये. तर परीक्षा करून योग्य माणसावर योग्य तें काम सोंपवावें. पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**त्रिविधाः पुरुषा राजन्नुत्तमाधममध्यमाः ।**
**नियोजयेत्तथैवैतांस्त्रिविधेष्वेव कर्मसु ॥ ७५० ॥**

हे राजन् ! उत्तम, मध्यम व अधम या भेदेंकरून तीन प्रकारचे पुरुष आहेत, करितां त्यांस तीन प्रकारच्या कार्यामध्यें योजावे ॥ ७५० ॥

**यो यत्र कुशलः कार्ये तं तत्र विनियोजयेत् ।**
**कर्मस्वदृष्टकर्माऽन्धः शास्त्रज्ञोऽपि विमुह्यति ॥ ७५१ ॥**

त्यापैकीं ज्या कामामध्यें जो कुशल असेल, त्यास त्या कामामध्यें योजावा, कारण काम पाहिलें नसल्यानें शास्त्रज्ञहि आंधळ्यासारखा मोह पावतो ॥७५१॥

**स्थानेष्वेव नियोक्तव्या भृत्या आभरणानि च ।**
**न हि चूडामणिः पादे नूपुरं मूर्ध्नि धार्यते ॥ ७५२ ॥**

भृत्य व भूषणें यांची योग्य ठिकाणीं योजना करावी,कारण चूडामणि पायांचे ठिकाणीं व पैंजण मस्तकाचे ठिकाणीं धारण केला जात नाहीं ॥ ७५२ ॥

**कनकभूषणसंग्रहणोचितो यदि मणिस्त्रपुणि प्रतिबध्यते ।**
**न स विशोभयते न च शोभते भवति योजयितुर्वचनीयता ॥७५३॥**

सुवर्णाच्या अलंकारांत जडण्यास योग्य मणि जर कथिलांत जडविला असेल तर तो शोभाहि देत नाहीं व शोभतहि नाहीं, तर उलट जडणाराची वाच्यता मात्र होते ॥ ७५३ ॥

**मणिर्लुण्ठति पादाग्रे काचः शिरसि धार्यते ।**
**क्रयविक्रयवेलायां काचः काचो मणिर्मणिः ॥ ७५४ ॥**

मणि पायाच्या अग्रभागीं व कांच मस्तकाच्या ठिकाणीं धारण केली असेल तर, क्रय-विक्रयाची वेळ आली असतां कांच ती कांच व मणि तो मणीच ठरतो ॥ ७५४ ॥

**अश्वः शस्त्रं शास्त्रं वीणा वाणी नरश्च नारी च ।**
**पुरुषविशेषं प्राप्ता भवन्ति योग्या अयोग्याश्च ॥ ७५५ ॥**

अश्व, शस्त्र, शास्त्र, वीणा, वाणी, नर, आणि नारी या वस्तु ज्या प्रकारच्या पुरुषाजवळ प्राप्त होतील त्या प्रकारच्या अर्थात् योग्य किंवा अयोग्य होतात ॥ ७५५ ॥

**परीक्षका यत्र न सन्ति देशे नार्घन्ति रत्नानि समुद्रजानि ।**
**न वेत्ति यो यस्य गुणप्रकर्षं स तं सदा निन्दति नात्र चित्रम् ॥७५६॥**

ज्या देशांत परीक्षक नाहींत, त्या देशामध्यें समुद्रापासून उत्पन्न झालेल्या रत्नांची किंमत होत नाहीं. कारण जो ज्याच्या गुणोत्कर्षास जाणत नाहीं, तो नेहमीं त्याची निंदा करतो यांत आश्चर्य नाहीं ॥ ७५६ ॥

**विद्वानेव विजानाति विद्वज्जनपरिश्रमम् ।**
**नहि वन्ध्या विजानाति गुर्वीं प्रसववेदनाम् ॥ ७५७ ॥**

विद्वानांच्या परिश्रमास विद्वानच जाणूं शकतो, कारण प्रसूतिकालीं होणाऱ्या गर्भिणीच्या वेदनेस वंध्या स्त्री जाणूं शकत नाहीं ॥ ७५७ ॥

**गुणी गुणं वेत्ति न वेत्ति निर्गुणो बली बलं वेत्ति न वेत्ति निर्बलः ।**
**मधोर्गुणं कोकिलको न वायसः करी च सिंहस्य बलं न मूषकः ७५८॥**

गुणी गुणास जाणतो, गुणहीन जाणत नाहीं, बलवान् बलास जाणतो, बलहीन जाणत नाहीं; कारण वसंतऋतूच्या गुणास कोकिल पक्षी जाणतो,

परंतु कावळा जाणत नाहीं, व सिंहाचें बल हत्ती जाणतो, परंतु उंदीर जाणणार नाहीं ॥ ७५८ ॥

पुनः अशा नोकरांनींहि आपल्या मालकाची नोकरी करण्यामध्यें दानत चांगली ठेवावी; व आळस सोडून मालकाचें काम अशा रीतीनें करावें कीं, ज्यामुळें त्याचें प्रेम संपादन होऊं शकेल, व आपल्या प्राप्तीमध्यें वाढ होईल. जर मालक चांगला मिळाला असेल तर त्याची नोकरी करणें कांहीं विकट वाटत नाहीं, परंतु मूर्ख मालकाची नोकरी अतिशय विकट वाटते. कारण तो तर केवळ दोषच पाहत असतो. पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

मौनान्मूकः प्रवचनपटुर्वातको जल्पको वा
क्षान्त्या भीरुर्यदि न सहते प्रायशो नाभिजातः ।
धृष्टः पार्श्वे वसति नियतं दूरतश्चाप्रगल्भः
सेवाधर्मः परमगहनो योगिनामप्यगम्यः ॥ ७५९ ॥

बहुतकरून भृत्य मौन धरील तर मुका, बोलण्यांत चतुर असेल तर वेडा किंवा बडबड्या, सहनशील असेल तर भित्रा, सहन न करील तर हलकट, नियमानें जवळ राहील तर निर्लज्ज, व दूर राहील तर लाजाळू ह्मटला जातो, म्हणून योग्यांस अगम्य असा सेवाधर्म मोठा गहन आहे ॥ ७५९ ॥

करितां नोकरांनीं नेहमीं सावध राहून मालकाच्या कामाविषयीं तत्पर असावें आणि तो जर एखाद्या वेळीं काम सांगेल व आपल्या समजण्यांत न येईल तर पुनः हळू विचारून समजून घ्यावें, कदाचित् मालक चार चौघांमध्यें बसला असेल व विचारणें शक्य नसेल तर सांगितलेलें काम सवडीप्रमाणें समजून घ्यावें. परंतु भोजनाच्या वेळीं "*सैन्धवमानय" अशी आज्ञा केली असतां घोडा आणून द्यावा अशी मूर्खता करूं नये. पचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

उदीरितोऽर्थः पशुनाऽपि गृह्यते हयाश्च नागाश्च वहन्ति चोदिताः ।
अनुक्तमप्यूहति पण्डितो जनः परेङ्गितज्ञानफला हि बुद्धयः ॥ ७६० ॥

---

*सैंधव या शब्दाचा अर्थ मीठ व घोडा असा आहे. परंतु भोजनाच्या प्रकरणावरून मिठाच्या अभिप्रायानें सैंधव शब्द योजलेला आहे, असा निश्चय जाणला पाहिजे.

सांगितलेला अर्थ पशुहि ग्रहण करतो, कारण घोडे व हत्ती खुणावले असतां वहन केलेले दिसून येतात, परंतु बुद्धिमान् लोक तर न सांगतांहि समजून जातो; कारण दुसऱ्याच्या मनांतील अभिप्राय जाणणें हेंच बुद्धीचें फल आहे ॥ ७६० ॥

**आकारैरिङ्गितैर्गत्या चेष्टया भाषणेन च ।**
**नेत्रवक्त्रविकारेण लक्ष्यतेऽन्तर्गतं मनः ॥ ७६१ ॥**

कारण आकार, संज्ञा, गति, चेष्टा, भाषण व नेत्र आणि मुख यांचे विकार यांहींकरून मनांतील अभिप्राय समजून येतो ॥ ७६१ ॥

याप्रमाणें मालक आणि नोकर या उभयतांनीं परस्पर एकमेकांचें कल्याण होईल त्या रीतीनें वागावें. कारण धनी आहे ह्मणून नोकर आहे, आणि नोकर आहे ह्मणून धनी आहे; करितां नोकर कदाचित् नवा असेल व सांगितलेलें काम कदाचित् लगेच समजूं न शकेल, तर त्यास मालकानें घडी घडी दुर्वचनांनीं टोंचूं नये, तर त्यास बरोबर समजावून माहिती देऊन त्याचेकडून काम करून घ्यावें. घडी घडी टोंचल्यानें नोकर सुधारण्याच्या ऐवजीं बुजून जाऊन कामांत गडबड करतो. सांगितलें आहे कीं,

**अवज्ञानात्प्राज्ञो भवति मतिहीनः परिजन-**
**स्ततस्तत्प्रामाण्याद्भवति न समीपे परिजनः ।**
**बुधैस्त्यक्ते शिष्टे नहि भवति नीतिर्गुणवती**
**विषण्णायां नीतौ सकलमवशं सीदति गृहम् ॥ ७६२ ॥**

बुद्धिमान् नोकरहि स्वामीच्या वारंवार टोंचणीनें मतिहीन होऊन जातो, नंतर त्याप्रमाणें "मलाहि टोंचील" असें समजून कोणी बुद्धिमान् दुसरा नोकर राहत नाहीं, व बुद्धिमान् नोकरांनीं त्याग केलेल्या मालकाची चांगली नीति राहत नाहीं आणि नीति गेली असतां त्याचें पराधीन झालेलें समग्र कुटुंब खेद पावतें ॥ ७६२ ॥

सृष्टींत कोणताहि मनुष्य पूर्ण असतच नाहीं. आरंभीं सर्व अडाणी असतात, परंतु कालेंकरून जसजसा अनुभव मिळवित जातो तसतसा तो हुषार

बनतो. पुनः नोकरानेंहि कधीं मालकाच्या उलट बोलूं नये. नेहमीं नम्रता ठेवून मालकास पित्यासारखा मानून त्याचें काम करण्याविषयीं तत्पर रहावें. याप्रमाणें वागणाऱ्या नोकरास आरामाची जरूर आहे, करितां मालकानें दिवसा व रात्रीस ठरावीक वेळेपर्यंत त्यास आराम घेऊं द्यावा. नोकरास खुष ठेविल्यानें मालकाचें काम चांगलें होतें, आणि मालकास प्रसन्न केल्यानें नोकराची जीविका उत्तम प्रकारें चालते. करितां मालक व नोकर यांनीं परस्परांमध्यें ऐक्य ठेवून वागावें. पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**अरैः संधार्यते नाभिर्नाभौ चाराः प्रतिष्ठिताः ।**
**स्वामिसेवकयोरेवं वृत्तिचक्रं प्रवर्तते ॥ ७६३ ॥**

जसा आऱ्यांनीं नाभि धरिला जातो आणि नाभींत आरे सांधिले जातात, तसेंच स्वामिसेवकांचें वृत्तिचक्र अन्योन्य संबंधानें चालतें ॥ ७६३ ॥

**सुहृदि निरन्तरचित्ते गुणवति भृत्येऽनुवर्तिनि कलत्रे ।**
**स्वामिनि सौहृदयुक्ते निवेद्य दुःखं सुखी भवति ॥ ७६४ ॥**

अंतररहित चित्ताचा मित्र, गुणी सेवक, अनुकूल स्त्री, आणि स्नेहयुक्त स्वामी यांच्याजवळ दुःख निवेदन केलें असतां मनुष्य सुखी होतो ॥७६४॥

पुनः सांगितलें आहे कीं,

**मणिना वलयं वलयेन मणिर्मणिना वलयेन विभाति करः ।**
**पयसा कमलं कमलेन पयः पयसा कमलेन विभाति सरः ॥७६५॥**

जसें मण्यानें कंकण व कंकणानें मणि आणि मणि व कंकण यांनीं हात शोभतो, पाण्यानें कमळ व कमळानें पाणी आणि पाणी व कमळ यांनीं सरोवर शोभतें,—॥ ७६५ ॥

**शशिना च निशा निशया च शशी**
**शशिना निशया च विभाति नभः ।**
**कविना च सभा सभया च कविः**
**कविना सभया च विभाति नृपः ॥ ७६६ ॥**

चंद्रानें रात्रि व रात्रीनें चंद्र आणि चंद्र व रात्रि यांनीं आकाश शोभतें, कविनें सभा व सभेनें कवि आणि कवि व सभा यांनीं राजा शोभतो ॥ ७६६ ॥

**तरुणा च गिरिर्गिरिणा च तरुस्तरुणा गिरिणा च विभाति वनम् ।**
**धनिनाऽनुचरोऽनुचरेण धनी धनिनाऽनुचरेण विभाति धनम् ७६७॥**

वृक्षानें पर्वत व पर्वतानें वृक्ष आणि पर्वत व वृक्ष यांनीं वन शोभतें; तसेंच स्वामीनें सेवक व सेवकानें स्वामी आणि स्वामी व सेवक यांनीं ऐश्वर्य शोभतें ॥ ७६७ ॥

परंतु जे नोकर काम करण्यामध्यें बरोबर ध्यान देत नाहींत किंवा चांगली दानत ठेवीत नाहींत आणि कांहीं सांगण्यांत आल्यास उलट बोलतात अशा नोकरांस ठेवूं नये. कारण ते एखाद्या वेळीं नुकसान करतात. विदुरनीतींत सांगितलें आहे कीं,

**वाक्यं तु यो नाद्रियतेऽनुशिष्टः प्रत्याह यश्चापि नियुज्यमानः ।**
**प्रज्ञाभिमानी प्रतिकूलवादी त्याज्यः स तादृक् त्वरयैव भृत्यः ॥७६८॥**

जो भृत्य शिकवून तयार केलेला, सांगितलेल्याचा अनादर करतो, कामांत योजिला असतां प्रत्युत्तर करतो, व स्वतःस शहाणा समजणारा व प्रतिकूल बोलणारा असेल, अशा भृत्याचा लवकरच त्याग करावा ॥ ७६८ ॥

**दुष्टा भार्या शठं मित्रं भृत्यश्चोत्तरदायकः ।**
**ससर्पे च गृहे वासो दुःखमेव न संशयः ॥ ७६९ ॥**

दुष्ट स्त्री, शठ मित्र, उलट जबाब देणारा भृत्य, व सर्पयुक्त गृहीं वास हीं सर्व साक्षात् दुःखेंच आहेत यांत संशय नाहीं ॥ ७६९ ॥

तसेंच जो मालक वाटेल तितकें काम केलें तरी दया ठेवीत नाहीं, अपशब्द बोलतच राहतो, मेहनतीचा मोबदला देण्याचे वेळीं संकोच करतो, अशा नीचाची नोकरी नोकरानें जेथपर्यंत आपणास इतरत्र कोठेंच मिळाली नाहीं तेथपर्यंतच करावी. कारण मध्येंच सोडिली असतां वृत्तीचा भंग होतो, करितां संधि आल्यानंतर त्याची नोकरी सोडून द्यावी. चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**यो ध्रुवाणि परित्यज्य अध्रुवं परिसेवते ।**
**ध्रुवाणि तस्य नश्यन्ति अध्रुवं नष्टमेव च ।। ७७० ।।**

जो निश्चित कार्य सोडून अनिश्चित कार्य सेवन करण्यास जातो, त्याचें निश्चित कार्य नाश पावतें व अनिश्चित तर नाश पावलेलेंच आहे ।। ७७० ।।

**चलत्येकेन पादेन तिष्ठत्येकेन बुद्धिमान् ।**
**नासमीक्ष्य परं स्थानं पूर्वमायतनं त्यजेत् ।। ७७१ ।।**

ह्मणून बुद्धिमान् मनुष्य एका पायानें चालून दुसऱ्या पायानें उभा रहातो. कारण दुसरें स्थान पाहिल्यावांचून पहिलें स्थान सोडूं नये ।। ७७१ ।।

तसेंच शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**स्वशङ्कितानां सामीप्यं त्यजेद्वै नीचसेवनम् ।। ७७२ ।।**

आपणास ज्यांची शंका येते त्यांचें सामीप्य व नीचाचें सेवन सोडून द्यावें ।। ७७२ ।।

पुनः पशूंची उपेक्षा केल्यानें त्यासंबंधीं नुकसान होतें. कारण पशू नेहमीं पराधीन असतात. चारा घातला तर खातील, पाणी पाजलें तर पितील व विश्रांति दिली तर विसावा घेतील. वाणी नसल्यानें पशू आपली भूक, तहान व श्रम समजवूं शकत नाहींत. शंकराचार्यांनीं ह्मटलें आहे कीं,

**सततं प्रवाह्यमाणैरश्वैरुष्ट्रैः खरैर्गजैर्महिषैः ।**
**हा कष्टं क्षुत्क्षामैः श्रान्तैर्नो शक्यते वक्तुम् ।। ७७३ ।।**

अहा ! नेहमीं भार उचलणारे घोडे, उंट, गाढव, हत्ती, आणि रेडे भुकेनें दुर्बल झाले व थकून गेले असले तरीहि सांगण्यास समर्थ होत नाहींत ! ही मोठी कष्टाची गोष्ट आहे ।। ७७३ ।।

करितां मनुष्यानें आपल्या पशूंस खाणें, पिणें व विसावा देऊन मुलांप्रमाणें त्यांचा संभाळ करावा, व त्यांच्या जवळून योग्य ती मेहनत करवावी, परंतु बांधून ठेवूं नये. कारण बांधून ठेविल्यानें तें फिरविल्याशिवायचीं पानें व रोटी यांच्यासारखे बिघडून जातात, अर्थात् अतिशय मस्त होऊन स्वाधीन राहत नाहींत. नंतर ते ज्यावेळीं वृद्ध होतील त्यावेळीं त्यांस थोडी मेहनत देऊन त्यांचें पालन करावें. परंतु ज्यांनीं स्वतःचें सर्व आयुष्य आपलें काम

करण्यांत काढलें असेल अशा त्या जनावरांस वृद्धावस्थेंत टाकून देऊन दुःखी होऊं देऊं नये. तसेंच धन व विद्या यांची उपेक्षा केल्यानें दोन्ही व्यर्थ होतात, व कधींहि संपादन होत नाहींत. करितां बेदरकार न राहतां वाटेल तें करून विद्या व धन संपादन करावें आणि शिकलेली विद्या विसरून जाऊं नये यासाठीं मोठेपणींहि आवृत्ति ठेवावी, व आयाच्या प्रमाणांत आयाहून खर्च कमी ठेवून थोडा थोडा द्रव्याचा संग्रह करीत जावें. कारण एखादे वेळीं आपत्ति आली तर संग्रह केलेलें द्रव्य उपयोगी पडतें. ह्मणून पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**अजरामरवत् प्राज्ञो विद्यामर्थं च चिन्तयेत् ।**
**गृहीत इव केशेषु मृत्युना धर्ममाचरेत् ॥ ७७४ ॥**

बुद्धिमान् मनुष्यानें स्वतःस अजर व अमर समजून विद्या आणि धन संपादन करावें, व केशांचे ठिकाणीं मृत्यूनें पकडलें आहे असें समजून धर्माचरण करावें ॥ ७७४ ॥

**शनैः पन्थाः शनैः कन्था शनैः पर्वतमस्तके ।**
**शनैर्विद्या शनैर्वित्तं पञ्चैतानि शनैः शनैः ॥ ७७५ ॥**

मार्ग क्रमणें, गोदडी शिवणें, पर्वताच्या माथ्यावर चढणें, विद्या शिकणें व द्रव्य मिळविणें हीं पांच कार्यें हळुहळू करावीं ॥ ७७५ ॥

तसेंच चाणक्यनीतींतहि सांगितलें आहे कीं,

**जलविन्दुनिपातेन क्रमशः पूर्यते घटः ।**
**स हेतुः सर्वविद्यानां धर्मस्य च धनस्य च ॥ ७७६ ॥**

पाण्याचा एकेक विंदु पडल्यानें क्रमानें घडा भरून जातो, तोच हेतु सर्व विद्या, धर्म, व धन यांच्या संग्रहाविषयीं जाणावा ॥ ७७६ ॥

**अनालोच्य व्ययं कर्ता अनाथकलहप्रियः ।**
**आतुरः सर्वकार्येषु नरो दुःखैर्नियुज्यते ॥ ७७७ ॥**

विचार केल्याशिवाय खर्च करणारा, गरिबांशीं तंटा करण्याविषयीं उत्साही आणि सर्व कार्यांमध्यें उतावीळपणा करणारा मनुष्य दुःख पावतो ॥ ७७७ ॥

तसेंच चांगल्या माणसांची नोकरी करण्यांत उपेक्षा केल्यानें नुकसान होतें, कारण कामांत गडवड केल्यामुळें चांगल्या मालकाचाहि नोकरावर रोष होतो, त्यामुळें त्याच्या जीविकेमध्यें बढती होण्याच्या ऐवजीं घटती होण्याची धास्ती असते. ह्मणून तशा मालकाची नोकरी तन-मन लावून अशी करावी कीं, ज्यामुळें तो प्रसन्न होईल व आपला पगार वाढेल. पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**दाता क्षमी गुणग्राही स्वामी दुःखेन लभ्यते ।**
**शुचिर्दक्षोऽनुरक्तश्च नूनं भृत्योऽपि दुर्लभः ॥ ७७८ ॥**

उदार, क्षमावान्, व गुणग्राहक मालक, तसाच शुद्ध मनाचा, चतुर व भक्तिमान् नोकर हे दोन्ही दुर्लभ होत ॥ ७७८ ॥

आतां शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**मातृपितृगुरुस्वामिभ्रातृपुत्रसखिष्वपि ।**
**न विरुध्येन्नापकुर्यान्मनसापि क्षणं क्वचित् ॥ ७७९ ॥**

माता, पिता, गुरु, स्वामी, भ्राता, पुत्र आणि मित्र यांच्याशीं केव्हांहि मनानेंहि क्षणमात्रहि विरोध व यांचा अपकार करूं नये ॥ ७७९ ॥

**स्वजनैर्न विरुध्येत न स्पर्द्धेत बलीयसा ।**
**न कुर्यात्स्त्रीबालवृद्धमूर्खेषु च विवादनम् ॥ ७८० ॥**

तसेंच संबंध्यांशीं विरोध करूं नये, बलवंताशीं स्पर्धा करूं नये, व स्त्री, बालक, वृद्ध आणि मूर्ख यांच्याशीं विवाद करूं नये ॥ ७८० ॥

कारण माता पिता वगैरे संबंध्यांशीं विरोध केल्यामुळें एकटा पडतो, लोकांमध्यें अपकीर्ति होते आणि व्यावहारिक कार्यप्रसंगीं मोह पावतो. कारण त्यांच्याशीं ऐक्य नसेल तर ते तशा प्रसंगीं येत नाहींत, त्यामुळें लोकांमध्यें आपणास वाईट वाटतें, म्हणून त्यांच्याशीं कधीं विरोध करूं नये. तसाच इतर लोकांशींहि विरोध करूं नये. याच ग्रंथाच्या याच अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**उत्कर्षो नैव नित्यः स्यान्नापकर्षस्तथैव च ।**
**तस्मात्सर्वेषु भूतेषु मैत्रीं नैव च हापयेत् ॥ ७८१ ॥**

नेहमींच उत्कर्ष असत नाहीं किंवा अपकर्षहि राहत नाहीं, म्हणून सर्व प्राण्यांशीं स्नेह ठेवावा ॥ ७८१ ॥

कारण पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**बलोपपन्नोऽपि हि बुद्धिमान्नरः**
**परं नयेन्न स्वयमेव वैरिताम् ।**
**भिषङ्ममास्तीति विचिन्त्य भक्षयेत्**
**अकारणात् को हि विचक्षणो विषम् ॥ ७८२ ॥**

बुद्धिमान् मनुष्यानें स्वतः बलवान् असतांहि दुसऱ्यास वैरी करूं नये, कारण "वैद्य माझा आहे" असें समजून कारणाशिवाय कोणचा शहाणा विष भक्षण करील ? ॥ ७८२ ॥

**दन्तस्य निष्कोषणकेन नित्यं कर्णस्य कण्डूयनकेन वापि ।**
**तृणेन कार्यं भवतीश्वराणां किमङ्ग वाग्घस्तवता नरेण ॥ ७८३ ॥**

पुनः राजांसहि दांत व कान कोरण्यासाठीं तृणाचा उपयोग होतो, तर वाणी व हात—पाय असणाऱ्या मनुष्याचा उपयोग होईल यांत काय सांगावें ! ॥७८३॥

**बहवो न विरोद्धव्या दुर्जयास्तेऽपि दुर्बलाः ।**
**स्फुरन्तमपि नागेन्द्रं भक्षयन्ति पिपीलिकाः ॥ ७८४ ॥**

तसाच अनेकांशीं विरोध करूं नये, कारण ते दुर्बल असले तरीहि जिंकण्यास अशक्य असतात, कारण फुस्कारा मारणाऱ्या मोठ्या सर्पासहि मुंग्या खाऊन टाकितात ॥ ७८४ ॥

तसेंच विदुरनीतींत सागितलें आहे कीं,

**संभोजनं संकथनं संप्रीतिश्च परस्परम् ।**
**ज्ञातिभिः सह कार्याणि न विरोधः कदाचन ॥ ७८५ ॥**

ज्ञातिवर्गाशीं परस्पर चांगल्या रीतीनें—भोजन करावें, बोलावें चालावें व प्रीति करावी, परंतु केव्हांहि विरोध करूं नये ॥ ७८५ ॥

तसेंच बलवंताशीं वैर केल्यामुळें झोंप येत नाहीं, खर्चानें घर धुवून साफ होतें व परिणामीं लाभ न होतां दुःख होतें. श्रीमहाभारतांतर्गत उद्योगपर्वांत विदुरानें धृतराष्ट्रास सांगितलें आहे कीं,

**अभियुक्तं बलवता दुर्बलं हीनसाधनम् ।**
**हृतस्वं कामिनं चोरमाविशन्ति प्रजागराः ॥ ७८६ ॥**

बलवंताशीं वैर केल्यानें साधनशून्य अशा दुर्बलास, ज्याचें द्रव्य लुटलें गेलें त्यास, आणि कामी व चोर यांस जागरणें होतात ॥ ७८६ ॥

**अपकृत्य बुद्धिमतो दूरस्थोऽस्मीति नाश्वसेत् ।**
**दीर्घौ बुद्धिमतो बाहू याभ्यां हिंसति दूरतः ॥ ७८७ ॥**

बुद्धिमानाचा अपकार करून ' मी दूर आहे ' असा विश्वास धरूं नये, कारण बुद्धिमान् मनुष्याचे हात लांब असतात, ज्यांच्या योगें तो दुरूनहि मारूं शकतो ॥ ७८७ ॥

तसेंच पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**बलीयसा हीनबलो विरोधं न भूतिकामो मनसाऽपि वाञ्छेत् ।**
**न वध्यतेऽत्यन्तबलो हि यस्माद्व्यक्तं प्रणाशोऽस्ति पतङ्गवृत्तेः॥७८८॥**

समृद्धी इच्छिणाऱ्या दुर्बलानें बलवंताशीं विरोध करण्याविषयीं मनांतहि आणूं नये, कारण अतिशय बलवान् मारिला जात नाहीं, परंतु पतंगाच्या वृत्तीचा आश्रय करणाऱ्या दुर्बलाचा नाश व्यक्त आहे ॥ ७८८ ॥

**अनुचितकर्मारंभः स्वजनविरोधो बलीयसा स्पर्धा ।**
**दुष्टस्त्रीविश्वासो ह्यापद्द्वाराणि चत्वारि ॥ ७८९ ॥**

अयोग्य कर्माचा आरंभ, स्वजनाशीं वैर, बलवंताशीं स्पर्धा आणि दुष्ट स्त्रीचा विश्वास हीं चार आपत्तीचीं द्वारें होत ॥ ७८९ ॥

पुनः माघकवीनें शिशुपालवधांत सांगितलें आहे कीं,

**विधाय वैरं सामर्षे नरोऽरौ य उदासते ।**
**प्रक्षिप्योदर्चिषं कक्षे शेरते तेऽभिमारुतम् ॥ ७९० ॥**

जे मनुष्य क्रोधी शत्रूशीं वैर करून गैरसावध राहतात, ते सुक्या गवताच्या राशींत अग्नि टाकून त्याच्या जवळ वाऱ्यासमोर झोंपून राहतात ॥ ७९० ॥

तसेंच स्त्री, बाल, वृद्ध आणि मूर्ख यांच्याशीं वाद केल्यानें खेद होतो. कारण स्त्रीच्या अनुकूलतेनें घरांत सुख असतें व ती जर प्रतिकूल असेल

तर दुःख होतें. वाद करण्यामध्यें कांहीं बोलण्याचा नियम न राहिल्यानें एखादे वेळीं अपशब्द बोलण्यांत येतो; त्यामुळें घरामध्यें क्लेश उत्पन्न होऊन स्त्री व पुरुष दोघेंहि पश्चात्ताप पावतात. तसेंच परस्त्रीशीं वाद करूं नये, कारण स्त्रीजाति नेहमीं पुरुषाहून दुर्बल असते; त्यामुळें त्यांच्याशीं विवेकानें वागणें हा पुरुषाचा धर्म आहे. त्या ठिकाणीं विवेक सोडून वाद केला तर त्यांस दुःख होतें व लोकांत अपकीर्ति होते. तसेंच बालकाशीं वाद न करण्याचें कारण तें अज्ञानी असतें, त्यामुळें सांगितलेलें ऐकत नाहीं, ह्मणून त्यास समजावून काम करून घ्यावें, वृद्धाशीं वाद न करण्याचें कारण कीं, तो सर्वांस मान्य असल्यामुळें त्यास वाईट वाटेल. कदाचित् तो विद्वान् किंवा अविद्वान् असेल, तरीहि वयानें वृद्ध असल्यामुळें सर्वांनीं मान देण्यालायक आहे. तसेंच पंडितंमन्य मूर्खाशीं वाद केल्यानें तो समजण्याच्या ऐवजीं शत्रु होतो. कारण जसें प्रकाश व तिमिर यांचें स्वाभाविक वैर आहे, तसें विद्यारूप प्रकाश ज्यास प्राप्त झाला आहे अशा मनुष्याशीं अविद्यारूप अंधकारानें आच्छादित झालेल्या बुद्धीच्या मनुष्याचें स्वाभाविक वैर असतें. आणि त्यामध्यें जर वाद होईल तर वैरांत भर पडेल यांत आश्चर्य नाहीं. पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**उपदेशो हि मूर्खाणां प्रकोपाय न शान्तये ।**
**पयःपानं भुजङ्गानां केवलं विषवर्धनम् ॥ ७९१ ॥**

मूर्खांस उपदेश क्रोध उत्पन्न करतो, परंतु शांति उत्पन्न करीत नाहीं, कारण सर्पांस दूध पाजलें असतां त्यापासून केवळ विष वाढण्याच्या पलीकडे दुसरा लाभ होत नाहीं ॥ ७९१ ॥

**प्रायेणात्र कुलान्वितं कुकुलजाः श्रीवल्लभं दुर्भगा**
**दातारं कृपणा ऋजूननृजवो वित्ते स्थितं निर्धनाः ।**
**वैरूप्योपहताश्च कान्तवपुषं धर्माश्रयं पापिनो**
**नानाशास्त्रविचक्षणं च पुरुषं निन्दन्ति मूर्खाः सदा ॥७९२॥**

बहुतकरून नेहमीं या लोकांत कुलीनाची दुष्कुलीन, चांगल्या भाग्यवंताची दुर्भागी, दात्याची कृपण, सरळांची लुच्चे, धनिकांची निर्धन, रूपवंतांची कुरूप, धर्मिष्ठांची पापी, आणि नानाप्रकारच्या शास्त्रांमध्यें चतुर असलेल्या पुरुषांची मूर्ख लोक निंदा करितात ॥ ७९२ ॥

पुनः सांगितलें आहे कीं,

**कोलाहले काककुलस्य जाते विराजते कोकिलकूजितं किम् ।**
**परस्परं संवदतां खलानां मौनं विधेयं सततं सुधीभिः ॥ ७९३ ॥**

कावळ्यांचा कोलाहल चालला आहे त्यांत कोकिळाचें कूजित शोभतें काय ? करितां परस्पर वाद करणाऱ्या मूर्खांच्या समुदायामध्यें बुद्धिमानांनीं निरंतर मौन धारण करावें ॥ ७९३ ॥

**मुक्ताफलैः किं मृगपक्षिणां च मिष्टान्नपानं किमु गर्दभानाम् ।**
**अन्धस्य दीपो बधिरस्य गीतं मूर्खस्य किं सत्यकथाप्रसङ्गः ॥ ७९४ ॥**

मृग, पक्षी यांस मुक्ताफळांनीं काय ? गाढवांस मिष्ट अन्नपानांनीं काय ? तसेंच अंधास दीप, बहिऱ्यास गायन व मूर्खास सत्य गोष्टीचा प्रसंग काय उपयोग ? ॥ ७९४ ॥

**हंसो न भाति बलिभोजनवृन्दमध्ये**
**गोमायुमण्डलगतो न विभाति सिंहः ।**
**जात्यो न भाति तुरगः खरयूथमध्ये**
**विद्वान्न भाति पुरुषेषु निरक्षरेषु ॥ ७९५ ॥**

कावळ्यांच्या टोळीमध्यें हंस, कोल्ह्यांच्या टोळीमध्यें सिंह, गाढवांच्या टोळीमधें जातिवान् घोडा आणि निरक्षर पुरुषांमध्यें विद्वान् शोभत नाहीं ॥ ७९५ ॥

**हंसो विभाति सरसीरुहवृन्दमध्ये**
**सिंहो विभाति सततं गिरिगह्वरेषु ।**
**जात्यो विभाति तुरगो रणभूमिमध्ये**
**विद्वान् विभाति पुरुषेषु विचक्षणेषु ॥ ७९६ ॥**

तर निरंतर हंस कमलांच्या समूहामध्यें, सिंह पर्वताच्या गुहेमध्यें, जातिवान् घोडा रणभूमीच्या ठिकाणीं, आणि विद्वान् सुरक्षित पुरुषांमध्यें शोभतो ॥ ७९६ ॥

आतां शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**न कंचिदात्मनः शत्रुं नात्मानं कस्यचिद्रिपुम् ।**
**प्रकाशयेन्नापमान्नं न च निःस्नेहतां प्रभोः ॥ ७९७ ॥**

आपल्याविषयीं एखाद्याची शत्रुता व एखाद्याविषयीं आपली शत्रुता, अपमान व धन्याची गैरमर्जी इतकीं प्रसिद्ध करूं नयेत ॥ ७९७ ॥

कारण अमुक माझा शत्रु आहे व अमक्याचा मी शत्रु आहें असें प्रसिद्धपणें सांगितल्यामुळें परस्परांच्या शत्रुतेमध्यें भर पडते, आणि नंतर मित्रता होण्याची आशा न राहतां परिणामीं दुःख होतें. तसाच आपला झालेला अपमान प्रसिद्ध केल्यानें प्रतिष्ठा कमी होते व आपणास हलकेपणा येतो. तशीच राजा व धनी यांची गैरमर्जी प्रसिद्ध केल्यानें आपल्या वागणुकीविषयीं लोकांत खराब मत होतें; त्यामुळें पुनः आपली वृत्ति मिळविण्यामध्यें हानि होते. पुनः चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**अर्थनाशं मनस्तापं गृहिणीचरितानि च ।**
**दानमानापमानं च मतिमान्न प्रकाशयेत् ॥ ७९८ ॥**

बुद्धिमंतानें धनाचा नाश, मनाचा संताप, स्त्रीचें चरित्र, केलेला परोपकार, मिळालेला मान आणि झालेला अपमान हीं प्रसिद्ध करूं नयेत ॥ ७९८ ॥

कारण धनाचा नाश सांगितल्यानें आपली गाफिलता दिसून येते, उपहास होतो आणि तो कदाचित् शक्तीच्या बाहेर गेला असेल तर आपल्या काळजास धक्का पोहोंचतो. तसेंच मनाचा खेद व स्त्रीचें आचरण मित्रावांचून इतरांस सांगितल्यानें तें दुःख तो घालवीत नाहीं, तर उलट थट्टा करतो. तसाच कोणावर उपकार केला असेल व आपणास कोठेंहि मान मिळाला असेल तर तो दुसऱ्यास बोलून दाखविल्यानें स्वतःस कमीपणा येतो, व लोकांमध्यें मागाहून मस्करी होते. चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**परप्रोक्ता गुणा यस्य निर्गुणोऽपि गुणी भवेत् ।**
**श्रेष्ठोऽपि लघुतां याति स्वयं प्रख्यापितैर्गुणैः ॥ ७९९ ॥**

दुसऱ्यानें ज्याचे गुण वर्णन केले तो निर्गुणी असला तरीहि गुणी होतो, परंतु आपले गुण आपणच प्रसिद्ध केल्यानें श्रेष्ठ असला तरीहि लघुत्वास प्राप्त होतो ॥ ७९९ ॥

**दाने तपसि शौर्ये वा विज्ञाने विनये नये ।**
**विस्मयो न हि कर्तव्यो बहुरत्ना वसुन्धरा ॥ ८०० ॥**

आपल्या ठिकाणीं परोपकार, इंद्रियनिग्रह, शौर्य, विज्ञान, विनय व नीति इत्यादि गुण असतील तर, त्याविषयीं विस्मय पावूं नये, कारण पृथ्वीवर एकाहून एक सरस अशीं अनेक रत्नें पडलेलीं आहेत ॥ ८०० ॥

आतां शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**क्रयविक्रयातिलिप्सां स्वं दैन्यं दर्शयेन्नहि ।**
**कार्यं विनाऽन्यगेहे न नाज्ञातः प्रविशेदपि ॥ ८०१ ॥**

क्रय किंवा विक्रय करणें यांविषयीं अतिशय औत्सुक्य व आपलें दैन्य दाखवूं नये आणि दुसऱ्याच्या घरीं कार्याशिवाय जाऊं नये, व प्रसंगविशेषीं जावें लागलें तर त्यास कळविल्यावांचून घरांत प्रवेश करूं नये ॥ ८०१ ॥

कारण माल विकत घेण्याच्या किंवा विकण्याच्या वेळीं अतिशय गरज किंवा दीनता दाखविल्यानें आपलें कार्य बरोबर सिद्ध होत नाहीं. कां कीं ज्याच्याजवळून माल विकत घेण्यांत येईल त्यास अतिशय गरज दाखविल्यानें तो भाव चापून घेतो, आणि दैन्य दाखविल्यानें माल मिळणार नाहीं. तसेंच ज्यास माल विकण्यांत येईल त्यास अर्थात् ग्राहकास अतिशय गरज दाखविली असेल तर तो बाजारभावाहून माल कमी भावानें मागतो, व दीनता दाखविली असेल तर अतिशय कमी भावानें माल पाडून घेण्याची इच्छा करतो, करितां वाटेल तेवढी गरज आणि गरीबी असली तरी वरून आवडंबर दाखवावा. पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**निर्विषेणापि सर्पेण कर्तव्या महती फणा ।**
**विषमस्तु न चाप्यस्तु फटाटोपो भयङ्करः ॥ ८०२ ॥**

विषरहित सर्पानेंहि मोठी फणा चढवावी, कारण विष असो वा नसो, तरीहि फणेचा अवडंबरच भयंकर आहे ॥ ८०२ ॥

पुनः माल घेणें विकणें वगैरे सर्व व्यवहार लिहून करावा, आणि कोणाकडूनहि भीड पडून किंवा आग्रह होऊन आपल्या घरामध्यें हानि होईल असें करूं नये तसेंच मान—अपमानाच्या भीतीनें बोलण्या—चालण्यांत लाजूं नये. कारण ज्याच्या जवळून आपला स्वार्थ साधावयाचा असतो, त्याचें मन धरावें लागतें. शुक्र नीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**नैवास्ति लिखितादन्यत्स्मारकं व्यवहारिणाम् ।**
**न लेख्येन विना कुर्याद्व्यवहारं सदा बुधः ॥ ८०३ ॥**

व्यवहारी मनुष्यांस लिहिण्यासारखें दुसरें स्मरण करणारें साधन नाहीं, करितां बुद्धिमानांनीं नेहमीं लिहिल्यावांचून व्यवहार करूं नये ॥ ८०३ ॥

पुनः पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**न स्वल्पस्य कृते भूरि नाशयेन्मतिमान्नरः ।**
**एतदेवात्र पाण्डित्यं यत्स्वल्पाद्भूरिरक्षणम् ॥ ८०४ ॥**

बुद्धिमान् मनुष्यानें थोडयाकरितां पुष्कळाचा नाश करूं नये, कारण या लोकांत थोडयाची उपेक्षा करून पुष्कळाचें रक्षण करणें यांतच शहाणपणा आहे ॥ ८०४ ॥

**नात्यन्तं सरलैर्भाव्यं गत्वा पश्य वनस्थलीम् ।**
**छिद्यन्ते सरलास्तत्र कुब्जास्तिष्ठन्ति पादपाः ॥ ८०५ ॥**

अत्यंत सरळपणानें वागूं नये, कारण अरण्यांत जाऊन पहा, तर तेथें सरळ वृक्ष कापिले जातात, व वांकडे तसेच कायम राहतात ॥ ८०५ ॥

**धनधान्यप्रयोगेषु विद्यासंग्रहणेषु च ।**
**आहारे व्यवहारे च त्यक्तलज्जः सुखी भवेत् ॥ ८०६ ॥**

धन, धान्य, व विद्या . संपादन करण्यामध्यें, आणि आहार व व्यवहार यांचे ठिकाणीं जो लज्जा सोडील तो सुखी होतो ॥ ८०६ ॥

**अवमानं पुरस्कृत्य मानं कृत्वा च पृष्ठतः ।**
**स्वार्थं च साधयेद्धीमान् स्वार्थभ्रंशो हि मूर्खता ॥ ८०७ ॥**

बुद्धिमान् पुरुषानें अपमान पुढें व मान मागें ठेवून स्वार्थ साधावा, कारण स्वार्थाचा नाश करणें हेंच मूर्खाचें लक्षण आहे ॥ ८०७ ॥

तसेंच भर्तृहरीनें सांगितलें आहे कीं,

**क्वचिद्भूमौ शय्या क्वचिदपि च पर्यङ्कशयनः**
**क्वचिच्छाकाहारः क्वचिदपि च शाल्योदनरुचिः ।**
**क्वचित्कन्थाधारी क्वचिदपि च दिव्याम्बरधरो**
**मनस्वी कार्यार्थी न गणयति दुःखं न च सुखम् ॥ ८०८ ॥**

कधीं पृथ्वीवर तर कधीं पलंगावर शयन, कधीं शाकमात्राचा तर कधीं मिष्टान्नाचा आहार आणि कधीं गोधडी व कधीं सुंदर पितांबर मिळाला, तरीहि कार्य साधणारा चतुर दुःख व सुख यांची पर्वा करीत नाहीं ॥ ८०८ ॥

तसेंच कार्यावांचून कोणाचे येथें गेल्यानें अपमान होतो व त्या घरधन्यास संशय येतो; पुनः घरधन्यास कळविल्यावांचून त्याच्याजवळ एकाएकीं जाणें हें विचारीपणाचें होत नाहीं. कारण त्यास भेटण्यास येणाऱ्याची बातमी नसल्यानें, तो वाटेल त्या स्थितींत बसलेला असल्याकारणानें परक्यास पाहून शरमून जातो व त्याच्यावर रागावतो. करितां तसें न करतां जो धनी भेटावयास येणारांशीं विवेकानें वागेल, त्याच्या घरीं काम पडेल त्यावेळीं जावें. परंतु दिवसभर तेथें पडून राहूं नये. पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**एह्यागच्छ समाश्रयासनमिदं कस्माच्चिराद्दृश्यसे**
**का वार्ता कुशलोऽस्ति बालसहितः प्रीतोऽस्मि ते दर्शनात् ।**
**एवं ये समुपागतान्प्रणयिनः प्रह्लादयन्त्यादरात्**
**तेषां युक्तमशङ्कितेन मनसा हर्म्याणि गन्तुं सदा ॥ ८०९ ॥**

"ओहो! या या! या आसनावर बसा, फार दिवसांनीं कां बरें दिसलां! काय बातमी आहे? मुलांबाळांसह तुमचें क्षेम आहे ना? तुमच्या दर्शनानें मी प्रसन्न झालों आहे," याप्रकारें आलेल्या स्नेह्यास जो संतुष्ट करील त्याचे घरीं नेहमीं मनांत कांहीं शंका न ठेवतां जाणें योग्य आहे ॥ ८०९ ॥

**नाभ्युत्थानक्रिया यत्र नालापा मधुराक्षराः ।**
**गुणदोषकथा नैव तत्र हर्म्ये न गम्यते ॥ ८१० ॥**

परंतु जेथें समोर उभा होण्याची क्रिया, मधुर भाषण आणि गुण-दोष-विषयक प्रश्न करण्याची रीत नाहीं त्या घरीं जाऊं नये ॥ ८१० ॥

कारण चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**परसदननिविष्टः को लघुत्वं न याति ॥ ८११ ॥**

दुसऱ्याच्या घरीं गेल्यानें कोण लघुत्वास पावत नाहीं ॥ ८११ ॥

करितां सांगितलें आहे कीं,

**अतिपरिचयादवज्ञा सन्ततगमनादनादरो भवति ।**
**मलये भिल्लपुरन्ध्री चन्दनतरुकाष्ठमिन्धनं कुरुते ॥ ८१२ ॥**

अतिशय परिचयानें तिरस्कार व निरंतर गमनानें अनादर होतो. कारण मलय पर्वतावर राहणारी भिल्लाची स्त्री अतिशय परिचय असल्याकारणानें चंदनवृक्षाच्या काष्ठांस जाळण्याचीं इंधनें करिते ॥ ८१२ ॥

आतां शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**कालं नियम्य कार्याणि ह्याचरेन्नान्यथा क्वचित् ।**
**गच्छेदनियमेनैव सदैवान्तःपुरं नरः ॥ ८१३ ॥**

पुरुषानें वेळ ठरवून त्याप्रमाणें कार्यें करावीं, कधींच अन्यथा करूं नयेत, परंतु अंतःपुरांत मात्र नेहमीं वेळ ठरविल्यावांचून जावें ॥ ८१३ ॥

वेळ नेमून काम केल्यानें सर्व कामें चांगल्या प्रकारें होऊं शकतात. नित्य मनुष्यास अनेक कामें असतात. प्रत्येक कामाकरितां वेळ न नेमिली असेल तर घोंटाळा होऊन जातो व एक काम सुरू केलें असतां दुसऱ्या बाजूनें नुकसान होतें. कामें नित्याचीं आहेत व तीं आयुष्यभर करावयाचीं

असतात. करितां प्रत्येक दिवशीं अमुक काम अमुक वेळपर्यंत करण्याचा नियम ठरवून सर्व कामें चांगल्याप्रकारें पार पाडतां येतील त्याप्रमाणें वागावें. आणि बरोबर वेळ विश्रांति घेण्याकरितां ठरवावा. कारण मानसिक किंवा शारीरिक मेहनत केली असतां शरीरास थकवा येण्याचा संभव आहे; तो जाण्याकरितां दिवसांतून थोडा वेळपर्यंत खेळ गंमत करण्याची व रात्रीं आराम घेण्याची जरूर आहे. परंतु हा फुरसतीचा वेळ इकडेतिकडे फिरून दुर्जनाच्या सोबतींत घालवूं नये. कारण पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**काव्यशास्त्रविनोदेन कालो गच्छति धीमताम् ।**
**व्यसनेन च मूर्खाणां निद्रया कलहेन वा ॥ ८१४ ॥**

बुद्धिमान् पुरुषांचा वेळ काव्य व शास्त्र यांच्या विनोदानें जातो, व मूर्खांचा वेळ व्यसन, निद्रा व कलह यांनीं जातो ॥ ८१४ ॥

याप्रमाणें वेळ बांधून काम करण्यास सांगितलें आहे; परंतु अंतःपुरांत वेळ नेमल्यावांचून जाण्यास सांगण्याचें कारण हें आहे कीं, कदाचित् घरांतील स्त्री दुष्ट असेल तर स्वामीच्या एकाएकीं येण्याच्या भयानें आडमार्गानें जाऊं शकणार नाहीं. कारण पति सर्व गुणांनीं संपूर्ण असला तरीहि—सच्छील स्त्रीच्या दुष्ट पतीप्रमाणें—दुष्ट स्त्री असल्यास आडरस्त्यानें जाण्याचा संभव आहे. पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**प्रायेण भूमिपतयः प्रमदा लताश्च**
**यः पार्श्वतो भवति तं परिवेष्टयन्ति ॥ ८१५ ॥**

बहुतकरून दुष्ट राजा, दुष्ट स्त्री आणि लता, यांचा स्वभाव असा आहे कीं, जो सन्निध असेल त्यासच वेंटाळून धरतात ॥ ८१५ ॥

आतां शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**दीर्घदर्शी सदा च स्यात्प्रत्युत्पन्नमतिः क्वचित् ।**
**साहसी सालसी चैव चिरकारी भवेन्नहि ॥ ८१६ ॥**

नेहमीं दूरवर विचार करून कार्य करावें आणि एखादे वेळीं वेळेवर सुचेल तसें करावें; परंतु साहसी, आळसी व दीर्घसूत्री होऊं नये ॥ ८१६ ॥

कारण कोणत्याहि प्रकारचा आचार, भाषण व कार्य करण्यामध्यें दूरवर विचार केला नसेल, तर त्याचा परिणाम चांगला होत नाहीं. करितां प्रथम आपल्या आचरणाचा विचार करून, ज्यामुळें लोकांत अपकीर्ति व परिणामीं दुःख होईल असें दुराचरण जर आपल्यामध्यें असेल तर तें टाकण्याचा यत्न करावा आणि सरळ, शुद्ध आचरणानें वागावें. लोकांमध्यें तोंडावर कोणी वाईट बोलत नाहीं, कारण ज्यास खरें पण कटु बोलण्यांत येईल तो अतिशय घिसघिस करील व रागावेल, अशी बोलणाराच्या मनामध्यें भीति असते. करितां शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**प्रत्यक्षं दुर्गुणान्नैव वक्तुं शक्नोति कोऽप्यतः ।**
**स्वदुर्गुणान्स्वयं चातो विमृशेल्लोकशास्त्रतः ॥ ८१७ ॥**

प्रत्यक्ष दुर्गुण सांगण्यास कोणीहि समर्थ होत नाहीं, करितां आपल्या दुर्गुणांचा आपणच लोक व शास्त्र या दृष्टींनीं विचार करावा ॥ ८१७ ॥

तसेंच विदुरनीतींत सांगितलें आहे कीं,

**सुलभाः पुरुषा राजन् सततं प्रियवादिनः ।**
**अप्रियस्य च पथ्यस्य वक्ता श्रोता च दुर्लभः ॥ ८१८ ॥**

हे राजन्, नेहमीं प्रिय बोलणारे मनुष्य सुलभ आहेत, परंतु अप्रिय असें हित वाक्य सांगणारा व तसेंच तें ऐकणाराहि पुरुष दुर्लभ आहे ॥ ८१८ ॥

पुनः भोजप्रबंधांत सांगितलें आहे कीं,

**मनीषिणः सन्ति न ते हितैषिणो हितैषिणः सन्ति न ते मनीषिणः ।**
**सुहृच्च विद्वानपि दुर्लभो नृणां यथौषधं स्वादु हितं च दुर्लभम् ॥ ८१९ ॥**

जे बुद्धिमान् असतील ते हितेच्छु असत नाहींत व जे हितेच्छु असतील ते बुद्धिमान् असत नाहींत. करितां जसें स्वादिष्ट व गुणकारक औषध दुर्लभ आहे, तसा बुद्धिमान् व हितेच्छु पुरुषहि दुर्लभ आहे ॥ ८१९ ॥

तसेंच कोणत्याहि प्रकारचें भाषण पहिल्यापासून विचार केल्यावांचून केलें असेल तर जेथें जसें योग्य तेथें तसें बोलण्याच्या ऐवजीं कसें तरी बोललें जातें. त्यामुळें भलत्याचें भलतेंच होऊन लोकांमध्यें थट्टा होते किंवा एखादे

वेळीं एखाद्याशीं तंटा करण्याची वेळ येते. करितां शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**न दर्शयेत्स्वाभिमतमनुभूताद्विना सदा ।**
**प्रविचार्योत्तरं देयं सहसा न वदेत् क्वचित् ॥ ८२० ॥**

नेहमीं पूर्ण अनुभव मिळविल्यावांचून आपलें मत प्रदर्शित करूं नये व विचार करून उत्तर द्यावें. परंतु उतावळेपणानें कधींच बोलूं नये ॥ ८२० ॥

तसेंच शार्ङ्गधरपद्धतींत सांगितलें आहे कीं,

**अल्पाक्षररमणीयं यः कथयति निश्चितं स खलु वाग्मी ।**
**बहुवचनमल्पसारं यः कथयति विप्रलापी सः ॥ ८२१ ॥**

जो अल्पाक्षरांनीं रमणीय व निश्चययुक्त वाक्य सांगतो, त्यासच बोलण्यामध्यें चतुर ह्मणतात, परंतु जो सार थोडें असून शब्द पुष्कळ उच्चारतो तो वृथा बोलणारा बडबड्या जाणावा ॥ ८२१ ॥

तसेंच कोणत्याहि प्रकारचें कार्य विचार केल्याशिवाय करण्यांत येईल तर मोहून जातो, कार्य बरोबर सिद्ध होऊं शकत नाहीं. केलेली मेहनत फुकट जाते आणि लोकांमध्यें थट्टा होते. करितां आपल्या खऱ्या स्नेह्यांची सल्ला घेऊन परिणाम चांगला होईल त्याप्रकारें दूरवर विचार करून आपलें कार्य सिद्ध करावें, आणि कदाचित् ध्यानांत न येईल असें एकाएकीं काम येऊन पडेल तर तेथें धैर्य धरून समयसूचकता वापरून तें पार पाडावें. विदुरनीतींत सांगितलें आहे कीं,

**वनस्पतेरपक्वानि फलानि प्रचिनोति यः ।**
**स नाप्नोति रसं तेभ्यो बीजं चास्य विनश्यति ॥ ८२२ ॥**

जो वनस्पतीचीं कच्चीं फळें तोडतो, तो त्यांतून रस मिळवूं शकत नाहीं; व त्याचें बीजहि नाश पावतें ॥ ८२२ ॥

**यस्तु पक्वमुपादत्ते काले परिणतं फलम् ।**
**फलाद्रसं स लभते बीजाच्चैव फलं पुनः ॥ ८२३ ॥**

परंतु जो वेळेवर परिणाम पावून पक्व झालेलीं फळें ग्रहण करतो, तो फळांतून रस मिळवितो व पुनः बीजापासून फळें मिळवितो ॥ ८२३ ॥

**दिवसेनैव तत्कुर्याद्येन रात्रौ सुखं वसेत् ।**
**पूर्वे वयसि तत्कुर्याद्येन वृद्धः सुखं वसेत् ॥ ८२४ ॥**

दिवसास असें करावें कीं, ज्यामुळें रात्रीस सुखानें झोंप येईल आणि पूर्व अवस्थेमध्यें असें करावें कीं, ज्यामुळें वृद्धावस्थेंत सुख होईल ॥ ८२४ ॥

पुनः चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**अनागतविधाता च प्रत्युत्पन्नमतिस्तथा ।**
**द्वावेव सुखमेधेते दीर्घसूत्री विनश्यति ॥ ८२५ ॥**

पहिल्यापासून विचार करणारा व वेळेवर बुद्धि पोंचविणारा हे दोघे सुखी होतात; परंतु दीर्घसूत्री नाश पावतो ॥ ८२५ ॥

**उत्पन्नपश्चात्तापस्य बुद्धिर्भवति यादृशी ।**
**तादृशी यदि पूर्वं स्यात् कस्य न स्यान्महोदयः ॥ ८२६ ॥**

मनुष्यास पश्चात्तापाच्या वेळीं जशी बुद्धि होते, तशी जर पहिल्यानेंच होईल तर कोणाचा उत्कर्ष होणार नाहीं ? ॥ ८२६ ॥

तसेंच किरातार्जुनीयांत भारवीनें सांगितलें आहे कीं,

**सहसा विदधीत न क्रियामविवेकः परमापदां पदम् ।**
**वृणते हि विमृश्यकारिणं गुणलुब्धाः स्वयमेव संपदः ॥८२७॥**

एकाएकीं कोणतेंहि कर्म करूं नये,कारण अविवेक परम आपत्तीचें स्थान आहे, कारण विचार करून करणारास गुणलोभी संपत्ति स्वतः होऊन वरतात ॥८२७॥

**मतिरेव बलाद्गरीयसी यदभावे करिणामियं दशा ।**
**इति घोषयतीव डिण्डिमः करिणो हस्तिपकाहतः क्वणन् ॥८२८॥**

पुनः "बलाहून बुद्धि श्रेष्ठ आहे, कारण जीच्या अभावीं हत्तीची ही दशा" अशी जणूं हत्तीच्या माहुतानें वाजविलेला शब्द करणारा नगारा सर्वांस जाणीवच देत आहे कीं काय असें भासतें ॥ ८२८ ॥

बहुधा बहुभिः सार्द्धं चिन्तिताः सुनिरूपिताः ।
कथंचिन्न विलीयन्ते विद्वद्भिर्निश्चिता नयाः ॥ ८२९ ॥

बहुतकरून अनेक विद्वानांनीं बरोबर बसून विचारपूर्वक निरूपण करून निश्चित केलेला न्याय कोणत्याहि प्रकारें नाश पावत नाहीं ॥ ८२९ ॥

सुजीर्णमन्नं सुविचक्षणः सुतः
सुशासिता स्त्री नृपतिः सुसेवितः ।
सुचिन्त्य चोक्तं सुविचार्य यत्कृतं
सुदीर्घकालेऽपि न याति विक्रियाम् ॥ ८३० ॥

चांगल्या प्रकारें जीर्ण झालेलें अन्न, सुशिक्षित पुत्र, सुशासित स्त्री, सुसेवित राजा, चांगल्या प्रकारें विचारपूर्वक बोललेलें व केलेलें असेल तें सर्व दीर्घ काल गेला असतांहि विकार पावत नाहीं ॥ ८३० ॥

पुनः भर्तृहरीनें सांगितलें आहे कीं,

गुणवदगुणवद्वा कुर्वता कार्यजातं
परिणतिरवधार्या यत्नतः पण्डितेन ।
अतिरभसकृतानां कर्मणामाविपत्ते-
र्भवति हृदयदाही शल्यतुल्यो विपाकः ॥ ८३१ ॥

पंडितानें गुणयुक्त किंवा गुणरहित कार्यें करीत असतां, यत्नानें त्यांच्या परिणामाचा विचार करावा; कारण अतिशय उतावळेपणानें केलेल्या कर्मांचा परिणाम विपत्तीपर्यंत हृदयास दाह करणाऱ्या शल्यासारखा होतो ॥ ८३१ ॥

तसेंच माघकवीनें सांगितलें आहे कीं,

समय एव करोति बलाबलं प्रणिगदन्त इतीव शरीरिणाम् ।
शरदि हंसरवाः परुषीकृतस्वरमयूरमयू रमणीयताम् ॥ ८३२ ॥

प्राण्यांस समयच बलाबल करतो, असें जणुं सांगणारेच कीं काय असे शरद् ऋतूंतील हंसांचे शब्द, मयूरांचा स्वर कठोर लागेल त्या प्रकारें मनोहर वाटूं लागले ॥८३२ ॥

पुनः कालिदासानें शाकुंतलांत सांगितलें आहे कीं,

आपरितोषाद्विदुषां न साधु मन्ये प्रयोगविज्ञानम् ।
बलवदपि शिक्षितानामात्मन्यप्रत्ययं चेतः ॥ ८३३ ॥

विद्वानांस संतोष होईपर्यंत कोणत्याहि प्रयोगाचें विज्ञान मी बरोबर झालें असें समजत नाहीं, कारण मोठ्या प्रयत्नानें शिकलेल्या पुरुषांचें देखील चित्त स्वतःविषयीं विश्वास ठेवत नाहीं ॥ ८३३ ॥

सुहृद्भिराप्तैरसकृद्विचारितं
स्वयं च बुध्द्या प्रविचारितं पुनः ।
करोति कार्यं खलु यः स बुद्धिमान्
स एव सौख्यं बहुधा समश्नुते ॥ ८३४ ॥

जो आप्त मित्रांशीं वारंवार विचार करून पुनः स्वतःच्याहि बुद्धीनें विचार करून कार्य करतो, तोच बुद्धिमान् व तोच बहुतकरून सुख पावतो ॥ ८३४ ॥

तसेंच कोणत्याहि कामामध्यें आळस केल्यानें व तें थांबवून ठेविल्यानें हानि होते, किंवा तें काम बरोबर होत नाहीं. करितां विदुरनीतींत सांगितलें आहे कीं,

षड्दोषाः पुरुषेणेह हातव्या भूतिमिच्छता ।
निद्रा तन्द्रा भयं क्रोध आलस्यं दीर्घसूत्रता ॥ ८३५ ॥

या लोकांत समृद्धि इच्छिणाऱ्या पुरुषानें झोंप, सुस्ती, भीति, क्रोध, आळस व दीर्घसूत्रता हे सहा दोष टाकावे ॥ ८३५ ॥

षडेव तु गुणाः पुंसां न हातव्याः कदाचन ।
सत्यं दानमनालस्यमनसूया क्षमा धृतिः ॥ ८३६ ॥

परंतु सत्य, परोपकार, अनालस्य, अनसूया, क्षमा व धैर्य हे सहा गुण मनुष्यांनीं कधींच टाकूं नयेत ॥ ८३६ ॥

तसेंच पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

शक्ष्यामि कर्तुमिदमल्पमयत्नसाध्य-
मत्रादरः क इति कृत्यमुपेक्षमाणाः ।
केचित् प्रमत्तमनसः परितापदुःख-
मापत्प्रसंगसुलभं पुरुषाः प्रयान्ति ॥ ८३७ ॥

"हें खटपट केल्यावांचून होण्यासारखें असें अल्प कार्य करण्यास मी समर्थ आहें करितां या विषयीं आदर काय करावयाचा आहे ?" असें समजून कार्याची उपेक्षा करणारे कित्येक गाफिल मनाचे पुरुष आपत्तींचा प्रसंग ज्यामध्यें सुलभ आहे अशा परितापदु:खांत प्राप्त होतात ॥ ८३७ ॥

आतां शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**सुगुप्तकार्यमन्त्रः स्यात्कुर्वन्मुह्येच्च नापदि ।**
**यथाशक्ति चिकीर्षेत न त्यजेच्छरणागतम् ॥ ८३८ ॥**

कार्य व मसलत चांगल्या रीतीनें गुप्त ठेवावी, आपत्तीच्या वेळीं मूढ होऊन जाऊं नये, तर आपल्या शक्तिप्रमाणें कार्य करीत जावें; आणि शरण आलेल्याचा त्याग करूं नये ॥ ८३८ ॥

कारण कोणतेंहि मोठें कार्य करण्याचें मनांत आणलें असेल, त्याची मसलत आपला जो विश्वासु पण चतुर मनुष्य असेल त्याच्याबरोबरच करावी; कारण कार्य सिद्ध होण्याचे पूर्वी ती जर बाहेर फुटेल तर त्यामध्यें प्रतिपक्ष्याच्या तर्फेनें विघ्न होण्याचा संभव असतो व कार्य सिद्ध न होईल तर लोकांमध्यें थट्टा होते. आणि कदाचित् सिद्ध झालें तर त्याविषयीं लोकांस विस्मय वाटत नाहीं. करितां चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**मनसा चिन्तितं कार्यं वाचा नैव प्रकाशयेत् ।**
**मन्त्रेण रक्षयेद् गूढं कार्यं चापि नियोजयेत् ॥ ८३९ ॥**

मनानें योजलेलें कार्य वाणीनें प्रसिद्ध करूं नये, तर मसलतीनें गुप्त ठेवावें, व कार्य करीत जावें ॥ ८३९ ॥

कारण पंचतंत्रांतहि सांगितलें आहे कीं,

**अम्भसा भिद्यते सेतुस्तथा मन्त्रोऽप्यरक्षितः ।**
**पैशून्याद्भिद्यते स्नेहो वाग्भिर्भिद्येत कातरः ॥ ८४० ॥**

पाण्याच्या पूरानें पूल, गुप्त न ठेवल्यानें मंत्र, चहाडीनें स्नेह, व वाणीनें भित्रा मनुष्य भेदिला जातो ॥ ८४० ॥

पुनः आरंभिलेल्या कार्यामध्यें विघ्न आलें असतां भिऊन मूढ होऊन गेल्यानें लोकांमध्यें आपली छाप कमी होते, व कार्य विघडून जाण्याचा संभव असतो; करितां आपत्समयीं धैर्यच ठेवावें. विदुरनीतींत सांगितलें आहे कीं,

**सुखं च दुःखं च भवाभवौ च लाभालाभौ मरणं जीवितं च ।**
**पर्यायशः सर्वमेते स्पृशन्ति तस्माद्धीरो न च हृष्येन्न शोचेत् ॥८४१॥**

सुख व दुःख, उत्कर्ष व अपकर्ष, लाभ व हानि आणि मृत्यु व जीवन, हीं सर्वांस पर्यायानें प्राप्त होतात, करितां धीर पुरुष या द्वंद्वांविषयीं हर्ष व शोक करीत नाहीं ॥ ८४१ ॥

**प्राप्यापदं न व्यथते कदाचिदुद्योगमन्विच्छति चाप्रमत्तः ।**
**दुःखं च काले सहते महात्मा धुरन्धरस्तस्य विपद्विनश्येत् ॥ ८४२ ॥**

जो आपत्तीस प्राप्त होऊन कधींहि व्यथा पावत नाहीं, तर सावधान होऊन उद्योग करीत जातो व प्रसंगीं दुःख येईल तें सहन करतो, त्या धुरंधर महात्म्याची विपत्ति नाश पावते ॥ ८४२ ॥

तसेंच प्रसंगरत्नावलींत सांगितलें आहे कीं,

**छिन्नोऽपि रोहति तरुश्चन्द्रः क्षीणोऽपि वर्द्धते लोके ।**
**इति विमृशन्तः सन्तः सन्तप्यन्ते न लोकेऽस्मिन् ॥८४३॥**

या लोकांत तोडलेला वृक्षहि पुनः उगवतो व क्षीण झालेला चंद्रहि पुनः वृद्धि पावतो; असा विचार करणारे सज्जन खेद पावत नाहींत ॥ ८४३ ॥

पुनः भर्तृहरीनें सांगितलें आहे कीं,

**क्वचिद्विद्वद्गोष्ठी क्वचिदपि सुरामत्तकलहः**
**क्वचिद्वीणानादः क्वचिदपि च हाहेति रुदितम् ।**
**क्वचिद्रम्या रामा क्वचिदपि जराजर्जरतनु-**
**र्न जाने संसारः किममृतमयः किं विषमयः ॥ ८४४ ॥**

संसारामध्यें कुठें विद्वानांचा विनोद, तर कुठें मदिरापान करून मत्त झालेल्यांचा कलह, कुठें वीण्याचा नाद, तर कुठें हा ! हा ! करून रुदन, कुठें मनोहर तरुणी, तर कुठें जरेनें जर्जरित झालेलें शरीर पाहिलें जातें,

यावरून हा संसार काय विषमय आहे कीं, अमृतमय आहे, तें मी जाणत नाहीं ॥ ८४४ ॥

करितां पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**त्याज्यं न धैर्यं विधुरेऽपि काले धैर्यात् कदाचिद्गतिमाप्नुयात्सः ।**
**यथा समुद्रेऽपि च पोतभङ्गे सांयात्रिको वाञ्छति तर्तुमेव ॥ ८४५ ॥**

जसे समुद्रामध्यें गलवत फुटून जाण्याच्या वेळींहि उतारू लोक पोंहण्याची इच्छा करितात, तसें विपत्कालींहि मनुष्यानें धैर्य सोडूं नये, कारण धैर्यामुळेंच कदाचित् तो गतीस प्राप्त होतो ॥ ८४५ ॥

**तावद्भयेषु भेतव्यं यावद्भयमनागतम् ।**
**आगतं तु भयं दृष्ट्वा प्रहर्तव्यमशङ्कया ॥ ८४६ ॥**

जेथपर्यंत भय आलें नसेल तेथपर्यंत भ्यावें, परंतु तें आलेलें जाणून निःशंक होऊन घालविण्याचा उपाय करावा ॥ ८४६ ॥

**सुखमापतितं सेवेद्दुःखमापतितं तथा ।**
**चक्रवत्परिवर्तन्ते दुःखानि च सुखानि च ॥ ८४७ ॥**

प्राप्त झालेलें दुःख व सुख धैर्यानें सेवन करावें, कारण सुखें व दुःखें चक्राप्रमाणें परिवर्तन पावतात ॥ ८४७ ॥

**आरम्भन्तेऽल्पमेवाज्ञाः कामं व्यग्रा भवन्ति च ।**
**महारम्भाः कृतधियस्तिष्ठन्ति च निराकुलाः ॥ ८४८ ॥**

अज्ञ जन अल्प कार्यास आरंभ करितात व त्यांत अतिशय व्यग्र होतात, परंतु बुद्धिमान् लोक मोठ्या कार्यास आरंभ करितात, व व्याकुल होत नाहींत ॥ ८४८ ॥

**अनारम्भो हि कार्याणां प्रथमं बुद्धिलक्षणम् ।**
**आरब्धस्यान्तगमनं द्वितीयं बुद्धिलक्षणम् ॥ ८४९ ॥**

कार्यास आरंभ न करणें हें बुद्धीचें पहिलें लक्षण आहे, व आरंभिलेलें कार्य पार पाडणें हें बुद्धीचें दुसरें लक्षण आहे ॥ ८४९ ॥

**आरभ्यते न खलु विघ्नभयेन नीचैः**
**प्रारभ्य विघ्नविहता विरमन्ति मध्याः ।**
**विघ्नैः पुनःपुनरपि प्रतिहन्यमानाः**
**प्रारब्धमुत्तमजना न परित्यजन्ति ॥ ८५० ॥**

विघ्नाच्या भयानें कनिष्ठ लोक कार्यास आरंभच करीत नाहींत, मध्यम लोक कार्यास आरंभ करून विघ्न आड येईल तर मध्येंच विराम पावतात. परंतु उत्तम लोक तर आरंभिलेल्या कार्यांत अनेक विघ्नें वारंवार आलीं तरीहि तें पुरें केल्यावांचून सोडित नाहींत ॥ ८५० ॥

आतां शरण आलेल्याचें यथाशक्ति आदरातिथ्य केल्यानें लोकांमध्यें पुष्कळ मित्र होतात व कीर्ति वाढते. कदाचित् शत्रु असेल व वैर सोडून शरण येईल, तर तोहि आदरातिथ्य करण्यास योग्य आहे; तर एखादा संबधी, मित्र, आपला जातभाई, परजातीचा किंवा पाहुणा घरीं येईल, तर तो आदरातिथ्य करण्यास योग्य असेल यांत काय आश्चर्य ! सांगितलें आहे कीं,

**गृहागतमपि क्षुद्रं यथार्हं पूजयेत्सदा ।**
**अरावप्युचितं कार्यमातिथ्यं गृहमागते ॥ ८५१ ॥**

नेहमीं घरीं आलेल्या क्षुद्राचाहि यथायोग्य सत्कार करावा, शत्रुहि जर घरीं येईल तर त्याचें आदरातिथ्य करावें ॥ ८५१ ॥

आतां शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**नात्यन्तं विश्वसेत्कंचिद्विश्वस्तमपि सर्वदा ।**
**पुत्रं वा भ्रातरं भार्याममात्यमधिकारिणम् ॥ ८५२ ॥**

नेहमीं पुत्र, बंधु, भार्या, अमात्य, अधिकारी यांचा व आपणास विश्वासू मानणाराचाहि अतिविश्वास करूं नये ॥ ८५२ ॥

कारण ज्याच्यावर अतिशय विश्वास असेल तोहि एखादे वेळीं दगा देतो; असें प्राचीन इतिहासापासून जाणण्यांत आलें आहे व आतांहि तसा अनुभव येतो. पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं;

नदीनां शस्त्रपाणीनां नखिनां शृङ्गिणां तथा ।
विश्वासो नैव कर्तव्यः स्त्रीषु राजकुलेषु च ॥ ८५३ ॥

नद्या, शस्त्रधारी पुरुष, नखें व शिंगें असलेलीं जनावरें, स्त्रीजन आणि राजकुल यांचा विश्वास करूं नये ॥ ८५३ ॥

न यस्य चेष्टितं विद्यान्न कुलं न पराक्रमम् ।
न तस्य विश्वसेत्प्राज्ञो यदीच्छेच्छ्रेय आत्मनः ॥ ८५४ ॥

जर आपलें श्रेय व्हावें अशी इच्छा असेल तर बुद्धिवंतानें, ज्याचें आचरण, कुल व पराक्रम समजला नसेल त्याचा विश्वास करूं नये ॥ ८५४ ॥

प्रणयादुपकाराद्वा यो विश्वसिति शत्रुषु ।
स सुप्त इव वृक्षाग्रात्पतितः प्रतिबुध्यते ॥ ८५५ ॥

जो शत्रूचा स्नेह व उपकार पाहून विश्वास करतो, तो वृक्षाच्या अग्रभागावर झोपीं गेलेल्या प्रमाणें पडेल त्यावेळीं जागा होतो ॥ ८५५ ॥

अपराधो न मेऽस्तीति नैतद्विश्वासकारणम् ।
विद्यते हि नृशंसेभ्यो भयं गुणवतामपि ॥ ८५६ ॥

"माझा कांहीं अपराध नाहीं" असें समजणें विश्वास करण्याचें कारण नाहीं. कारण गुणिजनांसहि क्रूर मनुष्यांकडून भीति उत्पन्न होते ॥ ८५६ ॥

अत्यादरो भवेद्यत्र कार्यकारणवर्जितः ।
तत्र शङ्का प्रकर्तव्या परिणामे सुखावहा ॥ ८५७ ॥

जेथें कार्यकारणावांचून अतिशय आदर होईल तेथें शंका ठेवावी, त्यामुळें शेवटीं सुख होतें ॥ ८५७ ॥

असती भवति सलज्जा क्षारं नीरं च निर्मलं भवति ।
दम्भी भवति विवेकी प्रियवक्ता भवति धूर्तजनः ॥ ८५८ ॥

बहुत करून असती स्त्री लज्जायुक्त असते, खारें पाणी निर्मळ असतें, दंभी विवेकयुक्त असतो आणि धूर्त मनुष्य गोडबोल्या असतो ॥ ८५८ ॥

दद्यात्साधुर्यदि निजपदे दुर्जनाय प्रवेशं
तन्नाशाय प्रभवति ततो वाञ्छमानः स्वयं सः ।

**तस्माद्देयो विपुलमतिभिर्नावकाशोऽधमानां**
**जारोऽपि स्याद्गृहपतिरिति श्रूयते वाक्यतोऽत्र ॥८५९॥**

साधुपुरुष जर दुर्जनास आपल्या स्थानांत प्रवेश करूं देईल, तर तो दुर्जन स्वतःच त्याच्या स्थानाची इच्छा करून त्याचा नाश करतो, करितां मतिमंतांनीं नीच मनुष्यास आपलें स्थान देऊं नये, कारण जार पुरुषहि घराचा मालक होऊन जातो, असें लोकांत ऐकण्यांत येणें ॥ ८५९ ॥

आतां शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**अवृत्तिव्याधिशोकार्ताननुवर्तेत शक्तितः ।**
**कदापि नोग्रदण्डः स्यात्कटुभाषणतत्परः ॥ ८६० ॥**

अवृत्ति, व्याधि व शोक यांनीं पीडित झालेल्यांस शक्तीप्रमाणें मदत करावी; व कधींहि कटु भाषणाविषयीं तत्पर व उग्रदंडी होऊं नये ॥ ८६० ॥

**भार्या पुत्रोऽप्युद्विजते कटुवाक्यात्प्रदण्डतः ।**
**पशवोऽपि वशं यान्ति दानैश्च मृदुभाषणैः ॥ ८६१ ॥**

कारण कटुवाक्य व उग्रदंड यांमुळें भार्या व पुत्रहि उद्वेग पावतात आणि दान व मृदुभाषण यांहींकरून पशूहि वश होतात ॥ ८६१ ॥

आपल्या शक्तीप्रमाणें परोपकार केल्यानें लोकांमध्यें यश वाढतें, प्रीति संपादन होते व ज्यावर उपकार केला असेल त्याचा अंतरात्मा प्रसन्न होतो. आणि ईश्वर सर्वांतर्यामीं असल्यामुळें हेंच त्याचें पूजन असतें. याविषयीं सांगितलें आहे कीं,

**येन केन प्रकारेण यस्य कस्यापि देहिनः ।**
**संतोषं जनयेत्प्राज्ञस्तदेवेश्वरपूजनम् ॥ ८६२ ॥**

बुद्धिमंतानें कोणत्याहि सरळ प्रकारानें कोणत्याहि प्राण्यास संतोष उत्पन्न करावा, तेंच ईश्वराचें पूजन आहे ॥ ८६२ ॥

करितां शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**स्थितो मृत्युमुखे चाहं क्षणमायुर्ममास्ति न ।**
**इति मत्वा दानधर्मौ यथेष्टौ तु समाचरेत् ॥ ८६३ ॥**

मी मृत्यूच्या मुखामध्यें राहिलों आहें, माझें आयुष्य क्षणमात्र नाहीं, असें समजून यथेष्ट दानधर्म आचरण करावें ॥ ८६३ ॥

कारण पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**तावत्प्रीतिर्भवेल्लोके यावद्दानं प्रदीयते ।**
**वत्सः क्षीरक्षयं दृष्ट्वा परित्यजति मातरम् ॥ ८६४ ॥**

लोकामध्यें जोंपर्यंत कांहीं दिलें जातें तोंपर्यंत प्रीति होते, कारण वासरूं दूध मिळत नाहीं असें पाहून मातेस सोडून देतें ॥ ८६४ ॥

**पश्य दानस्य माहात्म्यं सद्यः प्रत्ययकारकम् ।**
**यत्प्रभावादपि द्वेषी मित्रतां याति तत्क्षणात् ॥ ८६५ ॥**

तत्काळ विश्वास उत्पन्न करणारें दानाचें माहात्म्य पहा, कारण ज्याच्या प्रभावानें शत्रू असला तरी त्वरित मित्र होतो ॥ ८६५ ॥

परंतु फुगून जाऊन आपल्या शक्तीच्या बाहेर दान देऊं नये; कारण शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**अतिदानेन दारिद्र्यं तिरस्कारोऽतिलोभतः ।**
**यतोऽत्यन्तं नाशहेतुरति सर्वत्र वर्जयेत् ॥ ८६६ ॥**

अतिदानानें दारिद्र्य व अतिलोभानें तिरस्कार होतो, ह्मणून अति हें नाशाचें कारण आहे, करितां त्याचा सर्व ठिकाणीं त्याग करावा ॥ ८६६ ॥

पुनः ज्याच्यावर आपली सत्ता असेल अशा एखाद्या मनुष्यानें कदाचित् अपराध केला असेल तर त्यास उग्र दंड केल्यानें आणि क्रूर वचन बोलल्यानें एखादेवेळीं अनर्थ होण्याचा संभव असतो. कारण ज्यास उग्र दंड करण्यांत येईल व क्रूर वचन बोलण्यांत येईल तो कदाचित् दीर्घद्वेषी असेल, तर वैर ठेवून तसा दंड करणाराचें व क्रूर वचन बोलणाराचें संधि आली असतां नुकसान करतो. करितां चालेल तोंपर्यंत समजावून काम करून घ्यावें व कदाचित् दंड करावा लागेल तर विचार केल्याशिवाय करूं नये. पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**साम्नैव यत्र सिद्धिर्न तत्र दण्डो बुधेन विनियोज्यः ।**
**पित्तं यदि शर्करया शाम्यति कोऽर्थः पटोलेन ॥ ८६७ ॥**

ज्या ठिकाणीं समजाविल्यानें काम होईल तेथें शहाण्या माणसानें दंडाची योजना करूं नये, कारण जर साखरेनें पित्त शमतें, तर कडू पडवळाची गरज काय आहे ? ॥ ८६७ ॥

**न परस्यापराधेन परेषां दण्डमाचरेत् ।**
**आत्मनावगतं कृत्वा दण्डयेत्पूजयेच्च वा ॥ ८६८ ॥**

एकाच्या अपराधाबद्दल दुसऱ्यास दंड करूं नये, तर आपली खात्री करून, योग्य तो दंड किंवा सत्कार करावा ॥ ८६८ ॥

आतां शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**उपेक्षेत प्रनष्टं यत्प्राप्तं यत्तदुपाहरेत् ।**
**परद्रव्यं क्षुद्रमपि नादत्तं संहरेत्कचित् ॥ ८६९ ॥**

जें नाश पावलें असेल त्याची उपेक्षा करावी, व जें प्राप्त झालें असेल त्याचें ग्रहण करावें, परंतु कधीं थोडेंहि दुसऱ्याचें द्रव्य दिल्यावांचून घेऊं नये ॥ ८६९ ॥

नाश पावलेल्या कोणत्याहि वस्तूची उपेक्षा न करतां वारंवार तिचें चिंतन केल्यानें केवळ मनाचा संताप होऊन शरीर क्षीण होतें आणि नित्याच्या कामकाजांत प्रवृत्ति बरोबर न होतां त्यांत नुकसानी होण्याचा संभव आहे; परंतु ती नाश पावलेली वस्तु कधीं मिळावयाची नाहीं. करितां याच ग्रंथांत याच ठिकाणीं सांगितलें आहे कीं,

**शोकं न कुर्यान्नष्टस्य स्वकृतेरपि जल्पनम् ।**
**खादन्न गच्छेदध्वानं न च हास्येन भाषणम् ॥ ८७० ॥**

नष्ट वस्तूचा शोक करूं नये, विचारल्यावांचून आपण केलेलें कधीं बोलून दाखवूं नये, मार्गामध्यें खात खात चालूं नये व हांसत हांसत भाषण करूं नये ॥ ८७० ॥

तसेंच दुसऱ्याची जिच्यावर सत्ता असेल अशी वस्तु तिच्या मालकाच्या परवानगीवांचून आपल्या उपयोगांत आणिल्यानें चोरी ठरते; त्यामुळें शिक्षेस पात्र होतो आणि लोकांमध्यें अब्रू जाते. करितां सांगितलें आहे कीं,

**परधनहरणे पङ्गुः परदारनिरीक्षणेऽप्यन्धः ।**
**मूकः परापवादे स भवति सर्वप्रियो जगति ॥ ८७१ ॥**

जो दुसऱ्याचें धन हरण करण्याविषयीं पांगळा, दुसऱ्याची स्त्री पाहण्याविषयीं आंधळा व दुसऱ्याची निंदा करण्याविषयीं मुका असेल तो जगतामध्यें सर्व लोकांस प्रिय होतो ॥ ८७१ ॥

आतां शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**न ब्रूयादनृतं साक्ष्यं कृतं साक्ष्यं न लोपयेत् ।**
**आज्ञाभङ्गस्तु महतां राज्ञः कार्यो न वै क्वचित् ॥ ८७२ ॥**

खोटी साक्ष देऊं नये, दिलेली साक्ष फिरवूं नये व केव्हांहि राजाच्या अगर मोठ्यांच्या आज्ञेचा भंग करूं नये ॥ ८७२ ॥

खोटी साक्ष दिल्यानें ईश्वराचा अपराधी होतो, कारण तो सर्वांतर्यामी असल्यानें मनुष्यानें गुप्त रीतीनें केलेल्या पाप–पुण्यास जाणतो. मनुस्मृतीमध्यें सांगितलें आहे कीं,

**न वृथा शपथं कुर्यात्स्वल्पेऽप्यर्थे नरो बुधः ।**
**आत्मैव ह्यात्मनः साक्षी गतिरात्मा तथाऽऽत्मनः ॥ ८७३ ॥**

बुद्धिमान् मनुष्यानें थोड्या कार्यामध्येंहि खोटी शपथ घेऊं नये, कारण आपणच आपला साक्षी व गति आहे ॥ ८७३ ॥

पुनः श्रीमहाभारतांतर्गत आदिपर्वांत सांगितलें आहे कीं,

**मन्यते पातकं कृत्वा न कश्चिद्वेत्ति मामिति ।**
**तदेव वेत्ति भूतात्मा यश्चैवान्तरपूरुषः ॥ ८७४ ॥**

मनुष्य पाप करून 'मला कोणी जाणत नाहीं' असें समजतो, परंतु जो सर्व भूतांचा आत्मा अंतर्यामी ईश्वर आहे तो सर्व जाणतो ॥ ८७४ ॥

करितां सांगितलें आहे कीं,

**यथाश्रुतं यथादृष्टं सर्वमेवाञ्जसा वदेत् ।**
**सत्येन पूयते साक्षी धर्मः सत्येन रक्ष्यते ।। ८७५ ।।**

जसें ऐकलें व पाहिलें असेल तसेंच साक्षीनें सर्व जलद सांगावें, कारण सत्यानें तो स्वतः पवित्र होतो व सत्यानें धर्माचें रक्षण होतें ।। ८७५ ।।

पुनः खोटी साक्ष प्रसिद्धीस येईल तर, राजा शिक्षा करतो व लोकांमध्यें प्रतिष्ठा कमी होते. करितां कल्पतरु ग्रंथांत सांगितलें आहे कीं,

**यशो यस्माद्भस्मीभवति वनवह्नेरिव वनं**
**निदानं दुःखानां यदवनिरुहाणामिव जलम् ।**
**न यत्र स्याच्छायाऽऽतप इव तपःसंयमकथा**
**कथंचित्तन्मिथ्यावचनमभिधत्ते न मतिमान् ।। ८७६ ।।**

ज्यामुळें दावानलानें वनाप्रमाणें यश भस्मरूप होतें, जें वृक्षांस जलाप्रमाणें दुःखांस मूल कारण आहे, आणि ज्याचे ठिकाणीं उन्हांत छायेप्रमाणें तप व संयम यांची कथा नाहीं, असें मिथ्या भाषण कोणत्याहि प्रकारें बुद्धिमान् मनुष्य बोलत नाहीं ।। ८७६ ।।

तसेंच ज्याचा अंमल चालत असेल अशा सत्ताधारी मनुष्याच्या आज्ञेचें उल्लंघन केल्यानें, तो एक वेळ तर वाटेल तेवढ्या प्रतिष्ठित माणसासहि हैराण करूं शकतो; तर राजाच्या आज्ञेचें उल्लंघन केलें असल्यास तो काय करूं शकणार नाहीं ? पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**राजा वेश्या यमो ह्यग्निस्तस्करो बालयाचकौ ।**
**परदुःखं न जानन्ति ह्यष्टमो ग्रामकण्टकः ।। ८७७ ।।**

राजा, वेश्या, मृत्यु, अग्नि, तस्कर, बालक, याचक हे सात व आठवा ग्रामकंटक हे दुसऱ्याचें दुःख जाणत नाहींत।। ८७७ ।।

**काके शौचं द्यूतकारे च सत्यं सर्पे क्षान्तिर्यौवने कामशान्तिः ।**
**क्लीबे धैर्यं मद्यपे तत्त्वचिन्ता राजा मित्रं केन दृष्टं श्रुतं वा ।।८७८।।**

कावळ्यामध्यें पवित्रता, जुगाऱ्यामध्यें सत्य, सर्पामध्यें क्षमा, तारुण्यावस्थेमध्यें कामशांति, भित्र्यामध्यें धैर्य, मद्य पिणाऱ्यामध्यें तत्त्वचिंतन आणि राजाची मैत्री इतकीं कोणी पाहिलीं किंवा ऐकिलीं आहेत ? ।। ८७८ ।।

करितां सांगितलें आहे कीं,

शास्त्रं सुचिन्तितमथो परिचिन्तनीय-
माराधितोऽपि नृपतिः परिशङ्कनीयः ।
अङ्के स्थिताऽपि युवतिः परिरक्षणीया
शास्त्रे नृपे च युवतौ च कुतः स्थिरत्वम् ॥ ८७९ ॥

उत्तमप्रकारें चिंतन केलेलें शास्त्रहि पुनः विचार करण्यास योग्य आहे, आराधन केलेला राजाहि शंका करण्यास योग्य आहे, आणि जवळ असलेली तरुणीहि रक्षण करण्यास योग्य आहे, कारण शास्त्र, राजा व युवति यांचे ठिकाणीं स्थिरता कोठून असणार ? ॥ ८७९ ॥

आतां शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

जायापत्योश्च पित्रोश्च भ्रात्रोश्च स्वामिभृत्ययोः ।
भगिन्योर्मित्रयोर्भेदं न कुर्याद्गुरुशिष्ययोः ॥ ८८० ॥

पति-पत्नी, माता-पिता, बंधु-बंधु, धनि-सेवक, बहिणी-बहिणी, मित्र-मित्र आणि गुरु-शिष्य यांच्यामध्यें एकमेकांत फूट पाडूं नये ॥ ८८० ॥

कारण त्यांच्यामध्यें एकमेकांत फूट पाडण्याचा जो प्रयत्न करतो, त्यास जर ते चतुर असतील तर पहिल्यापासूनच सावध होऊन दूर करतात. कारण विदुरनीतींत सांगितलें आहे कीं,

ये वै भेदनशीलास्तु सकामा निस्त्रपाः शठाः ।
ते पापा इति विख्याताः संवासे परिगर्हिताः ॥ ८८१ ॥

जे भेद पाडणारे, कामी, निर्लज्ज, शठ व पापी ह्मटले जातात, ते सहवासामध्यें निंदित मानले आहेत ॥ ८८१ ॥

पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

मृदुना सलिलेन खन्यमानान्यवघृष्यन्ति गिरेरपि स्थलानि ।
उपजापविदां च कर्णजापैः किमु चेतांसि मृदूनि मानवानाम् ॥ ८८२ ॥

कोमल पाण्यानेंहि खनन झालेलीं पर्वताचीं स्थलें घर्षण होऊन जातात, तर भेद पाडणाऱ्यानें कान भरल्यामुळें मनुष्याचीं कोमल अंतःकरणें भेद पावतील यांत काय नवल ! ॥ ८८२ ॥

परंतु ज्यावेळीं त्यांचे येथें कांहीं व्यावहारिक प्रसंग येतो, त्यावेळीं लोकलज्जेसाठीं त्यांस एकत्र होण्याची जरूर पडते. त्यावेळीं ते भेद पडण्याच्या कारणाचा एकमेकांस खुलासा विचारूं लागतात, ह्मणजे लगेच त्या भेद पाडणाऱ्या मनुष्याचा भोंपळा फुटून प्रसिद्ध होऊन जातो. त्यामुळें तो सर्वांच्या तिरस्कारास पात्र होऊन त्यांच्या घरांतून दूर जातो, आणि त्यासंबंधीं ते पुनः पूर्वीप्रमाणें एकत्र जमतात. चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**बन्धनानि खलु सन्ति बहूनि प्रेमरज्जुकृतबन्धनमन्यत् ।**
**दारुभेदनिपुणोऽपि षडंघ्रिर्निष्क्रियो भवति पङ्कजकोशे ॥ ८८३ ॥**

बंधनें पुष्कळ प्रकारचीं असतात, परंतु प्रेमरूपी रज्जूचें बंधन कांहीं औरच आहे, कारण भ्रमर लांकूड फोडण्यामध्यें निपुण असूनहि कमलकोशामध्यें निष्क्रिय राहतो ॥ ८८३ ॥

आतां शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**सुहृदं भ्रातरं बन्धुमुपचर्यात्सदाऽऽत्मवत् ।**
**न मध्याद्गमनं भाषाशालिनोः स्थितयोरपि ॥ ८८४ ॥**

मित्र, बंधु व संबंधी यांस नेहमीं आपल्याप्रमाणें मानावे आणि दोघेजण उमे राहून गोष्टी करीत असतां त्यांच्यां मधून जाऊं नये ॥ ८८४ ॥

कारण सुहृदादिकांस आपल्यासारखे गणिल्यानें ऐक्य कायम राहतें, ऐक्य चालविण्याची फार जरूर आहे; कारण तें नसेल तर परक्याकडून पराभव प्राप्त होतो, व कोणतेंहि मोठें कार्य पार पाडतां येत नाहीं. चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**बहूनां चैव सत्त्वानां समवायो रिपुंजयः ।**
**वर्षधाराधरो मेघस्तृणैरपि निवार्यते ॥ ८८५ ॥**

जसा तृणांच्या समुदायानें पावसाळ्यांतील धारायुक्त मेघ निवारण केला जातो, तसा अनेक प्राण्यांचा समुदाय शत्रूंस जिंकणारा होतो ॥ ८८५ ॥

तसेंच पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

संहतिः श्रेयसी पुंसां स्वकुलैरल्पकैरपि ।
तुषेणापि परित्यक्ता न प्ररोहन्ति तण्डुलाः ॥ ८८६ ॥

मनुष्यास आपल्या कुलांतील अल्प पुरुषांशींहि दृढ संबंध ठेवणें कल्याणकारक आहे, कारण तुसानें टांकलेले तांदूळहि उगवत नाहींत ॥ ८८६ ॥

अल्पानामपि वस्तूनां संहतिः कार्यसाधिका ।
तृणैर्गुणत्वमापन्नैर्बध्यन्ते मत्तदन्तिनः ॥ ८८७ ॥

अल्प वस्तूंचाहि समुदाय कार्य साधण्यास समर्थ होतो, कारण रज्जूरूप झालेल्या तृणांनीं मदोन्मत्त हत्ती बांधिले जातात ॥ ८८७ ॥

पुनः विदुरनीतीमध्यें सांगितलें आहे कीं,

न वै भिन्ना जातु चरन्ति धर्मं न वै सुखं प्राप्नुवन्तीह भिन्नाः ।
न वै भिन्ना गौरवं प्राप्नुवन्ति न वै भिन्नाः प्रशमं रोचयन्ति॥८८८॥

एकमेकांत फूट पडलेले लोक धर्म आचरण करूं शकत नाहींत आणि सुख, गौरव व शांति त्यांस प्राप्त होत नाहीं ॥ ८८८ ॥

तसेंच दोघेजण गोष्टी करीत असतील, त्या ठिकाणीं एकाएकीं गेल्यानें ते दोघे गोष्टी करण्याचे अडून राहतात व मनांत क्रोध आणून तेथें येणारास मूर्ख समजतात. कालिदासानें भोजराजास सांगितलें आहे कीं,

खादन्न गच्छामि हसन्न जल्पे गतं न शोचामि कृतं न मन्ये ।
द्वाभ्यां तृतीयो न भवामि राजन् किं कारणं भोज भवामि मूर्खः॥८८९

हे भोजराजा! मी खात खात चालत नाहीं, हंसत हंसत बोलत नाहीं, गेलेल्याचा शोक करीत नाहीं, केलेल्याचा अभिमान बाळगित नाहीं आणि दोघे गोष्टी करीत असतील तेथें तिसरा होत नाहीं, तर मग मी मूर्ख कसा? ॥ ८८९ ॥

मूर्खो वर्षाप्रवासी सति पितरि गृहे नार्जिता येन विद्या
नानाधान्यौषधीनां सति निजविभवे संग्रहं यो न कुर्यात् ।
हित्वा भार्यां सुशीलां रतिमिह कुरुते भर्तृमत्यां च दास्यां
वाण्या वैराभिलाषी समयमतिजडो वक्ति राजन् खगोऽयम् ॥ ८९० ॥

हे राजन्! जो पावसाळ्यांत प्रवास करतो, घरामध्यें बाप विद्यमान असतां ज्यानें विद्या संपादन केली नाहीं, आपलें वैभव असून जो नाना प्रकारचीं धान्यें व ओषधी यांचा संग्रह करीत नाहीं, जो आपल्या सुशील स्त्रीस सोडून परस्त्री व दासी यांच्या ठिकाणीं रत होतो, जो शत्रुत्व बोलून दाखवितो व प्रसंगीं मतिमंद होतो, त्या मनुष्यास हा पक्षी मूर्ख ह्मणतो ॥ ८९० ॥

आणखी सांगितलें आहे कीं,

**देशाटनं राजसभावेशनं शास्त्रचिन्तनम् ।**
**वैश्यादिसंगतिं विद्वन्मैत्रीं कुर्यादतन्द्रितः ॥ ८९१ ॥**

उद्योगी मनुष्यानें देशाटन, राजसभेंत प्रवेश, शास्त्र चिंतन, व्यापाऱ्यांची संगति आणि विद्वानांची मैत्री करावी ॥ ८९१ ॥

देशाटन केल्यानें मनुष्यास अनेक प्रकारें लाभ होतो. जसा घरांत बसून राहणारा मनुष्य कांहीं व्यावहारिक विवेक जाणूं शकत नाहीं, तर गृहस्थांच्या जवळ येणें जाणें ठेवल्यानें जाणूं शकतो व आपल्यामध्यें असलेला अविवेक टांकून सुधरतो, तसा एकाच नगरांत राहणारा मनुष्य परदेशवासी मनुष्यांची वरीवाईट रीतभात व त्यांच्याशीं असलेल्या व्यवहारामध्यें होणारी लाभ—हानी जाणूं शकत नाहीं, परंतु देशाटन केल्यानें जाणूं शकतो; आणि आपली रीत भात सुधारून सुखी होतो. पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**देशान्तरेषु बहुविधभाषावेषादि येन न ज्ञातम् ।**
**भ्रमता धरणीपीठे वैफल्यं जन्मनस्तस्य ॥ ८९२ ॥**

पृथ्वीच्या पाठीवर भ्रमण करीत असतां ज्या मनुष्यानें, अन्यदेशांतील भाषा, वेष वगैरे जाणलें नाहीं, त्याचें जन्म व्यर्थ आहे. ॥ ८९२ ॥

**विद्यां वित्तं शिल्पं तावन्नाप्नोति मानवः सम्यक् ।**
**यावद्व्रजति न भूमौ देशाद्देशान्तरं हृष्टः ॥ ८९३ ॥**

जोंपर्यंत मनुष्य प्रसन्न होऊन पृथ्वीवरील एका देशांतून दुसऱ्या देशांत जात नाहीं, तोंपर्यंत विद्या, धन व कला हीं चांगल्या प्रकारें मिळवूं शकत नाहीं ॥ ८९३ ॥

**यस्यास्ति सर्वत्र गतिः स कस्मात्स्वदेशरागेण हि याति नाशम्।**
**तातस्य कूपोऽयमिति ब्रुवाणाः क्षारं जलं कापुरुषाः पिबन्ति॥८९४॥**

ज्याची सर्वत्र गति आहे तो कशासाठीं स्वदेशामध्यें पडून राहून नाश पावेल ? कारण 'हा माझ्या बापाचा कुवा आहे' असें ह्मणणारे दुराग्रही पुरुष खारें पाणी पितात ॥ ८९४ ॥

तसेंच विश्वगुणादर्शचंपूंत सांगितलें आहे कीं,

**आकिञ्चन्याद्‌तिपरिचयाज्जाययोपेक्ष्यमाणो**
**भूपालानामननुसरणाद्बिभ्यदेवाखिलेभ्यः ।**
**गेहे तिष्ठन् कुमतिरलसः कूपकूर्मैः सधर्मा**
**किं जानीते भुवनचरितं किं सुखं चोपभुङ्क्ते ॥ ८९५ ॥**

गरिबी व अतिपरिचय यांमुळें स्त्रीकडून अवमान केला जाणारा, राजादि महाजनांपाशीं न गेल्यामुळें सर्वांस भिऊन वागणारा, व घरामध्येंच राहिल्यानें विहिरींतील कांसवांसारखा असणारा आळशी व मूढ पुरुष पृथ्वीवर होणाऱ्या चरित्रांस कसा जाणील ! आणि सुख कसें भोगील ! ॥ ८९५ ॥

**व्यापारान्तरमुत्सृज्य वीक्षमाणो वधूमुखम् ।**
**यो गृहेष्वेव निद्राति दरिद्राति स दुर्मतिः ॥ ८९६ ॥**

जो दुर्मति इतर कामें सोडून स्त्रीचें मुख पहात घरांतच झोंपून राहतो; तो मनुष्य दरिद्री होतो ॥ ८९६ ॥

करितां चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**यस्मिन्देशे न संमानो न वृत्तिर्न च बान्धवः ।**
**न च विद्यागमोऽप्यस्ति वासं तत्र न कारयेत् ॥ ८९७ ॥**

ज्या देशामध्यें जीविका, सन्मान, बांधव नाहींत व विद्येचा लाभहि होत नाहीं, त्या देशांत वास्तव्य करूं नये ॥ ८९७ ॥

परंतु परदेशामध्यें जाणाऱ्या गृहस्थाकरितां मनुस्मृतीच्या ९ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**विधाय वृत्तिं भार्यायाः प्रवसेत्कार्यवान्नरः ।**
**अवृत्तिकर्षिता हि स्त्री प्रदुष्येत् स्थितिमत्यपि ॥ ८९८ ॥**

कार्यवान् पुरुषानें स्त्रीची जीविका चालेल असा बंदोवस्त करून परदेशीं जावें, कारण वृत्तिवांचून पीडित झालेली स्त्री सदाचरणी असली तरी बिघडते ॥ ८९८ ॥

परंतु गृहस्थानें परदेशांत अधिकांत अधिक तीन वर्षांच्या बाहेर वास करूं नये; कारण स्त्रीपुरुषांचा परस्पर पुष्कळ काळपर्यंतचा वियोग हानिकारक आहे. चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**कान्तावियोगः स्वजनापमान ऋणस्य शेषं कुनृपस्य सेवा ।**
**दरिद्रभावो विषमा सभा च विनाग्निनैते प्रदहन्ति कायम् ॥८९९॥**

स्त्रीचा वियोग, स्वजनामध्यें अपमान, कर्जाची बाकी, दुष्ट राजाची नोकरी, द्रारिद्य आणि विषम सभा इतकीं अग्नीवांचून शरीरास जाळून टाकितात ॥८९९॥

आणखी सांगितलें आहे कीं,

**साध्वीस्त्रीणां दयितविरहे मानिनां मानभङ्गे**
**सल्लोकानामपि जनरवे निग्रहे पण्डितानाम् ।**
**अन्योद्रेके कुटिलमनसां निर्गुणानां विदेशे**
**भृत्याभावे भवति विषमं किंतु संभावितानाम् ॥ ९०० ॥**

पतिव्रता स्त्रियांस पतीचा वियोग झाला असतां, मानी पुरुषांस मानभंग झाला असतां, सत्पुरुषांस लोकापवादामुळें, पंडितांस दंड झाल्यामुळें, कुटिल पुरुषांस दुसऱ्याचा उत्कर्ष झाला असतां, निर्गुणांस परदेशामध्यें आणि संभावितांस सेवकाच्या अभावीं दुःख होतें ॥ ९०० ॥

पुनः देशाटन करणाऱ्या मनुष्यानें नेहमीं सावध रहावें, कधीं गाफिल होऊं नये; कारण सृष्टीमध्यें सर्व मनुष्य एकसारखे नसल्यामुळें रस्त्यामध्यें चोर किंवा लुटारू लोकांकडून हानि होण्याचा संभव असतो. करितां मनुस्मृतीच्या चवथ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**नातिकल्यं नातिसायं नातिमध्यंदिने स्थिते ।**
**नाज्ञातेन समं गच्छेन्नैको न वृषलैः सह ॥ ९०१ ॥**

मोठ्या पहांटेस, अति सायंकाळीं, बरोबर मध्याह्नसमयीं, अनोळख्याबरोबर, एकट्यानें व शूद्रांबरोबर प्रवास करूं नये ॥ ९०१ ॥

पुनः पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**न वित्तं दर्शयेत्प्राज्ञः कस्यचित्स्वल्पमप्यहो ।**
**मुनेरपि यतस्तस्य दर्शनाच्चलते मनः ॥ ९०२ ॥**

बुद्धिमान् मनुष्यानें प्रवासामध्यें थोडेंहि द्रव्य कोणासहि दाखवूं नये, कारण द्रव्य पाहून अहो ! बहुतकरून मुनीचेंहि मन चळतें ॥ ९०२ ॥

तसेंच राजाच्या कचेरीमध्यें व कांहीं कार्यप्रसंगीं एकत्र जमलेल्या जनसमूहामध्यें कांहींकांहीं वेळीं जाण्या—येण्याचा परिपाठ ठेवल्यानें सभेमध्यें वागण्याची रीतभात समजून येते, बोलण्याची हिम्मत येते आणि विविध विषयांवर भाषणें ऐकिल्यामुळें नाना प्रकारचा बोध होतो. सांगितलें आहे कीं,

**गन्तव्या राजसभा द्रष्टव्या राजवल्लभाः पुरुषाः ।**
**यद्यपि न भवत्यर्थो भवत्यनर्थप्रतीकारः ॥ ९०३ ॥**

राजसभेंत जावें व राजाच्या कार्यकारी मंडळीस भेटत रहावें, त्यामुळें कदाचित् अर्थलाभ न झाला तरीहि अनर्थाचा प्रतीकार होतो ॥ ९०३ ॥

परंतु सभा कशी असली पाहिजे त्याविषयीं विदुरनीतींत सांगितलें आहे कीं,

**न सा सभा यत्र न सन्ति वृद्धा वृद्धा न ते ये न वदन्ति धर्मम् ।**
**धर्मः स नो यत्र न सत्यमस्ति सत्यं न तद्यच्छलनाभ्युपेतम् ॥ ९०४ ॥**

जीमध्यें वृद्ध नसतील ती सभा नव्हे, जे न्यायवाक्य न बोलतील ते वृद्ध नव्हत, ज्यामध्यें सत्य नसेल तो न्याय नव्हे, आणि जें छलानें युक्त असेल तें सत्य नव्हे ॥ ९०४ ॥

अशा सभेमध्यें भाषण करणें असेल तर, त्याचा पहिल्यापासून विचार करून ठेवावा व भाषणाच्या वेळींहि विचार करून बोलावें. कारण सांगितलें आहे कीं,

राजनि महतां मध्ये विबुधवराणां समागमे नित्यम् ।
साध्वसदूषितहृदयो वाक्पटुरपि कातरो भवति ॥ ९०५ ॥

संचय केली नसेल तर नित्य राजाजवळ, मोठ्या लोकांच्यामध्यें आणि विद्वानांच्या समागमाच्या वेळीं, बोलण्यामध्यें चतुर पुरुषहि भीतीनें हृदय गडबडून भित्रा बनतो ॥ ९०५ ॥

तसेंच शार्ङ्गधरपद्धतींत सांगितलें आहे कीं,

कथमिह मनुष्यजन्मा संप्रविशति सदसि विबुधगमितायाम् ।
येन न सुभाषितामृतमास्वादितमाननान्तमातृप्तेः ॥ ९०६ ॥

ज्या मनुष्यानें सुभाषितरूप अमृत मुखामध्यें तृप्ति होईतोंपर्यंत चाखलें नाहीं, तो या लोकांत विद्वानांच्या सभेमध्यें कसा जाईल ? ॥ ९०६ ॥

पुनः सांगितलें आहे कीं,

खिन्नं चापि सुभाषितेन रमते स्वीयं मनः सर्वदा
श्रुत्वाऽन्यस्य सुभाषितं खलु मनः श्रोतुं पुनर्वाञ्छति ।
अज्ञान् ज्ञानवतोऽप्यनेन हि वशीकर्तुं समर्थो भवेत्
कर्तव्यो हि सुभाषितस्य मनुजैरावश्यकः संग्रहः ॥९०७॥

आपलें खेद पावलेलें मन सुभाषितानें रमतें, दुसऱ्याचें सुभाषित ऐकून मन पुनः ऐकण्याची इच्छा करतें आणि अज्ञानी व ज्ञानी यांसहि सुभाषितानें वश करण्याविषयीं समर्थ होतां येतें, करितां मनुष्यांनीं अवश्य सुभाषिताचा संग्रह करावा ॥ ९०७ ॥

परंतु सभेमध्यें कोणाचाहिं अपमान होईल अशा रीतीनें बोलूं नये, जसें कीं ताणून बोलणें, मिथ्यावाद करणें, क्षुद्र छिद्रें काढणें व चालू भाषा सोडून आपलें पांडित्य दाखविण्यासाठीं कोणाशींही दुसऱ्या भाषेंत बोलणें वगैरे. शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

लज्जते च सुहृद्येन भिद्यते दुर्मना भवेत् ।
वक्तव्यं न तथा किंचिद्विनोदेऽपि च धीमता ॥ ९०८ ॥

जेणेंकरून मित्र लज्जित होईल, भेद पावेल व मनामध्यें खिन्न होईल, असें कांहींहि बुद्धिमानानें विनोदाच्या वेळींहि बोलूं नये ॥ ९०८ ॥

**वदेद्वृद्धानुकूलं यन्न बालसदृशं क्वचित् ।**
**परवेश्मगतस्तत्स्त्रीवीक्षणं न च कारयेत् ॥ ९०९ ॥**

नेहमीं ज्ञानवृद्ध पुरुषांस अनुकूल असें बोलावें. परंतु बालकासारखें केव्हांच बोलूं नये व दुसऱ्याच्या घरामध्यें जाऊन त्याच्या स्त्रीसमोर पाहूं नये ॥९०९॥

तसेंच अवकाशाच्या वेळीं विविध प्रकारचे ग्रंथ विचार करण्याचा परिचय ठेविल्यानें कांहीं ना कांहीं तरी नवीन तऱ्हेचें ज्ञान प्राप्त होतें. मनुस्मृतीच्या चवथ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**नित्यं शास्त्राण्यवेक्षेत धन्यानि च हितानि च ॥ ९१० ॥**

द्रव्य मिळविण्याची रीति शिकविणारीं व हितोपदेश करणारीं शास्त्रें नित्य वाचावीं ॥ ९१० ॥

पुनः व्यापारी व विद्वान् यांची संगति ठेविल्यानें व्यवहारांत कुशल होतां येतें. सांगितलें आहे कीं,

**देशाटनं राजसभाप्रवेशो व्यापारिविद्वज्जनसंगतिश्च ।**
**सर्वेषु शास्त्रेष्ववलोकनं च चातुर्यमूलानि भवन्ति पञ्च ॥ ९११ ॥**

देशाटन करणें, राजसभेंत जाणें, व्यापारी व विद्वान् यांची संगति करणें आणि सर्व शास्त्रांचें परिशीलन करणें हीं पांच चातुर्याचीं मूलकारणें आहेत ॥ ९११ ॥

आतां शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**राज्ञो नानुकृतिं कुर्यान्नच श्रेष्ठस्य कस्यचित् ।**
**नैको गच्छेद्व्यालव्याघ्रचोरादींश्च प्रबाधितुम् ॥ ९१२ ॥**

व्यवहारामध्यें राजाची किंवा आपल्याहून एखाद्या श्रेष्ठाची बरोबरी करूं नये आणि सर्प, वाघ वगैरे हिंस्र जनावरें व चोर यांस बाधा करण्याकरितां एकट्यानें जाऊं नये ॥ ९१२ ॥

व्यवहारामध्यें घरासंबंधीं नित्य खर्च ठेवण्यांत व कार्यप्रसंगीं खर्च करण्यांत आपल्याहून मोठा राजा किंवा श्रीमंत यांची बरोबरी करण्यास गेल्यानें दारिद्र्य येतें; व एखाद्याचा बंगला पाहून आपली झोंपडी पाडून टाकणाराप्रमाणें लोकांत आपला उपहास होतो. करितां सांगितलें आहे कीं,

**शीघ्रमायमनालोच्य व्ययमानः स्ववाञ्छया ।**
**परिक्षीयत एवासौ धनिकोऽपि नृपोपमः ॥ ९१३ ॥**

जो आपली आवक पाहिल्यावांचून उतावीळपणानें इच्छेप्रमाणें खर्च ठेवतो तो कदाचित् राजासारखा श्रीमंत असला, तरीहि द्रव्यानें क्षीण होतो ॥ ९१३ ॥

तसेंच चोर, वाघ वगैरेंस पकडण्यासाठीं एकटें गेल्यानें एखाद्या वेळीं त्यांच्यापासून शरीरसंबंधीं नुकसान होण्याचा संभव आहे. यासाठीं चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**एकाकिना तपो द्वाभ्यां पठनं गायनं त्रिभिः ।**
**चतुर्भिर्गमनं क्षेत्रं पञ्चभिर्बहुभी रणः ॥ ९१४ ॥**

एकट्यानें तपश्चर्या करावी, दोघांनीं पठन करावें, तिघांनीं गायन करावें, चौघांनीं गमन करावें, पांचांनीं शेत करावें आणि पुष्कळजणांनीं युद्ध करावें असें सांगितलें आहे ॥ ९१४ ॥

आतां शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**जिघांसन्तं जिघांसीयाद्गुरुमप्याततायिनम् ।**
**कलहे न सहायः स्यात्संरक्षेद्बहुनायकम् ॥ ९१५ ॥**

मारून टाकण्याची इच्छा करणाऱ्या आततायी अशा वडिलासहि मारावा, कोणाच्याहि कलहामध्यें साहाय्य करूं नये अर्थात् निरपराध्यास मारूं नये. आणि अनेकांचें पालन करणाराचें रक्षण करावें ॥ ९१५ ॥

कारण आततायीस मारिल्यानें आणि जरूर पडली असतां जशास तसें झाल्यानें कांहीं लोकांमध्यें अन्याय झटला जात नाहीं, तर उलट दुर्जन भितात व पुनः कोणाचेंहि वाईट करूं इच्छित नाहींत. शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सागितलें आहे कीं,

**अग्निदो गरदश्चैव शस्त्रोन्मत्तो धनापहः ।**
**क्षेत्रदारहरश्चैतान् षड्विद्यादाततायिनः ॥ ९१६ ॥**

आग लावून जाळून टाकणारा, विष देणारा, शस्त्रानें मारण्यास तयार झालेला, द्रव्याचा अपहार करणारा, जमीन दाबणारा व स्त्रीस हरण करणारा हे सहा आततायी जाणावे ॥ ९१६ ॥

करितां विदुरनीतींत सांगितलें आहे कीं,

**यस्मिन्यथा वर्तते यो मनुष्यस्तस्मिंस्तथा वर्तितव्यं स धर्मः ।**
**मायाचारो मायया वर्तितव्यः साध्वाचारः साधुना प्रत्यपेयः ॥९१७॥**

ज्याच्याजवळ जो मनुष्य जशा रीतीनें वागतो, त्यानें त्या मनुष्याजवळ तशा रीतीनें वागणें हा धर्म आहे, करितां कपटी मनुष्याशीं कपटानें व सरळ मनुष्याशीं सरळपणानें वागावें ॥ ९१७ ॥

कारण पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**अप्रकटीकृतशक्तिः शक्तोऽपि जनस्तिरस्क्रियां लभते ।**
**निवसन्नन्तर्दारुणि लङ्घ्यो वह्निर्नतु ज्वलितः ॥ ९१८ ॥**

आपली शक्ति प्रकट न करणारा समर्थहि लोकाच्या तिरस्कारास प्राप्त होतो; कारण काष्ठाच्या आंत असलेला अग्नि उल्लंघन करतां येतो, परंतु प्रज्वलित झालेला उल्लंघन करवत नाहीं ॥ ९१८ ॥

पुनः भारवि कवीनें सांगितलें आहे कीं,

**व्रजन्ति ते मूढधियः पराभवं भवन्ति मायाविषु ये न मायिनः ।**
**प्रविश्य हि घ्नन्ति शठास्तथाविधानसंवृताङ्गान्निशिता इवेषवः॥९१९॥**

जे कपटी मनुष्यांजवळ कपटी होत नाहींत, ते मूढबुद्धि पराभव पावतात, कारण चिलखत न घातल्यामुळें ज्यांचें शरीर उघडें आहे अशा पुरुषांस तीक्ष्ण बाणांप्रमाणें, ते कपटी शठ निष्कपटी पुरुषांच्या हृदयामध्यें प्रवेश करून ठार करितात ॥ ९१९ ॥

तसेंच शार्ङ्गधरपद्धतींत सांगितलें आहे कीं,

**रे रे कोकिल मा भज मौनं किंचिदुदञ्चय पञ्चमरागम् ।**
**नोचेत्त्वामिह को जानीते काककदम्बकपिहिते चाम्रे ।। ९२० ।।**

हे कोकिला ! मौन धरूं नकोस, कांहीं तरी पंचम राग गा, जर असें न करशील, तर काकसमूहानें गजवजून गेलेल्या या आम्रवृक्षाच्या ठिकाणीं तुला कोण ओळखणार ? ।। ९२० ।।

तसेंच एखाद्याच्या कलहामध्यें खोटी सहायता करून त्याची वाढ केल्या नें दोन्ही पक्षांचें नुकसान होतें व लोकांमध्यें आपली अपकीर्ति होते. पुनः जो अनेकांचें पालन करणारा असेल अशा मनुष्याची रक्षा करणें हें अनेकांचें रक्षण केल्यासारखें आहे. कारण त्याच्या जीवितावर पुष्कळ मनुष्यांच्य जीविकेचा आधार असतो. पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**यस्मिन् कुले यः पुरुषः प्रधानः स सर्वयत्नैः परिरक्षणीयः ।**
**तस्मिन् विनष्टे कुलसारभूते न नाभिभङ्गे ह्यरयो वहन्ति ।। ९२१ ।।**

ज्या कुलामध्यें जो मुख्य पुरुष असेल तो सर्व यत्नेंकरून रक्षण करण्यास योग्य आहे. कारण तो कुलाचा सारभूत पुरुष नाश पावेल तर जसे गाडीच्या चक्राचा मध्य मोडल्यानें आरे राहूं शकत नाहींत, तसे बाकीचे अनाथ झाल्यानें कुटुंब निराधार झाल्यामुळें चालत नाहीं ।। ९२१ ।।

आतां शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**सदारं प्रौढपुत्रं द्राक् श्रेयोर्थी विभजेत् पिता ।**
**सदारा भ्रातरः प्रौढा विभजेयुः परस्परम् ।। ९२२ ।।**

कल्याण इच्छिणाऱ्या पित्यानें विवाहित प्रौढ पुत्रांस लवकर वेगळे करावे, व पित्याच्या अभावीं विवाहित प्रौढ भावांनीं परस्पर समजून वेगळें व्हावें ।। ९२२ ।।

कारण पित्यानें विवाहित प्रौढ पुत्रांस आपल्या मिळकतीचे विभाग करून दिल्यानें किंवा पित्याच्या अभावीं त्या विवाहित प्रौढ बंधूंनीं आपसांत समजून विभाग करून घेतल्यानें कुटुंबांत कलह होण्याचा संभव असत नाहीं. परंतु पित्यानें पुत्रांस भाग वांटून देतेसमयीं आपला व आपल्या स्त्रीचा हिस्सा वेगळा काढून घ्यावा. कारण सांगितलें आहे कीं,

**न पुत्रायत्तमैश्वर्यं सर्वं कुर्याच्च पण्डितः ।**
**पुत्रार्पितप्रभुत्वोऽभूद्धृतराष्ट्रस्तृणोपमः ॥ ९२३ ॥**

बुद्धिमान् पुरुषानें आपलें सर्व ऐश्वर्य पुत्रांच्या स्वाधीन करून देऊं नये, कारण धृतराष्ट्र राजा आपलें स्वामित्व पुत्रांस अर्पण केल्यामुळें तृणतुल्य झाला होता ॥ ९२३ ॥

या प्रकारें विभाग केले नसतील तर कांहीं काल गेल्यानंतर स्त्रियांच्या खटखटीनें क्लेश उत्पन्न होतो. यद्यपि एका उदरापासून जन्मलेल्या बंधूंमध्यें परस्पर प्रेम असण्याचा संभव आहे, तथापि भिन्न भिन्न उदरांत जन्म घेऊन घरांत आलेल्या स्त्रियांमध्यें तसें प्रेम असत नाहीं, त्यामुळें सहज गोष्टीमध्यें कलह होतो, व एकमेकींवर आरोप ठेवून आपापल्या पतीचे एकांतामध्यें कान भरतात; आणि असें निरंतर घडल्यामुळें बंधुबंधूच्या ऐक्याचा बिघाड होतो. चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**एकोदरसमुद्भूता ह्येकनक्षत्रसंभवाः ।**
**न भवन्ति समाः शीले यथा बदरिकण्टकाः ॥ ९२४ ॥**

एका उदरापासून उत्पन्न झालेले व एका नक्षत्रावर जन्मलेले मनुष्यहि बोरीच्या कांट्यांप्रमाणें स्वभावानें सारखे असत नाहींत ॥ ९२४ ॥

तसेंच पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**तावत्स्यात्सुप्रसन्नास्यस्तावद्गुरुजने रतः ।**
**पुरुषो योषितां यावन्न शृणोति वचो रहः ॥ ९२५ ॥**

जोंपर्यंत एकांतामध्यें पुरुष स्त्रीचें वचन ऐकत नाहीं, तोंपर्यंतच तो प्रसन्नचर्या धारण करतो व गुरुजनाच्या ठिकाणीं प्रीति ठेवणारा होतो ॥ ९२५॥

**अकृत्यं मन्यते कृत्यमगम्यं मन्यते सुगम् ।**
**अभक्ष्यं मन्यते भक्ष्यं स्त्रीवाक्यप्रेरितो जनः ॥ ९२६ ॥**

कारण स्त्रीवाक्यानें प्रेरित झालेला पुरुष अकृत्यास कृत्य, अगम्यास गम्य आणि अभक्ष्यास भक्ष्य समजतो ॥ ९२६ ॥

पुनः सांगितलें आहे कीं,

न स्त्रीजितः प्रमूढः स्याद्गाढरागवशीकृतः ।
पुत्रशोकाद्दशरथो जीवं जायाजितोऽत्यजत् ॥ ९२७ ॥

पुरुषानें अत्यंत प्रीतीमुळें वश होऊन मूढ बनून स्त्रीजित होऊं नये, कारण स्त्रीनें जिंकलेला दशरथ राजा पुत्रशोकानें मरण पावला ॥ ९२७ ॥

करितां सांगितल्याप्रमाणें प्रौढपणामध्यें परस्पर मोकळीक करून भावांनीं एकीनें रहावें; कदाचित् कांहीं निमित्तानें एकत्र असलेल्या भांड्यांप्रमाणें भावांमध्येंहि परस्पर कलह होईल, तर त्यांनीं आपली एकी संभाळण्याकरितां एकमेकांस बोललेलें वचन विसरून जाऊन, उत्तम मनुष्याप्रमाणें, रेषेनें वेगळें केलेल्या पाण्याप्रमाणें पुनः लगेच मिळून जावें. अथवा मध्यम मनुष्या-प्रमाणें, रेषेनें वेगळी केलेल्या धूळीप्रमाणें थोडा वेळ गेल्यानंतर मिळून जावें; परंतु अधम मनुष्याप्रमाणें रेषा काढून वेगळा दिसणाऱ्या दगडाप्रमाणें कधीं भिन्नता ठेवूं नये. कारण कलहाच्या वेळीं क्रोधाच्या आवेशांत अयोग्य वचनहि बोलून जाण्याचा स्वभाव आहे. पुनः त्यांनीं उद्योग—धंदा बरोबर मिळून करावा. कारण कोणताहि मोठा धंदा थोड्या भांडवलानें होत नाहीं व तो करण्यामध्यें एकट्याची हिम्मत चालत नाहीं. पुनः धंद्यामध्यें कांहीं नुकसान होईल तर तें सर्वांच्या एकत्र जमलेल्या भांडवलांत समजून येत नाहीं; परंतु जर भाऊ आपापल्या भांडवलानें वेगवेगळा धंदा करतील, तर ज्याचें नुकसान होईल तो गरीब होतो. तसेंच जर सर्व एकत्र राहातील तर काठ्यांच्या भाऱ्या-प्रमाणें कोणत्याहि शत्रूकडून पराभव पावत नाहींत, परंतु जर वेगळे असतील तर एक एक सुट्या काठीप्रमाणें नाश पावतात. करितां जोंपर्यंत प्रत्येक भाऊ आपापला धंदा उत्तम प्रकारें करण्यास समर्थ न होईल, तोंपर्यंत त्यांनीं उद्योग—धंदा बरोबरच करावा. आणि निरंतर एकी राहील त्याप्रकारें घरांतील जो वडील असेल त्याच्या वचनांत रहावें. शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

गृहं बहुकुटुम्बेन दीपैर्गोभिः सुबालकैः ।
भात्येकनायकं नित्यं न गृहं बहुनायकम् ॥ ९२८ ॥

एक नायकयुक्त घर मोठें कुटुंब, दिवे गाई व चांगले बालक यांनीं शोभतें. परंतु ज्यामध्यें अनेक धनी असतील तें घर शोभत नाहीं ॥ ९२८ ॥

कारण सांगितलें आहे कीं,

**सर्वे यत्र विनेतारः सर्वे पण्डितमानिनः ।**
**सर्वे महत्त्वमिच्छन्ति तद्वृन्दमवसीदति ॥ ९२९ ॥**

ज्या समुदायामध्यें सर्व नायक, सर्व आपणास शहाणा समजणारे व सर्व मोठेपणाची इच्छा करितात तो समुदाय नाश पावतो ॥ ९२९ ॥

आतां शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**पराधीनं नैव कुर्यात्तरुणीधनपुस्तकम् ।**
**कृतं चेल्लभ्यते दैवाद् भ्रष्टं नष्टं विमर्दितम् ॥ ९३० ॥**

तरुणी धन व पुस्तक दुसऱ्याच्या स्वाधीन करूं नये. आणि कदाचित् केलीं असतील व सुदैवानें परत मिळतील तर, भ्रष्ट, नष्ट व विमर्दित होऊन मिळतील ॥ ९३० ॥

कारण विश्वास ठेवून द्रंव्य वगैरे वस्तू दुसऱ्याच्या स्वाधीन केल्यानें वर सांगितल्याप्रमाणें हानि होण्याचा संभव आहे. आणि जेथपर्यंत ती वस्तु पुनः स्वहस्तगत होत नाहीं तेथपर्यंत मनास उद्वेग असतो. याशिवाय दुसऱ्या तऱ्हेनेंहि पराधीनपणा दुःखदायक आहे. चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**नदीतीरे च ये वृक्षाः परगेहे च कामिनी ।**
**मन्त्रिहीनाश्च राजानः शीघ्रं नश्यन्त्यसंशयम् ॥ ९३१ ॥**

नदीच्या तीरावरील वृक्ष, दुसऱ्याच्या येथें असणारी स्त्री व मंत्र्याशिवायचे राजे हे तत्काळ नाश पावतील, यांत संशय नाहीं ॥ ९३१ ॥

**आलस्योपहता विद्या परहस्तगताः स्त्रियः ।**
**अल्पबीजं हतं क्षेत्रं हतं सैन्यमनायकम् ॥ ९३२ ॥**

आलस्यानें विद्या नाश पावते, दुसऱ्याच्या हातांत गेल्यानें स्त्री नाश पावते, अल्पबीजयुक्त क्षेत्र नाश पावतें व नायकरहित सैन्य नाश पावतें ॥९३२॥

तसेंच पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

यस्य क्षेत्रं नदीतीरे भार्या च परसंगता ।
ससर्पे च गृहे वासः कथं स्यात्तस्य निर्वृतिः ॥ ९३३ ॥

ज्याचें शेत नदीच्या तीरावर, ज्याची स्त्री परक्यास मिळालेली व ज्याचा वास सर्पयुक्त घरामध्यें असेल त्यास सुख कसें मिळणार ? ॥ ९३३ ॥

पल्लवग्राहि पाण्डित्यं क्रयक्रीता रतिस्तथा ।
भोजनं च पराधीनं तिस्रः पुंसां विडम्बनाः ॥ ९३४ ॥

पातेऱ्याप्रमाणें सर्वांपासून थोडें थोडें जमविलेलें पांडित्य, पैसा देवून विकत घेतलेली रति आणि पराधीन भोजन या पुरुषाच्या तीन विडंबना होत ॥९३४॥

मनुस्मृतीच्या चवथ्या अध्यायांतहि सांगितलें आहे कीं,

सर्वं परवशं दुःखं सर्वमात्मवशं सुखम् ।
एतद्विद्यात्समासेन लक्षणं सुखदुःखयोः ॥ ९३५ ॥

पराधीन सर्व दुःखरूप व स्वाधीन सर्व सुखरूप आहे; हें संक्षेपतः सुख-दुःखाचें लक्षण जाणावें ॥ ९३५ ॥

पुनः सांगितलें आहे कीं,

कष्टं खलु मूर्खत्वं कष्टं खलु सर्वदा च दारिद्र्यम् ।
कष्टादपि कष्टतरं परगृहवासः परान्नं च ॥ ९३६ ॥

मूर्खपणा व निरंतर दारिद्र्य कष्टरूप आहे व दुसऱ्याचे घरीं राहणें व दुसऱ्याचें अन्न खाणें हें तर अत्यंत कष्टरूप आहे ॥ ९३६ ॥

आतां शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

कूटेन व्यवहारं तु वृत्तिलोपं न कस्यचित् ।
कुर्यान्न चिन्तयेत्कस्य मनसाप्यहितं क्वचित् ॥ ९३७ ॥

कपटानें व्यवहार करूं नये, कोणाच्याहि वृत्तीचा लोप करूं नये आणि मनानेंहि कोणाचें अहित चिंतन करूं नये ॥ ९३७ ॥

कारण व्यवहारामध्यें कपट ठेविल्यानें कोणी विश्वास करीत नाहीं आणि कोणाच्याहि वृत्तीचा लोप केल्यानें जगतामध्यें निंदेस पात्र होतो व ज्याची वृत्ती नष्ट होईल त्यास दुःख होतें. करितां पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**अयं निजः परो वेति गणना लघुचेतसाम् ।**
**उदारचरितानां तु वसुधैव कुटुम्बकम् ॥ ९३८ ॥**

"हा माझा व हा परका" अशी गणना ज्यांचें हृदय तुच्छ त्यांची असते, परंतु ज्यांचें उदार चरित्र आहे त्यांचें तर सर्व पृथिवी कुटुंबरूप आहे ॥ ९३८ ॥

**निर्गुणेष्वपि सत्त्वेषु दयां कुर्वन्ति साधवः ।**
**नहि संहरते ज्योत्स्नां चन्द्रश्चाण्डालवेश्मनि ॥ ९३९ ॥**

सत्पुरुष निर्गुण प्राण्यांचे ठिकाणींहि दया करितात; कारण चंद्र चांडालाच्या घरामध्यें प्रकाशाचा अभाव करीत नाहीं ॥ ९३९ ॥

करितां शार्ङ्गधरपद्धतींत सांगितलें आहे कीं,

**अपकारिषु यः साधुः स साधुः सद्भिरुच्यते ।**
**उपकारिषु यः साधुः साधुत्वे तस्य को गुणः ॥ ९४० ॥**

अपकार करणाऱ्याविषयीं जो उपकारी होईल, त्यास सत्पुरुष साधु ह्मणतात, कारण उपकार करणाऱ्यांविषयीं जो उपकारी होईल, त्याच्या साधुपणामध्यें कोणता गुण आहे ॥ ९४० ॥

करितां श्रीमहाभारतांतर्गत उद्योगपर्वामध्यें सांगितलें आहे कीं,

**हितं यत्सर्वभूतानामात्मनश्च सुखावहम् ।**
**तत्कुर्यात्सर्वदा ह्येतन्मूलं सर्वार्थसिद्धये ॥ ९४१ ॥**

जें सर्व प्राण्यांस हितावह व आपणास सुखावह असेल, तें नित्य आचरण करावें, कारण हें सर्व अर्थाच्या सिद्धीचें मूळ आहे ॥ ९४१ ॥

**पापं कुर्वन्पापकीर्तिः पापमेवाश्नुते फलम् ।**
**पुण्यं कुर्वन्पुण्यकीर्तिः पुण्यमत्यन्तमश्नुते ॥ ९४२ ॥**

पाप करणारा पापकीर्ति होऊन पापरूपच फल भोगतो व पुण्य करणारा पुण्यकीर्ति होऊन पुण्यरूप फल भोगतो ॥ ९४२ ॥

**तत्त्वज्ञः सर्वभूतानां योग्यज्ञः सर्वकर्मणाम् ।**
**उपायज्ञो मनुष्याणां नरः पण्डित उच्यते ॥ ९४३ ॥**

करितां सर्व प्राण्यांचें तत्त्व, सर्व कर्मांची योजना व सर्व उपाय जाणणारा पुरुष, मनुष्यांमध्यें पंडित ह्मटला जातो ॥ ९४३ ॥

याप्रमाणें शारीरिक व व्यावहारिक कुशलामध्यें तत्पर राहणारा मनुष्य सुखी होतो. यासाठीं आचार्यानें शिष्यास कुशलापासून गाफिल न राहण्याविषयीं उपदेश केला आहे.

याप्रकारें प्रमाणसहस्रीच्या आचारप्रकरणापैकीं कुशलापासून गाफिल न राहण्याचा उपदेश.

---

## ॥ भूत्यै न प्रमदितव्यम् ॥

आठवा उपदेश समृद्धि मिळविण्याविषयीं प्रमाद न करण्याबद्दल आहे, कारण ज्याच्याजवळ समृद्धि असते, त्यास सर्व लोक भजतात. माता, पिता, बंधु, स्त्री, पुत्र, मित्र व संबंधी बहुतकरून द्रव्याचेच सोयरे होतात, व लोकांमध्येंहि विशेषेंकरून जे समृद्ध असतात तेच पूज्य होतात. कारण सांगितलें आहे कीं,

**वयोवृद्धास्तपोवृद्धा ज्ञानवृद्धास्तथाऽपरे ।**
**तिष्ठन्ति सधनद्वारे गुणिनः किङ्करा इव ॥ ९४४ ॥**

वयोवृद्ध, तपोवृद्ध, ज्ञानवृद्ध व इतरहि गुणिजन, धनवृद्धाच्या आंगणामध्यें सेवकांप्रमाणें उभे राहतात ॥ ९४४ ॥

**अहो नु कष्टः सततं प्रवासस्ततोऽतिकष्टः परगेहवासः ।**
**कष्टाधिका नीचजनस्य सेवा ततोऽतिकष्टा धनहीनता च ॥ ९४५ ॥**

अहो! निरंतर प्रवास कष्टरूप आहे, परक्याच्या घरामध्यें वास त्याहून कष्टरूप आहे, नीचजनाची सेवा त्याहून अधिक कष्टरूप आहे व दारिद्र्य तर त्याहूनहि अतिशय कष्टरूप आहे ॥ ९४५ ॥

**माता निन्दति नाभिनन्दति पिता भ्राता न संभाषते**
**भृत्यः कुप्यति नानुगच्छति सुतः कान्ता न संरज्जते ।**
**अर्थप्रार्थनशङ्कया न कुरुतेऽप्यालापमात्रं सुहृत्**
**तस्मादर्थमुपार्जयस्व सुसखे ह्यर्थस्य सर्वे वशाः ॥ ९४६ ॥**

दरिद्र्याची माता निंदा करते, पिता अभिनंदन करीत नाहीं, बंधु चांगल्या प्रकारें भाषण करीत नाहीं, नोकर रागावतो, पुत्र अनुसरण करीत नाहीं, स्त्री उत्तम प्रकारें प्रसन्न करीत नाहीं, मित्र द्रव्य मागेल या शंकेनें बोलत नाहीं, करितां हे मित्रा, धन संपादन कर, कारण सर्व धनास वश आहेत ॥ ९४६ ॥

**धनैर्निष्कुलीनाः कुलीना भवन्ति**
**धनैरापदं मानवा निस्तरन्ति ।**
**धनेभ्यः परो बान्धवो नास्ति लोके**
**धनान्यर्जयध्वं धनान्यर्जयध्वम् ॥ ९४७ ॥**

धनानें कुलहीन पुरुष कुलीन होतात, धनानें मनुष्य आपत्तीस तरून जातात व लोकामध्यें धनाहून श्रेष्ठ संबंधी कोणी नाहीं, ह्मणून धन संपादन करा! धन संपादन करा!! ॥ ९४७ ॥

याविषयीं शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**क्षणशः कणशश्चैव विद्यामर्थं च साधयेत् ।**
**न त्याज्यौ तु क्षणकणौ नित्यं विद्याधनार्थिना ॥ ९४८ ॥**

एकेक क्षणानें विद्या व एकेक कणानें धन संपादन करावें, करितां विद्या व धन इच्छिणाऱ्या पुरुषांनीं क्षण व कण फुकट जाऊं देवूं नये ॥ ९४८ ॥

**जीवामि शतवर्षं तु नन्दामि च धनेन वै ।**
**इति बुध्द्या संचिनुयाद्धनं विद्यादिकं सदा ॥ ९४९ ॥**

"मी शंभर वर्षें जीवंत राहणार व द्रव्यानें आनंद मिळविणार" अशा बुद्धीनें द्रव्य व विद्या नेहमीं संपादन करावी ॥ ९४९ ॥

करितां आळस सोडून द्रव्य संपादन करावें, कारण माघ कवीनें सांगितलें आहे कीं,

**तृप्तियोगः परेणापि महिम्ना न महात्मनाम् ।**
**पूर्णश्चन्द्रोदयाकांक्षी दृष्टान्तोऽत्र महार्णवः ॥ ९५० ॥**

मोठ्यांस श्रेष्ठ महिम्यानेंहि तृप्तियोग होत नाहीं, याविषयीं समुद्र पूर्ण असून चंद्रोदयाची इच्छा करतो हा दृष्टांत समजावा ॥ ९५० ॥

पुनः चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**प्रथमे नार्जिता विद्या द्वितीये नार्जितं धनम् ।**
**तृतीये नार्जितं पुण्यं चतुर्थे किं करिष्यति ॥ ९५१ ॥**

ज्यानें पहिल्या अवस्थेंत विद्या, दुसऱ्या अवस्थेंत धन व तिसऱ्या अवस्थेंत पुण्य संपादन केलें नाहीं तो चवथ्या अवस्थेंत काय करणार? ॥९५१॥

तसेंच पंचतंत्रात सांगितलें आहे कीं,

**न नरस्य नरो दासो दासस्त्वर्थस्य भूपते ।**
**गौरवं लाघवं चापि धनाधननिबन्धनम् ॥ ९५२ ॥**

हे राजा! मनुष्य मनुष्याचा दास नाहीं. तर द्रव्याचा दास आहे, कारण गौरव व लाघव यांचें मूळ क्रमानें धन व अधन आहे ॥ ९५२ ॥

**मानो वा दर्पो वा विज्ञानं विभ्रमः सुबुद्धिर्वा ।**
**सर्वं प्रणश्यति समं वित्तविहीनो यदा पुरुषः ॥ ९५३ ॥**

ज्यावेळीं पुरुष निर्धन होतो, त्यावेळीं त्याचीं मान, अभिमान, विज्ञान, विलास, आणि उत्कृष्ट बुद्धि हीं सर्व बरोबरच नाश पावतात ॥ ९५३ ॥

**अधोऽधः पश्यतः कस्य महिमा नोपचीयते ।**
**उपर्युपरि पश्यन्तः सर्व एव दरिद्रति ॥ ९५४ ॥**

आपल्याहून खालचीं खालचीं उदाहरणें पाहिल्यानें कोणाचा महिमा वाढलेला भासत नाहीं? परंतु आपल्याहून श्रेष्ठ उदाहरणें पाहिल्यानें सर्वच दरिद्र भासतात ॥ ९५४ ॥

**अव्यवसायिनमलसं दैवपरं साहसाच्च परिहीणम् ।**
**प्रमदेव हि वृद्धपतिं नेच्छत्युपगूहितुं लक्ष्मीः ॥ ९५५ ॥**

उद्योग न करणारा, आळशी, केवळ दैवासच मानणारा व पराक्रमानें रहित अशा पुरुषास, वृद्ध पतीस तरुण स्त्रीप्रमाणें लक्ष्मी भेटण्याची इच्छा करीत नाहीं ॥ ९५५ ॥

**आलस्यं स्त्रीसेवा सरोगता जन्मभूमिवात्सल्यम् ।**
**संतोषो भीरुत्वं षड् व्याघाता महत्त्वस्य ॥ ९५६ ॥**

आलस्य, स्त्रीसेवा, रोग, जन्मभूमीच्या ठिकाणीं प्रीतीनें पडून राहणें, संतोष व भित्रेपणा हे सहा दोष मोठेपणाचे विरोधी आहेत ॥ ९५६ ॥

यात्यधोऽधो व्रजत्युच्चैर्नरः स्वैरेव कर्मभिः ।
कूपस्य खनिता यद्वत्प्राकारस्येव कारकः ॥ ९५७ ॥

विहीर खोदणारा व किल्ला रचणारा यांच्याप्रमाणें, मनुष्य आपल्या कर्मांनींच खालीं जातो व वर चढतो ॥ ९५७ ॥

न दैवमिति संचिन्त्य त्यजेदुद्योगमात्मनः ।
अनुद्योगेन तैलानि तिलेभ्यो नाप्तुमर्हति ॥ ९५८ ॥

दैवावर भरंवसा ठेवून आपला उद्योग सोडूं नये, कारण उद्योग केल्यावांचून कोणीहि तिळांपासून तेल मिळविण्यास समर्थ होत नाहीं ॥ ९५८ ॥

उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मी–
दैवेनदेयमिति कापुरुषा वदन्ति ।
दैवं निहत्य कुरु पौरुषमात्मशक्त्या
यत्ने कृते यदि न सिद्ध्यति कोऽत्र दोषः ॥ ९५९ ॥

उद्योगी पुरुषश्रेष्ठास लक्ष्मी प्राप्त होते, व कुत्सित पुरुष दैव देईल असें ह्मणतात; करितां दैवास हटवून कोणत्याहि न्यूनतेशिवाय आपल्या शक्तीप्रमाणें उद्योग करावा आणि तसा उद्योग केला असतांहि कार्यसिद्धि न होईल तर त्यांत समयदोष जाणावा ॥ ९५९ ॥

काकतालीयवत्प्राप्तं दृष्ट्वापि निधिमग्रतः ।
न स्वयं दैवमादत्ते पुरुषार्थमपेक्षते ॥ ९६० ॥

'कावळा बसला व तालफल पडलें' याप्रमाणें आपल्या समोर प्राप्त झालेला द्रव्याचा ठेवा पाहूनहि दैव स्वतः ग्रहण करूं शकत नाहीं, तर प्रयत्नाची अपेक्षा असते ॥ ९६० ॥

उद्यमेन हि सिध्यन्ति कार्याणि न मनोरथैः ।
कातरा इति जल्पन्ति यद्भाव्यं तद्भविष्यति ॥ ९६१ ॥

उद्योग केल्यानें कार्यें सिद्ध होतात, केवळ मनोरथ केल्यानें होत नाहींत; असें असतां भित्रे मनुष्य जें होणें असेल तें होईल, असें ह्मणतात ॥ ९६१ ॥

**उत्साहसंपन्नमदीर्घसूत्रं क्रियाविधिज्ञं व्यसनेष्वसक्तम् ।**
**शूरं कृतज्ञं दृढसौहृदं च लक्ष्मीः स्वयं याति निवासहेतोः ॥९६२॥**

उत्साहयुक्त, आळसरहित, क्रियेचा विधि जाणणारा, निर्व्यसनी, शूर, केलेले उपकार स्मरणारा आणि दृढ मैत्री ठेवणारा अशा पुरुषाजवळ वास करण्यासाठीं लक्ष्मी स्वतः येते ॥ ९६२ ॥

**विषमां हि दशां प्राप्य दैवं गर्हयते नरः ।**
**आत्मनः कर्मदोषांश्च नैव जानात्यपण्डितः ॥ ९६३ ॥**

मूर्ख मनुष्य विषम दशेस प्राप्त होऊन, दैवाची निंदा करतो परंतु आपल्या कर्मदोषांस जाणत नाहीं ॥ ९६३ ॥

**विस्मयः सर्वथा हेयः प्रत्यूहः सर्वकर्मणाम् ।**
**तस्माद्बुधैस्तमुत्सृज्य साध्यसिद्धिर्विधीयताम् ॥ ९६४ ॥**

सर्व कर्मांस विघ्नरूप विस्मय सर्वथा त्याग करण्यास योग्य आहे, करितां तो सोडून बुद्धिमंतांनीं कार्यसिद्धि करावी ॥ ९६४ ॥

**पश्य दैववशात्प्राप्तं भोज्यकालेऽपि भोजनम् ।**
**हस्तोद्यमं विना वक्त्रे प्रविशेन्न कथंचन ॥ ९६५ ॥**

भोजनाच्या वेळीं कदाचित् दैववशात् भोजन प्राप्त झालें, तरीहि हाताच्या उद्योगावांचून कोणत्याहि प्रकारें मुखांत जात नाहीं तें पहा ॥ ९६५ ॥

**यथा ह्येकेन चक्रेण न रथस्य गतिर्भवेत् ।**
**एवं पुरुषकारेण विना दैवं न सिध्यति ॥ ९६६ ॥**

जशी एका चक्रानें रथाची गति होत नाहीं, तसें उद्योगाशिवाय दैव सिद्ध होत नाहीं ॥ ९६६ ॥

**न स्वल्पमप्यध्यवसायभीरोः करोति विज्ञानविधिर्गुणं हि ।**
**अन्धस्य किं हस्ततलस्थितोऽपि प्रकाशयत्यर्थमिह प्रदीपः ॥९६७॥**

व्यवसायापासून भिणाऱ्यास, त्याच्या ज्ञानाचा विधि अल्पहि गुण करीत नाहीं, कारण लोकामध्यें आंधळ्याच्या हातांत असलेला दिवा काय त्यास पदार्थ दाखवूं शकतो ? ॥ ९६७ ॥

पुनः शुक्रनीतीच्या पहिल्याच अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**प्राक्कर्मवशतः सर्वं भवत्येवेति निश्चितम् ।**
**तदोपदेशा व्यर्थाः स्युः कार्याकार्यप्रबोधकाः ॥ ९६८ ॥**

दैववशात् सर्व होतें, असा जर निश्चय असेल तर कर्तव्याकर्तव्याचा बोध करणारीं उपदेशशास्त्रें निष्प्रयोजन ठरतील ॥ ९६८ ॥

**धीमन्तो वन्द्यचरिता मन्यन्ते पौरुषं महत् ।**
**अशक्ताः पौरुषं कर्तुं क्लीबा दैवमुपासते ॥ ९६९ ॥**

करितां वंदन करण्यास योग्य ज्यांचें चरित्र असे बुद्धिमान् पुरुष उद्योगास श्रेष्ठ मानितात, आणि उद्योग करण्यास असमर्थ, असे भित्रे, दैवास मोठें समजतात ॥ ९६९ ॥

करितां मनुस्मृतीमध्यें सांगितलें आहे कीं,

**नात्मानमवमन्येत पूर्वाभिरसमृद्धिभिः ।**
**आ मृत्योः श्रियमन्विच्छेन्नैनां मन्येत दुर्लभाम् ॥ ९७० ॥**

प्रथम उद्योग केला असतां द्रव्य मिळालें नसेल तर, "मी मंदभाग्य आहें" असें मानून आपल्या आत्म्यास निंदूं नये, तर मरेपर्यंत लक्ष्मी मिळविण्याविषयीं उद्योग करावा व तीस दुर्लभ मानूं नये ॥ ९७० ॥

**आरभेतैव कर्माणि श्रान्तः श्रान्तः पुनः पुनः ।**
**कर्माण्यारभमाणं हि पुरुषं श्रीर्निषेवते ॥ ९७१ ॥**

आणि थकून थकूनहि पुनः पुनः कर्मासच आरंभ करावा, कारण कर्माचा आरंभ करणाऱ्या पुरुषास लक्ष्मी सेविते ॥ ९७१ ॥

तसेंच सभातरंगांत सांगितलें आहे कीं,

**विहाय पौरुषं यो हि दैवमेवावलम्बते ।**
**प्रासादसिंहवत्तस्य मूर्ध्नि तिष्ठन्ति वायसाः ॥ ९७२ ॥**

जो उद्योगास सोडून दैवाचाच आश्रय करतो, त्याच्या मस्तकावर राजवाड्याच्या सिंहाच्या डोक्यावर जसे तसे कावळे बसतात ॥ ९७२ ॥

पुन: श्रीमहाभारतांतर्गत वनपर्वाच्या ३२ व्या अध्यायांत द्रौपदीनें युधिष्ठिरास सांगितलें आहे कीं,

**यश्च दिष्टपरो लोके यश्चापि हठवादिकः ।**
**उभावपि शठावेतौ कर्मबुद्धिः प्रशस्यते ॥ ९७३ ॥**

लोकामध्यें जो दैवासच मानणारा व हठवादी आहे, हे दोघेहि शठ, आणि उद्योगास मानणारा श्रेष्ठ ह्मटला जातो ॥ ९७३ ॥

**यो हि दिष्टमुपासीनो निर्विचेष्टः सुखं शयेत् ।**
**अवसीदेत्स दुर्बुद्धिरामो घट इवोदके ॥ ९७४ ॥**

करितां जो दैवास मानून कांहींतरी उद्योग केल्याशिवाय घरांत सुखानें झोंपून राहतो, तो दुष्टबुद्धि पाण्यामध्यें असलेल्या कच्च्या घड्याप्रमाणें नाश पावतो ॥ ९७४ ॥

तसेंच योगवासिष्ठाच्या मुमुक्षुप्रकरणांत वसिष्ठानें रामचंद्रास सांगितलें आहे कीं,

**देशकालक्रियाद्रव्यवशतो विस्फुरन्त्यमी ।**
**सर्व एव जगद्भावा जयत्यधिकयत्नवान् ॥ ९७५ ॥**

जगताचे हे सर्व भाव देश, काल, क्रिया व द्रव्य यांच्या योगेंकरून विस्फुरण पावतात, त्यामध्यें अधिक यत्नवान् जय पावतो ॥ ९७५ ॥

**ये स्वमुद्योगमुत्सृज्य स्थिता दैवपरायणाः ।**
**ते धर्ममर्थं कामं च नाशयन्त्यात्मविद्विषः ॥ ९७६ ॥**

जे आपला उद्योग सोडून दैवावर विश्वास ठेवून बसतात, ते आत्मद्वेष्टे धर्म, अर्थ व काम यांचा नाश करितात ॥ ९७६ ॥

**भोक्ता तृप्यति नाभोक्ता गन्ता गच्छति नागतिः ।**
**वक्ता वक्ति नचावक्ता पौरुषं सफलं नृणाम् ॥ ९७७ ॥**

भोजन करणारा तृप्त होतो, न भोजन करणारा तृप्त होत नाहीं, चालणारा जातो, न चालणारा जात नाहीं व बोलणारा बोलतो, न बोलणारा बोलत नाहीं, यावरून मनुष्यांचा उद्योगच सफल दिसतो ॥ ९७७ ॥

**शुभेन पुरुषार्थेन शुभमासाद्यते फलम् ।**
**अशुभेनाशुभं राम यथेच्छसि तथा कुरु ॥ ९७८ ॥**

हे रामा ! मनुष्य चांगल्या उद्योगानें चांगल्या व वाईट उद्योगानें वाईट फलास प्राप्त होतो, ह्मणून जसें वाटेल तसें कर ॥ ९७८ ॥

**दैवमेवेह चेत्कर्तृ पुंसः किमिह चेष्टया ।**
**स्नानदानासनोच्चारान् दैवमेव करिष्यति ॥ ९७९ ॥**

या लोकांत दैवच जर कर्ता असेल तर पुरुषाच्या चेष्टेनें काय फळ? कारण स्नान, दान, आसन व उच्चार हेहि दैवच करील ॥ ९७९ ॥

**किंवा शास्त्रोपदेशेन मूकोऽयं पुरुषः किल ।**
**संचार्यते तु दैवेन किं कस्येहोपदिश्यते ॥ ९८० ॥**

पुनः या लोकांत शास्त्रोपदेशानें काय ? कारण या मुक्या पुरुषास दैवच मार्ग दाखवील, करितां कसला उपदेश कोणास करावयाचा ? ॥ ९८० ॥

**कालविद्भिर्विनिर्णीता यस्यास्ति चिरजीविता ।**
**स चेज्जीवति संछिन्नशिरास्तद्दैवमुत्तमम् ॥ ९८१ ॥**

दैव जाणणाऱ्या ज्योतिष्यांनीं ज्याचें पुष्कळ आयुष्य ठरविलें असेल, तो जर मस्तक तोडल्यानंतर वांचेल तर दैव श्रेष्ठ जाणावें ॥ ९८१ ॥

**कालविद्भिर्विनिर्णीतं पाण्डित्यं यस्य राघव ।**
**अनध्यापित एवासौ तज्ज्ञश्चेद्दैवमुत्तमम् ॥ ९८२ ॥**

पुनः हे राम ! त्या दैववेत्त्यांनीं ज्याचें पांडित्य ठरविलें असेल, तो शिकविल्यावांचून जर पंडित होईल तर दैव उत्तम जाणावें ॥ ९८२ ॥

करितां सांगितलें आहे कीं,

**उद्यमः साहसं धैर्यं बुद्धिः शक्तिः पराक्रमः ।**
**षडेते यत्र वर्तन्ते तत्र देवः सहायकृत् ॥ ९८३ ॥**

उद्यम, शौर्य, धैर्य, बुद्धि, शक्ति व पराक्रम हे सहा गुण जेथें विद्यमान असतील तेथें देव साहाय्य करणारा आहे ॥ ९८३ ॥

**निःस्वो वष्टि सहस्रं वष्टि सहस्री तथैव लक्षं च ।**
**लक्षी कोटिं वाञ्छति कोटीशोऽब्जं स्वभावतो नित्यम् ॥९८४॥**

निर्धन हजारांची, सहस्रपति लक्षांची, लाखपति कोटीची व क्रोडोपति अब्जाची नेहमीं स्वभावतःच इच्छा करतो ॥ ९८४ ॥

**गच्छतिपपीलिकापंक्तिः समुद्रमपि संतरेत् ।**
**अगच्छन्वैनतेयोऽपि पादमेकं न गच्छति ॥ ९८५ ॥**

चालणाऱ्या मुंग्यांची रांग समुद्रहि तरून जाईल, परंतु न चालणारा गरुड असला तरी एक पाऊलहि जात नाहीं ॥ ९८५ ॥

करितां श्रीमहाभारतांतर्गत उद्योगपर्वांत सांगितलें आहे कीं,

**यथाशक्ति चिकीर्षन्ति यथाशक्ति च कुर्वते ।**
**न कंचिदवमन्यन्ते नराः पण्डितबुद्धयः ॥ ९८६ ॥**

बुद्धिमान् मनुष्य यथाशक्ति करण्यास इच्छितात व यथाशक्ति करितात, परंतु कोणाचाहि तिरस्कार करीत नाहींत ॥ ९८६ ॥

तसेंच याच ग्रंथाच्या वनपर्वांत सांगितलें आहे कीं,

**निश्चित्य यः प्रक्रमते नान्तर्वसति कर्मणाम् ।**
**अवन्ध्यकालो वश्यात्मा स वै पण्डित उच्यते ॥ ९८७ ॥**

जो विचारानें निश्चय करून कर्मास आरंभ करतो, मध्यें सोडून देत नाहीं, वेळ फुकट जाऊं देत नाहीं, व मन ताब्यांत ठेवतो, तो पंडित ह्मटला जातो ॥ ९८७ ॥

करितां पुरुषानें नेहमीं उद्योगाविषयीं तत्पर राहून न्याय्य मार्गानें द्रव्य मिळवावें, कधींच कोणाचा विश्वासघात करून शिव्याशाप वगैरे घेऊन महा अन्याय करूं नये. कारण तसें करून मिळविलेलें द्रव्य ज्याचे शिव्याशाप असतील त्याची हाय पडल्यानें सुखानें भोगतां येत नाहीं व लोकांमध्यें अपकीर्ति होते. पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

अन्यायोपार्जितं वित्तं दशवर्षाणि तिष्ठति ।
प्राप्ते चैकादशे वर्षे समूलं च विनश्यति ॥ ९८८ ॥

अन्यायानें मिळविलेलें द्रव्य दहा वर्षें राहतें, परंतु अकरावें वर्ष प्राप्त झालें कीं मूळासह नाश पावतें ॥ ९८८ ॥

त्रिभिर्वर्षैस्त्रिभिर्मासैस्त्रिभिः पक्षैस्त्रिभिर्दिनैः ।
अत्युत्कटैः पापपुण्यैरिहैव फलमश्नुते ॥ ९८९ ॥

मनुष्य अत्यंत उत्कट पाप–पुण्याचें फळ या लोकामध्येंच तीन वर्षांनीं, तीन महिन्यांनीं, तीन पक्षांनीं किंवा तीन दिवसांनीं भोगतो ॥ ९८९ ॥

पुनः सांगितलें आहे कीं,

पुत्रेषु वा नप्तृषु वा न चेदात्मनि पश्यति ।
फलन्ति पापपुण्यानि यथा भुक्तमिवोदरम् ॥ ९९० ॥

मनुष्य पाप–पुण्य जर आपल्या आयुष्यामध्यें न भोगील तर तें त्याचे पुत्र किंवा पौत्र यांचे ठिकाणीं, उदराच्या ठिकाणीं खाल्लेलें जसें तसें, फलित होतें ॥ ९९० ॥

उपकारिणि विश्रब्धे शुद्धमतौ यः समाचरति पापम् ।
तं जनमसत्यसन्धं ददाति परमेश्वरो दण्डम् ॥ ९९१ ॥

ज्याची निष्कपटी बुद्धि अशा उपकार करणाऱ्या, व विश्वासू पुरुषाचे ठिकाणीं जो पाप आचरण करतो, त्या असत्य भाषण करणाऱ्या मनुष्यास परमेश्वर दंड देतो ॥ ९९१ ॥

याप्रकारें सदुद्योग करीत असतां द्रव्य मिळालें तर गर्विष्ठ होऊं नये; कारण नोकरीवांचून व्यापार वगैरे उद्योगामध्यें लाभ किंवा हानि हीं दोन प्रकारचीं फळें असल्यामुळें एखादेवेळीं मनुष्याजवळून द्रव्य जात राहण्याचा संभव आहे; कारण मनुष्य सर्वज्ञ नाहीं. विदुरनीतींत सांगितलें आहे कीं,

जरा रूपं हरति हि धैर्यमाशा मृत्युः प्राणान्धर्मचर्यामसूया ।
क्रोधः श्रियं शीलमनार्यसेवा ह्रियं कामः सर्वमेवाभिमानः ॥९९२॥

जरा रूपास, आशा धैर्यास, मृत्यु प्राणांस, असूया धर्माचरणास, क्रोध शोभेस, नीचसेवा शीलास, काम लज्जेस व अभिमान सर्वास हरण करतो ॥ ९९२ ॥

करितां शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**न विद्यया न शौर्येण धनेनाभिजनेन च ।**
**न बलेन प्रमत्तः स्यान्नातिमानी कदाचन ॥ ९९३ ॥**

विद्या, शौर्य, धन, कुल आणि बल यांहींकरून कधींहि उन्मत्त व अभिमानी होऊं नये ॥ ९९३ ॥

कारण पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**धनवानिति हि मदस्ते किं गतविभवो विषादमुपयासि ।**
**करनिहितकन्दुकसमाः पातोत्पाता मनुष्याणाम् ॥ ९९४ ॥**

तुला "मी श्रीमंत आहें" असा मद असेल तर वैभव गेलें असतां खेद कां पावतोस ? करितां मनुष्याची चढती आणि पडती दशा हातानें उडविलेल्या चेंडूसारखी समजावी ॥ ९९४ ॥

**अभ्रच्छाया खलप्रीतिर्नवसस्यानि योषितः ।**
**किंचित्कालोपभोग्यानि यौवनानि धनानि च ॥ ९९५ ॥**

अभ्रांची छाया, खलांची प्रीति, नवीं धान्यें, वनिता, यौवनें व धनें हीं सर्व अल्पकाल भोगण्यास योग्य आहेत ॥ ९९५ ॥

**अनित्यं यौवनं रूपं जीवितं द्रव्यसंचयः ।**
**ऐश्वर्यं प्रियसंवासो मुह्येत्तत्र न पण्डितः ॥ ९९६ ॥**

यौवन, रूप, जीवित, द्रव्यसंचय, ऐश्वर्य व प्रियाचा सहवास हीं सर्व नश्वर आहेत, करितां त्याविषयीं पंडित मोह पावत नाहीं ॥ ९९६ ॥

तसेंच प्रसंगरत्नावलींत सांगितलें आहे कीं,

**दिव्यमाम्ररसं पीत्वा न गर्वं याति कोकिलः ।**
**पीत्वा कर्दमपानीयं भेको मकमकायते ॥ ९९७ ॥**

कोकिल पक्षी आंब्याचा दिव्यरस पिऊन गर्व करीत नाहीं, परंतु बेडूक चिखलाचें पाणी पिऊन मस्त राहतो ॥ ९९७ ॥

करितां ज्यास द्रव्य मिळालें असेल, त्यानें बहकून जावून कोणाचाहि तिरस्कार करूं नये, गरीबांस गांजूं नये, तसेंच कोणाशीं वैर धरूं नये, कारण एखादे वेळीं द्रव्य जाऊन दैन्यावस्था प्राप्त होईल तर ते सर्व वैरी होऊन आपली संधि साधितात. कारण सांगितलें आहे कीं,

**आपद्गतं हससि किं द्रविणान्ध मूढ**
**लक्ष्मीः स्थिरा न भवतीति किमत्र चित्रम् ।**
**एतान्प्रपश्यसि घटाञ्जलयन्त्रचक्रे**
**रिक्ता भवन्ति भरिता भरिताश्च रिक्ताः ॥ ९९८ ॥**

हे द्रव्यानें अंध झालेल्या मूढा ! आपत्तीस प्राप्त झालेल्याचा उपहास कां करतोस ? कारण लक्ष्मी ही स्थिर असत नाहीं, यांत आश्चर्य कसलें ? या जलयंत्राच्या चक्राचे ठिकाणीं बांधिलेल्या घटांकडे पहा ! भरलेले रिकामे होत आहेत व रिकामे झालेले पुनः भरत आहेत ॥ ९९८ ॥

**मा त्वं तात बले स्थित्वा बाधिष्ठा दुर्बलं जनम् ।**
**नहि दुर्बलदग्धानां काले किंचित् प्ररोहति ॥ ९९९ ॥**

हे तात ! तूं बलामध्यें राहून दुर्बळ लोकांस हैराण करूं नकोस, कारण दुर्बलांनीं जाळून टांकलेल्यांचे कांहींहि कालेंकरून उगवत नाहीं ॥ ९९९ ॥

तसेंच पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**तृणानि नोन्मूलयति प्रभञ्जनो मृदूनि नीचैः प्रणतानि सर्वतः ।**
**समुन्नतानेव तरून्प्रबाधते महान्महत्येव करोति विक्रमम् ॥ १००० ॥**

तुफानी वायु चहूं बाजूंनीं खालीं नम्र झालेल्या कोमल तृणांस मुळांतून उपटून टांकित नाहीं, तर अतिशय उंच वृक्षांसच बाधा करतो, कारण मोठा मोठ्या जवळच पराक्रम करतो ॥ १००० ॥

**क्षते प्रहारा निपतन्त्यभीक्ष्णं धनक्षये गच्छति सर्वतः श्रीः ।**
**आपत्सु वैराणि समुल्लसन्ति छिद्रेष्वनर्था बहुलीभवन्ति ॥ १ ॥**

व्रणाच्या ठिकाणीं वारंवार प्रहार होतात, द्रव्य सोंपूं लागलें असतां लक्ष्मी चाऱ्ही बाजूंनीं जाते, आणि आपत्तीमध्यें द्वेष प्रकट होतात, कारण बहुत करून छिद्रांच्या ठिकाणीं अनर्थ बहुत होतात ॥ १ ॥

पुनः भवभूतीनें सांगितलें आहे कीं,

**विद्या विवादाय धनं मदाय शक्तिः परेषां परिपीडनाय ।**
**खलस्य साधोर्विपरीतमेतत् ज्ञानाय दानाय च रक्षणाय ॥ २ ॥**

खलाची विद्या वाद करण्यासाठीं, लक्ष्मी अभिमान करण्यासाठीं आणि शक्ति दुसऱ्यास पीडा करण्यासाठीं आहे. परंतु याहून उलट सत्पुरुषाची विद्या ज्ञानाकरितां, लक्ष्मी परोपकाराकरितां व शक्ति दुसऱ्याचें रक्षण करण्याकरितां आहे ॥ २ ॥

पुनः द्रव्याच्या मदांत दुर्जनांची संगति करूं नये, कारण ते तोंडानें गोड बोलतात, परंतु आंतून आपला मतलब साधण्याकरितां एखाद्यास वाईट मार्गांत प्रवृत्त करण्यास चुकत नाहींत, व ज्याचें खात असतील त्यासच विघडविण्याविषयीं तत्पर असतात. करितां त्यांची सोबत न करतां त्यांस दुरूनच नमस्कार करावा. चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**दुर्जनः प्रियवादी च नैतद्विश्वासकारणम् ।**
**मधु तिष्ठति जिव्हाग्रे हृदि हालाहलं विषम् ॥ ३ ॥**

दुर्जन प्रिय बोलणारा असतो, परंतु हें कांहीं त्याच्यावर विश्वास ठेवण्यास कारण नाहीं, कां कीं त्याच्या जिभेच्या अग्रभागावर मध असतो परंतु हृदयांत हालाहल विष असतें ॥ ३ ॥

**तक्षकस्य विषं दन्ते मक्षिकाया विषं शिरे ।**
**वृश्चिकस्य विषं पुच्छे सर्वाङ्गे तु दुरात्मनः ॥ ४ ॥**

सर्पाच्या दांतामध्यें, माशीच्या मस्तकामध्यें, विंचवाच्या पुच्छामध्यें आणि दुर्जनाच्या सर्वांगीं विष असतें ॥ ४ ॥

दह्यमानाः सुतीव्रेण नीचाः परयशोग्निना ।
अशक्तास्तत्पदं गन्तुं ततो निन्दां प्रकुर्वते ॥ ५ ॥

दुसऱ्याच्या यशोरूप तीक्ष्ण अग्नीनें दग्ध होणारे दुर्जन, त्या पदास पोहोंचण्याविषयीं असमर्थ असल्यामुळें निंदा करतात ॥ ५ ॥

दुर्जनं प्रथमं वन्दे सज्जनं तदनन्तरम् ।
मुखप्रक्षालनात्पूर्वं गुदप्रक्षालनं यथा ॥ ६ ॥

जसें गुदप्रक्षालन केल्यानंतर तोंड धुणें, तसें दुर्जनास प्रथम व सज्जनास त्यानंतर नमन करितों ॥ ६ ॥

तसेंच शार्ङ्गधरपद्धतींत सांगितलें आहे कीं,

गुणिनां गुणेषु सत्स्वपि पिशुनजनो दोषमात्रमादत्ते ।
पुष्पे फले विरागी क्रमेलकः कण्टकौघमिव ॥ ७ ॥

जसा पुष्पें व फळें यांविषयीं प्रीति नसलेला उंट कांट्यांचा समुदाय तेवढा खातो, तसा दुर्जन गुणी जनांपाशीं गुण असतांहि केवळ दोषांचेंच ग्रहण करितो ॥ ७ ॥

खलः सर्षपमात्राणि परच्छिद्राणि पश्यति ।
आत्मनो बिल्वमात्राणि पश्यन्नपि न पश्यति ॥ ८ ॥

दुर्जन दुसऱ्याचीं मोहरीएवढीं छिद्रें पाहतो, परंतु आपलीं वेलफळाएवढीं छिद्रें पाहत असूनहि पाहत नाहीं ॥ ८ ॥

रविरपि न दहति तादृग् यादृग् संदहति वालुकानिकरः ।
अन्यस्माल्लब्धपदो नीचः प्रायेण दुःसहो भवति ॥ ९ ॥

जसा सूर्याच्या तापानें संतप्त झालेला रेतीचा ढीग जाळतो, तसा प्रत्यक्ष सूर्यहि जाळीत नाहीं, कारण दुसऱ्यापासून ज्यास अधिकार प्राप्त झाला तो बहुतकरून दुःसह होतो ॥ ९ ॥

तसेंच सभातरंगांत सांगितलें आहे कीं,

संवर्द्धितोऽपि पयसा भुजगो न वश्य-
स्तत्पालकानपि निहन्ति बलेन सिंहः ।
दुष्टः परैरुपकृतस्तदनिष्टकारी
विश्वासलेश इह नैव बुधैर्विधेयः ॥ १०१० ॥

दूध पाजून वाढविला असतांहि सर्प वश रहात नाहीं, सिंह आपलें पालन करणारांसहि बलानें मारतो, आणि श्रेष्ठांनीं ज्याच्यावर उपकार केले आहेत असा दुर्जन त्यांचेंच अहित करणारा होतो, करितां त्यांचा बुद्धिमंतांनीं या लोकांत लेशमात्रहि विश्वास करूं नये ॥ १०१० ॥

प्राक् पादयोः पतति खादति पृष्ठमांसं
कर्णे कलं किमपि रौति शनैर्विचित्रम् ।
छिद्रं निरूप्य सहसा प्रविशत्यशङ्कः
सर्वं करोति मशकस्य खलश्चरित्रम् ॥ ११ ॥

प्रथम पायांवर पडतो, नंतर पाठीचें मांस खातो, आस्ते आस्ते कानामध्यें कांहीं विचित्र गुणगुण करतो, आणि छिद्र पाहून निःशंक रीतीनें एकदम प्रवेश करतो, याप्रकारचें मच्छराचें सर्व चरित्र दुर्जन करतो ॥ ११ ॥

जाड्यं ह्रीमति गण्यते व्रतरुचौ दम्भः शुचौ कैतवं
शूरे निर्घृणता मुनौ विमतिता दैन्यं प्रियालापिनि ।
तेजस्विन्यवलिप्तता मुखरता वक्तर्यशक्तिः स्थिरे
तत्को नाम गुणो भवेत्स गुणिनां यो दुर्जनैर्नाङ्कितः ॥१२॥

दुर्जन लज्जायुक्ताचे ठिकाणीं जडता, व्रतयुक्ताचे ठिकाणीं दंभ, पवित्राचे ठिकाणीं कपट, शूर वीराचे ठिकाणीं निर्दयता, मुनीचे ठिकाणीं मतिहीनता, प्रिय बोलणाराचे ठिकाणीं दैन्य, तेजस्व्याचे ठिकाणीं गर्व, वक्त्याचे ठिकाणीं वाचाळपणा आणि स्थिराचे ठिकाणीं असामर्थ्य समजतात, याप्रकारें गुणिजनांचा कोणता गुण असा आहे कीं, ज्यास दुर्जनांनीं दोषाचा शिक्का मारला नाहीं ? ॥ १२ ॥

पुनः प्रसंगरत्नावलींत सांगितलें आहे कीं,

**विद्यया विमलयाऽप्यलङ्कृतो दुर्जनः सदसि मास्तु कश्चन ।**
**साक्षरो हि विपरीततां गतः केवलं जगति सोऽपि राक्षसः ॥१३॥**

निर्मळ विद्येनें अलंकृत असाहि कोणी दुर्जन सभेमध्यें नसो ! कारण तो विपरीतपणास प्राप्त झालेला साक्षर जगतांत केवळ राक्षसच होय ! ॥ १३ ॥

**खलानां कण्टकानां च द्विविधैव प्रतिक्रिया ।**
**उपानद्मुखभङ्गो वा दूरतो वा विसर्जनम् ॥ १४ ॥**

करितां समजविला असतां मस्तकावर चढलेला दुर्जन व कंटक यांची, एक तर जोड्यांनीं तोंड फोडणें किंवा दुरूनच त्याग करणें, अशी दोन प्रकारची प्रतिक्रिया आहे ॥ १४ ॥

**शिरसि निहितोऽपि नित्यं यत्नादपि सेवितो बहुस्नेहैः ।**
**तरुणीकच इव नीचः कौटिल्यं नैव विजहाति ॥ १५ ॥**

पुनः तरुणीच्या केशांप्रमाणें, दुर्जनास डोक्यावर चढविला असेल व यत्नेंकरून अतिशय स्नेहानें सेविला असेल, तथापि तो आपली कुटिलता सोडीत नाहीं ॥ १५ ॥

पुनः भर्तृहरीनें ह्मटलें आहे कीं,

**अकरुणत्वमकारणविग्रहः परधने परयोषिति च स्पृहा ।**
**सुजनबन्धुजनेष्वसहिष्णुता प्रकृतिसिद्धमिदं हि दुरात्मनाम् ॥ १६ ॥**

निर्दयता, कारणावांचून कलह, परधन व परदारा यांविषयीं इच्छा आणि सुजन व बंधुजन यांची निंदा हे दोष बहुतकरून दुर्जनांमध्यें स्वभावतःच असतात ॥ १६ ॥

**मृगमीनसज्जनानां तृणजलसंतोषविहितवृत्तीनाम् ।**
**लुब्धकधीवरपिशुना निष्कारणवैरिणो जगति ॥ १७ ॥**

जगतामध्यें क्रमानें तृण, जल व संतोष यांहींकरून निर्वाह करणारे, मृग, मीन व सज्जन यांचे, कांहींएक कारण नसतांहि पारधी, कोळी व दुर्जन वैरी होतात ॥ १७ ॥

तसेंच कल्पतरूमध्यें सांगितलें आहे कीं,

सुजनानामपि हृदयं पिशुनपरिष्वङ्गलिप्तमिह भवति ।
पवनः परागवाही रथ्यासु वहन् रजस्वलो भवति ॥ १८ ॥

या लोकांत सज्जनाचें हृदयहि दुर्जनाच्या संगानें लिप्त होतें, कारण पुष्पांचे रजःकण वाहणारा वायु मार्गांमधून वाहत असतां धूलियुक्त होतो ॥ १८ ॥

अतिमलिने कर्तव्ये भवति खलानामतीव निपुणा धीः ।
तिमिरे हि कौशिकानां रूपं प्रतिपद्यते दृष्टिः ॥ १९ ॥

अत्यंत मलिन काम करण्यामध्यें दुर्जनांची बुद्धि अतिशय निपुण असते; कारण घुवडाची दृष्टि अंधारामध्येंच पदार्थांस पाहते ॥ १९ ॥

अहो प्रकृतिसादृश्यं श्लेष्मणो दुर्जनस्य च ।
मधुरैः कोपमायाति तिक्तकेनैव शाम्यति ॥ १०२० ॥

अहो ! कफ व दुर्जन यांची प्रकृति समान भासते ! कारण ते दोघेहि मधुर रसानें कुपित होतात व कडव्या रसानें शमतात ॥ १०२० ॥

अतिरमणीये कार्ये पिशुनोऽन्वेषयति दूषणान्येव ।
अतिरमणीये वपुषि व्रणगणमिव मक्षिकानिकरः ॥ २१ ॥

जसा अतिसुंदर शरीराचे ठिकाणीं माशांचा समुदाय व्रण तेवढा हुडकून काढतो, तसा अति रमणीय कार्याच्या ठिकाणीं, त्याच्या कर्त्याचा उत्साह भंग करण्याकरितां दुर्जन दोष तेवढाच शोधून काढतो ॥ २१ ॥

गुणगणगुम्फितकाव्ये मृगयति दोषं गुणं न जातु खलः ।
मणिमयमन्दिरमध्ये पश्यति हि पिपीलिका छिद्रम् ॥ २२ ॥

पुनः जशी मणिजडित मंदिरामध्यें मुंगी छिद्र शोधून काढते, तसा अतिशय गुणयुक्त काव्यामध्यें दुर्जन दोषच हुडकून काढतो, परंतु गुण कधींच शोधीत नाहीं ॥ २२ ॥

यासाठीं दुर्जनाचा संग करूं नये; कारण त्यांच्या सोबतीनें दुर्व्यसनांत पडावयास होतें. सर्व दुर्व्यसनांमध्यें वेश्यागमन मुख्य आहे. कारण त्या एका व्यसनाच्यापायीं मद्यपान, जुगार, चोरी वगैरे इतर अनेक दुर्व्यसनें मनुष्यास

जडण्याचा संभव आहे. कारण वेश्येच्या येथें जाणारास नशेकरितां मदिरा, भांग, अफीम, गांजा वगैरे वगैरे मादक पदार्थ सेवन करण्याची जरूर पडते. द्रव्य संपलें असतां जुगार खेळण्याविषयीं प्रवृत्ति होते व त्यांत हार गेलें असतां चोरी करण्याची आवश्यकता वाटते, त्याचा परिणाम वाईट होतो. पूर्वीं मद्यपानानें यादव नाश पावले आहेत व जुगारानें पांडव दुःखी झाले आहेत. पुनः मद्यपानानें शरीरांतील काळीजाचें नुकसान होऊन लवकर मृत्यु येतो, करितां आपलें कल्याण इच्छिणाऱ्या पुरुषांनीं वेश्यागमनादि व्यसना-मध्यें पडूं नये. सांगितलें आहे कीं,

**हारहीरकहिरण्यभूषणैस्तोषमेति गणिका धनैषिणी ।**
**प्रेमकोमलकटाक्षवीक्षणैरेव तुष्यति कुलाङ्गनाजनः ॥ २३ ॥**

द्रव्यास इच्छिणारी वेश्या हिऱ्यांचे हार व सुवर्णाचे अलंकार यांहींकरून संतोष पावते, परंतु कुलीन स्त्री केवळ पतीच्या प्रेमयुक्त कोमल कटाक्षांनीं पाहण्यानेंच संतुष्ट होते ॥ २३ ॥

**एता हसन्ति च रुदन्ति च वित्तहेतो-**
**र्विश्वासयन्ति पुरुषं न च विश्वसन्ति ।**
**तस्मान्नरेण कुलशीलसमन्वितेन**
**वेश्याः श्मशानघटिका इव वर्जनीयाः ॥ २४ ॥**

वेश्या द्रव्याकरितां हंसतात, रडतात, पुरुषाचा आपल्यावर विश्वास उत्पन्न करतात व आपण त्यांच्यावर विश्वास ठेवीत नाहींत, करितां कुल-शील-संपन्न पुरुषानें त्यांचा स्मशानांतील गाडग्यांप्रमाणें त्याग करावा ॥२४॥

**मक्षिका मशको वेश्या मूषिको याचकस्तथा ।**
**ग्रामणीर्गणकश्चैव सप्तैते परभक्षकाः ॥ २५ ॥**

माशी, मच्छर, वेश्या, उंदिर, याचक, जुलमी पाटील व ज्योतिषी, हे सात स्वभावतःच दुसऱ्यास भक्षण करणारे आहेत ॥ २५ ॥

पुनः कैफ करणाऱ्याविषयीं जिनधर्मविवेकांत सांगितलें आहे कीं,

**मत्तो हिनस्ति सर्वं मिथ्या प्रलपति विकलया बुध्या ।**
**कामयते चागम्यां सावज्ञं मद्यपानमत्तः सन् ॥ २६ ॥**

मद्यपानानें मत्त झालेला पुरुष सर्वांचा नाश करतो, बुद्धि विकल झाल्यामुळें मिथ्या बडबडतो, आणि तिरस्कार होईल त्या रीतीनें अगम्या स्त्रीची इच्छा करतो ॥ २६ ॥

**वैकल्यं धरणीपातमयथोचितजल्पनम् ।**
**सन्निपातस्य चिह्नानि मद्यं सर्वाणि दर्शयेत् ॥ २७ ॥**

विकलता, पृथ्वीवर पडणें, कांहीं तरी बडबडणें हीं सन्निपाताचीं सर्व लक्षणें मद्यपान दाखवितें ॥ २७ ॥

**चित्ते भ्रान्तिर्जायते मद्यपानाद्भ्रान्ते चित्ते पापचर्यामुपैति ।**
**पापं कृत्वा दुर्गतिं यान्ति मूढास्तस्मान्मद्यं नैव पेयं न पेयम् ॥२८॥**

मद्यपान केल्यामुळें चित्तामध्यें भ्रांति उत्पन्न होते, व चित्त भ्रांत झाल्यानें मनुष्य पापाचरण करतो, पाप केल्यामुळें मूढ लोक दुर्गतीस जातात, करितां मद्यपान कधींहि करूं नये ॥ २८ ॥

तसेंच जुगार व चोरी यांविषयीं विदुरनीतींत सांगितलें आहे कीं,

**द्यूतमेव पुराकल्पे दृष्टं वैरकरं नृणाम् ।**
**तस्माद् द्यूतं न सेवेत हास्यार्थमपि बुद्धिमान् ॥ २९ ॥**

पूर्वीपासून जुगार मनुष्यामध्यें वैर करणारें पाहिलें आहे, करितां बुद्धिमानानें गमतीदाखलहि तें खेळूं नये ॥ २९ ॥

**हरणं च परस्वानां परदाराभिमर्शनम् ।**
**सुहृदश्च परित्यागस्त्रयो दोषाः क्षयावहाः ॥ १०३० ॥**

परद्रव्याचें हरण, परस्त्रीचा संग व मित्राचा त्याग हे तीन दोष पुरुषांच्या नाशास कराण आहेत ॥ १०३० ॥

पुनः सांगितलें आहे कीं,

**आहारः कलहः कण्डूर्द्यूतादिव्यसनानि च ।**
**आलस्यमुद्यमो निद्रा सेवनात्तु विवर्धते ॥ ३१ ॥**

आहार, कलह, कंडू, द्यूतादि व्यसनें आळस, उद्यम व निद्रा हीं सेवन केल्यानें वाढतात ॥ ३१ ॥

करितां कोणत्याहि प्रकारच्या दुर्व्यसनामध्यें पडूं नये, कारण एकहि वांकडें पाऊल पडेल तर नंतर कोणत्याहि प्रकारचा विचार राहत नाहीं. एका गृहस्थानें एका स्वामीस पाहून विचारलें कीं,

**भिक्षो कन्था श्लथा ते नहि शफरिवधे जालमश्नासि मत्स्यां-**
**स्ते वै मद्योपदंशाः पिबसि मधु समं वेश्यया यासि वेश्याम् ।**
**दत्त्वाऽङ्घ्रिं मूर्ध्न्यरीणां तव किमु रिपवो भित्तिभेत्ताऽस्मि येषां**
**चोरोऽसि द्यूतहेतोस्त्वयि सकलमिदं नास्ति नष्टे विचारः ॥३२॥**

प्र. हे भिक्षुका ! काय ही तुझी शिथिल झालेली गोधडी आहे ? उ. नाहीं, मासे पकडण्याचें हें जाळें आहे; प्र. तर आपण मासे खातां काय ? उ. मद्यावरोवर तोंडी लावण्यास लागतात, प्र. तर आपण मद्यपान करतां ? उ. वेश्येबरोवर करतों, प्र. तर आपण वेश्येच्या घरीं जातां काय ? उ. शत्रूंच्या डोक्यावर पाय ठेवून जातों, प्र. तर आपणास शत्रू आहेत ? उ. ज्यांच्या घरांच्या भिंती मी फोडतों ते माझे शत्रू ; प्र. तर काय तूं चोरी करतोस ? उ. जुगार खेळण्यासाठीं करावी लागते; प्र. तर तुझ्यामध्यें हे सर्व दोष आहेत ! उ. मनुष्य एकदां भ्रष्ट झाला ह्मणजे त्यास विचार कसला ? ॥ ३२ ॥

करितां दुर्जनाच्या संगानें दुर्व्यसनामध्यें न पडतां निरंतर सज्जनांची सोबत ठेवून गुणी व्हावें. यद्यपि श्रीमंताला सर्वत्र मानतात, तथापि त्याचे ठिकाणीं जर सद्गुण नसेल तर तो सभेमध्यें शोभत नाहीं, व कांहीं भाषण करणें असेल तर त्याच्याकडून होऊं शकत नाहीं; त्यामुळें द्रव्य असलें तरी तो लोकामध्यें पाठीमागून मूर्ख ह्मटला जातो. चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**गुणेन स्पृहणीयः स्यान्न रूपेण युतो जनः ।**
**सौगन्ध्यवर्ज्यं नादेयं पुष्पं कान्तमपि क्वचित् ॥ ३३ ॥**

गुणवानाची सर्व इच्छा करतात; रूपवानाची करत नाहींत, कारण सुगंध नसलेलें पुष्प सुंदर दिसलें तरी कोणी तें ग्रहण करीत नाहीं ॥ ३३ ॥

स जीवति गुणा यस्य यस्य धर्मः स जीवति ।
गुणधर्मविहीनस्य जीवितं निष्प्रयोजनम् ॥ ३४ ॥

जो गुणवान् व सदाचरणी असेल तोच जीवंत आहे, कारण गुण व सदाचरण यांनीं रहित पुरुषाचें जीवन निष्फळ आहे ॥ ३४ ॥

गुणैरुत्तमतां याति नोच्चैरासनसंस्थितः ।
प्रासादशिखरस्थोऽपि काकः किं गरुडायते ॥ ३५ ॥

गुणांनीं उत्तमत्व प्राप्त होतें, उच्चासनावर बसल्यानें होत नाहीं, कारण महालाच्या शिखरावर बसलेला कावळा काय गरुड होऊं शकतो ? ॥ ३५ ॥

हस्ती स्थूलतनुः स चाङ्कुशवशः किं हस्तिमात्रोऽङ्कुशः
दीपे प्रज्वलिते प्रणश्यति तमः किं दीपमात्रं तमः ।
वज्रेणापि हताः पतन्ति गिरयः किं वज्रमात्रो गिरिस्
तेजो यस्य विराजते स बलवान् स्थूलेषु कः प्रत्ययः ॥३६॥

स्थूल शरीराचा हत्ती पण अंकुशास वश होतो, तो काय अंकुश हत्तीएवढा आहे ? दीप प्रज्वलित झाल्यानें अंधकाराचा नाश होतो, तो काय दीप अंधकाराएवढा आहे ? आणि वज्रानें आघात केलेले पर्वत पडून जातात, तें काय वज्र पर्वतांएवढें आहे ? करितां ज्यामध्यें तेज आहे तोच बलवान्, स्थूलपणाध्यें कसला विश्वास ? ॥ ३६ ॥

तसेंच पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

यत्र विद्वज्जनो नास्ति श्लाघ्यस्तत्राल्पधीरपि ।
निरस्तपादपे देशे एरण्डोऽपि द्रुमायते ॥ ३७ ॥

जेथें विद्वान् लोक नाहींत तेथें अल्प बुद्धीच्या पुरुषाचीहि प्रशंसा होते, कारण वृक्ष नसलेल्या देशामध्यें एरंडहि वृक्ष ह्मटला जातो ॥ ३७ ॥

यज्जीव्यते क्षणमपि प्रथितं मनुष्यै-
र्विज्ञानशौर्यविभवार्यगुणैः समेतम् ।
तन्नाम जीवितमिह प्रवदन्ति तज्ज्ञाः
काकोऽपि जीवति चिराय बलिं च भुङ्क्ते ॥ ३८ ॥

मनुष्यांकडून विज्ञान, शौर्य, वैभव व श्रेष्ठ गुण यांसह क्षणमात्रहि जें प्रसिद्धपणें जीवन केलें जातें, त्यासच सुज्ञ पुरुष या लोकामध्यें जीवन ह्मणतात; कारण बहुत कालपर्यंत तर कावळाहि जीवन करतो व वळी खातो ॥३८॥

**विनाऽप्यर्थैर्वीरः स्पृशति बहुमानोन्नतिपदं**
**समायुक्तोऽप्यर्थैः परिभवपदं याति कृपणः ॥ ३९ ॥**

वीर पुरुष द्रव्यावांचूनहि बहुमानाच्या उच्च पदवीस पोंचतात, व कृपण धनवान् असूनहि पराभवास प्राप्त होतो ॥ ३९ ॥

**कल्पयति येन वृत्तिर्येन च लोके प्रशस्यते सद्भिः ।**
**स गुणस्तेन च गुणिना रक्ष्यः संवर्धनीयश्च ॥ १०४० ॥**

ज्या गुणानें लोकामध्यें वृत्ति चालते व सत्पुरुष प्रशंसा करतात, तोच गुण गुणी जनानें उत्तम प्रकारें संरक्षण करण्यास व वाढविण्यास योग्य आहे ॥ १०४० ॥

तसेंच शार्ङ्गधर पद्धतींत सांगितलें आहे कीं,

**इभतुरगरथैः प्रयान्ति मूढा धनरहिता विबुधाः प्रयान्ति पद्भ्याम् ।**
**गिरिशिखरगतापि काकपंक्तिः पुलिनगतैर्न समत्वमेति हंसैः ॥४१॥**

कदाचित् द्रव्य मिळाल्यामुळें मूढ लोक हत्ती, घोडे व रथ यांच्यावर बसून जातात व द्रव्य न मिळाल्यामुळें विद्वज्जन पायीं चालतात, तरीहि पर्वताच्या शिखरावर बसलेली कावळ्यांची रांग, नदीच्या किनाऱ्यावर बसलेल्या हंसांशीं साम्य पावत नाहीं ॥ ४१ ॥

**खद्योतो द्योतते तावद्यावन्नोदयते शशी ।**
**उदिते तु सहस्रांशौ न खद्योतो न चन्द्रमाः ॥ ४२ ॥**

जोंपर्यंत चंद्रमा उदय पावला नाहीं, तोंपर्यंत काजवा प्रकाशमान होतो, परंतु सूर्याचा उदय झाल्यानंतर तर तो खद्योतहि प्रकाशत नाहीं व चंद्रमाहि प्रकाशत नाहीं ॥ ४२ ॥

**रूक्षं वपुर्न च विलोचनहारि रूपं**
**न श्रोत्रयोः सुखदमारटितं कदापि ।**

इत्थं न साधु यदि किंचिदिदं न साधु
तुच्छे रतिः करभ शीघ्रगतिश्च ते यत् ॥ ४३ ॥

हे उंटा ! तुझें शरीर रूक्ष, रूप सुंदर नाहीं, आणि तुझा शब्द नेहमीं कर्णकठोर, याप्रमाणें तुझ्यामध्यें चांगलें असें कांहीं नाहीं परंतु जर कांहीं असेल तर तुझी कांटे वगैरे तुच्छ पदार्थ खाण्यामध्यें प्रीति व शीघ्र गति, हें चांगलें आहे ॥ ४३ ॥

अनसि सीदति सैकतवर्त्मनि प्रचुरभारभरक्षपितोदके ।
गुरुभरोद्धरणोध्दुरकन्धरं स्मरति सारथिरेष धुरंधरम् ॥ ४४ ॥

ज्या वेळीं गाडा रेतीच्या रस्त्यांत रुपून जातो व अतिशय जड पदार्थांच्या भारानें पाण्यामध्यें उलटून पडतो त्यावेळीं अतिशय ओझें उंच उचलून बाहेर काढण्याविषयीं ज्याचे स्कंध दृढ आहेत अशा धुरंधरास हा सारथि आठवितो ॥ ४४ ॥

यद्यपि खदिरारण्ये गुप्तो वसतीह चम्पको वृक्षः ।
तदपि च परिमलमतुलं दिशि दिशि कथयेत्समीरणस्तस्य ॥४५॥

यद्यपि या लोकामध्यें चांफ्याचें झाड, खैर वृक्षांच्या अरण्यांत गुप्त उगवलें असेल, तथापि त्याच्या असाधारण सुगंधाचें, वायु प्रत्येक दिशेस वर्णन करीत फिरतो ॥ ४५ ॥

लोचितमखिलं गहनं परितो दृष्टाश्च विटपिनः सर्वे ।
सहकार न प्रपेदे पथिकेन तवोपमा जगति ॥ ४६ ॥

हे आम्रवृक्षा ! पांथस्थानें संपूर्ण वन पाहिलें व चहूं बाजूंनीं सर्व वृक्ष तपासले, परंतु जगतामध्यें तुझ्यासारखा वृक्ष पाहिला नाहीं ॥ ४६ ॥

वार्ता च कौतुकवती विमला च विद्या
लोकोत्तरः परिमलश्च कुरङ्गनाभेः ।
तैलस्य बिन्दुरिव वारिणि दुर्निवार-
मेतत्त्रयं प्रसरति स्वयमेव लोके ॥ ४७ ॥

बहुतकरून आश्चर्याची वार्ता, उत्कृष्ट विद्या आणि कस्तूरीमृगाच्या नाभीचा लोकोत्तर सुगंध, या तीन वस्तू पाण्यामध्यें टाकलेल्या तेलाच्या बिंदूप्रमाणें लोकामध्यें निष्प्रतिबंध आपण होऊनच प्रसार पावतात ॥ ४७ ॥

**शिशुरपि निपुणो गुरोर्गरीयान्नतु वपुषैव महान्महत्प्रतिष्ठः ।**
**मणिरणुरपि भूषणाय पुंसां नतु पृथुलापि शिला विलासहेतुः ॥४८॥**

शास्त्र जाणणारा लहान वयाचा असला तरी मोठ्या वयाच्या मनुष्याहून सल्ला विचारण्यामध्यें श्रेष्ठ समजावा, केवळ शरीरानें मोठा असला ह्मणून मोठा प्रतिष्ठित होत नाहीं; कारण मणि लहान असूनहिं पुरुषांस भूषणरूप होतो, केवळ मोठा पाषाण असला ह्मणून विलासाचा हेतु होत नाहीं ॥४८॥

**काकस्य चञ्चुर्यदि हेमयुक्ता माणिक्ययुक्तौ चरणौ च तस्य ।**
**एकैकपक्षे यदि मौक्तिकानि तथापि काको न च राजहंसः ॥ ४९ ॥**

कदाचित् कावळ्याची चोंच सोन्यानें मढविलेली, पाय माणिक्य रत्नानें जडलेले, व एकेक पांख मोत्यांनीं जडलेलें असलें, तथापि कावळा राजहंस होत नाहीं ॥ ४९ ॥

करितां सज्जनांचीं संगति करून सद्गुण संपादन करावे, व श्रेष्ठ लोकांच्या श्रेणीमध्यें आपली गणना होईल त्या प्रकारचा यत्न करावा. श्रेष्ठ लोकांच्या लक्षणांविषयीं विदुरनीतींत सांगितलें आहे कीं,

**न स्वे सुखे वै कुरुते प्रहर्षं नान्यस्य दुःखे भवति प्रहृष्टः ।**
**दत्त्वा च पश्चात् कुरुते न तापं स कथ्यते सत्पुरुषार्यशीलः ॥५०॥**

जो आपल्या सुखाच्यावेळीं वहकून जात नाहीं, दुसऱ्यास दुःख झालें असतां आनंदित होत नाहीं, आणि दिल्यानंतर पश्चात्ताप करीत नाहीं, तो श्रेष्ठ स्वभावाचा सत्पुरुष ह्मटला जातो ॥ १०५० ॥

तसेंच चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**छिन्नोऽपि चन्दनतरुर्न जहाति गन्धं**
**वृद्धोऽपि वारणपतिर्न जहाति लीलाम् ।**

यन्त्रार्पितो मधुरतां न जहाति चेक्षुः
क्षीणोऽपि न त्यजति शीलगुणान् कुलीनः ॥ ५१ ॥

जसा कापला असतांहि चंदन वृक्ष गंधास सोडीत नाहीं, वृद्ध झाला असतांहि हत्ती झुलणेंरूप लीलेस सोडीत नाहीं, आणि यंत्रामध्यें घातला असतांहि ऊंस मधुरतेस टाकीत नाहीं, तसा कुलीन पुरुष दुर्बल झाला असतांहि आपल्या शीलगुणांस टाकीत नाहीं ॥ ५१ ॥

ते धन्यास्ते विवेकज्ञास्ते सभ्या इह भूतले ।
आगच्छन्ति गृहे येषां कार्यार्थं सुहृदो जनाः ॥ ५२ ॥

ज्यांच्या घरीं कामासाठीं मित्रमंडळी येतात, ते पुरुष या भूतलावर विवेक जाणणारे, सभ्य व खरोखर धन्य होत ॥ ५२ ॥

विपदि धैर्यमथाभ्युदये क्षमा सदसि वाक्पटुता युधि विक्रमः ।
यशसि चाभिरुचिर्व्यसनं श्रुतौ प्रकृतिसिद्धमिदं हि महात्मनाम् ॥५३॥

विपत्तीमध्यें धैर्य, उत्कर्षामध्यें क्षमा, सभेमध्यें वाक्चातुर्य, युद्धामध्यें पराक्रम, यशाविषयीं प्रीति आणि शास्त्रामध्यें व्यसन, हे गुण बहुतकरून महात्म्यामध्यें स्वभावतःच असतात ॥ ५३ ॥

तसेंच शार्ङ्गधरपद्धतींत सांगितलें आहे कीं,

प्रथमवयसि पीतं तोयमल्पं स्मरन्तः
शिरसि निहितभारा नालिकेरा नराणाम् ।
ददति जलमनल्पं स्वादु तज्जीवनान्तं
नहि कृतमुपकारं साधवो विस्मरन्ति ॥ ५४ ॥

नारळाचीं झाडें, पहिल्या अवस्थेमध्यें किंचित्हि प्यालेल्या पाण्याची आठवण करून, मस्तकावर भार सहन करून मनुष्यास त्याचें जीवित असेपर्यंत अतिशयच स्वादिष्ट पाणी, फळांसहित प्रत्यर्पण करतात, कारण केलेल्या उपकारास सत्पुरुष विसरत नाहींत ॥ ५४ ॥

सभातरंगांत सांगितलें आहे कीं,

परोपदेशे पाण्डित्यं सर्वेषां सुकरं नृणाम् ।
धर्मे स्वीयमनुष्ठानं कस्यचित्तु महात्मनः ॥ ५५ ॥

सर्वांस दुसऱ्यास उपदेश करण्यामध्यें पांडित्य करणें सोपें आहे, परंतु स्वतः सदाचरणानें वागणें हें तर एखाद्या महात्म्यामध्येंच असतें ॥ ५५ ॥

भवन्ति नम्रास्तरवः फलोद्गमैर्नवाम्बुभिर्भूरिविलम्बिनो घनाः ।
अनुद्धताः सत्पुरुषाः समृद्धिभिः स्वभाव एवैष परोपकारिणाम् ॥५६॥

वृक्ष फलें लागलीं असतां नम्र होतात, मेघ नवीन पाण्यानें अतिशय खालीं लोंबूं लागतात, व सत्पुरुष समृद्धि मिळाली असतां विनीत असतात, कारण परोपकार करणाऱ्यांचा हा स्वभावच आहे ॥ ५६ ॥

पद्माकरं दिनकरो विकचं करोति
चन्द्रो विकासयति कैरवचक्रवालम् ।
नाभ्यर्थितो जलधरोऽपि जलं ददाति
सन्तः स्वयं परहितेषु कृतातियोगाः ॥ ५७ ॥

सूर्य दिनविकासी कमळांस, व चंद्र रात्रिविकासी कमळांस प्रफुल्लित करतो, आणि मेघ प्रार्थना केल्यावांचून पाणी देतो, कारण सत्पुरुष दुसऱ्याच्या हिताविषयीं आपण होऊनच प्रवृत्त होतात ॥ ५७ ॥

पुनः सांगितलें आहे कीं,

विरला जानन्ति गुणान् विरलाः कुर्वन्ति निर्धने स्नेहम् ।
विरलाः परकार्यरताः परदुःखेनापि दुःखिता विरलाः ॥ ५८ ॥

गुण जाणणारे, गरिबीशीं स्नेह करणारे, दुसऱ्याच्या कार्याविषयीं तत्पर असणारे आणि दुसऱ्याच्या दुःखानें दुःखित होणारे पुरुष विरळच असतात ॥ ५८ ॥

वने कुरङ्गास्तृणधान्यभुक्ता बुभुक्षिता घ्नन्ति कदा न जीवान् ।
एवं कुलीना व्यसनाभिभूता न नीतिमार्गं परिलङ्घयन्ति ॥५९॥

जसे वनामध्यें तृण व धान्य खाणारे मृग क्षुधित असले तरीहि कधींच जीवांची हिंसा करीत नाहींत, तसे कुलीन मनुष्य दुःखानें पीडित झाले तरीहि नीतिमार्गाचें उल्लंघन करीत नाहींत ॥ ५९ ॥

सद्भिस्तु लीलया प्रोक्तं शिलालिखितमक्षरम् ।
असद्भिः शपथेनापि जले लिखितमक्षरम् ॥ १०६० ॥

सत्पुरुषांनीं हंसत हंसत बोललेलेंहि पाषाणावर लिहिलेल्या अक्षरासारखें जाणावें, व असत्पुरुषांनीं शपथ घेऊन सांगितलेलेंहि पाण्यामध्यें लिहिलेल्या अक्षरासारखें जाणावें ॥ १०६० ॥

दाता न दापयति दापयिता न दत्ते
यो दानदापनपरो मधुरं न वक्ति ।
दानं च दापनमथो मधुरा च वाणी
त्रीण्यप्यमूनि खलु सत्पुरुषे वसन्ति ॥ ६१ ॥

जो दाता असेल तो दुसऱ्याकडून देववीत नाहीं, व जो देवविणारा असेल तो स्वतः देत नाहीं, आणि जो स्वतः देणारा व दुसऱ्याकडूनहि देवविणारा असेल, तो मधुर बोलत नाहीं, करितां देणें, देवविणें व मधुर वाणी बोलणें, हे तीनहि गुण एखाद्या सत्पुरुषाच्या ठिकाणींच वसतात ॥ ६१ ॥

उदयति यदि भानुः पश्चिमे दिग्विभागे
प्रचलति यदि हैमः शीततां याति वन्हिः ।
विकसति यदि पद्मं पर्वतानां शिखाग्रे
न चलति खलु वाक्यं सज्जनानां कदाचित् ॥ ६२ ॥

कदाचित् सूर्य पश्चिम दिशेस उदय पावेल, हिमालय चलन पावेल, अग्नि शीतल होईल व पर्वताच्या शिखरावर कमल प्रफुल्लित होईल, तथापि सज्जनांचें वाक्य चलायमान होत नाहीं ॥ ६२ ॥

यथा चित्तं तथा वाचो यथा वाचस्तथा क्रिया ।
चित्ते वाचि क्रियायां च साधूनामेकरूपता ॥ ६३ ॥

जसें चित्त तशी वाणी, जशी वाणी तशीच क्रिया, याप्रमाणें चित्त, वाणी आणि क्रिया या तीहींचे ठिकाणीं सत्पुरुषांची एकरूपता असते ॥ ६३ ॥

वदनं प्रसादसदनं सदयं हृदयं सुधामुचो वाचः ।
करणं परोपकरणं येषां केषां न ते वन्द्याः ॥ ६४ ॥

ज्यांचें मुख प्रसन्नतेचें घर, हृदय दयाळु, वाणी अमृततुल्य मधुर भाषण करणारी व क्रिया परोपकारानें पूर्ण असेल ते महात्मे कोणास वंद्य नाहींत? ॥६४॥

या प्रकारचीं महाजनांचीं लक्षणें संपादन करावीं, आणि जें आपणास द्रव्य प्राप्त झालें असेल, त्यांतून आपला व कुटुंबाचा उपभोग, परोपकार यांमध्यें व कोणाच्या बरोबर संभाळण्यामध्यें जें वापरणें योग्य तें यथाशक्ति वापरावें, आणि कांहीं मोटें धर्मकार्य चालू ठेवणें असेल तर त्याच्यासाठीं फंड करून त्याच्या व्याजांतून चालवावें; अत्यंत कंजूषपणा किंवा उधळपट्टी करूं नये. पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**शनैःशनैश्च भोक्तव्यं स्वयं वित्तमुपार्जितम् ।**
**रसायनमिव प्राज्ञैः सहसा न कदाचन ॥ ६५ ॥**

बुद्धिवंतांनीं स्वतः मिळविलेलें द्रव्य, रसायनाप्रमाणें, हळू हळू भोगावें, परंतु कधींच एकदम भोगूं नये ॥ ६५ ॥

**अलब्धं चैव लिप्सेत लब्धं रक्षेदवक्षयात् ।**
**रक्षितं वर्धयेत्सम्यग् वृद्धं दीनेषु निक्षिपेत् ॥ ६६ ॥**

द्रव्य मिळालें नाहीं तोंपर्यंत त्याची इच्छा करावी, मिळालेल्या द्रव्याचें नाशापासून रक्षण करावें. रक्षण केलेलें द्रव्य चांगल्या प्रकारें वाढवावें, आणि वाढलेल्या द्रव्याचा गरीबांच्या उपकारांत उपयोग करावा ॥ ६६ ॥

**दानोपभोगरहिता दिवसा यस्य यान्ति वै ।**
**स कर्मकारभस्त्रेव श्वसन्नपि न जीवति ॥ ६७ ॥**

ज्या श्रीमंताचे दिवस परोपकार व भोग केल्यावांचून जातात, तो लोहाराच्या भात्याप्रमाणें, श्वासोच्छ्वास करीत असतांहि मृतवत् समजावा ॥ ६७॥

**दातव्यं भोक्तव्यं सति विभवे संग्रहो न कर्तव्यः ।**
**पश्यामि मधुकरीणां संचितमर्थं हरन्त्यन्ये ॥ ६८ ॥**

द्रव्य द्यावें व भोगावें परंतु केवळ त्याचा संग्रह करूं नये, कारण मधुमक्षिकांच्या केवळ एकत्र केलेल्या मधास दुसरे हरण करून घेऊन जातात, तें मी पहातों ॥ ६८ ॥

**दानं प्रियवाक्सहितं ज्ञानमगर्वं क्षमान्वितं शौर्यम् ।**
**वित्तं त्यागनियुक्तं दुर्लभमेतच्चतुर्भद्रम् ।। ६९ ।।**

प्रियवाणीसहित दान, गर्वरहित ज्ञान, क्षमायुक्त शौर्य व परोपकारसहित द्रव्य हे चार श्रेष्ठ गुण दुर्लभ आहेत ।। ६९ ।।

**दानं भोगो नाशस्तिस्रो गतयो भवन्ति वित्तस्य ।**
**यो न ददाति न भुङ्क्ते तस्य तृतीया गतिर्भवति ।। १०७० ।।**

दान, भोग व नाश, या द्रव्याच्या तीन गती असतात, करितां जो देत नाहीं व भोगीतहि नाहीं त्याच्या द्रव्याची नाशरूप तिसरी गति होते।। १०७०।।

**यो नात्मजे गुरुजने नच बन्धुवर्गे**
**दीने दयां न कुरुते नच भृत्यवर्गे ।**
**किं तस्य जीवितफलं हि मनुष्यलोके**
**काकोऽपि जीवति चिरं च बलिं च भुङ्क्ते ।। ७१ ।।**

जो पुरुष पुत्र, वडील, बांधव, गरीब, सेवक यांवर दया करीत नाहीं, त्याच्या जीविताचें फळ मनुष्यलोकामध्यें काय आहे? कारण कावळाहि दीर्घकाल जीवन करतो व काकबली भक्षण करतो ।। ७१ ।।

तसेंच शार्ङ्गधरपद्धतींत सांगितलें आहे कीं,

**अहितहितविचारशून्यबुद्धेः श्रुतिनिपुणैर्बहुभिस्तिरस्कृतस्य ।**
**उदरभरणमात्रजीवितेच्छोः पुरुषपशोश्च पशोश्च को विशेषः ।। ७२ ।।**

अहित व हित विचारानें शून्य ज्याची बुद्धि आहे, बहुत विद्वनांनीं तिरस्कार केलेला आणि केवळ उदरभरणानेंच जगण्याची इच्छा ठेवणारा असा पुरुष-पशु व पशु यांमध्यें काय फरक आहे? ।। ७२ ।।

**यो न ददाति न भुङ्क्ते सति विभवे नैव तस्य तद्द्रव्यम् ।**
**तृणमयकृत्रिमपुरुषो रक्षति सस्यं परस्यार्थे ।। ७३ ।।**

जो वैभव असून परोपकार करीत नाहीं, व भोग भोगीत नाहीं, त्याचें तें द्रव्य नव्हे, कारण तृणमय कृत्रिम पुरुष दुसऱ्यासाठीं धान्याचें रक्षण करतो ।। ७३ ।।

गर्जितबधिरीकृतककुभा किमनेन कृतं हि घनेन ।
इयती चातकचञ्चुपुटी सापि भृता नैव जलेन ॥ ७४ ॥

मेघानें गर्जना करून चारहि दिशा बहिऱ्या करून सोडल्या, तेणेंकरून यानें काय केलें? कारण एवढेंसें चातक पक्ष्याचें चोंचरूपी पात्रहि पाण्यानें भरलें तर नाहीं ! ॥ ७४ ॥

पुनः प्रसंगरत्नावलींत सांगितलें आहे कीं,

ग्रासोद्गलितसिक्थस्य करिणः किं गतं भवेत् ।
पिपीलिका तु तेनैव सकुटुम्बोपजीवति ॥ ७५ ॥

हत्तीच्या शिजविलेल्या भाताच्या पिंडरूप ग्रासांतून कांहीं खालीं पडलें असलें तर त्यांत त्याचें काय गेलें? परंतु तेवढ्यानेंच मुंगी आपल्या सर्व कुटुंबाचा निर्वाह करित्ये ॥ ७५ ॥

इयत्यां संपत्तावपि च सलिलानां त्वमधुना
न तृष्णामार्तानां हरसि यदि कासार सहसा ।
निदाघे चण्डांशौ किरति परितोऽङ्गारनिकरं
कृशीभूतः केषामहह परिहर्तासि खलु ताम् ॥ ७६ ॥

हे सरोवरा ! आतां पाण्याची एवढी संपत्ति असतां जर तूं तृषिताची तहान एकदम शमविली नाहींस, तर उन्हाळ्यामध्यें सूर्याचे तीक्ष्ण किरण चहूं बाजूंनीं पसरतील, त्यावेळीं तूं सुकून निर्जल झाल्यानंतर कोणाची तृष्णा शमविशील ॥ ७६ ॥

परंतु या परोपकार करण्यामध्यें व भोग भोगण्यामध्यें नियम ठेवावा, कारण शक्तीच्या बाहेर परोपकार करण्यामध्यें निर्धनता प्राप्त होते, व भोग भोगल्यानें रोग व दारिद्र्य येतें. त्यामुळें शरीर व धन दोहोंचाहि नाश होऊन आपल्या कुटुंबामध्यें दुःख येऊन पडतें. प्रत्येक मनुष्याचें कर्तव्य आहे कीं, आपल्या हयातींत व मरणानंतर आपल्या कुटुंबाचें भरण–पोषण चांगल्या रीतीनें जसें होईल त्याप्रकारचा आपल्या शक्तीप्रमाणें बंदोबस्त करावा; परंतु ' शेजाऱ्यास पीठ द्यावें व घरच्या पोरांनीं जांतें चाटावें ' आणि बावास

मळई द्यावी आणि पोरांनीं ताक घ्यावें, या प्रकारचा घर विकून प्रयोजन करण्यासारखा परोपकार व भोग कधींहि करूं नये; तर नेहमीं नियमानें वागावें. विदुरनीतींत सांगितलें आहे कीं,

**अर्थानामीश्वरो यः स्यादिन्द्रियाणामनीश्वरः ।**
**इन्द्रियाणामनैश्वर्यादैश्वर्याद् भ्रश्यते हि सः ॥ ७७ ॥**

द्रव्याचा स्वामी आहे, परंतु इंद्रियें ज्याच्या स्वाधीन नाहींत, तो इंद्रियांस वश न ठेविल्यानें ऐश्वर्यापासून भ्रष्ट होतो ॥ ७७ ॥

**रथः शरीरं पुरुषस्य राजन्नात्मा नियन्तेन्द्रियाण्यस्य चाश्वाः ।**
**तैरप्रमत्तः कुशली सदश्वैर्दान्तैः सुखं याति रथीव धीरः ॥ ७८ ॥**

हे राजन्! पुरुषाचें शरीर रथ, आत्मा सारथि व इंद्रियें घोडे आहेत, करितां धीर मनुष्य सावधान होऊन त्या नियमांमध्यें ठेवलेल्या इंद्रियरूप चांगल्या अश्वांच्या योगें हुषार गाडीवानाप्रमाणें सुख पावतो ॥ ७८ ॥

**आत्मैव ह्यात्मनो बन्धुरात्मैव रिपुरात्मनः ।**
**बन्धुरात्माऽऽत्मनस्तस्य येनैवात्माऽऽत्मना जितः ॥ ७९ ॥**

आत्मा स्वतःच आपला बंधु आणि स्वतःच आपला शत्रु आहे, कारण ज्यानें आपलें मन आपणच जिंकलें, तो आपला बंधु आहे ॥ ७९ ॥

पुनः सांगितलें आहे कीं,

**कुरङ्गमातङ्गपतङ्गमीनभृङ्गा हताः पश्चभिरेव पश्च ।**
**एकः प्रमादी स कथं हतो न यः सेवते पश्चभिरेव पश्च ॥ १०८० ॥**

हरिण, हत्ती, पतंग, मत्स्य व भ्रमर हे पांच प्राणी क्रमानें शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध या पांच विषयांमध्यें अतिशय आसक्त झाल्यानें त्यांच्याकडून मारिले जातात; तर एकच गाफिल मनुष्य जो पांच इंद्रियांनीं पांच विषयांस अतिशय आसक्तीनें सेवितो तो कसा मारिला जाणार नाहीं? ॥ १०८० ॥

परंतु अमुक वेळीं परोपकार करीन व भोग भोगीन असा विचार ठेवूं नये; कारण सृष्टिनियमाप्रमाणें पदार्थमात्र अनित्य असल्यानें क्षणमात्रहि

शरीराचा भरंवसा नाहीं. करितां जें शुभ कर्तव्य असेल, तें नेहमीं करीत रहावें. शंकराचार्यांनीं सांगितलें आहे कीं,

**आयुः क्षणलवमात्रं न लभ्यते हेमकोटिभिः क्वापि ।**
**तच्चेद्गच्छति सर्वं मृषा ततः काऽधिका हानिः ॥ ८१ ॥**

कोट्यवधी सुवर्णाच्या मोहरा दिल्यानें कोठेंच क्षणभरहि आयुष्य मिळणें शक्य नाहीं, करितां तें जर सर्व व्यर्थ जाईल, तर त्याहून अधिक हानि ती दुसरी कोणती ? ॥ ८१ ॥

तसेंच भर्तृहरीनें सांगितलें आहे कीं,

**यावत्स्वस्थमिदं शरीरमरुजं यावज्जरा दूरतो**
**यावच्चेन्द्रियशक्तिरप्रतिहता यावत्क्षयो नायुषः ।**
**आत्मश्रेयसि तावदेव विदुषा कार्यः प्रयत्नो महान्**
**संदीप्ते भवने तु कूपखननं प्रत्युद्यमः कीदृशः ॥ ८२ ॥**

जोंपर्यंत हें शरीर रोग न होतां स्वस्थ आहे, वार्धक्य दूर आहे, इंद्रियांची शक्ति क्षीण झाली नाहीं, व आयुष्याचा क्षय झाला नाहीं, तोंपर्यंतच बुद्धि-मंतानें आपल्या श्रेयासाठीं महान् प्रयत्न करून घ्यावा; कारण घरास आग लागल्यानंतर विहीर खोदण्याविषयींचा प्रयत्न काय उपयोग ? ॥ ८२ ॥

कारण भोजप्रबंधांत सांगितलें आहे कीं,

**चेतोहरा युवतयः सुहृदोऽनुकूलाः**
**सद्बान्धवाः प्रणतिनम्रगिरश्च भृत्याः ।**
**गर्जन्ति दन्तिनिवहास्तरलास्तुरङ्गाः**
**सम्मीलने नयनयोर्नहि किञ्चिदस्ति ॥ ८३ ॥**

" भोजराजानें ह्मटलें कीं," चित्तास हरण करतील अशा तरुण स्त्रिया, अनुकूल मित्र, चांगले संबंधी, नम्रता व विनय यांनीं युक्त भाषण करणारे सेवक, गर्जना करणारे हत्ती व चंचल घोडे आहेत ! " तेव्हां कालिदास ह्मणाला कीं, " डोळे मिटल्यानंतर कांहीं नाहीं ॥ ८३ ॥

पुनः पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

अशनं मे वसनं मे जाया मे बन्धुवर्गो मे ।
इति मे मे कुर्वाणं कालवृको हन्ति पुरुषाजम् ॥ ८४ ॥

माझें अन्न, माझें वस्त्र, माझी स्त्री व माझे संबंधी, याप्रमाणें ' मे मे ' करणाऱ्या पुरुषरूप बकऱ्यास काळरूप लांडगा मारतो ॥ ८४ ॥

संक्षेपात् कथ्यते धर्मो जनाः किं विस्तरेण वः ।
परोपकारः पुण्याय पापाय परपीडनम् ॥ ८५ ॥

लोक हो ! दुसऱ्यावर उपकार केल्यानें पुण्य व दुसऱ्यांस पीडा केल्यानें पाप, हा संक्षेपानें धर्माधर्म सांगितला जातो, विस्तारानें तुह्मांस काय ? ॥ ८५॥

अनित्यानि शरीराणि विभवो नैव शाश्वतः ।
नित्यं संनिहितो मृत्युः कर्तव्यो धर्मसंग्रहः ॥ ८६ ॥

शरीर नाशवंत आहे, वैभव चिरस्थायी नाहीं, व मृत्यु नित्य संनिध आहे, असें जाणून धर्मसंग्रह करावा ॥ ८६ ॥

करितां श्रीमहाभारतांतर्गत वनपर्वांत सांगितलें आहे कीं,

श्वः कार्यमद्य कुर्वीत पूर्वाह्ने चापराह्निकम् ।
न हि प्रतीक्षते मृत्युः कृतमस्य न वा कृतम् ॥ ८७ ॥

उद्यांचें कार्य आज, व होनप्रहरचें कार्य सकाळीं करण्यास योग्य असेल तें करावें; कारण मृत्यु मनुष्यानें आपलें काम पुरें केलें किंवा नाहीं, याचा विचार करीत नाहीं ॥ ८७ ॥

या प्रकारें द्रव्याचा उपयोग करून त्याचें रक्षण करावें. कोणाबरोबर कोणत्या हि प्रकारचा वांधा पडेल तर चालेल तोंपर्यंत खाजगी न्यायानें आटपावें व तसें जर न आवरूं शकेल तर, मध्यें दोन चांगले गृहस्थ टेवून त्यांच्याकडून निभवावें, परंतु कसेंहि करून दोन्ही पक्षांच्या द्रव्याची हानि होईल त्या प्रकारें राजदरबार चढूं नये. कारण नीतिमान् मध्यस्थ जो निवाडा देतील तो बहुतकरून बरोबरच असतो. कारण पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

मानाद्वा यदि वा लोभात् क्रोधाद्वा यदि वा भयात् ।
योऽन्यायादन्यथा ब्रूते स नरः पापमाप्नुयात् ॥ ८८ ॥

मान, लोभ, क्रोध किंवा भय या कारणांमुळें जो मनुष्य न्याय सोडून अन्यथा बोलतो, तो पापी होतो ॥ ८८ ॥

पुनः मोठ्या अवस्थेमध्यें पुत्र लहान असेल किंवा नसेलच, तर धंद्याचा मोठा डौल घालूं नये; तसेंच कोणासहि आपलें नांव, गांव व द्रव्य देऊन त्यांच्या कडूनहि मोठ्या डौलांत पडूं नये. कारण बहुतकरून दुसऱ्यास काळजी थोडी असते. त्याचप्रमाणें धनी जर संभाळण्यास असमर्थ असेल, तर त्यांच्या दानतीमध्येंहि फरक पडतो; त्यामुळें, नांव गांव व द्रव्य या तिन्हींसहि नुकसान पोंचतें. आणि तशी नुकसानी मोठ्या अवस्थेंत पुनः भरून काढण्याची शक्ति नसल्यानें अति दुःखदायक होते. द्रव्य जात राहील तर मनुष्याच्या स्थितीविषयीं पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

तानीन्द्रियाण्यविकलानि मनस्तदेव
सा बुद्धिरप्रतिहता वचनं तदेव ।
अर्थोष्मणा विरहितः पुरुषः स एव
त्वन्यः क्षणेन भवतीति विचित्रमेतत् ॥ ८९ ॥

जरी विकल न झालेलीं तींच इंद्रियें, तेंच मन, तीच तरतरीत बुद्धि व वचनहि तेंच, असें असतां ज्यावेळीं पुरुष द्रव्याच्या उष्णतेनें रहित होतो, त्या वेळीं क्षणामध्यें जणूं दुसराच होऊन जातो! हें मोठें आश्चर्य आहे ॥ ८९ ॥

करितां द्रव्याचें रक्षण करून संसारांत आपला गृहस्थाश्रम सुखामध्यें जाईल त्याप्रकारें न्यायानें नेहमीं यत्न करीत रहावें. आणि परोपकार करण्याविषयीं प्रीति ठेवावी, त्यामुळें उत्तम गृहस्थांच्या श्रेणीमध्यें गणना होते, व आपणासहि सुख असतें. उत्तम व अधम गृहस्थाश्रमाविषयीं चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

यदि रामा यदि च रमा यदि तनयो विनयधीगुणोपेतः ।
तनये तनयोत्पत्तिर्वरोगिता चेत्ततः किमाधिक्यम् ॥ १०९० ॥

या संसारांत जर साध्वी स्त्री, धन, विवेकी गुणवान् पुत्र, पौत्र व निरोगी शरीर इतकें असेल, तर त्याहून अधिक काय पाहिजे? ॥ १०९० ॥

सानन्दं सदनं सुताश्च सुधियः कान्ता न दुर्भाषिणी
स्वेच्छापूर्णधनं स्वयोषिति रतिः स्वाज्ञापराः सेवकाः।
आतिथ्यं विभुचिन्तनं प्रतिदिनं मिष्टान्नपानं गृहे
साधोर्मैत्र्यमरोगिता च सततं धन्यो गृहस्थाश्रमः ॥ ९१ ॥

आनंदयुक्त घर, बुद्धिमान् पुत्र, मधुरभाषण करणारी स्त्री, इच्छा पूर्ण होऊं शकेल इतकें द्रव्य, केवळ आपल्याच स्त्रीच्या ठिकाणीं प्रीति, आज्ञापालक सेवक, पाहुण्याचें आतिथ्य, ईश्वरभक्ति, नित्य घरांत मिष्ट खाणें–पिणें सज्जनाची मैत्री व नेहमीं आरोग्य, इतक्या गुणांनीं युक्त गृहस्थाश्रम धन्य जाणावा ॥ ९१ ॥

क्रोधान्धाः शिशवः सवारि सदनं पङ्कावृतं चाङ्गणं
शय्या दंशवती च रूक्षमशनं धूमेन पूर्णं गृहम्।
भार्या निष्ठुरभाषिणी प्रकुरुते क्रोधान्धदृष्टिं सदा
स्नानं शीतलवारिभिः प्रतिदिनं धिग् धिग् गृहस्थाश्रमम् ॥ ९२ ॥

क्रोधांध झालेले बालक, भिजलेलें व धुरानें भरलेलें घर, चिखल असलेलें अंगण, ढेकूण, पिसवा वगैरे प्राण्यांनीं युक्त अंथरूण, रूक्ष भोजन, नेहमीं कठोर भाषण करणारी व क्रोधांध दृष्टीनें पाहणारी स्त्री आणि नित्य थंड पाण्यानें स्नान इतक्या दोषांनीं युक्त गृहस्थाश्रमास धिक्कार असो ॥ ९२ ॥

तसेंच विदुरनीतींत सांगितलें आहे कीं,

अर्थागमो नित्यमरोगिता च प्रिया च भार्या प्रियवादिनी च।
वश्यश्च पुत्रोऽर्थकरी च विद्या षड्जीवलोकस्य सुखानि राजन् ॥ ९३ ॥

हे राजन् ! नित्य द्रव्यलाभ, निरोगीपणा, प्रिय व प्रियभाषण करणारी स्त्री, आज्ञाधारक पुत्र व पुरुषार्थ संपादन करण्याच्या उपयोगी विद्या, हीं सहा मृत्युलोकांतील सुखें सांगितलेलीं आहेत ॥ ९३ ॥

कुग्रामवासः कुलहीनसेवा कुभोजनं क्रोधमुखी च भार्या।
पुत्रश्च मूर्खो विधवा च कन्या विनाऽग्निना षट् प्रदहन्ति कायम् ॥ ९४ ॥

आणि कुग्रामामध्यें वास, कुलहीनाची सेवा, कदन्नाचें भोजन, क्रोधमुखी भार्या, मूर्ख पुत्र आणि विधवा कन्या हीं सहा अग्नीवांचून शरीरास जाळितात ॥ ९४ ॥

आरोग्यमानृण्यमविप्रवासः सद्भिर्मनुष्यैः सह संप्रयोगः ।
स्वप्रत्यया वृत्तिरभीतवासः षड्जीवलोकस्य सुखानि राजन् ॥ ९५

हे राजन् ! आरोग्य, ऋण नसणें, अप्रवास, सज्जनाची संगति, आपल्या खात्रीची जीविका आणि निर्भय वास हीं सहा जीवलोकांतील सुखें सांगितलीं आहेत ॥ ९५ ॥

अनर्थकं विप्रवासं गृहेभ्यः पापैः संधिं परदाराभिमर्शम् ।
दंभं स्तैन्यं पैशुनं मद्यपानं न सेवते यस्स सुखी सदैव ॥ ९६ ॥

जो घरांतून अनर्थकारक प्रवास, पापी पुरुषांची संगति, परस्त्रीस्पर्श, दंभ, चोरी, चहाडी व मद्यपान करत नाहीं, तो नेहमीं सुखी जाणावा ॥ ९६ ॥

या प्रकारें द्रव्य मिळवून त्याचा यथाशक्ति परोपकार करण्यांत आणि आपल्या व कुटुंबाच्या उपभोगासाठीं उपयोग करण्यांत न येईल व वार्धक्य प्राप्त होईल किंवा अचानक मृत्यु येऊन पोंचेल, तर त्यावेळीं अतिशयच पश्चात्ताप होतो. कारण भर्तृहरीनें सांगितलें आहे कीं,

भोगा न भुक्ता वयमेव भुक्ता दानं न दत्तं वयमेव दत्ताः ।
कालो न यातो वयमेव यातास्तृष्णा न जीर्णा वयमेव जीर्णाः ॥ ९७ ॥

भोग भोगले नाहींत, तर आह्मींच भोगलों ! दान दिलें नाहीं, तर आम्हींच दिलों ! काळ गेला नाहीं, तर आम्हींच गेलों ! आणि तृष्णा जीर्ण झाली नाहीं. तर आम्हींच जीर्ण झालों ! ॥ ९७ ॥

अर्थाः पादरजःसमा गिरिनदीवेगोपमं यौवनं
आयुष्यं जलबिन्दुलोलचपलं फेनोपमं जीवनम् ।
दानं यो न करोति निश्चलमतिर्भोगं न भुङ्क्ते च यः
पश्चात्तापयुतो जरापरिगतः शोकाग्निना दह्यते ॥ ९८ ॥

द्रव्य पायांनीं उडालेल्या रजःकणासारखें चंचल यौवन पर्वतावरील नदीच्या वेगाप्रमाणें अस्थिर, आयुष्य जलबिन्दुप्रमाणें चपल, व जीवन तर फेंसासारखें अनियमित आहे, असें जाणून जो निश्चलमति पुरुष परोपकार करीत नाहीं,

व भोग भोगीत नाहीं; तो वृद्ध झाल्यानंतर पश्चात्तापयुक्त होऊन शोकरूप अग्नीनें जळतो ॥ ९८ ॥

याप्रमाणें पश्चात्ताप करण्याचा प्रसंग न येईल, त्या रीतीनें मिळविलेल्या द्रव्याचा उपयोग करण्याबद्दल, व द्रव्यावांचून व्यवहारसंबंधीं कोणतेंहि कार्य सिद्ध होत नाहीं ह्मणून, आचार्यानें तें मिळविण्याविषयीं गाफिल न राहण्याबद्दल उपदेश केला आहे.

याप्रकारें प्रमाणसहस्रीच्या आचारप्रकरणापैकीं भूतीविषयीं प्रमाद न करण्याचा उपदेश समाप्त.

---

## ॥ यान्यनवद्यानि कर्माणि तानि सेवितव्यानि नो इतराणि ॥

नववा उपदेश जीं कांहीं अनिंदित कर्में असतील तीं करण्याविषयीं आणि जीं निंदित कर्में असतील तीं न करण्याविषयीं आहे. कारण लोकांमध्यें अनिंदित कर्में करणारा यश व सत्कार यांस प्राप्त होतो आणि निंदित कर्में करणारा अपयश व तिरस्कार यांस प्राप्त होतो. ज्याची लोकामध्यें निंदा होत नाहीं असें सदाचरण अनिंदित कर्में आणि त्याहून विपरीत जें असदाचरण तीं निंदित कर्में ह्मटलीं जातात. हिंसा न करणें, सत्य बोलणें, चोरी न करणें, स्वच्छता ठेवणें, इंद्रियें स्वाधीन ठेवणें, परोपकार करणें, दया ठेवणें, मनास नियमांत ठेवणें, क्षमा ठेवणें, कोणाचाहि द्रोह न करणें, स्त्रीपुरुषांनीं एकीनें राहणें, कुटुंबामध्यें क्लेश न करणें, कुटुंबाचें पोषण करणें, बालकांचें रक्षण करणें, त्यांस चांगला उपदेश देणें, त्यांच्यावर न रागावणें, व त्यांचा अवेळीं विवाह न करणें, परस्त्रीगमन न करणें, शरीर स्वस्थ राहील त्याप्रकारें आचरण करणें, वडिलांचा मान ठेवणें, लहानांजवळ प्रेम ठेवणें, राजनियमास अनुसरून चालणें, दुर्जनांची संगति न करणें, रोगी व अनाथ यांची मस्करी न करणें, त्यांच्यावर दया करणें, रोगाची, अनाथपणाची व मरणाची घमेंडी न

मारणें, प्रिय बोलणें, कोणत्याहि प्रकारच्या धंद्यास लागणें, वृथा कालक्षेप न करणें साहस न करणें, वाद न करणें, आपल्या शक्तिप्रमाणें वर्तन करणें आपली प्रशंसा न करणें, गर्व न करणें, देशकालास अनुसरून चालणें, चाहाडी न करणें, मिथ्याभिमान न ठेवणें, पाहुण्याचा सत्कार करणें, आणि कोणाचाहि सद्गुण असेल तो ग्रहण करणें व दुर्गुण ग्रहण न करणें, वगैरे सदाचरण अनिंदित कर्में ह्मटलीं जातात. पुनः मनुस्मृतीच्या दुसऱ्या व चौथ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**नाप्सु मूत्रं पुरीषं वा ष्ठीवनं वा समुत्सृजेत् ।**
**अमेध्यलिप्तमन्यद्वा लोहितं वा विषाणि च ॥ ९९ ॥**

पाण्यामध्यें मल—मूत्र टाकूं नये किंवा थुंकूं नये, त्याचप्रमाणें विषें व अपवित्र पदार्थ लागलेलें कांहीं किंवा रक्तयुक्त दुसरें कांहींहि टाकूं नये ॥ ९९ ॥

**दूरादावसथान्मूत्रं दूरात्पादावसेचनम् ।**
**उच्छिष्टान्ननिषेकं च दूरादेव समाचरेत् ॥ ११०० ॥**

मल—मूत्राचा त्याग, तो केल्यानंतर हस्तपाद प्रक्षालनरूप क्रिया व उच्छिष्ट अन्न टाकणें, हें सर्व घरापासून दूर करावें ॥ ११०० ॥

पुनः पंचतंत्रांत सांगितलें आहे कीं,

**यस्य चित्तं द्रवीभूतं कृपया सर्वजन्तुषु ।**
**तस्य ज्ञानेन मोक्षेण किं जटाभस्मलेपनैः ॥ १०१ ॥**

ज्याचें चित्त सर्व प्राण्यांवरील दयेनें पाझरतें, त्यास ज्ञान, मोक्ष, जटा व भस्मलेपन यांनीं काय करावयाचें आहे ? ॥ १०१ ॥

**अमित्रं कुरुते मित्रं मित्रं द्वेष्टि हिनस्ति च ।**
**शुभं वेत्त्यशुभं पापं भद्रं वेत्त्यबुधो नरः ॥ १०२ ॥**

मूर्ख मनुष्य शत्रूस मित्र करतो, मित्राचा द्वेष व हानि करतो, शुभास अशुभ समजतो आणि पापास पुण्य मानतो ॥ १०२ ॥

**अनिष्टादिष्टलाभेऽपि न गतिर्जायते शुभा ।**
**यत्रास्ते विषसंसर्गोऽमृतं तदपि मृत्यवे ॥ १०३ ॥**

अशुभाचरणापासून शुभाची प्राप्ति दिसली, तरीहि त्यापासून शुभ गति होत नाहीं, कारण ज्यामध्यें विष मिश्रित आहे, असें अमृतहि मृत्यु प्राप्त करितें ॥ १०३ ॥

**मनसाऽपि हि भूतानां योऽनिष्टानि प्रचिन्तयेत् ।**
**भवन्ति तस्य तान्येव इह लोके न संशयः ॥ १०४ ॥**

जो मनानेंहि प्राण्याचें अनिष्ट चिंतन करतो, त्यास या लोकांमध्यें तसेंच प्राप्त होतें, यांत संशय नाहीं ॥ १०४ ॥

**अयशः प्राप्यते येन येन चापगतिर्भवेत् ।**
**पुण्यं च भ्रश्यते येन तत्कर्म न समाचरेत् ॥ १०५ ॥**

करितां ज्यापासून अपकीर्ति व अधोगति होईल आणि पुण्य नाश पावेल, तसें कर्म आचरण करूं नये ॥ १०५ ॥

**भिन्नस्वरमुखवर्णः शङ्कितदृष्टिः समुत्पतिततेजाः ।**
**भवति हि पापं कृत्वा स्वकर्मसंत्रासितः पुरुषः ॥ १०६ ॥**

पाप करून आपल्याच कर्मानें भय पावलेला मनुष्य, स्वर व मुखवर्ण यांमध्यें फरक पडून साशंक पाहणारा व तेज उडून गेलेला होतो ॥ १०६ ॥

**परोपदेशवेलायां शिष्टाः सर्वे भवन्ति वै ।**
**विस्मरन्ति हि शिष्टत्वं स्वकार्ये समुपस्थिते ॥ १०७ ॥**

दुसऱ्यास उपदेश करण्याचे वेळीं सर्व शिष्ट बनतात, परंतु आपल्यावर प्रसंग आला असतां शिष्टपणा विसरून जातात ! ॥ १०७ ॥

**जलान्तश्चन्द्रचपलं जीवितं खलु देहिनाम् ।**
**तथाविधमिति ज्ञात्वा शश्वत्कल्याणमाचरेत् ॥ १०८ ॥**

पाण्यामध्यें पडलेल्या चंद्रबिंबाप्रमाणें मनुष्याचें जीवित चंचल आहे, असें जाणून नेहमीं सदाचरणानें वागावें ॥ १०८ ॥

**यः करोति नरः पापं न तस्याऽऽत्मा ध्रुवं प्रियः ।**
**आत्मना हि कृतं पापमात्मनैव हि भुज्यते ॥ १०९ ॥**

जो मनुष्य पाप करतो, त्याचा आत्मा जरूर त्यास प्रिय नसला पाहिजे कारण स्वतः केलेलें पाप स्वतःलाच भोगावें लागतें ॥ १०९ ॥

**वनेऽपि दोषाः प्रभवन्ति रागिणां गृहेऽपि पञ्चेन्द्रियनिग्रहस्तपः ।**
**अकुत्सिते कर्मणि यः प्रवर्तते निवृत्तरागस्य गृहं तपोवनम् ॥११०॥**

इंद्रियांस वश न ठेवणाऱ्यांस वनामध्येंहि विकाररूप दोष होतात, व पांचहि इंद्रियांस नियमांत ठेवणें, हें घरामध्येंहि तप होतें, करितां जो इंद्रियांस वश ठेवून चांगल्या कर्माविषयीं प्रवृत्त होतो, त्यास गृहच तपोवन आहे ॥ ११० ॥

तसेंच भर्तृहरीनें सांगितलें आहे कीं,

**ईर्ष्यां छिन्धि भज क्षमां जहि मदं पापे रतिं मा कृथाः**
**सत्यं ब्रूह्यनुयाहि साधुपदवीं सेवस्व विद्वज्जनान् ।**
**मान्यान्मानय विद्विषोऽप्यनुनय ह्याच्छादय स्वान् गुणान्**
**कीर्तिं पालय दुःखिते कुरु दयामेतत्सतां लक्षणम् ॥ १११ ॥**

हे मनुष्या ! निंदा सोड, क्षमा ठेव, मिथ्याभिमान सोड, पापाविषयीं प्रीति करूं नकोस, सत्य बोल, सत्पुरुषांच्या मार्गाचें अवलंबन कर, विद्वानांची संगति कर, माननीय पुरुषांस मान दे, शत्रूंस विनीत कर, आपल्या गुणांची प्रशंसा करूं नको, सत्कीर्ति संपादन कर आणि दुःखितांवर दया कर, कारण हें सर्व सत्पुरुषांचें लक्षण आहे ॥ १११ ॥

**व्याघ्रीव तिष्ठति जरा परितर्जयन्ती**
**रोगाश्च शत्रव इव प्रहरन्ति देहम् ।**
**आयुः परिस्रवति भिन्नघटादिवाम्भो**
**लोकस्तथाप्यहितमाचरतीति चित्रम् ॥ ११२ ॥**

वाघिणीप्रमाणें चहूं बाजूंनीं पराभव करणारी जरा उभी आहे, शत्रूंप्रमाणें रोग देहावर प्रहार करीत आहेत, फुटक्या गाडग्यांतील पाण्याप्रमाणें आयुष्य स्रवून कमी होत चाललें आहे, तथापि मनुष्य अहित आचरण करतो, हें आश्चर्य आहे ! ॥ ११२ ॥

पुनः सांगितलें आहे कीं,

तद्भोजनं यच्छिशुवृद्धशेषं तत्सौहृदं यत्क्रियते परस्मिन् ।
सा प्राज्ञता यत्क्रियते न पापं दम्भं विना यः क्रियते स धर्मः ॥११३॥

जें बालक व वृद्ध यांस वाढून जेवणें तेंच भोजन, जो दुसऱ्याविषयीं स्नेह केला जातो तोच स्नेह, ज्यामुळें पाप न केलें जाईल तेंच शहाणपण आणि दंभावांचून जो आचरण केला जातो तोच धर्म ह्मटलेला आहे ॥ ११३ ॥

पादाभ्यां न स्पृशेदग्निं गुरुं पण्डितमेव च ।
नैव गां न कुमारीं च न वृद्धं च शिशुं तथा ॥ ११४ ॥

अग्नि, वडील, पंडित, गाई, कुमारी, वृद्ध व बालक यांस पायानी स्पर्श करूं नये ॥ ११४ ॥

यादृशी जायते बुद्धिर्व्यवसायोऽपि यादृशः ।
सहाया यादृशा एव तादृशी भवितव्यता ॥ ११५ ॥

जशी बुद्धि उत्पन्न होते, जसा व्यवसाय असतो व जसे मदतगार असतील तसें भवितव्य होतें ॥ ११५ ॥

दैवायत्तं फलं केचिद्बुद्धिर्दैवानुसारिणी ।
वदन्त्यपि च कर्तव्यं सुविचार्यैव धीमता ॥ ११६ ॥

जरी कित्येक, मनुष्यांची बुद्धि दैवास अनुसरणारी आहे व फळ मिळणें हें दैवाधीन आहे असें सांगतात, तथापि बुद्धिमंतानें चांगल्या प्रकारें विचार करूनच कर्तव्य करावें ॥ ११६ ॥

पापासक्तं हि बन्धाय पुण्यासक्तं हि मुक्तये ।
मन एव मनुष्याणां कारणं बन्धमोक्षयोः ॥ ११७ ॥

पापामध्यें आसक्त मन बंधन करितें आणि पुण्यामध्यें आसक्त मन मोक्ष देतें, करितां मनुष्याचें मनच बंध व मोक्ष यांस कारण आहे ॥ ११७ ॥

अगम्यान्यः पुमान्याति असेव्यांश्च निषेवते ।
स दुःखमुपगृह्णाति हतधीर्विषपो यथा ॥ ११८ ॥

जो अगम्यांजवळ गमन करतो व असेव्य पदार्थांचें सेवन करतो तो, ज्याची बुद्धि नष्ट झाली आहे अशा विषपान करणाऱ्या पुरुषाप्रमाणें दुःख पावतो ॥ ११८ ॥

**नित्यं छेदस्तृणानां क्षितिनखलिखनं पादयोरल्पपूजा**
**दन्तानामल्पशौचं वसनमलिनता रूक्षता मूर्धजानाम् ।**
**द्वे संध्ये चापि निद्रा निवसनशयनं ग्रासहासातिरेकः**
**स्वाङ्गे पीठे च वाद्यं भवति धनपतेर्भूमिपस्यापि वाच्यम् ॥११९॥**

नेहमीं गवताच्या काड्या तोडणें, पृथ्वीवर नखांनीं लिहिणें, पाय बरोबर न धुणें, दांत बरोबर साफ न करणें, मलिन वस्त्रें धारण करणें, डोक्याचे केंस तेल वगैरे लावून साफ न ठेवणें, सकाळ—संध्याकाळ झोंपून राहणें, नग्न झोपणें, अपरिमित खाणें व हंसणें, आणि आपल्या अंगावर किंवा पाट वगैरे आसनावर वाजविणें, इतकीं लक्षणें कुबेरतुल्य राजामध्यें जरी असलीं तथापि त्यांपासून त्याची निंदा होते ॥ ११९ ॥

**प्राप्य चाप्युत्तमं जन्म लब्ध्वा चेन्द्रियसौष्ठवम् ।**
**न वेत्त्यात्महितं यस्तु स भवेदात्मघातकः ॥ ११२० ॥**

श्रेष्ठ जन्म व उत्कृष्ट इंद्रियें प्राप्त होऊन, जो आपलें हित न जाणील तो आत्मघातकी होतो ॥ ११२० ॥

**यथैवात्मा परस्तद्वद्द्रष्टव्यः शुभमिच्छता ।**
**सुखदुःखानि तुल्यानि यथात्मनि तथा परे ॥ १२१ ॥**

कल्याण इच्छिणारानें आपल्या आत्म्याप्रमाणें दुसऱ्यास पहावा, कारण जशा आपल्यामध्यें तशाच दुसऱ्यामध्यें सुखदुःखाच्या वेदना समान आहेत ॥ १२१ ॥

**मांधाता न महीपतिः कृतयुगालङ्कारभूतो गतः**
**सेतुर्येन महोदधौ विरचितः क्वासौ दशास्यान्तकः ।**
**अन्ये चापि युधिष्ठिरप्रभृतयो याता दिवं भूपते**
**नैकेनापि समं गतो हि विभवस्तस्मान्न कार्योऽनयः ॥१२२॥**

हे भूपते! सत्ययुगाचा अलंकारभूत मांधाता राजा मृत्यु पावला, ज्यानें समुद्रामध्यें सेतु बांधून रावणाचा अंत केला तो रामराज कोठें आहे? आणि इतर युधिष्ठिरप्रभृति अनेक राजेहि परलोकीं गेले, परंतु त्यांच्यापैकीं एकाच्याहि बरोबर ऐश्वर्य गेलें नाहीं, करितां अन्याय करूं नये ॥ १२२ ॥

पापं कर्तुमृणं कर्तुं मन्यन्ते मानवाः सुखम् ।
परिणामोऽतिगहनो महतामपि नाशकृत् ॥ १२३ ॥

पाप व ऋण करतेवेळीं प्रथम मनुष्य सुख मानतात, परंतु त्या दोहोंचा परिणाम मोठ्यांचाहि नाश करतो असा अतिशय गहन आहे ॥ १२३ ॥

सर्वस्य द्वे सुमतिकुमती संपदापत्तिहेतू
एको गोत्रे प्रभवति पुमान् यः कुटुम्बं बिभर्ति ।
वृद्धो यूना सह परिचयात्त्यज्यते कामिनीभिः
स्त्रीपुंवच्च प्रभवति यदा तद्धि गेहं विनष्टम् ॥ १२४ ॥

सर्वांस सुमति व कुमति या दोन्ही क्रमानें संपत्ति व आपत्ति यांची प्राप्ति होण्यामध्यें हेतु आहेत; जो कुटुंबाचें पालन करतो तो एकच पुरुष घरांत मुख्य मानला जातो, तरुणाशीं परिचय झाल्यानें स्त्रिया वृद्ध पुरुषाचा अनादर करितात, आणि ज्यावेळीं घरांतील स्त्री पुरुषाप्रमाणें स्वतंत्र होईल त्यावेळीं तें घर नाश पावतें ॥ १२४ ॥

रोगशोकपरीतापबन्धनव्यसनानि च ।
आत्मापराधवृक्षाणां फलान्येतानि देहिनाम् ॥ १२५ ॥

रोग, शोक, पश्चात्ताप, बंधन व दुःख, हीं देहधाऱ्यांस आपल्या अपराधरूपी वृक्षांचीं फळें आहेत ॥ १२५ ॥

यान्ति न्यायप्रवृत्तस्य तिर्यञ्चोऽपि सहायताम् ।
अपन्थानं तु गच्छन्तं सोदरोऽपि विमुञ्चति ॥ १२६ ॥

न्याय्यमार्गानें चालणाऱ्यास पश्वादिकहि सहाय्य करतात, परंतु अन्यायमार्गानें चालणारास सख्खा बंधूहि सोडून जातो. ( पूर्वार्धाचें उदाहरण—रामचंद्र व वानर, उत्तरार्धाचें उदाहरण—रावण व बिभीषण समजावें. ) ॥ १२६ ॥

**न जारजातस्य ललाटशृङ्गं कुलप्रसूतस्य न पाणिपद्मम् ।**
**यदा यदा मुञ्चति वाक्यबाणं तदा तदा जातिकुलप्रमाणम् ॥१२७॥**

जारापासून जन्मलेल्याच्या डोक्यावर शिंग असत नाहीं, व सत्कुलापासून जन्मलेल्याच्या हातावर कमळ असत नाहीं, परंतु ज्या ज्या वेळीं वाक्यरूपी बाण सोडतो, त्या त्या वेळीं त्याची जाति व कुल समजून येतें ॥ १२७ ॥

**सत्यं मृदु प्रियं वाक्यं धीरो हितकरं वदेत् ।**
**आत्मोत्कर्षं तथा निन्दां परेषां परिवर्जयेत् ॥ १२८ ॥**

धीर मनुष्यानें सत्य, मृदु, प्रिय व हितकारक वाक्य बोलावें आणि स्वतःची स्तुति व दुसऱ्याची निंदा यांचा त्याग करावा ॥ १२८ ॥

**विरक्तः परदारेषु निस्पृहः परवस्तुषु ।**
**दम्भमात्सर्यहीनो यः स साधुः कथ्यते बुधैः ॥ १२९ ॥**

जो परस्त्रीविषयीं विरक्त, दुसऱ्याच्या वस्तूविषयीं निस्पृह आणि दंभ व मत्सर यांनीं रहित असेल त्यास बुद्धिमान् साधु म्हणतात ॥ १२९ ॥

**सत्यमेव व्रतं यस्य दया दीनेषु सर्वदा ।**
**कामक्रोधौ वशे यस्य स साधुः कथ्यते बुधैः ॥ ११३० ॥**

ज्याचें सत्य हेंच व्रत आहे, दीनांवर नेहमीं दया आहे, व काम, क्रोध वश आहेत, त्यास बुद्धिमान् साधु म्हणतात ॥ ११३० ॥

**मुनिर्भवति मौनान्नो नारण्यवसनान्मुनिः ।**
**मुनिर्भवति वश्यात्मा स्थिरधीर्मुनिरुच्यते ॥ १३१ ॥**

मनुष्य मौन धरिल्यानें व अरण्यामध्यें वास केल्यानें मुनि होत नाहीं, तर मनास वश केल्यानें मुनि होतो, कारण ज्याची बुद्धि स्थिर झाली तो मुनि म्हटला जातो ॥ १३१ ॥

**यो हि नो कुरुते पापं सर्वभूतेषु कर्हिचित् ।**
**कर्मणा मनसा वाचा स ज्ञानी कथ्यते बुधैः ॥ १३२ ॥**

जो कधींहि मन वाणी व कर्म यांहींकरून, कोणत्याहि प्राण्याविषयीं पापाचरण करीत नाहीं, त्यास बुद्धिमान् ज्ञानी म्हणतात ॥ १३२ ॥

याशिवायहि देशकालास अनुसरून अनेक प्रकारचीं अनिंदित कर्में सांगितलीं आहेत, कारण निरनिराळ्या देशामध्यें निरनिराळी रीतभात असते; जी एका देशांत निंदित, तर दुसऱ्या देशांत अनिंदित म्हटली जाते. करितां त्या त्या देशाच्या रीतिभातींवर लक्ष ठेवून वागावें. शुक्रनीतीच्या तिसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**नूतनप्राक्तनानां च व्यवहारविदां धिया ।**
**प्रतिक्षणं चाभिनवो व्यवहारो भवेदतः ॥ १३३ ॥**

व्यवहार जाणणाऱ्या जुन्या व नव्या मनुष्यांच्या बुद्धीनें, प्रतिक्षणीं नवी नवी रीतभात होते ॥ १३३ ॥

**वक्तुं न शक्यते प्रायः प्रत्यक्षादनुमानतः ।**
**उपमानेन तज्ज्ञानं भवेदाप्तोपदेशतः ॥ १३४ ॥**

करितां बहुतकरून तें सांगणें शक्य नाहीं, करितां केवळ प्रत्यक्ष, अनुमान आणि उपमान यांहींकरून व आप्तपुरुषाच्या उपदेशानें त्याचें ज्ञान होतें ॥ १३४ ॥

याप्रकारें सदाचरण पाळणारा व त्या त्या देशाच्या रीतीभातींवर लक्ष ठेवून वागणारा मनुष्य सर्वत्र मान पावून सुखी होतो, करितां आचार्यांनें निंदित कर्मांचा त्याग करून अनिंदित कर्में सेविण्याचा उपदेश केला आहे.

याप्रकारें प्रमाणसहस्रीच्या आचारप्रकरणापैकीं अनिंदित कर्में आचरण्याचा उपदेश समाप्त.

---

## ॥ यान्यस्माकं सुचरितानि तानि त्वयोपास्यानि नो इतराणि ॥

आतां दहावा उपदेश गुरु वगैरे वडिलांचीं जीं चांगलीं आचरणें असतील तीं ग्रहण करण्याचा आणि दुराचरणें असतील तीं ग्रहण न करण्याविषयींचा आहे. कारण कोणाचाहि गुण ग्रहण केल्यानें आणि दोष टाकल्यानें

मनुष्य चांगल्या प्रकारें कुशल होऊन लोकांमध्यें सुखी होतो, व चांगलें यश मिळवितो. करितां अमक्याजवळून सारे गुण शिकण्यास योग्य आहेत किंवा अयोग्य ! असा विचार सोडून देऊन सर्वांपासून गुण ग्रहण करावे. आणि मेंढरांच्या कळपासारखें गतानुगतिक होऊन ही माझ्या बापाची विहीर आहे, अशा दुराग्रहानें जवळ असलेल्या नदीचें गोडें पाणी सोडून देऊन, विहिरींतील खारें पाणी पिण्याप्रमाणें, परंपरेनें चालत आलेली आज्या–पणज्याची रूढी–कदाचित् वाईट असली, तर ती आग्रहानें धरून बसूं नये; कारण तशा आग्रहानें आपली स्थिति कधीं सुधारत नाहीं. करितां विदुरनीतींत सांगितलें आहे कीं,

**अप्युन्मत्तात्प्रलपतो बालाच्च परिजल्पतः ।**
**सर्वतः सारमादद्यादश्मभ्य इव काञ्चनम् ॥ १३५ ॥**

बकवाद करणारा, उन्मत्त, व बोबडें बोबडें बोलणारा बालक यांच्यापासून तसेंच इतर सर्वांपासून, दगडांतून सुवर्णाप्रमाणें सार ग्रहण करावें ॥ १३५ ॥

तसेंच सांगितलें आहे कीं,

**शत्रोरपि गुणा ग्राह्या गुरोस्त्याज्यास्तु दुर्गुणाः ।**
**देशकालानुरोधेन वर्तितव्यं सदा बुधैः ॥ १३६ ॥**

बुद्धिमंतानें शत्रूचेहि गुण ग्रहण करावे, व गुरूचेहि दुर्गुण टाकावे, आणि देश–कालास अनुसरून चालावें ॥ १३६ ॥

असें असतांहि जे गाडरिया प्रवाहाप्रमाणें चांगला उपदेश आग्रहानें स्वीकारीत नाहींत, त्यांच्याविषयीं सांगितलें आहे कीं,

**अगतित्वमतिश्रद्धा ज्ञानाभ्यासे रुचिर्नवै ।**
**त्रयः शिष्यगुणा ह्येते मूर्खाचार्यस्य पुष्टये ॥ १३७ ॥**

अगतित्व, अतिशय विश्वास व ज्ञानाच्या अभ्यासाविषयीं अरुचि, हे शिष्याचे तीन गुण मूर्ख आचार्यांच्या पुष्टीकरितां आहेत ॥ १३७ ॥

करितां नेहमीं आपल्या कल्याणासाठीं दुर्गुण सोडून सद्गुण ग्रहण करून सदाचारानें वागावें, आणि सर्वशक्तिमान् सर्वांतर्यामी परमेश्वराच्या भक्तीविषयीं तत्पर राहून त्याची प्रार्थना करीत रहावें. त्याविषयीं सांगितलें आहे कीं,

ॐ नमस्ते सते ते जगत्कारणाय
नमस्ते चिते सर्वलोकाश्रयाय ।
नमोऽद्वैततत्त्वाय मुक्तिप्रदाय
नमो ब्रह्मणे व्यापिने शाश्वताय ॥ १३८ ॥

हे सद्रूप, जगत्कारण, ज्ञानस्वरूप, सर्व लोकांचा आश्रय, अद्वितीय, मुक्तिदाता, नित्य व सर्वव्यापी परब्रह्म अशा तुला नमस्कार असो॥ १३८॥

त्वमेकं शरण्यं त्वमेकं वरेण्यं, त्वमेकं जगत्पालकं स्वप्रकाशम् ।
त्वमेकं जगत्कर्तृपातृप्रहर्तृ, त्वमेकं परं निश्चलं निर्विकल्पम्॥ १३९॥

तूं एकच सर्वांचा रक्षक, मुख्य, जगताचा पालक, स्वप्रकाश, जगताची सृष्टि, स्थिति व प्रलय करणारा, श्रेष्ठ, निश्चल व निर्विकल्प आहेस॥ १३९॥

भयानां भयं भीषणं भीषणानां गतिः प्राणिनां पावनं पावनानाम्।
महोच्चैःपदानां नियन्तृ त्वमेकं परेषां परं रक्षणं रक्षणानाम् ॥११४०॥

पुनः तूं एकच भयाचें भय, भयंकरांचा भयंकर, प्राण्यांची गति, पवित्रांचा पवित्र, अतिशय उच्च स्थानांचा नियंता, श्रेष्ठांचा श्रेष्ठ, व रक्षणांचेंहि रक्षण आहेस ॥ ११४० ॥

वयं त्वां स्मरामो वयं त्वां भजामो
वयं त्वां जगत्साक्षिरूपं नमामः ।
सदेकं निधानं निरालम्बमीशं
भवाम्भोधिपोतं शरण्यं व्रजामः ॥ १४१ ॥

करितां जगताचा साक्षिरूप तुला आम्हीं आठवितों, भजतों, व नमतों आणि तूं सत्यस्वरूप, विश्रांतिस्थान, निरालंब, भवसागर तरून जाण्याची नौका व रक्षक अशा एका ईशास आम्हीं शरण जात आहों ॥ १४१ ॥

विदुर्यं न चित्तेन्द्रियाणीन्द्रियेशं
विजानाति यस्तानि नित्यं नियन्ता ।
जगत्साक्षिणं व्यापकं विश्ववन्द्यं
चिदानन्दरूपं तमीशं प्रपद्ये ॥ १४२ ॥

ज्या इंद्रियांच्या ईशास मन व इंद्रियें जाणत नाहींत, परंतु जो नियंता नित्य त्यांस जाणतो, त्या जगताचा साक्षी, व्यापक व विश्वास वंदन करण्यास योग्य, चिदानंदरूप ईशास मी शरण जात आहें ॥ १४२ ॥

अणोरप्यणीयान् महद्भ्यो महीयान्
रवीन्दुग्रहज्याभगोलादिकर्ता ।
य ईशो हि सृष्टयादिमध्यान्तसंस्थ-
श्चिदानन्दरूपं तमीशं प्रपद्ये ॥ १४३ ॥

जो लहानांहून लहान, मोठ्यांहून मोठा, सूर्य, चंद्र, ग्रह, पृथ्वी व नक्षत्रादि गोलांचा कर्ता, नियंता आणि सृष्टीच्या आदि, मध्यें व अंतीं राहिला आहे अशा त्या चिदानंदरूप ईशास मी शरण जात आहें ॥ १४३ ॥

यतो जायते विश्वमेतत्समस्तं स्थितं यत्र यस्मिंल्लयं याति काले ।
अनादिं विभुं चादिमध्यान्तशून्यं चिदानन्दरूपं तमीशं प्रपद्ये ॥१४४॥

ज्यापासून हें समग्र विश्व उत्पन्न होतें, ज्याचे ठिकाणीं राहतें व कालेंकरून ज्यामध्यें लय पावतें, त्या अनादि, व्यापक आणि आदि, मध्य व अंतरहित अशा चिदानंदरूप ईशास मी शरण जात आहें ॥ १४४ ॥

वशे यस्य विश्वं समस्तं सदाऽऽस्ते
यदाभासतो भाति विश्वं विचित्रम् ।
न जानन्ति यं तत्त्वतो योगिनोऽपि
चिदानन्दरूपं तमीशं प्रपद्ये ॥ १४५ ॥

हें विश्व नेहमीं ज्याच्या स्वाधीन असतें व ज्याच्या आभासानें हें विचित्र विश्व भासतें, आणि ज्यास योगीहि तत्त्वतः जाणत नाहींत, अशा चिदानंदरूप ईशास मी शरण जात आहें ॥ १४५ ॥

याप्रमाणें गुणग्राही मनुष्य सुखी होतो, करितां आचार्यांनें वडिलांचीं दुश्चरितें सोडून सुचरितें ग्रहण करण्याबद्दल उपदेश केला आहे.

याप्रकारें प्रमाणसहस्रीच्या आचारप्रकरणापैकीं सुचरितें ग्रहण करण्याचा उपदेश समाप्त.

॥ इत्याचारप्रकरणम् ॥

॥ ॐ तत्सद्ब्रह्मणे नमः ॥

श्री

# प्रमाणसहस्री



## ॥ विचारप्रकरणप्रारंभ ॥

### प्रश्न



**योदेवानां प्रभवश्चोद्भवश्च विश्वाधिपो रुद्रो महर्षिः ।**
**हिरण्यगर्भं जनयामास पूर्वं स नो बुध्या शुभया संयुनक्तु ॥ १ ॥**

—श्वेताश्वतरोपनिषद्.

**जो देव–भूतां रचि विश्वहेतू सच्चित्स्वरूपी भवसिंधुसेतू ।**
**हिरण्यगर्भा सृजिलें जयानें सुबुद्धि द्यावी सकलां तयानें ॥ १ ॥**

पहिल्या प्रकरणांत सृष्टिसंबंधीं व दुसऱ्या प्रकरणांत आचाराविषयीं विचार केला आहे. आतां तिसऱ्या प्रकरणांत जीव, ईश्वर आणि परमात्मा यांसंबंधीं विचार करण्यांत येत आहे. जशी मनुष्यास सृष्टि आणि आचार यासंबंधी ज्ञान मिळविण्याची आवश्यकता आहे, तशीच जीवादिकांचें ज्ञान मिळविण्याची अतिशयच आवश्यकता भासते. कारण जसा सृष्टिज्ञान मिळविल्यानें मनुष्य गर्वरहित बनून आणि आचार जाणल्यानें व्यवहारांत कुशल होऊन सुखी होतो, तसाच जीवादिकांचें ज्ञान प्राप्त झाल्यानें मनुष्य नानाप्रकारच्या संशयांपासून मुक्त होऊन सुखी होतो.

श्रीमद्भगवद्गीतेच्या चवथ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।**
**नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥ २ ॥**

अज्ञ, ईश्वरास न मानणारा आणि संशयी मनुष्य नाश पावतो. त्यांपैकीं संशयखोराचा इहलोक व परलोक सुधारत नाहीं व त्यास सुखहि होत नाहीं ॥ २ ॥

करितां ज्यांस सारासार विचार करण्याची शक्ति मिळाली आहे, अशा मनुष्यप्राण्यांनीं जर जीवादिकांसंबंधीं विचार केला नाहीं, तर त्यांचें जन्म व्यर्थ समजावें. कारण इतर प्राण्यांस त्यासंबंधी विचार करण्याची शक्ति नाहीं ! पूर्वीं या भरतखंडामध्यें अनेक तत्ववेत्ते होऊन गेले आहेत, त्यांनीं जीवादिकांसंबंधीं फारच चांगल्या प्रकारें विचार केला आहे. कृष्णयजुर्वेदाच्या श्वेताश्वतर उपनिषदांत सांगितलें आहे कीं,

**किं कारणं ब्रह्म । कुतः स्म जाता जीवामः केन ।**
**क्व च संप्रतिष्ठिताः केन सुखेतरेषु वर्तामहे ॥ ३ ॥**

काय जगताचें कारण ब्रह्म आहे ? आपण कोठून उत्पन्न झालों ? कशानें जीवन करीत आहों ? कुठें राहिलों आहों ? आणि कोणाकडून सुख—दुःखांमध्यें वर्तत आहों ? ॥ ३ ॥

---

## ॥ किंकारणं ब्रह्म ॥

आतां जगताचें कारण काय ब्रह्म आहे ? हा पहिला प्रश्न आहे; त्याविषयीं विचार केला असतां अवश्य जगताचें कांहींतरी कारण असलें पाहिजे असा तर्क होतो. तर्क केल्यावांचून कोणच्याहि वस्तूचें यथार्थ स्वरूप समजण्यांत येऊं शकत नाहीं. जसें कसोटीच्या पाषाणावर कस काढिला असतां सोन्याचें यथार्थ स्वरूप समजतें, तसें हरएक पदार्थाची किती सत्ता आहे, तें विश्वास ठेवून मानण्याऐवजीं जर तर्कानें विचार करण्यांत येईल, तर त्या पदार्थाच्या सत्तेचें यथार्थ स्वरूप समजून येतें. विश्वगुणादर्शांत सांगितलें आहे कीं,

मोहं रुणद्धि विमलीकुरुते च बुद्धिं
सूते च संस्कृतपदव्यवहारशक्तिम् ।
शास्त्रान्तराभ्यसनयोग्यतया युनक्ति
तर्कश्रमो न तनुते कमिहोपकारम् ॥ ४ ॥

तर्क अज्ञानास घालवितो, बुद्धीस निर्मल करितो, चांगल्या प्रकारानें रचलेल्या वाक्याची पद्धति समजण्याची शक्ति उत्पन्न करतो आणि इतर शास्त्रें अध्ययन करण्यास योग्य बनवितो, करितां त्यामध्यें केलेला श्रम या लोकांत कोणता उपकार करीत नाहीं? ॥ ४ ॥

पुनः कारणावांचून कार्य होत नाहीं, या न्यायानें जगद्रूप कार्याचें कांहीं तरी कारण असलें पाहिजे, असें अनुमान करण्यांत येतें. यद्यपि सृष्टींत अनेक पदार्थ पाहण्यांत येतात, तथापि त्या सर्वांचा जड आणि चेतन या दोहोंमध्यें अंतर्भाव होतो. जड वस्तु पाहण्यांत किंवा जाणण्यांत आल्यानें ती दृश्य किंवा ज्ञेय ह्मटली जाते, व चेतन तीस पाहणारा असल्यानें तो द्रष्टा किंवा ज्ञाता ह्मटला जातो. जर सृष्टीमध्यें चैतन्य नसतें आणि एकच जड वस्तु असती, तर सृष्टीचा अनुभव करणारा कोणी झालाच नसता, असें असूनहि पदार्थ-वादी चार्वाकानें सांगितलें आहे कीं,

चतुर्भ्यः खलु भूतेभ्यश्चैतन्यमुपजायते ।
किण्वादिभ्यः समेतेभ्यो द्रव्येभ्यो मदशक्तिवत् ॥ ५ ॥

जशी तंदुलादि द्रव्यकृत सुराबीजानें संयुक्त झालेल्या द्रव्यांपासून दारूमध्यें कैफरूप मादक शक्ति येते, तसें पृथ्वी, जल, तेज आणि वायु या एकत्र जमलेल्या चार महाभूतांपासून चैतन्य उत्पन्न होतें ॥ ५ ॥

अग्निरुष्णो जलं शीतं शीतस्पर्शस्तथाऽनिलः ।
केनेदं चित्रितं तस्मात्स्वभावात्तद्व्यवस्थितिः ॥ ६ ॥

अग्नि उष्ण, पाणी थंड, आणि वायु शीतस्पर्शयुक्त आहे, हें कोणी निर्माण केलें? करितां त्याची स्वभावतःच व्यवस्था जाणावी ॥ ६ ॥

केनाञ्जितानि नयनानि मृगाङ्गनानां
कोवा करोति रुचिराङ्गरुहान्मयूरान् ।
कश्चोत्पलेषु दलसंनिचयं करोति
कोवा करोति विनयं कुलजेषु पुंसु ॥ ७ ॥

हरिणींच्या नेत्रामध्यें कोणी अंजन केलें ? मोरांचीं सुंदर पिच्छें कोण बनवितो ? कमलांमध्यें पाकळ्यांचा समुदाय कोण रचतो ? आणि कुलीन पुरुषांमध्यें विनय कोण उत्पन्न करितो ? ॥ ७ ॥

निम्नोन्नतं कः कुरुते जलानां विचित्रभाव मृगपक्षिणां च ।
माधुर्यमिक्षौ कटुतां मरीचे स्वभावतः सर्वमिदं हि सिद्धम् ॥ ८ ॥

पुनः पाण्यांची नीच—उच्चता, पशुपक्ष्यांचे विचित्र भाव, उंसांमध्यें माधुर्य, व मिर्च्यांमध्यें तिखटपणा कोण उत्पन्न करतो? करितां हें सर्व स्वभातःच सिद्ध आहे ॥ ८ ॥

परंतु या स्वाभाविक धर्मांची प्रवृत्ति चैतन्याच्या सत्तेवांचून कोठेंच पाहण्यांत येत नाहीं, कारण क्रिया होण्यामध्येंहि हेतु चैतन्य आहे, जड नाहीं. जर पदार्थांमध्यें सामान्य चैतन्य नसतें, तर जीवरूप विशेष चैतन्य कसें झालें असतें ? कारण सामान्य अग्नीचें अस्तित्व आहे, ह्मणूनच तो प्रकाशरूपानें विशेष होतो. कोणासहि स्वतःच्या अस्तित्वाचा निश्चय आहे; जसा एखादा शून्य घराचा अनुभव करणारा सांगतो कीं, " या घरांत कोणी नाहीं " तर तेथें त्याचा अनुभव करणारा तो स्वतः साक्षी आहे. तसा, जड वस्तुच आहे व ती मिश्रित झाल्यानें चैतन्याचा उद्भव होतो, असें सांगणारा स्वतः त्याचा साक्षी आहे, असें प्रसिद्धपणें समजण्यांत येतें. करितां जडाखेरीज चैतन्याचें अस्तित्व स्पष्ट आहे, त्याविषयीं शंकराचार्यांनीं सांगितलें आहे कीं,

अस्ति स्वयमित्यस्मिन्नर्थे कस्यास्ति संशयः पुंसः ।
अत्रापि संशयश्चेत्संशयिता यः स एव भवसि त्वम् ॥ ९ ॥

" मी आहें " या अर्थाविषयीं कोणत्या मनुष्यास संशय आहे ? आणि यामध्येंहि जर तुला संशय असेल, तर जो संशय करणारा तोच तूं ठरतोस ॥ ९ ॥

यावरून असें सिद्ध होतें कीं, जडाचा अनुभव करणारें चेतन आहे, परंतु तें मन, वाणी वगैरे इंद्रियांस अगोचर असल्यानें प्रत्यक्ष पाहण्यांत येत नाहीं. सामवेदाच्या केनोपनिषदांत सांगितलें आहे कीं,

**न तत्र चक्षुर्गच्छति न वाग्गच्छति नो मनो न**
**विद्मो न विजानीमो यथैतदनुशिष्यात् ॥ १० ॥**

त्या ब्रह्मास दृष्टि पाहूं शकत नाहीं, वाणी वर्णन करूं शकत नाहीं, आणि मन जाणूं शकत नाहीं, त्यामुळें आम्हीहि जाणत नाहीं, करितां त्याचा शिष्यास कोणत्या रीतीनें उपदेश करावा, हें आम्ही समजूं शकत नाहीं ॥१०॥

**यस्यामतं तस्य मतं मतं यस्य न वेद सः ।**
**अविज्ञातं विजानतां विज्ञातमविजानताम् ॥ ११ ॥**

ब्रह्म समजणें शक्य नाहीं, असा ज्यास निश्चय आहे, तो ब्रह्म जाणतो, आणि “ मी ब्रह्म जाणलें ” असा ज्यास निश्चय आहे, तो ब्रह्म जाणत नाहीं. कारण तें “ जाणतों ” असें सांगणारास समजलें नाहीं, आणि “ जाणलें नाहीं ” असें सांगणारास समजलें आहे ॥ ११ ॥

कारण यजुर्वेदाच्या कठोपनिषदांत सांगितलें आहे कीं,

**इन्द्रियेभ्यः परा ह्यर्था अर्थेभ्यश्च परं मनः ।**
**मनसश्च परा बुद्धिर्बुद्धेरात्मा महान् परः ॥ १२ ॥**

इंद्रियांहून पर विषय, विषयांहून पर मन, मनाहून पर बुद्धि आणि महान् आत्मा बुद्धिहूनहि पर आहे ॥ १२ ॥

**नैव वाचा न मनसा प्राप्तुं शक्यो न चक्षुषा ।**
**अस्तीति ब्रुवतोऽन्यत्र कथं तदुपलभ्यते ॥ १३ ॥**

तें ब्रह्म वाणीनें, चक्षूनें किंवा मनानेंहि प्राप्त होणें शक्य नाहीं, तर त्याचें अस्तित्व न मानणाऱ्यास तें कसें समजावें ? ॥ १३ ॥

तसेंच श्रीमद्भगवद्गीतेंत सांगितलें आहे कीं,

**आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवद्वदति तथैव चान्यः ।**
**आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् ॥१४॥**

या आत्म्याचा कोणी आश्चर्याप्रमाणें विचार करतो, कोणी आश्चर्याप्रमाणें वर्णन करतो, आणि कोणी आश्चर्याप्रमाणें श्रवण करतो, व श्रवण करूनहि यास कोणी जाणत नाहीं ॥ १४ ॥

परंतु जशी शोध केल्यानें पदार्थांचे गुण–दोष समजून, त्यांची सत्ता समजणें शक्य आहे, तसें सृष्टींतील सर्व पदार्थांचा ज्यामध्यें समावेश होतो, अशा जड–चैतन्याचा विवेकपूर्वक विचार केला असतां सामान्य चैतन्य स्पष्टपणें समजून येतें. कृष्णयजुर्वेदाच्या श्वेताश्वतर उपनिषदांत सांगितलें आहे कीं,

**वह्नेर्यथा योनिगतस्य मूर्तिर्न दृश्यते नैव च लिङ्गनाशः ।**
**स भूय एवेन्धनयोनिगृह्यस्तद्वोभयं वै प्रणवेन देहे ॥ १५॥**

जसें स्वतःच्या कारणरूप अरणीमध्यें असलेल्या अग्नीचें स्वरूप दिसत नाहीं, त्यामुळें कांहीं त्याच्या सूक्ष्म स्वरूपाचा नाश होत नाहीं, कारण तो फिरून अरणीचें काष्ठ मंथन केल्यानें प्रकट होऊन ग्रहण करतां येतो, तसा देहामध्यें असलेला आत्मा विचारानें जाणतां येतो ॥ १५ ॥

पुनः कठोपनिषदांत सांगितलें आहे कीं,

**एष सर्वेषु भूतेषु गूढात्मा न प्रकाशते ।**
**दृश्यते त्वग्र्यया बुध्द्या सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः ॥ १६ ॥**

हा सर्व भूतांमध्यें गुप्त असलेला आत्मा सहज जाणतां येत नाहीं, परंतु सूक्ष्म विचार करणाऱ्या पंडितांस सूक्ष्म व एकाग्र बुद्धीनें जाणतां येतो ॥ १६ ॥

तसेंच मुंडकोपनिषदांत सांगितलें आहे कीं,

**बृहच्च तद्दिव्यमचिन्त्यरूपं सूक्ष्माच्च तत्सूक्ष्मतरं विभाति ।**
**दूरात्सुदूरे तदिहान्तिके च पश्यत्स्विहैव निहितं गुहायाम् ॥१७॥**

तें सर्वांहून महत्, स्वयंप्रकाश, अचिन्त्यरूप आणि सूक्ष्माहूनहि अति-सूक्ष्म ब्रह्म प्रकाशत आहे, परंतु अज्ञान्यांस दूराहूनहि दूर आहे, आणि ज्ञान्यांस हृदयांमध्यें जवळच आहे ॥ १७ ॥

चाणक्यनीतींत सांगितलें आहे कीं,

**पुष्पे गंधं तिले तैलं काष्ठे वह्निं पयो घृतम् ।**
**इक्षौ गुडं तथा देहे पश्यात्मानं विवेकतः ॥ १८ ॥**

जसा पुष्पांमध्यें गंध, तिळांमध्यें तेल, काष्ठामध्यें अग्नि, दूधामध्यें तूप, आणि उंसामध्यें गूळ असतो, तसा देहामध्यें असलेला आत्मा विवेकानें जाण ॥ १८ ॥

पुनः शंकराचार्यांनीं सांगितलें आहे कीं,

**सर्वगं सच्चिदात्मानं ज्ञानचक्षुर्निरीक्षते ।**
**अज्ञानचक्षुर्नेक्षेत भास्वन्तं भानुमन्धवत् ॥ १९ ॥**

सर्वव्यापक सच्चिदात्म्यास ज्ञानरूप दृष्टि ज्यास आहे तो पहातो, परंतु ती ज्यास नाहीं, तो—आंधळा जसा प्रकाशित सूर्यास पाहूं शकत नाहीं तसा—त्यास पाहूं शकत नाहीं ॥ १९ ॥

सृष्टींमध्यें कोणतेंहि असें स्थान नाहीं कीं, जेथें सामान्य चैतन्य नसेल, जसा सामान्य अग्नि सर्वत्र व्यापून राहिला आहे, तसें तेंहि सर्वत्र भरलें आहे. ऋग्वेदाच्या ऐतरेयोपनिषदांत सांगितलें आहे कीं,

**कतरः स आत्मा । येन वा रूपं पश्यति । येन वा शब्दं शृणोति । येन वा गन्धानाजिघ्रति । येन वाचं व्याकरोति । येन वा स्वादुचास्वादु च विजानाति ॥ २० ॥**

तो आत्मा कोण ? ज्याच्या सत्तेनें प्राणी डोळ्यांनीं रूप पहातो, कानांनीं शब्द ऐकतो, नाकानें गंधाचा वास घेतो, मुखानें वाणी बोलतो आणि जिभेनें स्वाद आणि अस्वाद जाणतो ॥ २० ॥

तसेंच कृष्णयजुर्वेदाच्या तैत्तिरीयोपनिषदांत सांगितलें आहे कीं,

**यतो वा इमानि भूतानि जायन्ते । येन जातानि जीवन्ति ।**
**यत्प्रयन्त्यभिसंविशन्ति तद् ब्रह्म ॥ २१ ॥**

ज्याच्या पासून हे प्राणी उत्पन्न होतात, झाल्यानंतर ज्याच्या सत्तेनें जीवन करतात, आणि विनाशाच्या वेळीं ज्यामध्यें जाऊन राहतात, तें ब्रह्म ॥ २१ ॥

हें सामान्य चैतन्य कोणच्याहि कालीं विनाश न पावल्यामुळें सत्, ज्ञानरूप असल्यामुळें चित् आणि मनाच्या अभावामुळें संकल्प–विकल्परहित असल्या कारणानें आनंदरूप ह्मटलें जातें, अर्थात् तें सच्चिदानंदरूप आहे. पुनः तें व्यापक असल्यानें अनंत व एकच असल्यानें अद्वितीय ह्मटलें जातें. नृसिंहोत्तरतापिनीमध्यें सांगितलें आहे कीं,

**अयमात्मा नित्यः शुद्धो बुद्धः सत्यो मुक्तो**
**निरञ्जनो विभुरद्वयानन्दः ॥ २२ ॥**

हा आत्मा नित्य, शुद्ध, बुद्ध, सत्य, मुक्त, निरंजन, व्यापक, अद्वितीय आणि आनंदस्वरूप आहे ॥ २२ ॥

पुनः अथर्ववेदाच्या सर्वोपनिषत्सारामध्यें सांगितलें आहे कीं,

**सत्यं ज्ञानमनन्तमानन्दं ब्रह्म ॥ २३ ॥**

सत्यस्वरूप, ज्ञानस्वरूप, अनंतस्वरूप आणि आनंदस्वरूप ब्रह्म आहे॥२३॥ परंतु या सामान्य चैतन्याच्या एकदेशामध्यें जडांश राहिला आहे, तो नित्य अंतर्बहिर् त्यानें व्याप्त असल्यामुळें, बीजांतून वृक्ष आणि वृक्षांतून बीज याप्रमाणें विकास आणि संकोच पावतो. विकासाच्या वेळीं वृक्षाप्रमाणें अनेक ब्रह्मांडरूप जगत् बनतो व संकोचाचे वेळीं बीजाप्रमाणें परमाणुरूपानें राहतो. विद्यारण्य महामुनींनीं पंचदशीमध्यें सांगितलें आहे कीं,

**पादोऽस्य सर्वा भूतानि त्रिपादस्ति स्वयंप्रभः ।**
**इत्येकदेशवृत्तित्वं मायाया वदति श्रुतिः ॥ २४ ॥**

या परमात्म्याच्या स्वरूपामध्यें एक अंश सर्व भूतें व तीन अंश स्वप्रकाश आहे; याप्रमाणें परमात्म्याच्या एकदेशामध्यें जडांशाची स्थिति श्रुति सांगते ॥२४॥

तसेंच श्रीमद्भगवद्गीतेच्या १३ व्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**यावत्संजायते किञ्चित्सत्वं स्थावरजङ्गमम् ।**
**क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ ॥ २५ ॥**

हे अर्जुना ! सृष्टीमध्यें जें कांहीं स्थावर–जंगमरूप सत्व उत्पन्न होतें, तें जड–चैतन्याच्या संयोगापासून होतें असें जाण ॥ २५ ॥

परंतु सामान्य चैतन्य कोणच्याहि कालीं नाश पावत नाहीं, कारण तें अवयव रहित आहे, त्यामुळें त्यास वृद्धि—क्षयरूप विकार लागू पडत नाहींत. श्रीमद्भगवद्गीतेच्या दुसऱ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं,

**अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ।**
**विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति ॥ २६ ॥**

ज्यानें हें सर्व व्यापिलें आहे, त्यास अविनाशी जाण, कारण तें अव्यय असल्यानें त्याचा विनाश करण्यास कोणी समर्थ होत नाहीं ॥ २६ ॥

परंतु जडांश अवयवयुक्त असल्यामुळें त्यास वृद्धि—क्षयरूप विकार लागू होतात. जरी परमाणूचाहि कोणेकाळीं नाश होत नाहीं, तथापि तो रूपांतरास प्राप्त झालेला दिसल्यामुळें नाशवान् म्हटला आहे. सृष्टीमध्यें कालें-करून जेथें जल तेथें स्थल आणि जेथें स्थल तेथें जल होतें, जेथें वसती तेथें अरण्य आणि जेथें अरण्य तेथें वसती होते, व जेथें पर्वत तेथें मैदान आणि जेथें मैदान तेथें पर्वत होतात, असा फेरफार होतो. पुनः कोणतीहि दृश्य वस्तु एकाच स्थितीमध्यें असलेली दिसत नाहीं; एखादी अल्पकालानें तर एखादी बहुत कालानें वृद्धि—क्षयाच्या विकारास प्राप्त होते, त्याविषयीं सांगितलें आहे कीं,

**दृश्यानि सर्वाणि विनश्वराणि ॥ २७ ॥**

सर्व दृश्य पदार्थ नाशवंत आहेत ॥ २७ ॥

यावरून असें समजूं नये कीं, हें जगत् तीन्ही कालामध्यें नाहीं, कारण भूत कालीन विद्वानांनीं रचलेल्या ग्रंथांपासून समजतें कीं, पूर्वीं जगत् होतें, वर्तमान कालीं प्रत्यक्ष भासत आहे, व भविष्यत्कालींहि भूतकालाप्रमाणें असलें पाहिजे. जगत् आहे ह्मणूनच त्याचें नेत्रांच्या कनीनिकेंतील जलीय अंशामध्यें प्रतिबिंब पडल्यामुळें तें प्रत्यक्ष पाहण्यांत येतें, परंतु जर तें नसतेंच तर कधींच भासलें नसतें. करितां ज्यावेळीं दृष्टीस पडतें, त्या वेळींच सृष्टि उत्पन्न होते, असें ह्मणणें असंभावित आहे. त्यामध्यें जर अवयवयुक्त जडांश वृद्धि पावून जगद्रूप झाला नसता तर कधीं भासला नसता. कारण निरवयव वस्तूच्या

ठिकाणीं सावयव वस्तूचें भासणें असंभवनीय आहे, कारण दोरी व शिंपी हीं दोन्ही सावयव आहेत, आणि तेथें सर्प व रुपें भासण्यासारखा योग आहे. मृगजल भासण्यामध्यें सूर्यकिरण व पृथ्वीमधून निघणारी वाफ यांचा मिश्रित योग हें कारण आहे, तशीच आकाशाची नीलता प्रकाश व तिमिर यांच्या मिश्रित योगानें भासते; परंतु वंध्यासुत, खपुष्प आणि शशशृंग हीं तर मूळांतच नाहींत, तर त्यांचा दृष्टांत जगतास काय उपयोग? करितां निरवयव सामान्य चैतन्यामध्यें सावयव जडांशाचा योग झाल्यामुळें जगत् भासतें. कारणावांचून कार्य होत नाहीं, आणि कारणगुणपूर्वक कार्यगुण असतो, या न्यायानें अवयवयुक्त जगताचें कारण अवयवयुक्त असलें पाहिजे. यावरून सामान्य चैतन्यास कांहीं द्वैतपणा प्राप्त होत नाहीं, कारण जेथें मन आहे तेथेंच द्वैत आहे, परंतु सामान्य चैतन्यामध्यें मनाचा अभाव असल्यामुळें तेथें चैतन्या-व्यतिरिक्त दुसऱ्या एखाद्या जगतासारख्या पदार्थाचा भासणेंपणा नाहींच. जसा एखाद्याच्या पायांस कांटा लागावा आणि तो रुपावा, तसें मनाचा अभाव असल्या कारणानें जगत् कांहीं सामान्य चैतन्यास रुपत नाहीं, करितां सामान्य चैतन्य अद्वैतच ठरतें, पुनः सामान्य चैतन्य अवयवांनीं रहित असल्यामुळें त्यामध्यें सजातीय, विजातीय आणि स्वगत यांपैकीं कोणत्याहि प्रकारचा भेद संभवत नाहीं. एकाच जातीच्या दोन पदार्थांचा जो भेद तो सजातीय भेद, दोन्ही वेगवेगळ्या जातीच्या पदार्थांचा जो भेद तो विजातीय भेद, आणि एकाच पदार्थामध्यें अवयवेंकरून जो भेद तो स्वगत भेद ह्मटला जातो. करितां सामान्य चैतन्य सच्चिदानंदरूपानें एकच आहे, असें अनुमान होतें. पुनः पदार्थमात्राचें भासणें किंवा न भासणें हें व्यावहारिक, प्रातिभासिक आणि पारमार्थिक या तीन प्रकारच्या सत्तेनें होतें. जागृतावस्थेमध्यें व्यावहारिक, स्वप्नावस्थेमध्यें प्रातिभासिक, आणि सुषुप्तीमध्यें किंवा समाधिदशेमध्यें पारमार्थिक सत्ता वर्तन करिते. एका अवस्थेच्या सत्तेचा दुसऱ्या अवस्थेमध्यें अभाव झाल्यानें जागृतीचे पदार्थ स्वप्नामध्यें आणि स्वप्नाचे पदार्थ सुषुप्तीमध्यें किंवा समाधीमध्यें भासत नाहींत; परंतु ज्या ज्या अवस्थेमध्यें जे जे पदार्थ भासतात, त्या त्या अवस्थे-

मध्यें ते ते पदार्थ सत्य आहेत, कारण तसें नसेल तर भासणारच नाहींत; आणि जसें जागृतीमध्यें सिंह—व्याघ्रादिकांस पाहून भय वाटतें, तसें स्वप्ना-मध्यें वाटणार नाहीं, परंतु जेथें मन क्रिया करीत नाहीं अशा सुषुप्तीमध्यें किंवा समाधीमध्यें कांहीं भासत नाहीं. यावरून एका अवस्थेच्या पदार्थांचा दुसऱ्या अवस्थेमध्यें अभाव दिसतो; परंतु वस्तुतः कांहीं अभाव नाहीं, कारण फिरून त्याच अवस्थेमध्यें तशा पदार्थांचें भासणें होतें. जरी जागृतीच्या पदार्थांसारखे स्वप्नांतील पदार्थ कांहीं सत्य नाहींत, तथापि जागृतीचे पदार्थ पाहिल्यानें त्यांचा जो मनामध्यें बीजरूपानें संस्कार बनून राहतो, तोच स्वप्नामध्यें प्रकट होऊन पदार्थरूपानें भासतो. परंतु जर जागृतीमध्यें पदार्थ नसतील तर त्यांचा मनामध्यें संस्कारहि राहत नाहीं, आणि कांहीं स्वप्ना-मध्यें भासतहि नाहीं. करितां जेथें मन क्रिया करीत नाहीं, अशा सुषुप्तीमध्यें किंवा समाधिदशेमध्यें एकाच सामान्य चैतन्याचा सद्भाव आहे; तेथें जगताचें भासणें मूळांतच नाहीं. त्यामुळें सामान्य चैतन्य अद्वितीयच ठरतें, आणि जगताच्या आंत—बाहेर सर्वत्र व्यापून राहिलें आहे, आणि त्याच्याच सत्तेनें जडांश विकास व संकोच पावतो; करितां तेंच सामान्य चैतन्य जडांशास हें परिदृश्यमान जगद्रूप होण्यांत कारण आहे, आणि तेंच ब्रह्म अथवा परमात्मा ह्मटला जातो, करितां सृष्टीचें कारण सच्चिदानंदरूप परमात्माच आहे. नृसिंहोत्तरतापिनी उपनिषदामध्यें सांगितलें आहे कीं,

**एष योनिः सर्वस्य प्रभवाप्ययौ हि भूतानाम् ॥ २८ ॥**

ह्याच परमात्मा सर्वांचें कारण आणि प्राण्यांची उत्पत्ति व नाश होण्यामध्यें हेतु आहे ॥ २८ ॥

याप्रमाणें प्रमाणसहस्रीच्या विचारप्रकरणापैकीं जगत्कारणब्रम्हनिरूपण समाप्त.

---

## ॥ कुतः स्म जाता जीवामः केन ॥

आतां आपण कोठून उत्पन्न झालों आणि कशानें जीवन करित आहों ? हा दुसरा प्रश्न आहे. त्याविषयीं सहज विचार केला तर सर्व प्राणी आप-

आपल्या माता–पित्यांच्या संयोगानें उत्पन्न झालेले भासतात. जरायुज व अंडज प्राण्यांमध्यें या प्रकारची उत्पत्ति प्रसिद्धपणें दिसून येते. स्वेदजांमध्येंहि कांहीं कांहीं वेळीं पाहण्यांत येते, आणि उद्भिज्जांमध्यें पुष्परजाच्या संयोगेंकरून भासते; आणि त्या त्या सर्व प्राण्यांचें जीवन परस्परांकडून झालेलें दिसून येतें. परंतु विशेष विचार केला असतां सर्व प्राण्यांचीं शरीरें जडांशापासून व जीवात्मे सामान्य चैतन्यापासून झालेले भासतात. प्रथम सामान्य चैतन्याच्या सत्तेनें जडांश वृद्धि पावून पृथ्वी, जल, तेज व वायु असा भूतचतुष्टयरूप झाला. आणि या चार भूतांच्या अनेक प्रकारच्या मिश्रित योगानें सृष्टींतील अनेक प्रकारच्या प्राण्यांचीं शरीरें झालेलीं दिसतात. आणि ज्याप्रमाणें एकच सामान्य अग्नि जशा आकाराच्या आणि जशा शक्तीच्या उपाधीनें युक्त होईल तशा आकाराच्या झालेल्या शक्तिरूपानें विशेष भासतो, त्याप्रमाणें जेथें जसा शरीराचा आकार तेथें तसें सामान्य चैतन्याचें जीवात्मरूपानें विशेषत्व झालेलें भासतें. यजुर्वेदाच्या कठोपनिषदांत सांगितलें आहे कीं,

**अग्निर्यथैको भुवनं प्रविष्टो रूपं रूपं प्रतिरूपो बभूव ।**
**एकस्तथा सर्वभूतान्तरात्मा रूपं रूपं प्रतिरूपो बहिश्च ॥ २९ ॥**

जसा जगतामध्यें असलेला एक अग्नि प्रत्येक काष्ठांत त्यात्या रूपाचा होतो, तसा सर्व भूतांच्या आंत व बाहेर असलेला एकच परमात्मा प्रत्येक देहांत त्यात्या रूपाचा होतो ॥ २९ ॥

**वायुर्यथैको भुवनं प्रविष्टो रूपं रूपं प्रतिरूपो बभूव ।**
**एकस्तथा सर्व भूतान्तरात्मा रूपं रूपं प्रतिरूपो बहिश्च ॥ ३० ॥**

जसा जगतांमध्यें असलेला एकच वायु रूपारूपाप्रत तशा रूपाचा होतो, तसा सर्व भूतांच्या आंत व बाहेर असलेला एकच परमात्मा रूपारूपाप्रत तशा रूपाचा होतो ॥ १०३० ॥

जसा एकच सामान्य अग्नि, सूर्यरूप मोठ्या उपाधीमुळें तसा विशेषरूपानें होऊन सर्व जगतास प्रकाशित करतो, आणि दीपकरूप लहानउपाधीमुळें तसा अल्परूपानें होऊन घरांतील थोड्या भागासच प्रकाशित करूं शकतो; तसें

एकच सामान्य चैतन्य महत् शक्तीच्या उपाधीनें सर्व शक्तिमान् ईश्वर बनून सर्वज्ञ, आणि अल्प शक्तीच्या उपाधीनें अल्पशक्तिमान् जीव बनून अल्प होऊं शकतें. वस्तुतः सामान्य चैतन्याचा कांहीं भेद भासत नाहीं, मात्र शक्तीचाच भेद दिसतो. जसा मनुष्य जातित्वेंकरून एक असून ऐश्वर्याच्या भेदानें राजा आणि प्रजा होतो, तसें चैतन्य एक असून शक्तींच्या भेदानें ईश्वर आणि जीव होऊं शकतें. जसा मनुष्यशरीरामध्यें उत्पन्न होऊन, त्यामध्यें राहून व त्यांतून पोषण मिळविणाऱ्या कृमिकीटादिकांच्या मनाकडून कदाचित् मनुष्याच्या अस्तित्वाचा अभाव असेल, तरी पण तो मनुष्य आहे, तसा ईश्वराच्या विराट् शरीरामध्यें उत्पन्न होऊन, त्यामध्यें राहून त्यांतून पोषण मिळविणाऱ्या मनुष्याच्या मनाकडून कदाचित् ईश्वराच्या अस्तित्वाचा निश्चय होत नसेल तरी-पण तो असला पाहिजे. कारण मनुष्याच्या पोटामध्यें असलेल्या प्रत्येक कृमि-कीटादिकांस आपापल्या शरीराचा वेगवेगळा अभिमान असतांहि, सर्व मनुष्यशरीराचा अभिमानी एक जीवात्मा निराळा आहे, तसाच ईश्वराच्या विराट्रूप शरीरामध्यें उत्पन्न झालेल्या प्रत्येक जंगम प्राण्यास आपापल्या शरीराचा निरनिराळा अभिमान असतांहि, सर्व विराट्रूप शरीराचा अभिमानी एक ईश्वर वेगळा असला पाहिजे; आणि जसे कृमिकीटादिक मनुष्यास जाणण्यास असमर्थ आहेत, तसे मनुष्य प्राणीहि ईश्वरास जाणण्यास समर्थ नाहींत. कारण जशी प्रत्येक दिव्याची तेल वात वगैरे भिन्न भिन्न व मर्यादित आहे, तशी मनुष्यादि शरीरधारी प्राण्यांची बुद्धि प्रत्येक शरीरामध्यें भिन्न भिन्न व मर्यादित आहे, आणि जसा तैलवर्तिकादिकांशीं योग पावून दीपकरूपानें झालेला सामान्य अग्नि त्या तैलवर्तिकादिकांच्या शक्तीप्रमाणें प्रकाश करतो, तसें अल्पबुद्धीशीं योग पावून जीवात्मरूपानें झालेलें सामान्य चैतन्य जितक्या प्रदेशामध्यें त्या सामान्य बुद्धीची शक्ति पोंचते तितक्या प्रदेशासंबंधी जाणूं शकतें, परंतु विशेष जाणूं शकत नाहीं. यामुळेंच मनुष्यादि प्राणी एकमेकांच्या मनांतील गोष्ट जाणूं शकत नाहींत, परंतु ईश्वर तर सर्व जाणूं शकतो. कारण जसा सूर्यगोलाशीं किंवा त्याच्या वातावरणाशीं

योग पावून त्याच्या शक्तीप्रमाणें महाप्रकाशरूपानें झालेला सामान्य अग्नि सर्व जगतास प्रकाशित करतो, तसा व्यापक बुद्धीशीं योग पावून, तिच्या शक्ती-प्रमाणें ईश्वररूपानें झालेलें सामान्य चैतन्य सर्व जाणील यामध्यें आश्चर्य नाहीं. जसा देह जीवानें व्याप्त असल्यामुळें त्याचें शरीर, आणि जीव त्याचा आत्मा आहे, तसें जगत् ईश्वरानें व्याप्त असल्यामुळें त्याचें शरीर, आणि ईश्वर त्याचा आत्मा आहे. याप्रमाणें जडांशापासून प्राण्यांचीं शरीरें व चैतन्यापासून त्यांचे जीवात्मे झालेले भासतात. आतां सामान्य दृष्टीनें पाहिलें असतां सर्व प्राणी खाण्या–पिण्यानें जीवंत राहतात; परंतु विशेष विचार केला असतां असें दिसून येते कीं, जर ईश्वरेच्छा अनुकूल नसेल, तर खाण्या–पिण्याचे पदार्थ जवळ असतांहि प्राणी जीवंत राहूं शकत नाहींत. सृष्टीमध्यें कोठेंहि कारणा-वांचून कार्याची स्थिति भासत नाहीं, या नियमाप्रमाणें सर्व प्राण्यांचीं शरीरें पृथ्वी, जल, तेज वायुरूप कारणांचें कार्य आहे; त्यामुळें या चार महाभूतां-पैकीं एखाद्याचाहि अभाव झाला असेल तर प्राणी जीवंत राहूं शकत नाहींत. आहार हा पृथ्वीचा भाग समजावा, पिणें हा पाण्याचा भाग समजावा, जठराग्नि हा अग्नीचा भाग समजावा, आणि प्राणवायु हा वायूचा भाग समजावा. जरी हीं प्रत्येक महाभूतें जडासारखीं दिसतात, तथापि चैतन्यानें व्याप्त असलीं पाहिजेत, कारण त्यांच्यामुळें प्राण्याच्या चैतन्यांशास पुष्टि झालेली दिसते. परंतु प्राणी सर्वज्ञ नसल्यानें सृष्टिनियमरूप ईश्वरी कायद्याचें उल्लंघन केल्यानें ईश्वराचे अपराधी होतात, त्यामुळें त्याची इच्छा प्रतिकूल झाली असतां ते अवधि होण्याच्या पूर्वीं मरण पावतात. करितां जसें होईल तसें मनुष्यानें विशेष ज्ञानवान् होऊन सृष्टिनियम जाणून त्याप्रमाणें चालावें आणि ईश्वराची कृपा मिळवून निदान १०० वर्षांच्या अवधीपर्यंत तरी जीवन करणें शक्य होईल अशा प्रकारचा प्रयत्न करावा.

याप्रमाणें प्रमाणसहस्रीच्या विचारप्रकरणापैकीं जीवोत्पत्तिस्थितिनिरूपण समाप्त.

---

## ॥ क च संप्रतिष्ठिताः ॥

आतां आपण कोठें राहिलों आहों? हा तिसरा प्रश्न आहे. त्याविषयीं सहज विचार केला तर असें दिसून येतें कीं, आपण एखाद्या घरामध्यें राहिलों आहों. परंतु क्रमानें विशेष विचार केला असतां एखाद्या गांवांमध्यें एखाद्या शहरामध्यें, एखाद्या देशामध्यें आणि एखाद्या खंडामध्यें राहिलेले भासतों, आणि त्याहूनहि पुढें विचार केला तर या भूगोलावर आपण राहिलों आहोंत, असें भासतें. परंतु सूक्ष्म विचार केला असतां आपण एखाद्या महाशक्तिमान् जगद्रूप शरीरयुक्त ईश्वराच्या अंगामध्यें—आपल्या शरीरामधील कृमि-कीटादिकांप्रमाणें—राहिलों आहोंत. आकाशांतील असंख्य गोल मिळून ईश्वराचें जगद्रूप शरीर आणि त्या प्रत्येक गोलास त्याचा अवयव कल्पिलेला आहे; अशा जगद्रूप शरीराचें जें अभिमानी चैतन्य तो ईश्वर ह्मटला जातो, त्यास जाणण्यास त्याच्या पोटामध्यें असलेले मनुष्यप्राणी कालांतरानेंहि समर्थ होऊं शकतील असें नाहीं.

याप्रकारें प्रमाणसहस्रीच्या विचारप्रकरणापैकीं प्राणिनिवासस्थाननिरूपण समाप्त.

---

## ॥ केन सुखेतरेषु वर्तामहे ॥

आतां आपण कशामुळें सुख—दुःखांमध्यें वर्तत आहोंत, हा चवथा प्रश्न आहे. त्याविषयीं सहज विचार केला असतां असें दिसून येतें कीं, आपणास सुख-दुःख होण्याचें कारण दुसरें आहे. परंतु सूक्ष्म रीतीनें विचार केला असतां आपण स्वतःच तें सुख—दुःख होण्यामध्यें कारण आहोंत, असें दिसून येतें. कारण "क्रियेसारखें फल" या नियमाप्रमाणें मनुष्य जसें आचरण करतो तसें फल पावतो. वाटेल तेवढा ज्ञानी असला तरी पापापासून मुक्त होत नाहीं. कदाचित् तो आपल्या मनानें मी पापापासून मुक्त झालों असें समजत असेल तर भले समजो; परंतु सृष्टिनियम तर असा आहे कीं, क्रियेचें फल वाटेल त्या रीतीनें मिळालेंच पाहिजे. करितां तशा दीड शहाण्यानें विवेक सोडून एखाद्याबद्दल

अशुभ रीतीनें वर्तन करून पहावें, त्याचा मोबदला जर त्यास न मिळेल तर समजावें कीं, तो पापापासून मुक्त झाला आहे. कदाचित् सामान्य चैतन्य मुक्त आहे असें समजून तो आपणास मुक्त मानत असेल तर त्यामध्यें त्याची मोठी चूक आहे; कारण तो स्वतःतर विशेष आहे, आणि क्रियेचें फळ होणें तें विशेषासच होतें. कारण क्रिया विशेषाकडूनच होते, सामान्यामध्यें क्रिया नाहीं, ह्मणून तेथें फलहि नाहीं. सामान्य अग्नीस कांहीं वायु, आप, व पृथ्वी बाध करूं शकत नाहींत, परंतु विशेष अग्नीस बाध करितात, असें प्रत्यक्ष पाहण्यांत येतें. तर जीवात्मरूप विशेष चैतन्यास पापपुण्याचें फळ कां मिळूं नये ? कदाचित् स्वतःस असंग समजून पाप-पुण्याचा भोक्ता न मानील, तर त्यांतहि त्याची भूल आहे. कारण कोणतीहि क्रिया तीमध्यें मन लाविल्यावांचून आणि ममत्व बांधिल्या-वांचून होऊं शकत नाहीं. पुनः मन चंचल असल्यानें सुषुप्ति, मूर्छा आणि निर्विकल्प समाधि यांच्याशिवाय स्थिर राहूं शकत नाहीं, व कोणत्या ना कोणत्या तरी विषयामध्यें प्रवृत्त असतें. परंतु त्यामध्यें एकाच वेळीं दोन ठिकाणीं प्रवृत्त होण्याची शक्ति नसल्या कारणानें " असंग राहणें आणि क्रिया करणें " या दोन्ही गोष्टी एकाच वेळीं त्याचे कडून होणार नाहींत. करिता जाग्रत्, स्वप्न आणि सविकल्प समाधि या दशांमध्यें जीवात्मा मनाच्यां हजिरीनें क्रिया करतो, आणि तिचें प्रत्यक्ष फळ भोगतो. तर तेथें तो असंग कसा ह्मटला जावा ? यद्यपि सुषुप्ति, मूर्च्छा किंवा निर्विकल्प समाधि या दशां-मध्यें मनाच्या अभावीं जीवात्मा असंग असेल, तरी त्यामुळें काय झालें ! तो पुनः जाग्रत्, स्वप्न व सविकल्प समाधीमध्यें आला असतां क्रियेचें फळ भोगील. मनामध्यें रजोगुणाचें उत्थान झाल्यावांचून कोणत्याहि कार्याचा आरंभ होत नाहीं, सत्त्वगुणाचें उत्थान झाल्यावांचून त्याचें पालन होत नाहीं, आणि तमोगुणाचें उत्थान झाल्यावांचून त्याचा नाश होत नाहीं, तर असंग राहून क्रिया करणेंपणा कोठें राहिला ? असंग राहून क्रिया तर अशी होते कीं, जसें एखाद्या बेशुद्ध मनुष्याचें अंथरुणावरच मल-मूत्र विसर्जन होतें,

दूध, पाणी किंवा औषध पाजलें तरच त्याच्या पोटांत जाईल आणि त्याचें उघडें असलेलें शरीर झांकलें तरच तें झांकेल; तसें शुद्धीवर असलेल्यानें करणें योग्य होत नाहीं, कारण सृष्टिनियमच असा आहे कीं, जंगम प्राण्यांनीं नेहमीं सावध राहून क्रिया करावी. जर असें नसेल तर त्यास जंगम करण्याची जरूरच काय होती ? एखाद्या पाषाणासारखा बनविला असता. बालक जर न रडतां, न हंसतां व हातपाय हालविल्यावांचून स्वस्थ पडून राहील, तर घरचीं सर्व माणसें विचारामध्यें पडून तसें होण्याचें कारण शोधण्यास लागतात. यावरून असें दिसून येतें कीं, जंगम प्राण्यानें शुद्धीमध्यें क्रियारहित होणें हें सृष्टिनियमाच्या विरुद्ध आहे. करितां नेहमीं आपल्या कार्यांत सावधान राहून सदाचरणानें वागावें. कारण बृहदारण्यकांत सांगितलें आहे कीं,

**यथाकारी यथाचारी तथा भवति । साधुकारी साधुर्भवति पापकारी पापो भवति । पुण्यः पुण्येन कर्मणा भवति पापः पापेन ॥३१॥**

जीवात्मा जसें करील व आचरील तसा होईल; चांगलें करील तर चांगला होईल, आणि वाईट करील तर वाईट होईल, कारण पुण्यकर्मेंकरून पुण्यवान् होतो, आणि पाप कर्मेंकरून पापिष्ठ होतो, ॥ ३१ ॥

तसेंच यजुर्वेदाच्या कठोपनिषदांत सागितलें आहे कीं,

**आत्मानं रथिनं विद्धि शरीरं रथमेव तु ।**
**बुद्धिं तु सारथिं विद्धि मनः प्रग्रहमेव च ॥ ३२ ॥**

जीवात्म्यास रथामध्यें बसणारा जाण, शरीरास रथ जाण, बुद्धीस सारथी जाण; आणि मनास लगाम जाण ॥ ३२ ॥

**इन्द्रियाणि हयानाहुर्विषयांस्तेषु गोचरान् ।**
**आत्मेन्द्रियमनोयुक्तं भोक्तेत्याहुर्मनीषिणः ॥ ३३ ॥**

करितां बुद्धिमान्, इंद्रियांस घोडे, विषयांस मार्ग, आणि शरीर, इंद्रियें व मन यांनीं युक्त आत्म्यास भोक्ता ह्मणतात ॥ ३३ ॥

व्यवहारामध्यें तर क्रियेचें फळ प्रत्यक्ष दिसून येतें; परंतु कित्येक सुख-दुःखांमध्यें–जेथें त्यांचें कारण समजण्यांत येत नाहीं तेथें–असें समजावें कीं, मनुष्य सर्वज्ञ नसल्यानें तसें सुख–दुःख होईल, त्या रीतीचें त्याचें आचरण नकळत होऊन गेलें असेल; कारण कारणावांचून कार्य होणें अस्वाभाविक आहे. लोकनियम, राजनियम आणि सृष्टिनियम यांच्या अनुकूल–प्रतिकूल वर्तन केलें असतां क्रमानें, लोक, राजा व ईश्वर यांजकडून सुखःदुखाची प्राप्ति होते. परंतु लोकनियमाप्रमाणें व राजनियमाप्रमाणें सृष्टिनियम चांगल्या प्रकारें जाणणें शक्य होत नाहीं, त्यामुळें मनुष्यास ज्याचें कारण समजण्यांत येत नाहीं, अशा सुख–दुःखांची प्राप्ति एकाएकीं होते. जसा मनुष्य जातित्वेंकरून एक असतांहि लोक आणि राजा आपआपल्या नियमाहून विरुद्ध चालणाऱ्यांस शिक्षा करितात, तसा सर्वशक्तिमान् ईश्वरहि चैतन्यत्वेंकरून एक असतांहि, अल्पशक्तिमान् जीवास, जर तो आपल्या नियमाविरुद्ध रीतीनें चालेल तर शिक्षा करतो. परंतु जसे मनुष्याच्या पोटामध्यें राहून विकार करणारे कृमिकीटादि, त्यांस मनुष्य कशा रीतीनें शिक्षा करील, तें कांहीं ते जाणत नाहींत, तसा ईश्वर जीवांस कशा रीतीनें शिक्षा करील, तें कांहीं त्यांच्या समजण्यांत येऊं शकत नाहीं. कारण तो सर्वशक्तिमान्, तुफान, रेल्वे, भूकंप, दुष्काळ, रोग किंवा अकस्मात् प्रेरणा यांपैकीं वाटेल त्या प्रकारानें अपराधी प्राण्यांस शिक्षा करतो. बृहदारण्यकांत सांगितलें आहे कीं,

**स सर्वेषां भूतानामधिपतिः ॥ ३४ ॥**

तो सर्व भूत प्राण्यांचा नियंता आहे ॥ ३४ ॥

करितां त्याचा दंड उग्र आहे, आणि तो न्यायी असल्यानें कोणाचा पक्षपात करील असें नाहीं, यासाठीं लोकनियम, राजनियम आणि सृष्टिनियम यांनीं जसें बनेल तसें माहितगार होऊन, त्याप्रमाणें वागावें; त्यामुळें बहुत-करून दुःख न होतां सुख होण्याचा संभव असतो. याप्रमाणें आचरण करून सर्वांतर्यामी, सर्वशक्तिमान् ईश्वरास आपल्या हृदयामध्यें नित्य पाहून, चित्त

स्थिर करण्याचा अभ्यास करावा; कारण चित्ताच्या स्थिरतेमुळेंच आनंद भासतो. करितां यजुर्वेदाच्या कठोपनिषदांत सांगितलें आहे कीं,

**एको वशी सर्व भूतान्तरात्मा एकं रूपं बहुधा यः करोति ।**
**तमात्मस्थं येऽनुपश्यन्ति धीरास्तेषां सुखं शाश्वतं नेतरेषाम् ॥ ३५ ॥**

जो एक, जगतास वश ठेवणारा व सर्वभूतांचा अंतरात्मा आहे; आणि जो एक वस्तूस अनेक प्रकारें करतो; त्यास जे धीर मनुष्य आपल्या हृदयामध्यें अनुभवितात, त्यांस आनंदरूप नित्यसुखाची प्राप्ति होते, इतरांस होत नाहीं ॥ ३५ ॥

**नित्यो नित्यानां चेतनश्चेतनानामेको बहूनां यो विदधाति कामान् ।**
**तमात्मस्थं येऽनुपश्यन्ति धीरास्तेषां शान्तिः शाश्वती नेतरेषाम् ३६**

जो नित्यांचा नित्य व चेतनांचा चेतन आहे, आणि सर्व प्राण्यांस त्यांच्या कर्मांची फळें देतो, त्यास जे धीर मनुष्य आपल्या हृदयामध्यें अनुभवितात, त्यांस नित्य शांतीचा लाभ होतो, इतरांस होत नाहीं ॥ ३६ ॥

या प्रकारें प्रमाणसहस्रीच्या विचारप्रकरणापैकीं प्राणिसुखदुःखहेतुनिरूपण समाप्त.

॥ इति विचारप्रकरणम् ॥

**॥ समाप्तोऽयं ग्रन्थः ॥**